


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

नवभारत
मासिक
द्वारा/ प्राज्ञ छापखाना
३१५/ गंगापुरी
वाई
जिल्हा सातारा
४१२८०३

NAVABHARAT
MAGEZINE
C/o The Pradnya Press
315/Gangapuri
WAI
Dist/Satara
412803

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत व
प्राज्ञपाठशाला मंडळ वाई, संचालित मासिक

# नवभारत

## व्यावहारिक मराठी विशेषांक

वर्ष ३४ । अंक ११-१२ । ऑग.-सप्टें. १९८१
किंमत १० रुपये । वार्षिक वर्गणी १८ रुपये

---

अध्यक्ष व विश्वस्त
तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

---

संपादक
मे. पुं. रेगे

---

अभ्यागत संपादक
अशोक रा. केळकर

---

अभ्यागत कार्यकारी संपादक
विजया चिटणीस-माडगूळकर
कल्याण काळे

---

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# आभार

'नवभारता'च्या जुलै १९८१ च्या अंकात प्रसिद्ध केल्यानुसार ऑगस्ट-सप्टेंबर १९८१ असा जोडअंक 'व्यावहारिक मराठी विशेषांक' म्हणून वाचकांच्या हाती देताना आम्हास आनंद होत आहे.

या विशेषांकासाठी ज्या व्यक्तींनी व संस्थांनी जाहिराती मिळवून देण्याच्या संदर्भात परिश्रम घेतले व ज्या व्यक्तींनी व संस्थांनी प्रत्यक्ष जाहिराती देऊन आर्थिक साहाय्य केले, त्यांचे आम्ही ऋणी आहोत.

या विशेषांकासाठी सुंदर व समर्पक असे मुखपृष्ठ करून दिल्याबद्दल श्री. सुभाष अवचट यांचे मनःपूर्वक आभार !

---

व्यवस्थापकीय पत्रव्यवहाराचा पत्ता
श्री. ग. दिक्षीत,
व्यवस्थापक, नवभारत मासिक,
द्वारा : दि प्राज्ञ प्रेस, वाई (जि. सातारा)

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# कै. ज. पां. नाईक

## एक गांधीवादी शिक्षणतज्ज्ञ



श्री. ज. पां. नाईक यांच्या रविवार दि. ३० ऑगस्ट रोजी झालेल्या निधनाने राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यात सक्रिय भाग घेतलेल्या आणि गांधीवादाने संस्कारित झालेल्या विचारवंतांच्या आणि कार्यकर्त्यांच्या पिढीशी असलेला आणखी एक दुवा निखळला. महाराष्ट्रातील आणि भारतातील सुशिक्षित वर्गाला नाईक हे 'जे. पी.' ह्या, जवळीक दाखविणाऱ्या, नावाने परिचित होते. आणि त्यांच्या खास परिचितांत त्यांचा उल्लेख 'नाईकसाहेब' असा होत असे. नाईकसाहेबांचे हे खास परिचित कोल्हापूरात आणि गडहिंग्लज तालुक्यात, महाराष्ट्राच्या खेडोपाडी, भारतातील सर्व राज्यांतील विद्यापीठांत, शिक्षणखात्यात, मंत्रालयात, संशोधनसंस्थांत, भारताच्या राजधानीतील सर्व राष्ट्रीय संस्थांत, केंद्रीय मंत्रालयात, जगभरच्या संस्थांत, पहिल्या जगातील, दुसऱ्या जगातील आणि तिसऱ्या जगातील सर्व देशांत पसरले होते. त्यांच्या खास परिचितांचा हा वर्ग किती मोठा आणि विविध होता ह्याची कल्पना नाईकसाहेब आणि त्यांच्या पत्नी यांच्याशिवाय कुणालाही बहुधा नसेल. परस्परांना अपरिचित असलेले, पण परस्परांच्या कार्याविषयी आदर बाळगणारे, जगाच्या दोन टोकांना राहणारे समाजशास्त्रज्ञ, वैज्ञानिक, शिक्षणवेत्ते नाईकसाहेबांचे जिवलग मित्र असत. नाईकसाहेब त्या दोघांमधील दुवा होते ही कल्पनाही त्यांना नसे.

नाईकसाहेबांच्या खास परिचितांचा हा वर्ग एवढा विस्तृत होता, तरी त्याच्यात जवळिकीच्या आणि अंतराच्या श्रेणी नव्हत्या. नाईकसाहेबांना सर्वच सारखेच जवळचे होते आणि आपल्यासारख्याच नाईकसाहेबांना जवळच्या असलेल्या इतर असंख्य व्यक्ती असल्या, तरी आपल्यापेक्षा अधिक जिव्हाळ्याचा कुणी असेल अशी कुणाची भावना नसे. तेव्हा ह्या वर्गात श्रेणी नव्हत्या, फक्त उपवर्ग होते. एका उपवर्गाचा खास उल्लेख केला पाहिजे. तो म्हणजे स्वातंत्र्याच्या आंदोलनात ज्यांनी उमेदवारी केली होती अशा महाराष्ट्रातील सर्व पक्षांच्या आणि विचारप्रणालींच्या राजकीय आणि सामाजिक कार्यकर्त्यांचा वर्ग. ह्या सर्वांना, महाराष्ट्रापुढील व भारतापुढील आर्थिक, सामाजिक व राजकीय समस्यांविषयी मोकळेपणे विचारविनिमय करता यावा म्हणून पक्षनिरपेक्ष असे व्यासपीठ कोल्हापूरच्या कोरगांवकर धर्मादाय संस्थेने उपलब्ध करून दिले होते. ह्या उपक्रमात नाईकसाहेबांचा सिंहाचा वाटा होता. स्वातंत्र्यानंतर उदयाला आलेल्या नव्या पिढीतील राजकीय व सामाजिक कार्यकर्त्यांशी असेच जिव्हाळ्याचे संबंध प्रस्थापित करण्याचे त्यांचे प्रयत्न अखेरपर्यंत चालू होते.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

नाईकसाहेब अंतःप्रेरणेनें आणि संस्कारांनी गांधीवादी होते, पण गांधीवादी विचारवंतांची किंवा कार्यकर्त्यांची जी रूढ प्रतिमा आहे तिच्याहून त्यांचे बौद्धिक व्यक्तिमत्त्व आणि कार्यपद्धती वेगळी होती. त्यांची सामाजिक ध्येये आणि वैयक्तिक नैतिक आदर्श गांधीवादी होते. पण त्यांनी गांधीवादाचा संप्रदाय बनविला नाही. आज विशेषतः अविकसित देशांपुढे आणि सबंध मानवजाती-पुढे ज्या बिकट समस्या आहेत, त्यांच्या संदर्भात गांधीप्रणीत मूल्यांना आणि समाजधारणेच्या तत्त्वांना नवीन आशय दिला आणि त्यांचे सामाजिक परिवर्तनाच्या कार्यक्रमात रूपांतर केले. गांधीवादी नैतिक वृत्तीला त्यांनी वैज्ञानिक दृष्टिकोणाची जोड दिली आणि आज माणसांना भेडसावीत असलेल्या समस्यांचे शास्त्रशुद्ध पद्धतीने विश्लेषण करून त्या सोडविण्यासाठी ह्या मूल्यांना आणि तत्त्वांना अनुसरणारे रेखीव आणि व्यवहार्य असे कार्यक्रम आखले. असे कार्यक्रम आखण्याच्या आणि पार पाडण्याच्या प्रयत्नांना सातत्य लाभावे म्हणून आधुनिक पद्धतीच्या आणि शिस्तीच्या संस्था उभारल्या. त्यांची संस्थांवर श्रद्धा होती. संस्थांमुळे कामाला सातत्य लाभते, स्थैर्य लाभते म्हणूनच केवळ नव्हे, संस्थेशी तादात्म्य पावून व्यक्तीला आपल्या दोषांचे व उणीवांचे विसर्जन करता येते आणि आपल्या अंगचा चांगुलपणा सार्वजनिक कार्याला वाहता येतो म्हणूनही. आदर्श संस्था उभारण्याचा, असलेल्या संस्थांना अधिकाधिक आदर्श रूप देण्याचा प्रयत्न करीत राहणे आणि अशा संस्थांत सुसंवादीपणे काम करणे हा शिक्षणाचाच एक आवश्यक भाग आहे असे ते मानीत.

'ज्याची प्रेरणा प्रेमात असते, आणि ज्ञान ज्याचे मार्गदर्शन करीत असते ते जीवन म्हणजे चांगले जीवन होय' असे बर्ट्रांड रसेल यांचे एक वचन आहे. नाईकसाहेब नेमक्या ह्या अर्थाने चांगले जीवन जगले.

त्यांना कामाचा हव्यास होता. ते कामात अखंड गढलेले असत. पण ते कधी एकांडेपणे कामे करीत नसत. त्यांच्या कामाचे स्वरूप सामाजिक होते आणि म्हणून ह्या कामाची बैठकही सामाजिक असे. त्यांना यथार्थपणे प्रतिभावंत म्हणता येईल अशा तोडीची बुद्धिमत्ता, कल्पकता आणि उद्योगशीलता त्यांच्या ठिकाणी होती. ह्या आपल्या समर्थतेचा प्रत्ययही त्यांना होता. पण तरीही त्यांनी आपल्या कामाला कटाक्षाने सांघिक, संस्थात्मक स्वरूप दिले. अनेकांना सोबत घेऊन त्यांच्या सहकार्याने, अनेकांतील एक म्हणून त्यांनी काम केले. ह्या अनेकांतील त्यांचे, स्थान बहुधा प्रथमचे असे. जगातल्या क्रियाशील विचारवंतांचा कोणताही गट घेतला असता, तरी त्याच्यात नाईकसाहेबांना दुसरे स्थान घ्यावे लागले असते अशी कल्पना करणे कठीण ठरेल. सामाजिक उद्दिष्टांसाठी सांघिक प्रयत्न झाले पाहिजेत, हा सामाजिक उद्दिष्टे साधण्याचाच नव्हे, तर व्यक्तींची गुणवत्ता वाढविण्याचा एकमेव मार्ग आहे अशी त्यांची श्रद्धा होती. म्हणून संघटनांमध्ये आणि संस्थांमध्ये त्यांनी स्वतःच्या वैयक्तिक कर्तृत्वाचे विसर्जन केले.

आणि म्हणून ते सतत सहकाऱ्यांच्या, कामाला जोडता येतील अशा माणसांच्या शोधात असत. त्यांच्या कामांचा पसारा अवाढव्य होता म्हणून त्यांच्या सहकाऱ्यांची संख्याही अवाढव्य होती. पण नाईकसाहेबांचे जे सहकारी झाले ते त्यांचे सांगातीही बनले. नाईकसाहेब कुठेही असले, तरी हे सांगाती सदैव त्यांच्या मनात असत. ह्या माणसांची दाटी त्यांच्या मनात होणार नाही; प्रत्येकाचे व्यक्तित्व वेगळे, त्याच्या गरजा, त्याच्या आवडीनिवडी ह्यांच्यासह वेगळे राहील एवढे त्यांचे मन विशाल होते. त्यांची कामे अखेरीस ज्या माणसांसाठी होती, त्या माणसांचीच ती प्रति-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

निधी होती. प्रत्येक माणसाच्या व्यक्तित्वाची कदर, प्रत्येक व्यक्तीच्या कल्याणाविषयी जिव्हाळा हे नाईकसाहेबांच्या जीवनाचे सूत्र होते. जी माणसे त्यांना भेटली, त्या प्रत्येकाशी झालेल्या त्यांच्या आचरणात ते प्रतिबिंबित झाले. जी भेटली नाहीत, त्यांच्या बाबतीत नाईकसाहेबांचा नाइलाज झाला.

शिक्षण आणि आरोग्यसेवा ही नाईकसाहेबांच्या व्यासंगाची आणि जीवनकार्याची प्रमुख क्षेत्रे होती. पण एका अर्थाने हे प्रारंभबिंदू होते. ह्या क्षेत्रातील समस्यांचा पाठपुरावा ज्या ज्या दिशांनी करता येईल त्या सर्व दिशांनी केला आणि ह्या संचारातून हे सर्व प्रकारचे ज्ञान त्यांनी गोळा केले त्याचा विनियोग ह्या समस्यांकडे अधिक सम्यक् आणि व्यापक दृष्टीने पाहता यावे, त्या सोडविण्यासाठी अधिक अर्थपूर्ण आणि परिणामकारक कार्यक्रम आखता यावे यासाठी केला. १९४७ नंतरचे त्यांचे आयुष्य हा त्या कालखंडातील भारतीय शिक्षणाच्या इतिहासाचा अविच्छेद्य भाग आहे. पण विशेषत: शिक्षण आयोगाचे (१९६५–६६) सदस्य-सचिव म्हणून त्यांनी केलेली कामगिरी केवळ अविस्मरणीय आहे. ह्या आयोगाच्या सबंध अहवालावर, त्यात आखलेल्या धोरणांवर आणि त्याच्या लेखनशैलीवर, नाईकसाहेबांची वैयक्तिक छाप आहे. जवळजवळ तितकीच अविस्मरणीय ठरेल अशी त्यांची दुसरी कामगिरी म्हणजे ' इंडियन काउन्सिल ऑफ सोशल सायन्स रिसर्च ' ह्या मंडळाचे पहिले सदस्य-सचिव म्हणून त्याला त्यांनी दिलेले रूप आणि त्याच्यात त्यांनी ओतलेले चैतन्य. ह्या मंडळाद्वारे त्यांनी भारतीय सामाजिक वैज्ञानिकांना एका परिवारात संघटित केले आणि पूर्वी एकांडेपणे चाललेल्या सामाजिक संशोधनाला सुसूत्र केले, त्याला महत्त्वाच्या सामाजिक समस्यांशी संलग्न केले आणि सुव्यवस्थित उद्दिष्टे प्राप्त करून दिली.

हे सर्व असूनही नाईकसाहेबांचे ध्यान खेड्यापाड्यांतून पसरलेल्या, गरिबीमुळे शाळेत जाऊ न शकलेल्या, शाळेतून गळलेल्या कुंठित मुलामुलींच्या शिक्षणाकडे लागले होते. प्राथमिक शिक्षणाच्या सार्वत्रिकीकरणाचा परिणामकारक मार्ग शोधून काढणे हे त्यांचे प्रमुख जीवितकार्य होते. हा मार्ग गवसत आहे अशी आशा दिसू लागली असतानाच त्यांना अर्ध्यावरून जावे लागले. प्राथमिक शिक्षणाच्या क्षेत्रात गोपाळ कृष्ण गोखले, महात्मा गांधी, नाईकसाहेबांचे ज्येष्ठ मित्र रामभाऊ परुळेकर आणि स्वत: नाईकसाहेब अशी परंपरा आहे.

प्राज्ञपाठशाळेचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्याशी त्यांचे जिव्हाळ्याचे संबंध होते. शास्त्रीजींचा ८० वा वाढदिवस सार्वजनिक समारंभपूर्वक साजरा व्हावा ही कल्पना आणि योजना नाईकसाहेबांची होती. शास्त्रीजींसारख्या जन्मभर व्यासंगाला आणि सामाजिक प्रबोधनाच्या कार्याला वाहून घेतलेल्या व्यक्तीचा सार्वजनिक रीतीने सन्मान करणे हासुद्धा प्रबोधनाच्या कार्यक्रमाचाच भाग आहे अशी नाईकसाहेबांची धारणा होती. ह्या निमित्ताने महाराष्ट्राच्या प्रत्येक जिल्ह्यातून प्राज्ञपाठशाळेसाठी आर्थिक साहाय्य गोळा करावे, यासाठी मोठ्या देणग्या गोळा करू नयेत, तर सर्वसामान्य माणसांना प्राज्ञपाठशाळेच्या कामाचे स्वरूप व महत्त्व समजावून सांगावे आणि त्यांच्याकडून ज्या अल्पस्वल्प देणग्या मिळतील, त्या स्वीकारून त्यांना ह्या कामात गोवून घ्यावे अशी योजना त्यांनी आखली होती. प्राज्ञपाठशाळेला आधुनिक पद्धतीच्या संशोधनात सहभाग घेता यावा, तिच्याजवळ पारंपरिक ज्ञानाचा जो अतुलनीय साठा आहे त्याचा लाभ आधुनिक विद्वानांना व्हावा म्हणून पाठशाळेचे पुणे येथे केंद्र स्थापन करण्याची योजनाही

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाईकसाहेबांचीच होती. ह्या केंद्राला नाईकसाहेबांच्या कल्पनेप्रमाणे भव्य आणि चैतन्यशील स्वरूप द्यायला प्राज्ञपाठशाळा बांधलेली आहे.

आपल्या विद्वत्तेचे आणि कार्यमग्नतेचे नाईकसाहेबांना कधी ओझे झाले नाही. ह्याचे एक कारण त्यांची विनोदी वृत्ती. पण दुसरे, कदाचित अधिक महत्त्वाचे कारण असे, की त्यांची विश्वाच्या चांगुलपणावर आणि म्हणून माणसातल्या चांगुलपणावर खोल श्रद्धा होती. लौकिक अर्थाने नास्तिक असूनही ह्या अर्थाने ते धार्मिक होते. व म्हणून कितीही अपयशे आली, तरी ते खचले नाहीत. त्यांची वृत्ती सदैव ताजी टवटवीत, प्रसन्न राहिली.

मृत्यूची छाया त्यांच्या देहावर पडली आणि तो जर्जर झाला. पण त्यांच्या मनावर कधी पडली नाही. ते धैर्याने मृत्यूला सामोरे गेले हे म्हणणेही गैर ठरेल, कारण धैर्यामागे असणारा ताण त्यांच्या मनाला कधी बाधला नाही. त्यांनी व्याधीला आणि मृत्यूला तोंड दिले नाही. अलिप्तपणे, शांतपणे मान्यता दिली. सर्व जगाला शुभेच्छा देत ते जगात विलीन झाले. ' प्रज्ञावंत जीवनाचे चिंतन करतो, मृत्यूचे नव्हे' ह्या स्पिनोझाच्या उक्तीचा अर्थ त्यांच्या अखेरच्या दिवसांनी विशद केला.

नाईकसाहेब आणि त्यांच्या पत्नी चित्राताई यांचे सहजीवन हे खरेखुरे सहजीवन होते. " And on that day I shall be in my Father and you in me and I in you." पण हा एक विशिष्ट दिवस नव्हता, ती उभयतांच्या जीवनाची धाटणी होती.

' नवभारत ' नाईकसाहेबांना कृतज्ञतापूर्वक श्रद्धांजली वहात आहे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत : व्यावहारिक मराठी विशेषांक : ऑगस्ट-सप्टेंबर १९८१


| | | |
|---|---|---|
| अभ्यागत संपादकांचे मनोगत | अशोक रा. केळकर | एक |
| 'व्यावहारिक मराठी : गरज, मागणी, पूर्ती' या चर्चासत्राविषयी | सुमन बेलवलकर | पाच |
| भाषा व राष्ट्रीयत्व | लक्ष्मणशास्त्री जोशी | सात |
| गद्य : समाजपरिवर्तनाचे एक वाहन आणि साधन | मे. पुं. रेगे | १ |
| मराठी भाषेच्या विकासाविषयी | अ. रा. कामत | १९ |
| कायदा आणि मराठी | नरेंद्र चपळगावकर | ३१ |
| कायद्यासंबंधी लोकांचे व विद्यार्थ्यांचे शिक्षण | सत्यरंजन साठे | ३५ |
| डॉक्टर आणि अशिक्षित रुग्ण यांचा संवाद | सुभाष पत्की | ३७ |
| कारखान्याच्या आवारातील भाषा | वि. नी. पेंडसे | ४० |
| जाहिरातव्यवहार आणि मराठी | र. कृ. जोशी | ४३ |
| व्यापार–उद्योग आणि मराठी | प्र. चिं. शेजवलकर | ४७ |
| प्रसारमाध्यमे आणि बोलभाषा | व्यंकटेश माडगूळकर | ५० |
| वाचिक अभिनय : एक अभ्यासक्रम | कमलाकर सोनटक्के | ५५ |
| नभोनाट्यरूपांतर आणि नाट्यरूपांतर : भाषिक प्रश्न | पुष्पा भावे | ६२ |
| प्रशासकीय मराठी | गीता सुभाष भागवत | ६७ |
| ग्रामीण उपेक्षित वर्गात काम करणारा कार्यकर्ता व मराठी | अनिल अवचट | ८० |
| समाजनिरीक्षकांच्या वाटेतील भाषाव्यवहाराचे खाचखळगे | रा. प. नेने | ८६ |
| मर्यादित शब्दसंग्रह व त्याचे परिणाम | स. ह. देशपांडे | ९१ |
| वृत्तपत्रे व मराठी | गोविंद तळवलकर | ९३ |
| अनुवादकांचे प्रशिक्षण | प्र. ना. परांजपे | ९५ |
| प्रौढ साक्षरांसाठी करायच्या लेखनाची भाषा | इरगोंडा पाटील | १०३ |
| व्यावहारिक मराठी : गरज आणि मागणी | ह. मो. मराठे | १०७ |


अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत : व्यावहारिक मराठी विशेषांक : ऑगस्ट-सप्टेंबर १९८१


| | | |
|---|---|---|
| अध्यापन : भाषेचे आणि साहित्याचे | ना. गो. कालेलकर | १११ |
| अमराठी भारतीयांसाठी मराठी भाषा | कल्याण काळे | ११७ |
| व्यावहारिक मराठीचे परभाषिकांना अध्यापन | विजया चिटणीस-माडगूळकर | १२२ |
| निरंतर शिक्षण आणि व्यावहारिक मराठी | भालचंद्र फडके | १२८ |
| व्यावहारिक इंग्रजी : परिचय व बोध | तिलोत्तमा दासवाणी | १३१ |
| व्यावहारिक हिन्दी | क्रान्तिप्रकाश मिश्र | १४१ |
| मातृभाषेसाठी दुवा : पाठ्यक्रम | राज्यश्री सुब्बय्या | १४५ |
| व्यावहारिक मराठीचा शालेय पाया : इयत्ता १ ते ७ | रा. सो. सराफ | १४८ |
| व्यावहारिक मराठी : ८ वी ते १२ वी | वसंत दावतर | १५२ |
| महाविद्यालयीन अध्यापन आणि मराठी माध्यम | प्र. वा. ऊर्ध्वरेषे | १५९ |
| व्यावहारिक मराठी आणि विद्यापीठीय चौकट | शां. ब. मुजुमदार | १६४ |
| चर्चासार | सुमन बेलवलकर व कल्याण काळे | १६७ |
| लेखक-परिचय | | १७५ |
| लेखकसूची व लेखसूची (वर्ष ३४, ऑक्टो. १९८० ते सप्टें. १९८१) | अ. ना. ठाकूर | १७७ |
| जाहिरात-विभाग | | १८५ |




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# अभ्यागत संपादकांचे मनोगत

राजभाषा-वर्षामध्ये निघालेला शासकीय मराठीचा प्रश्न आणि थोड्या नंतर विद्यापीठीय शिक्षणातील विषय आणि माध्यम म्हणून मराठीचे स्थान याबद्दल माजलेला वाद या निमित्ताने निरनिराळ्या विचारसरणी आणि मुद्दे विचारवंतांसमोर आणि लोकांसमोर आले. ह्यातून एक गोष्ट स्पष्ट झाली की, या सर्वच विषयाचा व्यापक, समतोल, आणि सखोल रीतीने विचार करण्याची गरज आहे. केवळ तात्कालिक निमित्त आणि उद्दिष्ट डोळ्यांसमोर ठेवायचे आणि नंतर वाफ निघून गेली म्हणजे पुन्हा झोपी जायचे हा आपला नेहमीचा खाक्या सोडला पाहिजे. या दृष्टीने 'व्यावहारिक मराठी' हा विषय निवडून डेक्कन कॉलेजमधील पश्चिम विभागीय भाषा केंद्र येथे एक चर्चासत्र योजण्यात आले. चर्चासत्र संपतेवेळी चर्चा उद्बोधक झाली आणि महाराष्ट्रातील लोकांसमोर हा विषय छापील स्वरूपात मांडला जावा असे अनेकांनी बोलून दाखवले. साहजिकच, 'नवभारत'च्या संपादकांकडून या विषयावर एक विशेष अंक पुस्तिकारूपाने काढण्याचा प्रस्ताव आला तेव्हा अभ्यागत संपादकाचे काम अंगावर घ्यायला मी आनंदाने संमती दिली. मात्र या प्रकाशनाकडे केवळ होऊन गेलेल्या चर्चासत्राचे इतिवृत्त म्हणून न पाहता आणखी चर्चेची नांदी म्हणून पाहिले जावे. विषयाची सांगोपांग चर्चा इथे अभिप्रेत नाही, तर काही महत्त्वाच्या मुद्द्यांची चर्चा आणि काही थोड्या क्षेत्रांचे उदाहरणादाखल निरीक्षण एवढा मर्यादित हेतू इथे आहे. त्यामुळे वाचकांच्या मनात विचारमंथन चालू होईल आणि त्यातून विधायक कार्यक्रम पुढे येतील अशी उमेद आहे. या संपादकीयात विषयाचे एकंदर स्वरूप आणि व्याप्ती याचे दिग्दर्शन केले आहे. त्यामुळे बाकीचे लेख वाचताना सबंध विषयाचे भान रहायला मदत होईल अशी अपेक्षा आहे.

मराठी भाषिकांना पूर्वी जसा संस्कृतचा आधार लागत असे, तसा आज इंग्लिशचा आधार लागतो. उदाहरणार्थ, व्यावहारिक मराठी असा शब्दप्रयोग केल्याबरोबर व्यवहार आणि व्यावहारिक या शब्दांचे मराठीमधले नेहमीचे अर्थ काय या दिशेने मंडळी विचार करत नाहीत, तर हा शब्दप्रयोग कुठल्या इंग्लिश शब्दप्रयोगाचे भाषांतर असला पाहिजे आणि तो functional Marathi याचे भाषांतर म्हणून असला पाहिजे, functional English याचा अर्थ कोणता–असल्या दिशेने मग विचार होऊ लागतो. आणि तळापासून विचार बांधत जाण्याची एक संधी हुकते. तसे याठिकाणी होऊ नये अशी माझी मनापासून इच्छा आहे.

## समाजाचा त्रिविध भाषाव्यवहार

वक्ता श्रोत्याशी निरनिराळ्या निमित्ताने आणि निरनिराळ्या संदर्भात बोलतो. त्याचप्रमाणे लेखक पत्र, परिपत्रक, लेख, पुस्तक, बातमीपत्र इत्यादी रूपाने त्या त्या वाचकासाठी लिहितो. श्रोता आणि वाचक त्यांना जमेल त्याप्रमाणे वक्त्याचे किंवा लेखकाचे मनोगत समजावून

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

घेतात. म्हणजेच वक्त्यापासून किंवा लेखकापासून चालू झालेले संज्ञापनाचे कार्य कमी-अधिक यशस्वी स्वरूपात श्रोत्यापर्यंत किंवा वाचकापर्यंत येऊन पुरे होते. एखाद्या समाजामध्ये वेळोवेळी भाषेच्या द्वारे हे जे संज्ञापन होते, त्याला एकत्रितपणे त्या समाजाचा भाषाव्यवहार असे म्हणता येईल. समाजातला भाषाव्यवहार साधारणपणे तीन प्रकारचा असतो असे दिसून येते.

(१) व्यवहारसापेक्ष भाषाव्यवहार
(२) परिभाषासापेक्ष भाषाव्यवहार
(३) शैलीसापेक्ष भाषाव्यवहार

यांपैकी पहिला म्हणजे आपल्या रोजच्या व्यवहारात भाषेचा जो व्यवहारसापेक्ष उपयोग होतो तो, तिचा सर्वांत ठळक आणि मध्यवर्ती उपयोग आहे, हे उघडच आहे. अशा व्यवहारात शब्दांच्या अर्थांना निवळ कडा नसतात, वाक्यरचना काटेकोर नसते. हा ढोबळपणा आणि मोघमपणा मंडळींच्या समजूतदारपणावर विसंबून आपण चालवून घेतो. काही वेळा तर तो पथ्यावरही पडतो ! या मध्यवर्ती भाषाव्यवहाराकडून आपण दोन विरुद्ध दिशांना वाटचाल करू शकतो आणि हा ढोबळपणा कमी करू शकतो. गैरसमजाला जागा ठेवायचीच नाही, मंडळींच्या समजूतदारपणावर न विसंबता त्यांच्या एका विशिष्ट क्षेत्रातील जाणकारीवर भिस्त ठेवायची आणि समोरच्या मजकुरातून एकच एक अर्थ निघेल अशा तजविजीत रहायचे – या दिशेने आपण गेलो तर विज्ञान, तंत्रज्ञान, कायदा, विशिष्ट खेळ इत्यादी क्षेत्रांत चालणाऱ्या परिभाषा-सापेक्ष व्यवहाराकडे आपण येतो. असा भाषाव्यवहार त्या त्या विशिष्ट परिभाषेभोवती फिरत राहतो. उलटपक्षी, पारिभाषिक पूर्वसंकेतांवर भिस्त न ठेवता भाषिक संदर्भावर भिस्त ठेवली आणि या संदर्भातूनच शब्दांचे आणि वाक्यांचे अर्थ आपल्या मनोगताला अनुसरून नव्याने घडवीत गेलो, समोरच्या मजकुरातून नवनव्या अर्थांची वलये निघाली तर त्यात आनंद मानला तर शैलीसापेक्ष भाषाव्यवहाराकडे आपण येतो. कविता हे त्याचे उत्तम उदाहरण आहे. तसेच कथा, नाटक, रंगलेले कीर्तन, श्रोत्यांना खिळवून ठेवणारे वक्तृत्वपूर्ण भाषण, आकर्षक जाहिरात हीही अशा शैलीसापेक्ष भाषाव्यवहाराची उदाहरणे म्हणता येतील. सारांश, कोणत्याही जिवंत आणि समृद्ध भाषेचे व्यवहारसापेक्ष, परिभाषासापेक्ष, आणि शैलीसापेक्ष असे तीनही प्रकारचे उपयोग होतात. ह्या तीनही प्रकारांतून तिचे पोषण होते. उदा. परिभाषासापेक्ष इंग्लिश-मधून व्यावहारिक इंग्लिशमध्ये a difference of degree and not of kind, the survival of the fittest, in geometrical progression, inferiority complex, bad money drives out good money यांसारखे शब्दप्रयोग उतरतात. तसेच शैलीसापेक्ष इंग्लिशमधून व्यावहारिक इंग्लिशमध्ये to be or not to be, you too Brutus, cannot suffer fools gladly, a grief ago, not with a bang but with a whimper यांसारखे शब्दप्रयोग येतात.

मराठी भाषाव्यवहाराकडे पाहिले तर काय दिसते ? पहिल्यांदाच आपल्याला कबूल केले पाहिजे की, इंग्लिशच्या तुलनेने मराठीची गद्याची परंपरा पुरेशी सातत्यपूर्ण आणि समर्थ नाही. प्राचीन मराठी गद्यामध्ये महानुभाव गद्य, बखरी आणि कैफियती, आणि शासकीय पत्रे आणि दस्तऐवज अशा सुटया आणि मर्यादित परंपरा आहेत. अर्वाचीन मराठीत ललितेतर गद्य पुरेसे पोसले गेले नाही. आजही मराठी प्रकाशन-व्यवहाराची चर्चा झाली की, मुख्यतः ललित साहित्य आणि शालेय पाठ्यपुस्तके यांच्याभोवतीच लक्ष घोटाळत राहते. बंगालमध्ये शिक्षणात अनौपचारिकरीत्या इंग्लिश आणि बांगला अशा मिश्र माध्यमाचा उपयोग गेली


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पन्नासएक वर्षे चालू असल्यामुळे आणि बांगला भाषेच्या अभिमानापोटी इंग्लिश भाषेची उपेक्षा न झाल्यामुळे दोन गोष्टी झाल्या. एक म्हणजे बांगला लेखकांनी इंग्लिशमध्ये आणि बांगलामध्ये भरपूर लिहिले. आणि दुसरे म्हणजे बांगला वाचकांनी दोन्ही भाषांतून वाचले. महाराष्ट्रामध्ये मात्र आपले बौद्धिक जीवन पूर्णतः इंग्लिशमध्ये जगणारा किंवा पूर्णतः मराठीत जगणारा अशी सोयीची वाटणारी, पण घातुक ठरलेली फाळणी झालेली दिसते. याचा परिणाम रोजच्या व्यवहारसापेक्ष मराठीवर झालेला दिसतो. शैलीसापेक्ष मराठीचा परिणाम तिच्यावर नको इतका दिसतो. उपरे अलंकार मिरवल्याशिवाय विचार निखळपणे मांडण्याची आणि ग्रहण करण्याची क्षमताच नाहीशी होते की काय, असे वाटू लागले आहे. उलट परिभाषासापेक्ष भाषाव्यवहाराचा रोजच्या व्यवहारसापेक्ष मराठीवर पाहिजे तेवढा परिणाम दिसत नाही.

'व्यावहारिक मराठी' असा विषय चर्चेसाठी घेताना ही परिस्थिती माझ्यासमोर उभी होती आणि तिच्यावर काय उपाय करता येईल हा विचार मनाला सतावू लागला. किंबहुना, ही चर्चा म्हणजे या उपाययोजनेतीलच पहिले पाऊल असे मी मानतो. मराठीमधला परिभाषा-सापेक्ष भाषाव्यवहार (उदा. व्यावसायिक, प्रशासकीय, विद्यापीठीय) आणि व्यवहारसापेक्ष भाषाव्यवहार (उदा. अनौपचारिक चर्चा, सार्वजनिक वक्तृत्व, वृत्तपत्रे) यांची आजची स्थिती कशी आहे हे पहायला पाहिजे. ती स्थिती सुधारायची तर कोणत्या गरजा समाधानकारक रीतीने पुऱ्या होणे जरूर आहे याची नोंद घ्यायला हवी. यापुढची पायरी म्हणजे या गरजा संबंधित लोकांना कशा जाणवतील आणि त्या लोकांकडूनच सुधारणांची मागणी कशी येईल याचा विचार करणे. वरून लादलेल्या सुधारणा कितीही चांगल्या असल्या, तरी त्या मूळ धरत नाहीत आणि अपेक्षित परिणाम साधत नाही असा अनुभव आहे (उदा. उस्मानिया विद्या-पीठात निजामशाहीने लादलेल्या उर्दू माध्यमाचा फसलेला प्रयोग). लोकशाहीमधले परिवर्तन गरज, मागणी, आणि पूर्ती असे दुवे जुळूनच घडते आणि असे परिवर्तन टिकाऊ आणि हित-कारक ठरते.

## गरज, मागणी, आणि पूर्ती

गरज, मागणी, आणि पूर्ती ही साखळी जरी अखंड असली, तरी चर्चेसाठी काही विभागणी करावी लागते. यानंतर आलेल्या लेखांमध्ये अशी कार्यविभागणी दिसेल. सुरवातीचे व्यापक समालोचन करणारे एकदोन लेख सोडले, तर नंतरचे लेख व्यावसायिक गरजांचा अधिक विचार करत आहेत. पाठोपाठ ज्या ठिकाणी व्यवसायाचा विचार इथे महत्त्वाचा नसून एकंदर सामाजिक गरजांचा विचार करायला हवा अशी क्षेत्रे निवडलेली आहेत. नंतर गरजांचे रूपांतर मागणीमध्ये कसे होईल याचा म्हणजे गरजांबद्दल लोकशिक्षण करण्याचा विचार येतो. सरतेशेवटी पूर्तीचा विचार आला. साहजिकच आपल्या शिक्षणाच्या चौकटीत आणि शिक्षणाच्या चौकटीबाहेर ही पूर्तीची उपाययोजना करावी लागेल. मुख्यतः, मराठी भाषा शिकवताना साहित्यावर वाजवीपेक्षा अधिक भर दिला जातो तो कमी करावा लागेल. पण हा केवळ नकारात्मक विचार झाला, मराठीच्या अध्यापनात साहित्याबरोबरच आणखी कशाकशावर भर द्यायचा याचाही विचार उरलेल्या लेखांमध्ये केलेला आढळेल. Functional English आणि त्याच्या अनुकरणाने व्यावहारिक हिंदी यांचा विचार अलीकडे होतो आहे. अर्थात हे दोन्ही परभाषाशिक्षणातील प्रयोग आहेत. व्यावहारिक मराठी मराठीभाषिकांना शिकवायचे, तर हा प्रयोग स्वभाषाशिक्षणातील असल्यामुळे इंग्लिशभाषी देशांमध्ये ती भाषा स्वभाषा म्हणून कशी शिकवतात याचाही तपास घेणे जरूर आहे. कदा-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चित त्यापासून आपल्याला काही बोध घेता येईल. हे लेख एकत्रित रूपाने मराठी वाचकां-पुढे मांडताना मनात ठेवलेला हेतू फलद्रूप झाला तर पुढील उपक्रम हाती घ्यावे लागतील.

( १ ) या चर्चेत राहून गेलेल्या विषयांचा विचार हाती घेणे. उदाहरणार्थ, सार्वजनिक वक्तृत्वातील मराठी.

( २ ) या चर्चेत येऊन गेलेल्या विषयांमध्ये अधिक तपशील भरणे. उदाहरणार्थ, कायदा आणि मराठी यांचा विचार करताना कायद्याच्या मसुद्याची भाषा, न्यायालयातील प्रत्यक्ष काम-काजाची भाषा, वकील आणि अशील यांच्यामधील संज्ञापन, कायद्याबद्दल मराठीतून समाजजागृती करण्यासाठी हाती घ्यायचे उपक्रम असे वेगवेगळे उपविषय ध्यानात आले. उद्या कायदा आणि मराठी असा स्वतंत्र परिसंवाद कुणाला घ्यावासा वाटला, तर त्यात आश्चर्य वाटायला नको.

( ३ ) व्यावहारिक मराठीचे औपचारिक आणि अनौपचारिक शिक्षण देण्यासाठी योग्य ते पाठ्यक्रम आखणे, हे पाठ्यक्रम राबवण्यासाठी शालेय आणि महाविद्यालयीन अध्यापकांचे जरूर ते प्रशिक्षण करणे. संदर्भ पुस्तके तयार करणे, आणि क्रमिक पाठ्यपुस्तके तयार करणे. उदाहरणार्थ, अशिक्षित रुग्ण आपली लक्षणे ज्या शब्दांत सांगतो, त्यांचे वैद्यकीय परिभाषेत भाषांतर पुरवणारी एक कोशपुस्तिका करायला पाहिजे अशी कल्पना चर्चेत पुढे आली.

( ४ ) मराठीत अनुवादाचे आणि ललितेतर गद्याच्या निर्मितीचे काम मोठ्या प्रमाणावर चालू व्हायला पाहिजे. त्यासाठी तऱ्हेतऱ्हेची मार्गदर्शक पुस्तके निघणे जरूर आहे. उदाहर-णार्थ, डेक्कन कॉलेज येथे मराठीमधील समानार्थी शब्दांचे विवेचन करणारा कोश तयार करण्यात येत आहे.

( ५ ) व्यावहारिक मराठीच्या प्रश्नाची जाणीव महाराष्ट्रात इतरांनाही आपापल्या जागी झाली असण्याची शक्यता आहे. काही मंडळी या दृष्टीने उपयुक्त कामही करत असतील. अशा सर्व प्रयत्नांची एकत्रित नोंद होणे जरूर आहे. यादृष्टीने अशा उपक्रमांची माहिती अनाठायी संकोच बाजूला ठेवून त्या त्या लोकांनी कळवल्यास मी आभारी होईन. त्यातून परस्पर सहकार्याची काही योजना हाती घेता येईल.

पाहुण्याने अंथरूण पाहून पाय पसरावेत. तेव्हा 'नवभारत'च्या संपादकांनी हा लेखसंग्रह प्रकाशित करण्याची संधी मला दिल्याबद्दल त्यांचे माझ्यातर्फे आणि अभ्यागत कार्यकारी संपादकांतर्फे मन:पूर्वक आभार मानून हे संपादकीय पुरे करतो.

अशोक रा. केळकर

## सूचना

ह्यापुढे येणाऱ्या लेखांमधील मते लेखकांची व्यक्तिगत मते आहेत. लेखक ज्यांच्याशी संबंधित आहे त्या संस्था किंवा शासकीय विभाग, अभ्यागत संपादक किंवा अभ्यागत कार्यकारी संपादक, चर्चासत्र घडवणारे डेक्कन कॉलेजमधील पश्चिम–विभागीय–भाषा–केंद्र, किंवा नवभारत मासिक त्यांच्याशी सहमत असतीलच असे नाही.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# ' व्यावहारिक मराठी : गरज, मागणी, पूर्ती ' या चर्चासत्राविषयी

भारतासारख्या बहुभाषिक देशात प्रादेशिक भाषांच्या शास्त्रशुद्ध शिक्षणासाठी आणि भाषा-शिक्षणाद्वारा राष्ट्रीय एकात्मता साधण्यासाठी म्हैसूरला ' भारतीय भाषा संस्थान ' ची स्थापना भारत-सरकारच्या शिक्षणमंत्रालयातर्फे झाली. प्रादेशिक भाषांच्या शिक्षणासाठी पुणे, भुवनेश्वर, पतियाळा, म्हैसूर, आणि सोलन याठिकाणी भाषाशिक्षण केंद्रे उभारण्यात आली. पुण्यातील पश्चिमविभागीय भाषा-केंद्रात सिंधी, गुजराती, आणि मराठी या भाषा परप्रांतांतून येणाऱ्या प्रशिक्षित माध्यमिक शिक्षकांना दहा महिन्यांच्या कालावधीत शिकवल्या जातात. या अभ्यासक्रमातून हे प्रशिक्षणार्थी त्या त्या भाषेचे शिक्षक बनून आपल्या शाळेत जाऊन ती भाषा आपल्या विद्यार्थ्यांना शिकवतात. पश्चिमविभागीय भाषाकेंद्राने आपल्या कार्याला या वर्षी दहा वर्षे पूर्ण केली. दहा वर्षांत केंद्रात अनुक्रमे १६४, ६४, आणि १९५ प्रशिक्षणार्थी मराठी, सिंधी, आणि गुजराती भाषा शिकून गेले. त्यांनी आत्मसात केलेल्या भाषा भारतातील बारा राज्यांमध्ये ११,७४३ विद्यार्थी शिकत आहेत.

आपल्या या मुख्य कार्यक्रमाबरोबरच केंद्राला भाषाविषयक आणि भाषेच्या अध्यापनविषयक प्रश्नांविषयी साहजिकच मनापासून आस्था आहे. स्वभाषेच्या, परभाषेच्या शिक्षणात जे जे प्रश्न उभे राहतात, त्यांविषयी चर्चासत्रे भरवून, स्वतः पाहणी करून, किंवा उपयुक्त साधनसामग्री पुरवून केंद्राने शैक्षणिक संस्थांना आपला मदतीचा हात नेहमीच पुढे केला आहे. उपयोजक भाषाविज्ञानातील आधुनिक संशोधन आणि भोवतालच्या परिसरातले भाषिक प्रश्न यांच्यामध्ये काही सांधेजोड करण्याचे कार्य पश्चिमविभागीय भाषाकेंद्र डेक्कन कॉलेजसारख्या गावापासून दूर असलेल्या परिसरात आपल्या मर्यादित सामर्थ्यानिशी करत आले आहे. आतापर्यंत भाषांतर, कवितेचे अध्यापन, सिंधी भाषेचे शिक्षण यांवर चर्चासत्रे केंद्राने यशस्वीरीत्या पार पाडली. यावर्षी दशवार्षिकाच्या निमित्ताने चार प्रमुख चर्चासत्रांचे आयोजन दि. २ फेब्रु. १९८१ पासून ७ फेब्रु. १९८१ पर्यंत डेक्कन कॉलेजमध्ये केले होते.

या चर्चासत्रांचे उद्घाटन २ फेब्रुवारी रोजी सकाळी १० वाजता डेक्कन कॉलेजच्या सभागृहात झाले. उद्घाटनाचे अध्यक्ष होते भारतीय भाषा-संस्थानाचे संचालक डॉ. देवीप्रसन्न पट्टनायक आणि प्रमुख पाहुणे होते तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी. पहिल्या चर्चासत्रासाठी केंद्राचे माजी प्रशिक्षणार्थी आमंत्रित केले होते. या नव्या भाषा शिकवण्याचे माध्यम, साधने, आणि पद्धती यांविषयी त्यांनी दोन सत्रांमध्ये चर्चा केली. दुसरे चर्चासत्र मातृभाषा-शिक्षणाविषयी घेण्यात आले. या आणि द्वितीय भाषेच्या अध्यापनावर झालेल्या तिसऱ्या चर्चासत्रात केंद्राच्या प्राचार्या डॉ. विजया चिटणीस-माडगूळकर आणि प्राध्यापकवर्ग यांनी निबंध वाचले. या दोन्ही चर्चासत्रांसाठी प्राथमिक आणि माध्यमिक शाळेतील सर्व भाषाशिक्षकांना चर्चेसाठी आमंत्रित करण्यात आले होते. सुमारे १०० शिक्षकांनी या चर्चेत अतिशय उत्साहाने भाग घेऊन आपले प्रश्न, शंका, अनुभव मांडले.

या संपूर्ण कार्यक्रमातले प्रमुख चर्चासत्र होते व्यावहारिक मराठी या विषयावरचे. स्वातंत्र्यानंतर अनेक व्यापारव्यवहारक्षेत्रांचा विकास झपाट्याने व्हायला लागला. त्या त्या प्रमाणात भाषिक व्यवहारही व्यापक झाले आणि त्यातून अनेक भाषिक प्रश्न निर्माण झाले. आतापर्यंत साहित्याच्या पाटातून चालणाऱ्या भाषेच्या अध्यापनाचा काही पुनर्विचार करण्याची वेळ आता आली. या संदर्भात एखाद्या अभ्यासक्रमात मराठी असावे की नसावे हा प्रश्न डोके वर काढत होता. जिथे जिथे म्हणून भाषा-व्यवहार चालतो तिथे भाषा नसावी हा प्रश्नच उद्भवत नाही. त्या त्या व्यवहारातल्या भाषेचे स्वरूप काय असावे याविषयी काही चर्चा करणे मात्र आवश्यक होते. भाषावैज्ञानिक आणि डेक्कन कॉलेज-मधील भाषाविज्ञान प्रगत अध्ययन केंद्राचे संचालक डॉ. अशोक केळकर यांनी वेगवेगळ्या क्षेत्रांतील मराठीचे स्थान, गरजा, मागणी, पूर्ती यानुसार

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चर्चासत्राचा आराखडा बनवला. वेगवेगळ्या क्षेत्रांतील अनुभवी व्यक्तींना एकत्र आणून त्या क्षेत्रांच्या मराठी भाषेकडून कोणत्या गरजा आहेत आणि त्या पूर्ण करण्यासाठी काय करता येईल याचा विचार एका व्यासपीठावर घडवून आणण्याच्या दृष्टीने आयोजित करण्यात आलेले हे पहिलेच चर्चासत्र होते.

तीन दिवसांच्या या चर्चासत्राचे उद्घाटन दि. ५ फेब्रु. रोजी सकाळी नऊ वाजता झाले. याचे अध्यक्ष होते पुणे विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. राम ताकवले आणि प्रमुख पाहुणे होते साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष डॉ. सुरेंद्र बार्लिंगे. भाषा ही एकमेकांशी संवाद प्रस्थापित करण्यासाठी आहे म्हणून तिचं व्यावहारिक महत्त्व लक्षात घेणं आवश्यक आहे असं डॉ. बार्लिंगे म्हणाले. प्रा. मे. पुं. रेगे यांनी संपूर्ण चर्चासत्रासाठी सूत्रपाताचे भाषण केले. त्यांच्या व्यावहारिक मराठीविषयीच्या विचारांनी चर्चासत्राला एक दिशा प्राप्त झाली. तीन दिवस सकाळी दहा ते एक-दीडपर्यंत आणि दुपारी दोन ते संध्याकाळी पाच-साडेपाचपर्यंत अशा दोन बैठकी भरत होत्या. प्रत्येक बैठकीसाठी स्वतंत्र अध्यक्ष असत. डॉ. वसंतराव पटवर्धन, डॉ. मोहन आगाशे, डॉ. अशोक केळकर, श्री. नानासाहेब गोरे, श्री. श्री. ग. मुणगेकर, आणि डॉ. अ. रा. कामत यांच्यासारख्या मान्यवर अधिकारी व्यक्तींनी चर्चेचे सूत्रसंचालन अतिशय समर्थपणे केले. प्रत्येक बैठकीत चार किंवा पाच याप्रमाणे निबंध वाचले जाऊन चर्चा होत होती. निबंधवाचकांमध्ये प्रत्येक क्षेत्रातील अनुभवी व्यक्तींना पाचारण करण्यात आले होते. श्री. गोविंद तळवलकर, डॉ. अनिल अवचट, डॉ. सुभाष पत्की, डॉ. ना. गो. कालेलकर, श्री. व्यंकटेश माडगूळकर, श्री. ह. मो. मराठे, डॉ. रा. सो. सराफ, श्री. वि. नी. पेंडसे, ॲड. नरेंद्र चपळगावकर, डॉ. सत्यरंजन साठे, डॉ. शां. ब. मुजुमदार, डॉ. प्र. चिं. शेजवलकर, प्रा.कमलाकर सोनटक्के, प्रा. पुष्पा भावे, डॉ. तिलोत्तमा दासवाणी, श्री. रा. प. नेने, प्रा. वसंत दावतर, प्रा. प्रभाकर ऊर्ध्वरेषे, प्रा. प्र. ना. परांजपे इत्यादी व्यक्तींनी आपले अभ्यासपूर्ण निबंध वाचले. प्रत्येक निबंधावर स्वतंत्र अनुभवी अधिकारी चर्चिकही आमंत्रित केले होते. त्यांनीही आपली टिपणे चर्चेत मांडली. भाषा संचालनालयाचे संचालक श्री. य. शं. कानिटकर, श्री. र. कृ. जोशी, डॉ. वाय्. व्ही. फाटक, श्री. माधव वझे, डॉ. विलास सारंग, श्रीमती आशा मुंडले, डॉ. र. वा. धोंगडे, श्री. मनोहर पंधे, डॉ. म. सु. पाटील, डॉ. ल. ना. गोखले, डॉ. स. ह. देशपांडे, डॉ. चं. जे. दासवाणी, डॉ. द. न. गोखले, डॉ. चं. द. इंदापूरकर, प्रा. सीताराम रायकर इत्यादी चर्चिकांनी मांडलेले विचारही तितकेच वजनदार होते.

याखेरीज संपूर्ण सत्रामध्ये अनेकांनी अतिशय उत्साहाने भाग घेतला. श्री. वि. शं. डोंगरे, डॉ. द. दि. पुंडे, प्रा. यास्मिन शेख, डॉ. श्री. दा. संगोराम, प्रा. रमेश वरखेडे इत्यादिकांनी चर्चेत भाग घेऊन चर्चा जिवंत, खेळती ठेवली. मराठीचे शिक्षक, प्राध्यापक या सत्रांसाठी आवर्जून बहुसंख्येने उपस्थित होते. डॉक्टर, ॲडव्होकेट, भाषावैज्ञानिक, कारखान्यांतले अधिकारी, साहित्यिक आणि संपादक अशी विविध मंडळी एकत्र जमून आल्यामुळे चर्चेला अभिनव रंग चढत गेला. पहिल्याच सत्रापासून या प्रश्नांनी आणि चर्चेने अशी काही पकड घेतली की, तीन दिवस अनेकांनी हा बौद्धिक आनंद आवडीने मनसोक्त लुटला. शेवटच्या दिवशी पु. ल. देशपांडे यांनीही चर्चेत भाग घेतला. तज्ज्ञांमुळे या चर्चेला प्रथमपासूनच एक वजन, प्रतिष्ठा, आणि दर्जा प्राप्त झाला होता. आणि तरीही हे सर्व तज्ज्ञ आपापल्या व्यवहारातले अनुभवी असल्यामुळे चर्चा केवळ तत्त्वजड, सैद्धांतिक झाली नाही.

दि. ७ फेब्रु. ला संध्याकाळी डॉ. राम ताकवले यांच्या अध्यक्षतेखाली समारोप झाला. यात चर्चासत्राच्या फलितावर मिलिंद मालशे, प्रा. पुष्पा भावे, प्रा. रमेश वरखेडे यांची, तसेच एकूणच चर्चासत्रांची शिस्त आणि पथ्ये यासंबंधी डॉ. अशोक केळकर यांचे अशी भाषणे झाली. डॉ. राम ताकवले यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात समाधान व्यक्त केले. डॉ. विजया चिटणीस–माडगूळकर यांनी आभार मानले.

डेक्कन कॉलेजसारख्या गावापासून दूर असलेल्या ठिकाणी रोज शंभराच्यावर माणसे नियमाने येत राहिली. यावरून त्यांना विषयाबद्दल वाटणारी आस्था तर दिसून येते, तसेच याचे काही श्रेय चर्चासत्राचे संयोजक, भाषाकेंद्राचे कर्मचारी, आणि पाहुणेमंडळी यांच्यामध्ये उत्पन्न झालेला अनौपचारिक मोकळेपणा आणि समंजस सहकार्याची भावना यांना देता येईल.

–सुमन बेलवलकर

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# भाषा व राष्ट्रीयत्व

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

[ 'व्यावहारिक मराठी : गरज, मागणी व पूर्ती' या चर्चासत्राच्या उद्घाटनाच्या प्रसंगी केलेले भाषण ]

युरोपमध्ये पहिल्यांदा राष्ट्रवादाचा उदय झाला. एका विशिष्ट भाषिक प्रदेशातील समाजाची राजकीय संघटना हे राष्ट्राचे ऐतिहासिक रूप होय. एक भाषा – एक राष्ट्र असे समीकरण साधारणपणे राष्ट्रवादाच्या मीमांसेमध्ये लक्षात घ्यावे लागते. राष्ट्र म्हणून एक सामुदायिक अस्मिता १८ व्या शतकाच्या मध्ये अनेक युरोपियन राष्ट्रांमध्ये निर्माण झाली. विशिष्ट भौगोलिक प्रदेशामध्ये राहणाऱ्या समाजाची एका भाषेच्याद्वारे जी राजकीय संघटना निर्माण होते, ती संघटना राष्ट्रवादाचे अधिष्ठान होय. ब्रिटन, फ्रान्स, जर्मनी, इटली, स्पेन, रशिया, अमेरिकेची संयुक्त संस्थाने यांच्यामध्ये पहिल्यांदा एकराष्ट्रीयत्वाची राजकीय जाणीव प्रकट झाली. पश्चिमी देशांमध्ये बहुतेक राष्ट्रे विशेषत: एकभाषिकच आहेत. राष्ट्र म्हणून सामाजिक जाणिवेची निर्मिती आणि विकास त्यांच्या त्या त्या भाषांच्या व्यवस्थित विकासामुळे प्रभावी बनला. मनुष्याच्या समाजीकरणाची एक मुख्य शक्ती भाषा ही होय. एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याला आपल्या मनोगताचे निवेदन भाषेच्या द्वारे मुख्यतः करीत असतो. हे जे परस्पर-मनोनिवेदनाचे भाषारूप साधन, हे समाजीकरणाचे साधन होय. भाषा हा मानवी मनाचा आरसा आहे. त्याच्या भाषेचा इतिहास हा त्या त्या समाजाच्या इतिहासाचे प्रतीक होय. इतिहास-संशोधनाचे वरिष्ठ आणि संपन्न साधन म्हणजे भाषेचा इतिहास होय.

एक भाषा – एक राष्ट्र हे समीकरण अगदी निरपवाद नाही. युरोपातील स्वित्झर्लंड आणि अमेरिका खंडातील कॅनडा अशांसारखी राष्ट्रे अनेकभाषिक आहेत. या काही थोड्या अपवादात्मक अनेकभाषिक राष्ट्रांमध्ये स्वित्झर्लंडची राष्ट्रीयता ही ते राष्ट्र त्रिभाषिक असूनदेखील दृढ आहे. याचे कारण, येथील बहुतेक नागरिक हे कमीजास्त प्रमाणात जर्मन, फ्रेंच आणि इटालियन भाषा बोलू शकतात, समजावून घेऊ शकतात. एका प्रदेशातील एक भाषा आणि एक राष्ट्र हे समीकरण २० व्या शतकातील पूर्वेकडील राष्ट्रवादाच्या इतिहासाला पूर्णपणे लागू पडत नाही. उदा., भारताचे एकराष्ट्रीयत्व हे बहुभाषिक आहे. युरोपमधील मोठ्या किंवा मध्यम प्रतीच्या एकभाषिक राष्ट्रांच्या लोकसंख्येइतकी लोकसंख्या असलेले भारतातील भिन्न भिन्न भाषिक

अनुक्रमणिका


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रदेश आहेत. इतके असूनही संख्येने १२ पेक्षा अधिक लिखित, प्रगत भाषा बोलणारे भिन्नभाषिक जनसमुदाय एकराष्ट्रीयत्वाच्या अस्मितेने भारले गेले याचे कारण दळणवळणाची विद्युत्‌ऊर्जेने निर्माण केलेली वेगवान साधने होत. तारायंत्र, टेलिफोन, रेल्वे, विमाने, मोटारगाड्या इ. आधुनिक दळणवळणाच्या साधनांनी हे भिन्नभाषिक जनसमुदाय जोडले गेले. ब्रिटिशांचे एकछत्री राज्य, दळणवळणाची आधुनिक साधने आणि साम्राज्यशाहीच्या विरुद्ध एकमताने झालेला उठाव व राजकीय आंदोलन यांमुळे हे बहुभाषिक भारतीय राष्ट्रीयत्व निर्माण झाले. मराठीभाषिक राजकीय नेत्याचा विचार अन्यभाषिक राजकीय नेत्याला आणि जनतेला २४ तासांच्या आत प्राप्त होऊ लागला. स्वराज्य हे एक ध्येय एका परकीय साम्राज्याच्या नाशातून उत्पन्न होणार या जाणिवेतून भिन्नभाषिक भारतीयांमध्ये राजकीय एकात्मतेची खोलवर तीव्र जाणीव निर्माण झाली आणि त्या जाणिवेने जी शांततामय राजकीय क्रांती झाली, तिला आवश्यक असणारी एकराष्ट्रीयता गेल्या दीडशे वर्षांत विकसित झाली.

भारताचे महाराष्ट्र, गुजरात, कर्नाटक इ. जे भाषिक प्रदेश आहेत, त्या प्रदेशांमध्ये राष्ट्रीयत्वाची जाणीव १८ व्या व १९ व्या शतकात निर्माण झाली असती, तर हीसुद्धा भिन्न राष्ट्रे बनली असती. हे लक्षात घेऊन मराठी भाषेच्या प्रश्नांकडे पाहिले पाहिजे. भाषेने राष्ट्रीय मन तयार होत असते. ती राष्ट्रीय मन तयार करणारी भाषा जितकी मागासलेली राहते, तितकी ती भाषा बोलणाऱ्या जनांची राष्ट्रीयता दुर्बळ राहते. सगळा जीवनव्यवहार आणि सगळे प्राथमिक स्तरापासून ते उच्च स्तरापर्यंतचे ज्ञान-विज्ञानांचे शिक्षण समर्थपणे ज्या भाषेत चालते, ती भाषा बोलणाऱ्या जनांची मने समर्थ राष्ट्रीयत्वाने भारलेली असतात.

आपण मराठी भाषेची चर्चा करणार आहोत. या चर्चेच्या संदर्भात हे लक्षात ठेवले पाहिजे, की आज मराठी भाषेच्या विकासाचे जे जे प्रश्न आहेत, ते ते सर्व प्रश्न अन्य भारतीय भाषांचेही आहेत. काश्मीरी, पंजाबी, हिंदी, बंगाली, गुजराती, तेलगू, मराठी, कानडी, तमिळ, उड़िया, असमी, मलयाळम्, बंगाली आणि उर्दू या लिखित व प्रगल्भ भाषा अजून राजकीय व्यवहाराच्या भाषा म्हणून मनःपूर्वक कोणत्याही प्रदेशराज्याने स्वीकारल्या नाहीत. स्वीकारल्या असल्या, तरी तशी अंमलबजावणी कोठेही केली जात नाही. शिक्षणक्षेत्रात तर यापेक्षाही अतिशय निराशाजनक वातावरण आहे. बहुतेक उच्च शिक्षण किंवा विद्यापीठीय शिक्षण इंग्लिशमध्येच चालते. महाराष्ट्रातील विद्यापीठे पहा म्हणजे ही गोष्ट स्पष्टपणे ध्यानात येईल. आधुनिक ज्ञानविज्ञान समाधानकारक रीतीने प्रकट करता येईल अशी आविष्कारशक्ती मराठीमध्ये यावी असे प्रयत्न हिरीरीने करावयास पाहिजेत. तशी हिरीरी मराठी-विद्या-विभूषितांमध्ये दिसत नाही. ब्रिटनमधील किंवा अमेरिकेतील बाल–बालिका प्रथमपासून तो अखेरपर्यंत सर्व प्रकारचे ज्ञानविज्ञानाचे शिक्षण केवळ इंग्लिशमधून घेऊ शकतात. हीच अनुकूलता जर्मन, इटालियन, फ्रेंच, रशियन इ. भाषा बोलणाऱ्या बाल–बालिकांना उपलब्ध आहे. त्यामुळे पश्चिमी देशांतील नागरिक स्त्री-पुरुष हे अधिक विकसित मनांचे आहेत असे म्हणता येते. असे सामान्य मराठी माणसाबद्दल म्हणता येणार नाही. या दृष्टिकोणातून मराठी भाषेच्या सर्व प्रश्नांचा आणि भारतीय राष्ट्रीयत्वाच्या विकासाचा विचार केला पाहिजे.






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मे. पुं. रेगे

# गद्य : समाजपरिवर्तनाचे एक वाहन आणि साधन

'गद्य : समाजपरिवर्तनाचे एक वाहन आणि साधन' हा मला देण्यात आलेला विषय आहे. भाषेच्या एका रूपाचा असा विशिष्टत्वाने जेव्हा उल्लेख करण्यात येतो, तेव्हा ते रूप भाषेच्या दुसऱ्या रूपापासून – उदा. पद्यापासून – कोणत्या प्रकारे भिन्न असते, कोणती विशिष्ट भाषिक कार्ये करण्यासाठी म्हणून त्याची प्रकृती घडलेली असते, त्याच्या ह्या उचित कार्यांपासून त्याच्या प्रकृतीचे कोणते विशेष कसे सिद्ध होतात त्या प्रश्नांचा ऊहापोह अपेक्षित असतो. आपण अर्थात हा ऊहापोह मराठीच्या संदर्भात करू. मराठी गद्याचे आज जे रूप प्रचलित आहे– किंवा जी रूपे प्रचलित आहेत– ती गद्याची विशिष्ट भाषिक कार्ये पार पाडण्याच्या दृष्टीने कितपत समर्थ आहेत ? आणि ती अधिक समर्थ बनायची असतील, तर तर त्यांच्यांत कोणत्या दिशांनी पालट घडवून आणावा लागेल ? हे आपल्या पुढचे प्रश्न असतील.

लंडन टाइम्सच्या पत्रव्यवहाराच्या स्तंभात प्रसिद्ध होणाऱ्या गद्याची, सर्वसामान्य सुशिक्षित इंग्रज ज्या गद्यातून तात्कालिक किंवा दूरगामी, महत्त्वाच्या किंवा क्षुल्लक प्रश्नांची चर्चा करतात त्याची गुणवत्ता प्रसिद्ध आहे. नेमकेपणा, नेटकेपणा, स्पष्टपणा किंवा स्वच्छपणा, सडसडीतपणा, सूक्ष्म विनोद आणि उपरोध हे गुण त्याच्यात आढळून येतात. शैलीकार म्हणून मान्यता पावलेल्या लेखकांच्या गद्याचा आपण येथे विचार करीत नसून सामान्य सुशिक्षित माणसे आपल्या नेहमीच्या व्यवहाराच्या संदर्भात, विशिष्ट प्रयोजनांसाठी म्हणून जे गद्य वापरतात, त्याचा विचार करीत आहोत. तेव्हा मराठीपुरते पाहता वर्तमानपत्रांच्या संपादकीय स्तंभातून, पत्रव्यवहाराच्या स्तंभातून, 'विशेष' म्हणून ज्यांचे वर्णन करण्यात आलेले असते अशा अनामिक वार्ताहारांनी पाठविलेल्या वृत्तांतात, सभांसारख्या औपचारिक प्रसंगी होणाऱ्या भाषणांत, आकाशवाणीवरून किंवा दूरदर्शनवरून प्रक्षेपित होणाऱ्या विविध कार्यक्रमांत, वैचारिक किंवा ललित निबंधांत मराठी गद्याचे जे वेगवेगळे मान्य नमुने आढळून येतात, त्याची चिकित्सा आणि मूल्यमापन आपल्याला करावे लागेल.

आणि ही चिकित्सा आणि मूल्यमापन सामाजिक परिवर्तनाच्या संदर्भात आपल्याला करावे लागेल. पण सामाजिक परिवर्तनाचे साधन म्हणून मराठी गद्याकडे जर आपण पाहू लागलो, तर आपल्या प्रश्नाला वेगळेच वळण लागते. कारण बहुसंख्य मराठी माणसे प्रगल्भ भाषिक व्यवहारापासून दूर आहेत. जे सामाजिक परिवर्तन घडवून आणायचे आहे, ते ह्या माणसांच्या संदर्भात घडवून आणायचे आहे. "ह्या माणसांना प्रगल्भ भाषिक व्यवहारात सामील करून घेणे" असे ह्या सामाजिक परिवर्तनाच्या साध्याचे (एक प्रकारे) वर्णन करता येईल. ह्या वर्णनातून परिवर्तनाचा आर्थिक सामाजिक आणि सांस्कृतिक आशय सूचित होतो. कारण एका विशिष्ट आर्थिक, सामाजिक आणि सांस्कृतिक पातळीवरील जीवन जगत असल्याशिवाय एखादा माणूस, विशेषतः माणसाचा एखादा गट प्रगल्भ भाषिक व्यवहारात सहभागी होऊ शकणार नाही. तेव्हा आज जे मराठी गद्याचे नमुने रूढ आहेत, त्यांच्याशी बहुसंख्य मराठी माणसांचा काही संबंध पोचत नाही.

उलट, सामाजिक परिवर्तन घडवून आणण्याची जबाबदारी ज्या सुशिक्षित मराठी वर्गावर आहे, त्याचा सर्वांत वरचा थर, ज्ञान, अधिकार आणि



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

प्रतिष्ठा यांच्या दृष्टीने सर्वांत वर असलेला थर आपले प्रगल्भ भाषिक व्यवहार इंग्रजीतून पार पाडतो आणि मराठी गद्याचा आणि त्याचाही फारसा संबंध असत नाही. वंचित, दडपलेल्या बहुसंख्य माणसांचा वर्गच सामाजिक परिवर्तन, क्रांती घडवून आणतो, सुस्थितीतील सुशिक्षितांचा वर्ग नव्हे असे ह्यावर कदाचित म्हटले जाईल. जागृत झालेल्या किंवा होत असलेल्या वंचितांचा वर्ग सामाजिक परिवर्तनाला फार मोठी प्रेरणा आणि शक्ती पुरवितो यात शंका नाही. आणि ही प्रेरणा आणि शक्ती कार्यरत असल्याशिवाय व्यापक सामाजिक परिवर्तन घडून येणार नाही. पण ही प्रेरणा आणि शक्ती यांना दृष्टी आणि दिशा ही सुशिक्षितांकडूनच लाभते. मग या सुशिक्षितांचे वर्णन निर्वर्ग (डीक्लास्ड) झालेले व ऐतिहासिक भौतिकवाद जाणणारे मध्यमवर्गीय, किंवा देशाभिमानाने प्रेरित झालेल्या ध्येयाबाबतचा वर्ग किंवा उदारमतवादी मानवतावाद्यांचा वर्ग असेही करता येईल. भारतात हा सामाजिक परिवर्तनाचे पुढारीपण करू शकणारा वर्ग भाषिक दृष्ट्या इंग्रजीतून व्यवहार करणारा आहे. भारतीय कम्युनिस्ट पक्षाची नावेही — केवळ इंग्रजी वर्तमानपत्रांतून छापण्यात येणारी त्यांची नावे नव्हे, तर लोकांच्या तोंडी असलेली त्यांची नावे — इंग्रजी आहेत. तेव्हा मराठी गद्यापासून दूर असलेल्या बहुसंख्य मराठी माणसांना आणि सुशिक्षित मराठी माणसांना मराठी भाषिक व्यवहारात सामील कसे करून घ्यावे हा आपल्यापुढे असलेला अधिक मूलगामी प्रश्न आहे. ही दोन प्रकारची मराठी माणसे मराठी भाषिक व्यवहारात सर्वतोपरी सहभागी होणे हे सामाजिक परिवर्तनाचे साधनही आहे आणि साध्यही आहे. ह्या प्रश्नासंबंधीचे माझे विचार मी आपल्यापुढे मुख्यतः मांडणार आहे.

पण त्यापूर्वी मराठीचे दोन अस्सल नमुने मी आपल्यापुढे ठेवणार आहे. पहिला नमुना असा :

**पोलीस मोटार वाहातुक विभाग एम्. टी. पत्रक. नं. १४**

**विषय**

१. ड्रायव्हरने करावयाची रोजची तपासणी व कामे. ड्रायव्हरने आपली गाडी आतून व बाहेरुन स्वच्छ ठेवली पाहिजे. आपल्या ए. सेक्शनच्या ठरविल्या दिवशी गाडी धुण्याची जबाबदारी ड्रायव्हरची आहे.

२. रेडीएटर कोठेही लीक होत नसून नेहमी पाण्याने भरलेला आसला पाहिजे.

३. इंजिन ऑइलची लेवल तपासून खात्री केली पाहिजे व ऑइल प्रेशर बरोबर दाखवीत आसले पाहिजे.

४. पेट्रोल सिस्टीम वेवस्थित आसले पाहिजे. रोज बरोबर दाखवित आसावे, पेट्रोल सिस्टीममध्ये कोठेही लिकीज आसू नये.

५. जाण्यायेण्याच्या प्रवासासाठी पेट्रोलटाकीमध्ये पुरेसे आसले पाहिजे.

६. टायरची झीज, चीरा, किंवा नादुरुस्ती तपासून त्यातील हवेचे प्रेशर वरोबर आसले पाहिजे.

७. बॅटरी पूर्ण चार्ज स्थितीत आसली पाहिजे, पाण्याची लेवल पुरी आसली पाहिजे, केबलचे टर्मिनल योग्य रीतीने टाईट जोडले आसून स्वच्छ आसले पाहिजे. चार्जिंग चालू असून ॲम्पिअर मीटर बरोबर दाखवीत आसला पाहिजे.

८. लाईटस हॉर्न, सेल्फस्टार्टर यांची तपासणी करून त्याचे काम समाधानकारक होत आसले पाहिजे.

९. ब्रेकचे काम योग्य असल्याची तपासणी केली पाहिजे.

१०. बॉडीला लावलेले बोल्ट व नट घट आसल्याची खात्री केली पाहिजे. कोठेही बोल्ट व नट किंवा स्क्रू ढिला असता उपयोगाचा नाही. बॉडीच्या क्रॉसमेंबरचे तळ, बॉडीचे बाजूच्या मागील बॉडीचे एखादे लाकूड मोडले किंवा चीर लागले नसावे.

११. ठरविक दिवसांची सर्वीसींग आणि मेन्टनन्स समाधानकारक झाले पाहिजे, आपल्या ताब्यात असलेल्या गाडीची ही सर्व कामे रोज सकाळी ड्यूटीवर जाण्यापूर्वी व आल्यानंतर प्रत्येक ड्रायव्हरने केली पाहिजे. कसल्याही प्रकारच्या दुरुस्तीची जरूरच असल्यास वरिष्ट अमलदारातर्फे ड्रायव्हर मेकॅनिककडून दुरस्ती करून घेण्याची व्यवस्था केली पाहिजे.

दुसरा नमुना असा : ( हे शिवाजीराजांनी ज्ञानेश्वर महाराजांच्या आळंदी येथील मंदिरास इनाम





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जमीन दिली त्यासंबंधीचे, २५–१०–१६७१ चे पत्र आहे.)

"अजब रतरवाने राजश्री शिवाजीराजे साहेब दाम दौलय हू.हाजर बज्यानेब कारकून हाल व इस्त-कबाल व देशमुखानी व देशपांडे यांनी व मोकदमानी व रयानी प्रांत चाकण सु इसने सबैन अलफ श्री याचे इनाम मौजे आळंदी प्रगणे यासी सालाबाद जि।। मुजेरी सेत १४=।। येक खंडी अडीच मण देवाचे देवास दिधले असे. कुलाबा व कुलाकानू दुमाले केले असे. दुमाला करणे. यासी काडीची तोसीस न लावणे. थलकरी अगर कोणी इस्कील न करणे. सदरहू थलबद देणे. देवाचे देवास चालवणे. साल दरसाल चालवीत जाणे. ताजा खुर्दखताचा उजूर न करणे. हिंदू होऊन इस्कील करील त्यास गाईची आण असे. मुसलमान होऊन इस्कील करील त्यास सोराची आण असे. लिहिले प्रा ो चालविणे तालिक घेऊन असल फिराऊन राजश्री रामानंद गोसावी तपस्वी यापासी देणे. ५।। हुजूर तेरीख छ रजब."

हे दोन भिन्न काळांतील सरळ मराठी गद्याचे नमुने आहेत. 'सरळ' ह्याचा अर्थ असा, की मराठी भाषेचे स्वरूप कसे असावे, कोणत्या प्रकारचे शब्द मराठी शब्द म्हणून मान्य करून घेण्यात यावेत ह्याविषयीच्या कोणत्याही दंडकाचे दडपण त्यांच्या लेखकांवर नाही. काही काम पार पाडण्यासाठी म्हणून हे लिखाण करण्यात आले आहे आणि ते काम साधले जावे यासाठी आपले म्हणणे त्यांच्या लेख-कांनी स्वच्छपणे, ज्यांना उद्देशून हे लिहीत आहेत त्यांना समजावे अशा शब्दांचा वापर करून मांडले आहे. पहिल्या नमुन्यांत बरेच इंग्रजी शब्द आहेत. पण ड्रायव्हर मंडळी आपल्या दैनंदिन कामाच्या संदर्भात हरघडी वापरतात असे ते शब्द आहेत. आजच्या मराठी ड्रायव्हरांच्या तोंडी असलेले ते शब्द आहेत व म्हणून ते मराठी शब्द आहेत. हीच गोष्ट तत्त्वतः दुसऱ्या नमुन्यातील फारशी शब्दांविषयी खरी आहे. ह्या अर्थाने जे 'सरळ' मराठी गद्य आहे त्याचे आणि सामाजिक परिवर्तनाचे जे नाते असेल त्याचा विचार आपल्याला करायचा आहे.

कोणत्या स्वरूपाचे सामाजिक परिवर्तन आप-ल्याला अभिप्रेत आहे ? ह्या प्रश्नाचे उत्तर थोड-क्यात देता येईल. पण प्रत्यक्षात वस्तुस्थितीत आणि मूर्त व्यवहारात हे उत्तर उतरवायचे झाल्यास त्याची किंमत म्हणून आपणा सर्वांना अनेक दशके निष्ठेने आणि कल्पकतेने कष्ट करावे लागतील, रक्त, घाम आणि अश्रू ओतावे लागतील. भारतीय संघराज्याचे जबाबदार नागरिक म्हणून हे उत्तर वास्तवतेत उतरवायला आपण बांधलेले आहोत ही गोष्टही आपल्याला विसरून चालणार नाही.

आपल्या प्रश्नाचे संक्षेपाने देता येण्याजोगे उत्तर असे, की आपल्या राज्यघटनेच्या उपोद्घातात जी सामाजिक ध्येये नमूद करण्यात आली आहेत, ती साधणारे सामाजिक परिवर्तन आपल्याला घडवून आणायचे आहे. ही सामाजिक ध्येये म्हणजे "सामा-जिक, आर्थिक आणि राजकीय न्याय, विचाराचे, अभिव्यक्तीचे, मत बाळगण्याचे, श्रद्धा ठेवण्याचे आणि ज्ञानसाधनेचे स्वातंत्र्य, दर्जा आणि संधी यांची समानता आणि बंधुभाव – व्यक्तीला तिच्या प्रतिष्ठेचे आश्वासन देणारा आणि राष्ट्रीय ऐक्याची जोपासना करणारा बंधुभाव–ही होत.

ही सुटचा ध्येयांची यादी नव्हे, ही ध्येये एक-मेकांत गुंफलेली आहेत, माणसाच्या व्यक्तिमत्त्वा-विषयीच्या एका विशिष्ट संकल्पनेच्या अधिष्ठानावर ध्येयांचा हा व्यूह किंवा ध्येयांची ही व्यवस्था आधारलेली आहे. माणसाची ही संकल्पना माण-साची स्वतःविषयीची संकल्पना आहे. माणसे स्वतःकडे आणि इतर माणसांकडे एका विशिष्ट दृष्टीने पाहू लागल्याशिवाय, ही दृष्टी त्यांच्या अंग-वळणी पडल्याशिवाय ही सामाजिक ध्येये प्रत्यक्षात उतरणार नाहीत. म्हणजे हे सामाजिक परिवर्तन मूलतः आणि पहिल्यांदा माणसांमधले आंतरिक परिवर्तन आहे आणि नंतर ह्या आंतरिक परिवर्त-नातून उदयाला येणाऱ्या प्रवृत्तींचा आणि कृतींचा परिणाम म्हणून बाह्य परिस्थितीत घडून येणारे परिवर्तन आहे. म्हणजे ज्या प्रकारचे परिवर्तन काही माणसे इतर सर्वांसाठी म्हणून घडवून आणू शकतील, आणि ही इतर माणसे, जशी होती तशीच राहून, ज्याचा लाभ घेऊ शकतील अशा स्वरूपाचे हे परि-वर्तन नव्हे. उदा. रस्ता बांधायचे कसब ज्यांच्यांत आहे अशी काही माणसे अडचणीच्या जागेमधून रस्ता बांधतील आणि त्याचा लाभ सर्वजण घेऊ शकतील. ह्या बाह्य परिवर्तनासारखे आपल्याला अभिप्रेत

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असलेले परिवर्तन नाही. माणसांची स्वतःच्या स्वरूपाविषयीची संकल्पना बदलून टाकणारे हे परिवर्तन आहे.

माणसाच्या व्यक्तिमत्त्वाविषयीची ही वेगळी संकल्पना कोणती ? ही संकल्पना अशी, की माणूस ही स्वतः निर्णय घेण्याची शक्ती जिच्या अंगी असते अशी व्यक्ती आहे, ह्या तिच्या स्वायत्ततेमध्ये आणि स्वायत्ततेबरोबर येणाऱ्या नैतिक जबाबदारीमध्ये –स्वतःच्या निर्णयाविषयी स्वीकाराव्या लागणाऱ्या नैतिक जबाबदारीमध्ये –जिची प्रतिष्ठा सामावलेली असते, अशी ती व्यक्ती आहे ही ती संकल्पना होय. स्वायत्त कर्ते असणे हे माणसांचे समान स्वरूप आहे आणि ह्या स्वरूपावर आधारलेली त्यांची प्रतिष्ठाही समान आहे. ज्यांचे स्वरूप पूर्णपणे असे नसते ती पूर्णार्थाने माणसे नसतात. उदा. मुले ही अजून माणसे नसतात, वेड लागलेली माणसे 'माणसांत' नसतात, माणसांतून उठलेली असतात. माणसामाणसांत नैसर्गिक गुण आणि कुवत, स्वभावविशेष आणि प्रवृत्ती यांच्या बाबतीत खूप भेद असतात आणि ही नैसर्गिक प्रकृती, तिच्यावर झालेले संस्कार आणि अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती ह्या साऱ्याचे एकत्रित फलित म्हणून माणसे आपल्या जीवनात जे साधतात, जी कामगिरी बजावतात तिच्यातही खूप तफावत असते. ह्या गोष्टीमुळे माणसाच्या गुणवत्तेमध्ये, अर्हतेमध्ये ( merit ) भेद पडतात. हे सारे मान्य करूनही माणसांच्या ठिकाणी, स्वायत्त व्यक्ती व कर्ता ह्या त्याच्या समान स्वरूपामुळे एक मूलभूत अशी समान प्रतिष्ठा असते.

स्वतःच्या ह्या प्रतिष्ठेला अनुसरून स्वतःची स्वायत्तता अनुभवण्यात आणि नैतिक जबाबदारी स्वीकारण्यात, आणि इतरांच्या प्रतिष्ठेची कदर करण्यात माणसांची ही स्वतःविषयीची संकल्पना व्यक्त होते.

ह्या स्वरूपाचे परिवर्तन घडवून आणणे म्हणजे ज्या माणसांच्या मनात स्वतःविषयीची आणि इतरांविषयीची ही संकल्पना रुजलेली नाही त्यांच्या मनात ती रुजविणे. हे परिवर्तन घडवून आणले जाण्याची एक अट अशी, की जी माणसे ते घडवून आणीत असतील, त्यांच्या मनात माणसाविषयीची ही संकल्पना दृढ असली पाहिजे. त्यांचे इतरांसंबंधीचे वागणे, विशेषतः ज्यांच्यांत हे परिवर्तन घडवून आणायचे आहे त्यांच्यासंबंधीची वागणूक ह्या संकल्पनेला धरून असली पाहिजे आणि तिच्यातून उद्भवली पाहिजे. इतरांच्या स्वायत्त व्यक्तित्वाविषयीची कदर त्यांच्या वागण्यातून, वृत्तीतून दिसून आली पाहिजे. दुसरी महत्त्वाची गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. ज्यांच्या ठिकाणी ही संकल्पना नसते त्यांना ती देता येते. ह्याचे कारण असे, की स्वतःविषयीची, माणसांविषयीची ही संकल्पना बनविण्याची आणि बाळगण्याची शक्ती आणि प्रवृत्ती त्यांच्या ठिकाणी असते. तत्त्वज्ञानात खोल न शिरता असे म्हणता येईल, की ही संकल्पना त्यांच्या मनात सुप्त असते आणि ती जागृत करायची असते. हे परिवर्तन म्हणजे एक विशिष्ट संकल्पना माणसांवर बाहेरून लादण्याची प्रक्रिया नसते. जी संकल्पना त्यांच्या मनात रुजवायची आहे तिच्याशी काहीही लादण्याचा प्रयत्न विसंगत ठरेल. तेव्हा ज्यांच्यांत हे परिवर्तन घडवून आणायचे आहे त्यांना स्वतःच्या माणुसकीचा सबंध अर्थ समजून घेता यावा ह्यासाठी त्यांना चालना देणे, साहाय्य करणे असे हे परिवर्तन राहील. म्हणजे आंतरिक वाढ ह्या स्वरूपाचे हे परिवर्तन आहे. सारांश, हे परिवर्तन म्हणजे एक प्रकारचे लोकशिक्षण आहे. शिक्षणाच्या प्रक्रियेची समाप्ती ज्याप्रमाणे शिक्षक आणि शिष्य ह्यांच्या दरम्यान समानतेचे नाते प्रस्थापित होण्यात होते, त्याप्रमाणे ह्या परिवर्तन घडवून आणले जाते त्या दोघांमध्ये समानतेचे नाते प्रस्थापित होण्यात होते.

स्वायत्त व्यक्ती हा समान दर्जा आणि समान प्रतिष्ठा प्रस्थापित करणे हा ह्या परिवर्तनाचा गाभा आहे. जो सामाजिक, राजकीय, आर्थिक न्याय साधायचा आहे तो ह्या समान दर्जावर आधारलेला न्याय आहे. जी समता साधायची आहे ती स्वतंत्र कर्ता ह्या दर्जाची समानता आणि कर्त्याच्या कर्तृत्वाला मोकळीक करून देणाऱ्या संधीची समानता आहे. व्यक्तीची सामाजिकता ही स्वायत्त व्यक्तींना एका समाजात गुंफणाऱ्या बंधुभावात सामावलेली असली पाहिजे. बंधुभावामध्ये आपुलकी, जिव्हाळा, एकात्मता असते त्याप्रमाणे समानताही अंतर्भूत असते.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपण एक स्वायत्त व्यक्ती आहोत अशी माणसांची स्वत:विषयीची आणि इतरांविषयीची संकल्पना ही एक आंतरिक गोष्ट असते आणि तिचा बाह्य आविष्कार अनुरूप अशा व्यवहारात, व्यक्ती-व्यक्तींमधील प्रत्यक्ष संबंधात, संस्थांच्या घडणीत, कार्यपद्धतीत आणि साध्यांमध्ये होतो असे आपण वर म्हटले आहे. ह्याचप्रमाणे सामाजिक परिवर्तनाची प्रक्रियाही केवळ आंतरिक असून भागणार नाही, ती केवळ आंतरिक असूही शकणार नाही. ही प्रक्रिया एकाच वेळी आंतरिक आणि बाह्य अशी दुहेरी असावी लागेल. परिवर्तन घडविणाऱ्या ज्याच्यात परिवर्तन घडवून आणायचे आहे त्याच्याशी असलेली आणि प्रकट होणारी वृत्ती, त्याच्याशी होणारे त्याचे वर्तन हा ह्या 'बाह्य' परिस्थितीतील एक महत्त्वाचा घटक असेल. पण ह्याचबरोबर परिवर्तन पावणाऱ्या माणसाची बदलत जाणारी दृष्टी, त्याला लाभत असलेल्या नवीन शक्ती, त्याने स्वीकारलेली नवीन साध्ये ह्यांचा आविष्कार त्याच्या प्रत्यक्ष वर्तनातून झाला पाहिजे, ह्या वर्तनातून त्याचा परिसर बदलत गेला पाहिजे, ह्या आविष्काराला अनुकूल ठरेल अशी परिस्थिती त्याच्या भोवती, परिवर्तन करू पाहणाऱ्याने, जाणीवपूर्वक निर्माण केली पाहिजे. स्वायत्त व्यक्ती ह्या स्वरूपाकडे होणारी त्याची वाटचाल त्याच्या वर्तनात होणाऱ्या बदलातून, आपल्या परिस्थितीशी तो करीत असलेल्या वेगळ्या प्रकारच्या झटापटीतून, आणि परिस्थितीत घडून येणाऱ्या पालटातून प्रकट झाली पाहिजे.

सामाजिक परिवर्तनाच्या स्वरूपाचे मी इतक्या विस्ताराने जे वर्णन केले त्याचे कारण असे, की भाषेकडे आपली दृष्टी हे माणसाकडे पाहण्याच्या आपल्या दृष्टीचे प्रतिबिंब असते. उदा. समजा, आपण सामाजिक परिवर्तनाविषयीची पुढील कल्पना स्वीकारली : भारतीय समाजाची आज जी वाईट अवस्था आहे ती मुख्यत: दारिद्र्यात सामावलेली आहे. तेव्हा ह्या समाजाची स्थिती सुधारण्याचा मुख्य उपाय म्हणजे उत्पादन खूपच वाढविणे आणि त्याच्यात सर्वांना पुरेसा वाटा मिळेल अशी व्यवस्था करणे हा होय. उत्पादन वाढविण्यासाठी ज्या गोष्टी आवश्यक आहेत, त्यांतील एक महत्त्वाची गोष्ट ही, की वेगवेगळ्या पातळ्यांवरील तंत्रज्ञानाचा आणि तांत्रिक कौशल्यांचा समाजात फार मोठ्या प्रमाणावर फैलाव झाला पाहिजे. हे तंत्रज्ञान लोकांनी आत्मसात करायचे तर ज्या भाषेत हे ज्ञान उपलब्ध आहे ती भाषा लोकांना आली पाहिजे. म्हणजे ज्या भाषेच्या माध्यमातून हे ज्ञान मांडलेले असते त्या भाषेतील शब्दप्रयोगांचा, वाक्यांचा अर्थ लावून हे ज्ञान त्यांना प्राप्त करून घेता आले पाहिजे. तांत्रिक कौशल्ये लोकांच्या अंगी बाणण्यासाठी त्यांना ट्रेनिंग देणे आवश्यक असते. हे ट्रेनिंग देताना भाषेचा वापर अपरिहार्यपणे करावा लागतो. तेव्हा जिच्यातून वैज्ञानिक आणि तांत्रिक ज्ञान मांडता येईल आणि कमी–अधिक गुंतागुंतीच्या, कमी–अधिक प्रगल्भ पातळीवरच्या तंत्रांचा वापर करण्याचे ट्रेनिंग जिचा उपयोग करून लोकांना देता येईल अशी भाषा लोकांना आली पाहिजे. आधुनिक तंत्रांचे एक वैशिष्ट्य असे, की ती उपयोजित निसर्गविज्ञानावर आधारलेली असल्यामुळे सर्वत्र एका धर्तीची असतात. दुसरे वैशिष्ट्य असे, की त्यांच्यामुळे वस्तूंची आणि माणसांची जलद ने–आण करणे शक्य होते आणि उलट अशा अतिशय जलद गतीने वस्तूंची आणि माणसांची ने–आण होण्याच्या शक्यतेवर ती अवलंबून असतात. अनेक ठिकाणी विखुरलेली कोट्यवधी माणसे ह्या तंत्रावर आधारलेल्या उत्पादनात गुंतलेली असतात, एका ठिकाणी जे घडत असेल ते गृहीत धरून त्याच्याशी संबंधित असे दुसरे काही तरी हजारो मैल दूर असलेल्या दुसऱ्या ठिकाणी घडविण्यात येत असते, उत्पादनाचे जगड्व्याळ असे यंत्र बनलेले असते आणि संदेशांचे अतिशय जलद आदान–प्रदान (communication) होणे शक्य असल्यामुळे हे यंत्र सुरळितपणे चालू राहते. तेव्हा ह्या उत्पादनात सहभागी असणाऱ्या सर्व माणसांची एकच भाषा असणे सोयीचे होईल. तंत्रज्ञान शिकवण्याची, ट्रेनिंग घेण्याची, उत्पादनासाठी तंत्रे वापरीत असताना एकमेकांना जे सांगावे लागते ते सांगण्याची जर सर्वांची एक समान भाषा असेल, तर ते सोयीचे होईल. दुर्दैवाने जगात अनेक भाषा प्रचलित आहेत. हा एक दुर्दैवी ऐतिहासिक वारसा आहे. भारतातही अनेक भाषा प्रचलित आहेत. हीही एक दुर्दैवी वस्तुस्थिती आहे. पण निदान भारतापुरती तरी


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सर्वांची भाषा एक राहील अशी व्यवस्था करणे इष्ट ठरेल.

ह्या दृष्टिकोणात उत्पादन हेच साध्य झाले आहे आणि माणसे उत्पादन–यंत्रणेचे केवळ घटक बनले आहेत, तंत्रज्ञानाचे आणि तांत्रिक कौशल्यांचे वाहक ह्या स्वरूपात ते घटक बनले आहेत. भाषा हे केवळ उत्पादनाचे माध्यम बनले आहे. उत्पादन मूलतः एका साच्याचे असल्यामुळे माणसे आणि भाषाही एकाच साच्याची असणे हितकर ठरले आहे. निश्चितपणे काम देणारी यंत्रे जशी नमुन्याबरहुकूम बनवावी लागतात, त्याप्रमाणे यंत्रांशी काम करणारी, यंत्राचा विस्तार असलेली माणसेही नमुन्याबरहुकूम बनवावी लागतात, यंत्राच्या ठिकाणी व्यक्तिमत्त्व नसते. एका यंत्राची जागा त्याच घडणीचे आणि तेच काम करणारे दुसरे यंत्र घेऊ शकते असे घडू शकत नसेल, तर यंत्रे घडविणाऱ्या कारागिरीतील तो दोष समजावा लागेल. ही गोष्ट माणसाच्या बाबतीतही लागू पडते. एका माणसाची जागा जर दुसरा माणूस घेऊ शकणार नसेल तर तो ट्रेनिंगमधील दोष समजावा लागेल. यंत्रात फालतू असे काही असू नये, प्रत्येक भाग आवश्यक, कार्यसंबंधी असला पाहिजे. प्रत्येक भागाने आपले काम बिनचूकपणे केले पाहिजे. भाषेचा वापरही असा बिनचूक असला पाहिजे, प्रत्येक शब्द कार्यासंबंधी असला पाहिजे. अर्थात उत्पादन हे माणसांसाठी असते ह्या गोष्टीचा विसर ह्या साऱ्या रचनेत होतो असे माझे म्हणणे नाही. माणसाविषयीची ह्या व्यवस्थेत गृहीत धरलेली कल्पना दुहेरी असते. उत्पादनयंत्रणेचे घटक हे माणसांचे एक स्वरूप असते. हे स्वरूप उत्पादनयंत्रणेशी जुळणारे असले पाहिजे. उत्पादित वस्तूंचे सेवन करणारे हे माणसांचे दुसरे स्वरूप असते. हे स्वरूप उत्पादित वस्तूंशी जुळणारे असणे सोयीचे असते. ह्या दृष्टीने पाहता जितक्या अधिक माणसांच्या आवडीनिवडी जितक्या अधिक सारख्या असतील त्या प्रमाणात उत्पादनयंत्रणा अधिक सुरळितपणे चालत राहील.

ह्या रचनेशी अनुकूल असलेले भाषिक धोरण थोडक्यात मांडता येईल. उत्पादनयंत्रणा आंतरराष्ट्रीय असल्यामुळे विज्ञानाची आणि तंत्रज्ञानाची एक आंतरराष्ट्रीय भाषा असावी लागेल. आणि ही भाषा आपल्या दृष्टीने इंग्रजी आहे. अखिल भारतीय संदर्भात विज्ञान, तंत्रज्ञान, उत्पादन, उत्पादनात अंतर्भूत असलेले व्यवस्थापन आणि शासन यांची भाषाही इंग्रजीच आहे आणि सामान्य प्रशासनाच्या उच्च स्तरावरील भाषाही इंग्रजीच आहे. औद्योगिक व्यवस्थापन आणि शासन आणि कायदा व सर्वसामान्य प्रशासन यांची भाषा एकच असणे सोयीचे असते. तेव्हा उच्च स्तरावरील सर्व सार्वजनिक व्यवहाराची भारतीय भाषा आज इंग्रजी आहे. सर्व लोकांच्या सर्व व्यवहारांची भाषा इंग्रजी बनविणे अशक्य असल्यामुळे प्रादेशिक भाषांना सार्वजनिक व्यवहारांतही स्थान देण्यात येते. हे स्थान दुय्यम आहे. ज्या व्यवहारांसाठी उच्च पातळीवरील ज्ञान आणि कौशल्ये आवश्यक असतात आणि जे पार पाडणाऱ्या व्यक्तींना, त्या वाहत असलेल्या जबाबदाऱ्यांच्या अनुरोधाने, विशेष अधिकार, सन्मान आणि मोबदला द्यावा लागतो त्या प्रतिष्ठित व्यवहारांची भाषा इंग्रजी आहे. परंपरेने शिक्षणाचा वारसा लाभलेल्या उच्च जातीची मुलेमुली ही भाषा आणि तिच्यातून मिळणारे ज्ञान आणि कौशल्ये आत्मसात करतात आणि संपत्ती, अधिकार, सामाजिक प्रतिष्ठा आणि सन्मान उपलब्ध करून देणारा जीवनक्रम त्यांना ह्यामुळे मोकळा होतो. शिक्षणाचा झालेला प्रसार, शिष्यवृत्ती मिळण्याची सोय ह्यांच्या जोरावर परंपरेने मागासलेल्या जातीतील काही मुलेमुली ही ह्या इंग्रजी भाषेच्या ज्ञानावर आधारलेल्या उच्च वर्गामध्ये प्रवेश मिळवू शकतात. पण अशी मुले तुरळक असतात.

प्रादेशिक व्यवहाराची भाषा मराठीसारखी प्रादेशिक भाषा आहे. पण हा व्यवहार दुय्यम प्रतीचा आहे. ही मराठी भाषा म्हणजे पारंपरिक उच्च जातींनी प्रादेशिक संस्कृतीची म्हणून घडविलेली भाषा आहे. बहुसंख्य मराठी माणसे आपल्या प्रत्यक्ष जीवनात जी भाषा ( किंवा ज्या विविध भाषा ) बोलतात ती ही भाषा नव्हे. पण उच्च जातीतील मुले सहजपणे आणि इतर जातीतील मुले औपचारिक शिक्षणक्रमातून ही भाषा शिकून आत्मसात करतात. खालच्या जातीतील खूपच मुलेमुली आता

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शिक्षण घेऊन बाहेर पडल्यामुळे आणि त्यांतील अनेकजण शिक्षक बनलेले असल्यामुळे त्यांच्या स्वाभाविक उच्चारांचे आणि वाक्यप्रयोगांचे काही ढंग प्रमाणित मराठीत आता मिसळलेले असले, तरी एकंदरीत प्रमाणित मराठी ही उच्चवर्गीयांची पारंपरिक भाषा आहे (हे मी तक्रार म्हणून सांगत नाही. हे केवळ वस्तुस्थितीचे निवेदन आहे). ह्या भाषेत रूढ असलेल्या उच्चारांहून वेगळे उच्चार जर सुशिक्षित माणसाने केले किंवा वेगळे शब्द किंवा वेगळी वाक्यपद्धती वापरली, तर आपण काही तरी गैर केले अशी अपराधी भावना त्याच्या मनात असते. ही प्रमाणित मराठी आज प्रादेशिक पातळीवरच्या राजकीय, सांस्कृतिक, शासकीय, व्यापारी व्यवहारांच्या नियंत्रणाचे माध्यम आहे.

बहुसंख्य मराठी माणसे अशिक्षित आहेत. ही प्रमाणित भाषा ते वापरीत नाहीत. ते स्वतःची बोली भाषा वापरतात ('डायलेक्ट' ह्या अर्थाने मी 'बोली' हा शब्द येथे वापरीत नाही. त्यांच्या परिसरातील लोक जी भाषा बोलतात आणि जिच्यातून ते आपले व्यवहार पार पाडतात ती त्यांची स्वतःची भाषा ते बोलतात.). त्यामुळे सुशिक्षित मराठी माणसांहून ते वेगळे पडतात. त्यांच्या भाषेमुळे त्यांच्यावर अशिक्षितपणाचा आणि म्हणून अडाणीपणाचा छाप असतो. ज्यांचे मार्गदर्शन करावे आणि नियंत्रण करावे अशी ती माणसे दिसतात.

ही वासाहतिक (colonial) परिस्थिती आहे. वासाहतिक परिस्थितीचे सार असे, की परकी लोक एखाद्या समाजाचे नियंत्रण करतात. हे परकी लोक ज्ञान, कौशल्य, कर्तबगारी या बाबतींत त्या समाजाहून वरचढ असतात आणि त्याच्या कल्याणासाठीच आपण त्याचे नियंत्रण करीत आहोत असा त्यांचा दावा असतो. हा दावा प्रसंगी खराही असू शकेल. उदा. विशिष्ट परिस्थितीत ब्रिटिशांनी भारताचे नियंत्रण केले ती सबंध परिस्थिती जर ध्यानात घेतली तर हे नियंत्रण ही इष्टापत्ती होती असेच मला वाटते. अनेक ब्रिटिश अधिकाऱ्यांना भारतीयांच्या कल्याणाविषयी मनापासून आस्था होती ह्याविषयी कोणाला शंका घेता येणार नाही. पण वासाहतिक संबंधात जो डंख असतो तो असा, की तुमच्या कल्याणासाठीच आम्ही हे सर्व करीत आहोत ह्या परकीयांच्या दाव्याविषयीचे त्यांचे जे काही मत असेल त्याला काही किंमत नसते. किंबहुना हा दावा तपासून पाहण्याची त्यांची अनेकदा क्षमता नसते (तो तपासून पाहण्याची जेव्हा त्यांना क्षमता येते तेव्हा ते वासाहतिक दर्जातून अर्धवट मोकळे झालेले असतात.).

भारत ही आज परदेशीयांची वसाहत नसली, तरी परभाषिकांची वसाहत आहे. ज्या भाषेत मी सहभागी होऊ शकत नाही, त्या भाषेद्वारा चाललेल्या व्यवहारांतही मी सहभागी होऊ शकत नाही. तो व्यवहार मला उमजू शकत नाही. त्याची चिकित्सा आणि मूल्यमापन मी करू शकत नाही. बहुसंख्य मराठी भाषिकांच्या दृष्टीने इंग्रजीतून चाललेला व्यवहार आणि प्रमाणित मराठीतून चाललेला व्यवहार हा परभाषिकांनी परभाषेतून चालविलेला व्यवहार असतो. बहुसंख्य मराठी माणसे, त्यांच्या संबंधात चाललेला व्यवहार समजू शकत नाहीत. हा व्यवहार त्यांच्या भोवती आणि त्यांच्या संबंधात घडतो; पण तो घडविण्यात त्यांचा सहभाग नसतो. भाषिकदृष्टचा ते परावलंबी आहेत आणि भाषिक परावलंबित्व हे सबंध जीवनाला ग्रासणारे परावलंबित्व असते.

ह्याच्या उलट, स्वायत्त व्यक्तींची बंधुभावावर आधारलेली समाजव्यवस्था राज्यघटनेमध्ये अभिप्रेत आहे. ही समाजव्यवस्था साधण्यासाठी जे समाजपरिवर्तन घडवून आणावे लागेल त्याच्याशी सुसंगत आणि त्याला पोषक असलेली भाषिक नीती कशी असेल ह्याचा विचार आपल्याला करायचा आहे.

स्वायत्त आविष्कारातून व्यक्तीचे व्यक्तित्व मूर्त आणि सिद्ध होते आणि सर्व आविष्कार हा मूलतः भाषिक आविष्कार असतो हे ह्या भाषिक नीतीचे आधारसूत्र राहील.

काही माणसांकडे इतरांपेक्षा अधिक ज्ञान आहे, जीवनात ज्या महत्त्वाच्या गोष्टी आहेत त्यांच्याविषयीचे हे ज्ञान आहे आणि म्हणून ज्यांच्याकडे आज हे ज्ञान आहे त्यांना ते मिळणे त्यांच्या स्वतःच्या दृष्टीने अत्यंत उपयुक्त ठरेल यात शंका नाही. ज्यांच्याकडे आज हे ज्ञान आहे ती मानवी संस्कृतीच्या वारशावर आधारलेली त्यांची कमाई आहे. प्रश्न एवढाच आहे, की ह्या कमाईचा उपयोग ते

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्वतःसाठी, आपण आणि इतर यांच्यामधील अंतर कायम राखण्यासाठी, इतरांना कनिष्ठ स्थानावर डांबून ठेवण्यासाठी आणि त्यांचा स्वार्थासाठी वापर करण्यासाठी म्हणून करतील की इतरांना त्यांच्यात सहभागी करून घेण्यासाठी, त्यांच्याशी समतेचे नाते जोडण्यासाठी करतील ? आज जे मराठी भाषिक काही अंशी इंग्रजीतून आणि काही अंशी मराठीतून आपला भाषिक व्यवहार चालवितात त्यांच्यापुढे असलेला हा मूलभूत प्रश्न आहे. राज्यघटनेत अंतर्भूत असलेल्या मूल्यांना अनुसरून समाजपरिवर्तन घडवून आणण्याचे सामर्थ्य त्यांच्या ठिकाणी आहे यात शंका नाही. ह्या सामर्थ्याचा वापर ह्या उद्दिष्टांसाठी ते करणार आहेत, की नाहीत हा प्रश्न आहे.

समजा, हे भाषिक स्वायत्ततेचे साध्य स्वीकारून त्याला अनुसरून समाजपरिवर्तन घडवून आणायचे आपण ठरविले तर कोणता व्यावहारिक कार्यक्रम उभारावा लागेल ? आज ४०% मराठी माणसे निरक्षर आहेत. लिहिलेला मजकूर ती वाचू शकत नाहीत, ती स्वतःच्या मनातले इतरांना लिहून कळवू शकत नाहीत. लिखित मराठी साहित्याचा सबंध वारसा, मराठी माणसांनी स्वतः कमावलेले आणि मराठीत मांडलेले ज्ञान आणि मराठी माणसांनी इतर भाषांत प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांपासून मिळविलेले आणि मराठीत मांडलेले ज्ञान त्यांच्या दृष्टीने असून नसल्यासारखे आहे. हे भयानक परावलंबित्व आहे. कारण इतर माणसे त्यांना जे सांगायचे ठरवतील किंवा अनवधानाने जे सांगतील, किंवा अपघाताने त्यांच्या जे कानी पडेल तेवढेच ज्ञान त्यांना मिळू शकेल. अर्थात स्वतःच्या अनुभवांचे चिंतन करून त्यांनी मिळविलेले ज्ञान त्यांच्यापाशी असेल. पण ते त्यांचे स्वकष्टार्जित ज्ञान आहे. मानवी संस्कृतीचा समाईक वारसा म्हणून जे ज्ञान आज उपलब्ध आहे आणि त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे नवीन ज्ञान निर्माण करण्याची, ज्ञानाचा विस्तार करण्याची जी पद्धती शोधून काढण्यात आली आहे त्यांच्यात त्यांना प्रवेश नाही.

ही स्थिती ताबडतोब पालटली पाहिजे आणि सर्व मराठी माणसांना साक्षर करण्याच्या कार्यक्रमाला अग्रक्रम दिला पाहिजे. ही साक्षरता केवळ औपचारिक साक्षरता असून भागणार नाही. म्हणजे सही करण्यापुरती किंवा शब्द ओळखता येण्यापुरती साक्षरता कामाची नाही. ती परिणामकारक साक्षरता असली पाहिजे. लिहिलेला मजकूर एखाद्याला वाचता येतो ह्याचा अर्थ तो त्याला वाचून समजतो असा केला पाहिजे. समोरचा मजकूर वाचल्यामुळे आपल्याला ज्या गोष्टी माहीत नव्हत्या त्या माहीत झाल्या, आपल्या ज्ञानात भर पडली, उपयुक्त किंवा मजेदार गोष्टी कळल्या असा अनुभव जेव्हा निरक्षर असलेल्या माणसांना येईल तेव्हाच ते खऱ्या अर्थाने साक्षर बनतील.

ह्यासाठी त्यांना ज्याप्रमाणे अक्षर ओळख करून दिली पाहिजे, त्याप्रमाणे जो मजकूर त्यांच्यापुढे वाचण्यासाठी ठेवण्यात येईल तो त्यांच्या स्वतःच्या भाषेतील मजकूर असला पाहिजे. त्यांची तोंडी भाषा लिखित स्वरूपात त्यांच्यापुढे अवतरली पाहिजे. आणि हा मजकूर केवळ औपचारिक असता कामा नये. तो त्यांच्या दृष्टीने महत्त्वाचा असला पाहिजे. त्यांच्या सरावाचे झालेले इतरांचे बोलणे ज्याप्रमाणे त्यांना सहज समजते तितक्या सहजपणे त्यांना समजेल असा तर तो असला पाहिजेच, पण तो समजत असताना त्याच्यात ते रंगून जातील असाही तो असला पाहिजे. त्यांना साक्षर करू पाहणारे जे असतील, ते त्यांच्या जीवनाच्या अंतरंगात शिरल्याशिवाय असा मजकूर लिहू शकणार नाहीत. दुसऱ्या शब्दांत हे मांडायचे, तर त्यांनी त्यांची भाषा आत्मसात केलेली असल्याशिवाय त्यांना हे साधायचे नाही.

आज ह्या निरक्षरांकडे काही ज्ञान आहे, त्यांच्या काही समजुती आहेत, जीवनाची काही समज त्यांच्याकडे आहे. ह्या मनोविश्वात ते बंदिस्त आहेत आणि त्यांची भाषाही बंदिस्त आहे. त्यांना स्पष्टपणे पडणारे काही प्रश्न आहेत, अंधुकपणे जाणवणारे काही प्रश्न आहेत आणि अशा अनेक गोष्टी त्यांच्या जीवनात घडत असतात किंवा त्यांच्या कानी येतात, की त्या आपल्या समजशक्तीच्या आवाक्यापलीकडच्या आहेत असे मानून त्यांचा नाद सोडून देण्याखेरीज त्यांना गत्यंतर नसते. ह्या त्यांच्या मनोविश्वाची आरपार ओळख असल्याशिवाय आपण त्यांच्याशी खराखुरा संवाद साधू शकणार नाही. ह्या विश्वाने त्यांची भाषा घडवि-


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लेली असते आणि त्यांच्या भाषेने त्यांचे मनोविश्व घडविलेले असते. तेव्हा त्यांची भाषा शिकल्याशिवाय त्यांच्या विश्वात आपण शिरू शकणार नाही. आणि त्यांच्या विश्वात शिरल्याशिवाय त्यांच्याशी अर्थपूर्ण रीतीने बोलू शकणार नाही. त्यांच्या भाषेविषयी, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाविषयी आदर असल्याशिवाय त्यांची भाषा आपण खऱ्या अर्थाने शिकू शकणार नाही. कारण ही भाषा शिकणे म्हणजे काही शब्द शिकणे आणि काही उच्चार शिकणे एवढेच नसते, तर दुसऱ्या माणसाशी एकात्मता साधणे असते. आणि दुसऱ्या माणसाची माणूस म्हणून कदर आपल्याला असल्याशिवाय अशी एकात्मता आपल्याला साधता येणार नाही.

प्रमाणित मराठी भाषा बोलणारा आणि लिहिणारा-वाचणारा माणूस आणि निरक्षर असलेला, आपल्या बोली भाषेशिवाय दुसरी भाषा वापरू न शकणारा माणूस यांच्यांत भाषिकदृष्टचा खूप तफावत असते ह्यात शंका नाही. काही अंशी ही तफावत हा केवळ फरक आहे. एकमेकींशी बऱ्याच मिळत्याजुळत्या असलेल्या दोन भिन्न भाषा ही दोन माणसे बोलतात किंवा एकाच भाषेची भिन्न रूपे ते बोलतात. पण महत्त्वाची गोष्ट अशी, की प्रमाणित मराठी ही अधिक प्रगल्भ भाषा आहे. अधिक व्यापक आणि सुव्यवस्थित ज्ञानाची, अधिक अमूर्त आणि काटेकोर संकल्पनांची, अधिक गुंतागुंतीच्या आणि विस्तृत व्यवहारांची वाहक असलेली ही भाषा आहे. (ह्याच निकषांना अनुसरून इंग्रजी ही मराठीहून अधिक प्रगल्भ भाषा आहे.) बोली मराठी आणि प्रमाणित मराठी ही एकाच भाषेची दोन रूपे आहेत, एक अविकसित आणि दुसरे अधिक विकसित अशी दोन रूपे आहेत असे मानले, तर प्रमाणित मराठीने बोली मराठीचे स्थान, निदान सार्वजनिक व्यवहारात तरी सर्वतोपरी घेणे योग्य ठरेल अशी आपली धारणा होईल. आपली औपचारिक शिक्षणव्यवस्था जर अधिक समर्थ आणि परिणामकारक बनविली, तर प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षणाच्या द्वारे हे साध्य बऱ्याच प्रमाणात गाठता येईल — माध्यमिक शिक्षणापर्यंतच्या पायरीपर्यंत ज्या वयोगटातील मुले ह्या शिक्षणव्यवस्थेत सामील असतात त्यांच्या बाबतीत तरी ते गाठता येईल असे आपल्याला वाटेल. ज्यांच्या तोंडी प्रमाणित मराठी बसवायची आहे त्यांच्या दृष्टीनेही ते आपल्या स्वतःच्या भाषेचे सुसंस्कृत व प्रतिष्ठित रूप असल्यामुळे त्यांची वृत्तीही ह्या कार्यक्रमांशी अनुकूल राहिल, किंबहुना आपल्या मुलामुलींच्या तोंडी ही भाषा बसली, तर सुसंस्कृतपणा आणि सामाजिक दर्जा या बाबतीत त्यांनी खूपच मोठी मजल मारली असे त्यांना वाटेल. इंग्रजीने मराठीची जागा घेणे हे कितीही इष्ट वाटले, तरी हे साध्य गाठण्यात जबरदस्त व्यावहारिक आणि भावनिक अडचणी आहेत. इंग्रजी ही काही झाले तरी परकी आणि अपरिचित, वेगळ्या धाटणीची भाषा आहे. प्रमाणित मराठीने बोली मराठीची जागा घेण्यात ह्या अडचणी नाहीत. आपल्या अधिकृत भाषिक धोरणाचे हेच प्रकट किंवा सुप्त असे साध्य आहे असे मला वाटते.

माझ्या मते हे साध्य हानिकारक आहे. एक तर ह्यामुळे बोली भाषेवर हीनपणाचा आणि कुचकामीपणाचा छाप अधिकृतरीत्या असतो. प्रमाणित मराठी हीच केवळ ज्ञान देण्याची आणि घेण्याची भाषा ठरते. ह्यामुळे प्रमाणित मराठीच्या परीघात जे लोक येत नाहीत त्यांना पद्धतशीरपणे ज्ञान देण्याची व्यवस्था करण्याचे कारण नाही असा समज निर्माण होतो, ही व्यवस्था करणे ही कुणाची जबाबदारी ठरत नाही. स्वावलंबी होण्यासाठी ज्यांना ज्ञानाची सर्वांत जास्त जरूरी आहे, तेच लोक ज्ञानापासून पूर्णपणे वंचित राहतात. लोकशाही समाजाचे घटक म्हणून आपले नेमके हक्क आणि आपल्या नेमक्या जबाबदाऱ्या काय आहेत, वेगवेगळ्या प्रकारच्या सरकारी अधिकाऱ्यांची आपल्याविषयीची कर्तव्ये काय आहेत आणि त्यांच्या अधिकारांच्या मर्यादा काय आहेत, आपली आर्थिक स्थिती, आरोग्य, परिसर सुधारण्यासाठी उपयुक्त ठरेल असे कोणते ज्ञान आज उपलब्ध आहे, ह्या सुधारणा कोणत्या दिशांनी आणि किती प्रमाणात घडवून आणण्याच्या शक्यता आज निर्माण झाल्या आहेत, ह्या सिद्ध करण्यासाठी आपल्याला स्वतःला काय करता येईल, इतरांवर किती प्रमाणात अवलंबून राहावे लागेल हे ज्ञान जोपर्यंत बहुसंख्य लोकांना नाही तोपर्यंत आपल्याला काय घडत आहे ह्याचा अर्थ त्यांना कळणार नाही,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणि ते स्वतः डोळसपणे काही घडवून आणणार नाहीत. सरकार आणि राजकीय व सामाजिक पुढारी त्यांच्या वतीने आणि त्यांच्यासाठी अनेक योजना हातात घेतील आणि अनेक गोष्टी घडवून आणतील. पण हे सर्व लोकांना सुदैवाने किंवा दुर्दैवाने जे काही घडत आहे त्याचा भाग असेल, ते घडवून आणण्यात लोकांचा भाग असणार नाही. आणि म्हणून खरे सामाजिक परिवर्तन घडून येणार नाही.

१९७७–७८ साली महाराष्ट्रात ६–११ वयोगटातील ११६·५% मुलगे आणि ८८·८% मुली पहिली ते पाचवी ह्या इयत्तांत पटावर होत्या. हे आकडे काही प्रमाणात अवास्तव असतात ही सर्वांना माहीत असलेली गोष्ट आहे. तरीही ही एकंदरीत बरीच समाधानकारक परिस्थिती आहे असे आपल्याला वाटेल. पण ह्या परिस्थितीचा एक भाग असा की पहिलीच्या वर्गात दाखल झालेल्या १०० मुलांपैकी सुमारे ५० मुलेच सरासरीने पाचव्या इयत्तेपर्यंत पोचतात आणि आठव्या इयत्तेपर्यंत पोचणाऱ्या मुलांची संख्या तर सरासरीने २५ इतकी असते. तसेच विदर्भात १४ ते १६/१७ ह्या वयोगटातील केवळ २०% मुलगे आणि १७·९% मुली माध्यमिक शाळेत होत्या आणि मराठवाड्यासंबंधीचे हे आकडे अनुक्रमे २८·८ टक्के आणि ७·५ टक्के असे होते. ही परिस्थिती फार झपाट्याने सुधारता येईल असे नाही. तेव्हा प्रमाणित मराठी हीच ज्ञानभाषा असे आपण मानले, तर बहुसंख्य लोक महत्त्वाच्या, जीवनोपयोगी ज्ञानापासून वंचित आणि म्हणून परावलंबी राहतील.

इतिहासात संस्कृती आणि तिचा भाग असलेले ज्ञान ह्या गोष्टी श्रेष्ठी वर्गाने निर्माण केल्या आहेत आणि हे ज्ञान श्रेष्ठी वर्गापासून तळच्या माणसापर्यंत झिरपत जाण्याची प्रक्रिया इतिहासात सुरू आहे. औद्योगीकरणाचा रेटा, समानतेचे तत्त्वज्ञान आणि दडपलेल्या वर्गांचा दबाव यांनी ह्या प्रक्रियेला चालना दिली आहे. पण भारताची स्थिती ध्यानात घेतली, तर ह्या संथपणे होणाऱ्या प्रक्रियेवर सर्वस्वी अवलंबून राहणे घातक ठरेल. कोट्यवधी आयुष्यांची आज होत असलेली नासाडी तशीच चालू राहील. ह्या परिस्थितीतून बाहेर पडण्याचा एक मार्ग म्हणून ज्या ज्ञानाच्या आधारे लोक आपल्या पायांवर उभे राहू शकतील ते ज्ञान सरळ त्यांच्यापर्यंत पोचविण्याचा उपक्रम हाती घ्यावा लागेल.

ह्या ज्ञानप्रसाराचे माध्यम, वर म्हटल्याप्रमाणे लोक प्रत्यक्ष जी भाषा बोलतात, त्यांच्या तोंडात जी भाषा वावरत असते, त्यांच्या भौतिक आणि सामाजिक परिसराशी जी एकजीव झालेली असते ती भाषा. महाराष्ट्रात वेगवेगळ्या ठिकाणी ही भाषा वेगवेगळी असेल. एका ठिकाणी प्रचलित असलेल्या भाषेहून जाणवण्याइतकी वेगळी असलेली भाषा त्या ठिकाणाच्या जवळात जवळ असलेल्या कोणत्या ठिकाणी रूढ आहे हे भाषाशास्त्रज्ञांनी ठरवायचे आहे, महाराष्ट्रातील बोलींचा नकाशा बनविण्याचे काम त्यांचे आहे. ज्ञानाच्या दृष्टीने एवढेच म्हणता येईल, की ह्या सर्व गोष्टींचा विचार न करता, आपल्या समोर जी माणसे आहेत त्यांना समजेल त्या भाषेत, म्हणजे त्यांची जी भाषा आहे त्या भाषेत त्यांना आवश्यक असलेल्या गोष्टींची माहिती करून देणे हे आपले काम आहे.

समोरच्या माणसाविषयी आस्था आणि कदर असली आणि कल्पकता असली तर हे फारसे अवघड नाही. ह्या माणसांच्या भाषेत जी शब्दसंपत्ती असेल तिच्यातील प्रत्येक शब्दाला त्यांच्या जीवनात प्रयोजन असणार. त्याशिवाय हे शब्द त्यांच्या भाषेतील शब्द म्हणून टिकून राहिले नसते. तेव्हा ही भाषा आत्मसात करणे म्हणजे त्यांच्या जीवनात शिरणे होय. आज अनेक यंत्रे आणि त्यांचे भाग आपापली इंग्रजी नावे घेऊन त्यांच्या भाषेत शिरले असणार. ही इंग्रजी नावे, खतांची इंग्रजी नावे, सरकारी अधिकाऱ्यांचे इंग्रजी हुद्दे, कायदे आणि सरकारी कामकाजातील प्रक्रियांची इंग्रजी नावे, जे, जे शब्द आज त्यांच्या तोंडी आहेत ते सर्व मराठीच्या एका विशिष्ट बोलीतील शब्द आहेत आणि म्हणून मराठी शब्द आहेत असेच मानले पाहिजे. त्या बोलीत असलेल्या ह्या सबंध शब्दसंपत्तीचा वापर करून तिच्या भाषिक लकबींचा वाक्यप्रयोगांचा वापर करून, आवश्यक तेथे नवीन शब्द प्रविष्ट करून महत्त्वाचे, व्यवहारोपयोगी ज्ञान तिच्याद्वारा लोकांपर्यंत पोचविले पाहिजे.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

" मराठी ही महाराष्ट्रातील सबंध लोकसमूहाची भाषा " अशी तिची व्याख्या केली, तर सामाजिक परिवर्तनाच्या उद्दिष्टासाठी तिचा अधिक परिणामकारक वापर करण्यासाठी पुढील कार्यक्रमाला अग्रस्थान दिले पाहिजे, असे मला वाटते :

१) प्रौढ निरक्षरांना आणि शाळेतून गळलेल्या आणि निरक्षर राहिलेल्या मुलांना साक्षर करणे आणि लिहिण्यात येणाऱ्या भाषेच्या व्यवहारात दृढपणे प्रविष्ट करणे.

२) नवसाक्षर प्रौढांसाठी, शाळेतून गळलेल्या नवसाक्षर मुलांसाठी, शाळेतून गळलेल्या साक्षर मुलांसाठी, साक्षर असलेल्या पण प्रमाणित मराठीवर पुरेसा काबू नसलेल्या प्रौढांसाठी त्यांच्या तोंडी असलेल्या भाषेतून त्यांच्या प्रत्यक्ष जीवनाच्या दृष्टीने उपयुक्त असलेले ज्ञान लिहिलेल्या मजकुराच्या साहाय्याने त्यांच्यापर्यंत पोचविणे. उदा. ह्या माणसांना आपल्या भोवतालच्या परिसराची, त्यातील वनस्पती, पशु पक्षी, पिके, त्याचे हवामान ह्याची चांगली माहिती असते. ह्याच्या आधारावर त्यांना भूशास्त्र ( Geology ), वनस्पतिशास्त्र, प्रजननशास्त्र ( Genetics ) इत्यादींचे, नवीन संकरित जाती कशा घडवितात, झाड जगते कसे, खतांची रासायनिक घडण कशी होते, त्यांचा नेमका परिणाम काय होतो, हवामानाचे स्वरूप कसे निर्धारित होते, हरितक्रांती कुठेकुठे झाली, तिच्यामुळे कोणकोणत्या लोकांचे उत्पन्न किती प्रमाणात वाढले, कुणाचे का वाढले नाही ह्याची माहिती देता येईल. लिहिलेला मजकूर वाचून समजून घेणे हे सरावानेच जमणारे काम आहे. तेव्हा नवसाक्षर लोकांसाठी एका बैठकीत वाचून होईल असा, वाचतावाचता त्यांना सहज समजेल अशा रीतीने मांडलेली आणि सोप्या भाषेत लिहिलेला एकपानी, दोनपानी मजकूर छापून प्रसिद्ध केला पाहिजे. सोप्या भाषेत लिहिलेला मजकूर म्हणजे प्रमाणित मराठी भाषा बोलणाऱ्यांच्या दृष्टीने सोप्या असलेल्या भाषेतील मजकूर नव्हे. तर लोकांच्या तोंडी असलेल्या भाषेतील मजकूर. ह्या मजकुराची लांबी आणि व्याप्ती हळूहळू वाढवीत नेता येईल आणि नेली पाहिजे, कायद्याप्रमाणे पोलिसांना कोणते अधिकार आहेत आणि कोणते नाहीत, आणि कोणत्या गोष्टी करायला ते बांधलेले आहेत, वस्तूंचे भाव कसे ठरतात, मजुरी कशी ठरते, महागाई का होते, विजेची यंत्रे कशी चालतात, रोग कसे होतात आणि त्यांच्यावर उपाय काय, संततिनियमन कसे करावे, सरंजामशाहीत वेगवेगळ्या प्रकारचे लोक एकमेकांशी कसे वागत, लोकशाहीत ते कसे वागतात, जादूटोणा, नवससायास, शिवाशीव, विटाळ ह्यांविषयी कुठेकुठे काय समजुती होत्या, त्या निराधार कशा आहेत, विजेची यंत्रे कशी चालतात, मोटरगाडी, रेल्वे इंजिन कसे चालते, कोर्टाचे कामकाज कसे चालते, ह्या सर्व गोष्टींची माहिती लोकांना हवी असते आणि ती त्यांना त्यांच्या भाषेतून, त्यांच्या तोंडच्या भाषेतून घेता आली पाहिजे आणि एकमेकांना सांगता आली पाहिजे.

केवळ भाषिक दृष्टीने पाहिले, तर हा कार्यक्रम अंमलात आणण्याचे पुढील परिणाम होतील असे मला वाटते :

१) प्रमाणित मराठीतील अनेक शब्द, तसेच इंग्रजीतील वरेच शब्द ठिकठिकाणच्या बोलीभाषांत, त्यांच्या प्रत्यक्ष व्यवहारांत शिरतील. पण हे शब्द परके वाटणार नाहीत. त्यांचा वापर होताना त्यांचा अर्थ लोकांच्या तोंडी असलेल्या शब्दांच्या साहाय्याने स्पष्ट केलेला असेल. ह्यामुळे ठिकठिकाणच्या बोली प्रमाणित मराठीच्या जवळ येतील.

२) वरील कार्यक्रम विशिष्ट परिसरातील लोकजीवनात मुरलेली, त्या परिसरातील लोकभाषा आत्मसात केलेली, प्रमाणित मराठीवर चांगला काबू असलेली आणि इंग्रजी वाचू शकणारी माणसे पार पाडू शकतील. उच्च शिक्षणाचा आज जो प्रसार झाला आहे त्यामुळे अशी माणसे महाराष्ट्रात जवळजवळ सर्वत्र पुरेशा संख्येने आहेत. ती जर ह्या कार्यक्रमात सहभागी झाली तर ठिकठिकाणच्या बोलीभाषांतील अनेक शब्द—उदा. वेगवेगळे कारागीर जो कच्चा माल, जमीन, डोंगरदऱ्या, नक्षत्रे, पशु-पक्षी, समारंभ, संस्कार, चालीरीती, भाव-भावना, वस्त्रे, अलंकार, माणसांचे स्वभावविशेष, वागण्याच्या तऱ्हा याविषयींचे आज एका विशिष्ट परिसरात रूढ असलेले बोलके, रंगदार शब्द प्रमाणित मराठीत अवतरतील. प्रमाणित मराठी अधिक समृद्ध आणि कार्यकुशल होईल.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

३) आज बोलीभाषांतून होणारे व्यवहार जे मर्यादित व कुंठित आहेत ते अधिक समृद्ध आणि मोकळे होतील. केवळ बोली भाषा जाणणारी माणसे आज मुकी आहेत. ती बोलकी बनतील. ह्याचा परिणाम म्हणून घरी आणि दारी होणारा भाषिक व्यवहार अधिक सतेज होईल, त्याचा व्याप वाढेल आणि वाढणारी मुले हा भाषिक वारसा घेऊन शाळेत भाषा शिकतील. औपचारिक पद्धतीने शाळेत ज्या भाषा शिकाव्या लागतात त्या शिकणे त्यांना अधिक सुलभ जाईल.

४) बोलीभाषांना प्रतिष्ठा प्राप्त होईल. ज्यांची जागा प्रमाणित मराठीने घ्यायची आहे अशा त्या अप्रगल्भ, असंस्कृत हेंगाडी बोली आहेत हा समज नाहीसा होऊन बऱ्याचशा उन्नत पातळीवरच्या प्रादेशिक लोकव्यवहाराचे नैसर्गिक माध्यम हे त्यांचे स्थान त्यांना प्राप्त होईल. ह्या बोली आणि प्रमाणित मराठी ह्यांच्यात सतत दळणवळण चालू राहील. सर्व प्रादेशिक बोलींचे प्रवाह प्रमाणित मराठीत येऊन मिसळतील आणि ह्या उधाणलेल्या मराठीत एकवटलेले शब्द विशिष्ट प्रादेशिक बोलीत शिरतील.

सबंध महाराष्ट्राची समाईक भाषा असलेली प्रमाणित मराठी अजून घडायची आहे. ती कधी पूर्णपणे घडेल असे नाहीच. परंतु ती घडण्याच्या प्रक्रियेलाही अलीकडेच सुरवात झाली आहे. प्रगल्भ सांस्कृतिक व्यवहारापासून ज्यांना दूर ठेवण्यात आले होते अशा अनेक जातीजमातींतील तरुण आपल्या विशिष्ट बोलींचा भाषिक वारसा घेऊन मराठी साहित्याच्या—प्रमाणित मराठीच्या क्षेत्रात आज पहिल्यांदाच अवतरले आहेत. सामाईक मराठी भाषा घडण्याच्या प्रक्रियेचा हा प्रारंभ आहे. समाजाच्या अधिकाधिक विभागांतील शिक्षित मंडळीमध्ये प्रमाणित मराठी पसरू लागली आहे असे ह्या प्रक्रियेचे स्वरूप आहे. ही इष्ट असली, तरी एकतर्फी प्रक्रिया आहे. बोलीभाषांतील व्यवहार अधिक संपन्न करून त्यांना प्रमाणित मराठीच्या जवळ आणले, तर ही प्रक्रिया अधिक जोमदार बनेल. मग आजपर्यंत शिक्षणापासून दूर ठेवलेल्या जातिजमातींतील नव्याने शिकणारे तरुण आज आपली बोली सोडून प्रमाणित मराठीच्या क्षेत्रात उतरताना जसे दिसतात तसे ते दिसणार नाहीत. आपली बोली सोबत घेऊन ते प्रमाणित मराठीत उतरतील. बोलभाषांमध्ये जशा अठरापगड जाती आणि शेती व हुन्नर जसे मिसळलेले आहेत तसे ते प्रमाणित मराठीमध्ये मिसळलेले नाहीत. प्रमाणित मराठी ही मूलतः शहरी पांढरपेशा जातींची भाषा आहे आणि इंग्रजी अमदानीनंतर तिचे हे स्वरूप अधिकच घट्ट झाले आहे. बोली भाषा तिच्यात विरघळल्या, तर तिचा जोम आणि तिची संपन्नता किती तरी वाढणार आहे. बोलीभाषांना प्रमाणित मराठीच्या जवळ आणूनच ही गोष्ट साधता येईल.

प्रमाणित मराठी आणि इंग्रजी ह्या भाषांमधील संबंधाकडे आता मी वळतो. आपल्या परिस्थितीत इंग्रजी भाषेचे एक विशिष्ट स्थान आहे आणि ते दुहेरी आहे. अखिल भारतीय प्रगल्भ व्यवहाराचे-शासकीय, वैज्ञानिक-तांत्रिक, व्यवस्थापकीय, व्यापारी व्यवहाराचे- भाषिक माध्यम इंग्रजी आहे. आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठा आणि सत्ता यांचे दोन प्रकार आज महाराष्ट्रात दिसून येतात. एक प्रकार म्हणजे तालुका, जिल्हा आणि राज्य ह्या पातळ्यांवरील राजकीय पुढाऱ्यांना असलेली प्रतिष्ठा आणि अधिकार. सर्वसामान्य लोकांच्या अडचणी आणि आकांक्षा ह्यांच्याशी संबंधित असलेल्या व्यवहारावर ही प्रतिष्ठा आणि अधिकार आधारलेला असतो. ह्या व्यवहाराचे माध्यम मराठी आहे. दुसऱ्या प्रकारची प्रतिष्ठा आणि अधिकार वैज्ञानिक – तांत्रिक ज्ञान आणि कौशल्ये ह्यांच्यावर आधारलेला असतो. ह्या व्यवहाराचे माध्यम इंग्रजी आहे. दुसऱ्या प्रकारची, म्हणजे सुसंस्कृत प्रतिष्ठा ज्यांच्याकडे आहे ते सर्वसामान्यपणे राजकीय पुढाऱ्यांकडे तुच्छतेने पाहतात. पण आजच्या परिस्थितीत, म्हणजे सर्वसामान्य लोक निदान अस्वस्थ झाले आहेत आणि चुळबूळ करू लागले आहेत अशा परिस्थितीत सुसंस्कृत वर्ग आणि सर्वसामान्य लोक यांच्यामध्ये राजकीय पुढारी हाच एक दुवा आहे. आजचा राजकीय व्यवहार अतिशय अप्रगत आहे यात शंका नाही. पण त्याच्या उद्दिष्टांची आणि पद्धतीची चिकित्सा, मूल्यमापन करण्याची आणि त्याला वळण देण्याची कुवत जोपर्यंत सर्वसामान्य जनतेत आलेली नाही तोपर्यंत तो अप्रगतच राहणार. ज्या ज्ञानामुळे ही कुवत लोकांत येईल ते त्यांच्यापर्यंत पोचविण्याचे


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

काम सुसंस्कृत वर्गाचे आहे. वर म्हटल्याप्रमाणे बोली-भाषांच्या माध्यमातूनच हे काम साधता येईल. सुसंस्कृत वर्ग हे काम हातात घेत नाही ह्याचे एक महत्त्वाचे कारण असे, की हा वर्ग इंग्रजी भाषेत बंदिस्त आहे. ह्या वर्गाचे सभासद एकमेकांशी बोलू शकतात, ते लोकांशी बोलू शकत नाहीत.

दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळात अमेरिकेच्या वैज्ञानिक-तांत्रिक आणि आर्थिक बळामुळे इंग्रजी हे ज्ञानाच्या देवाण-घेवाणीचे आणि नवीन ज्ञानाच्या मांडणीचे आंतरराष्ट्रीय भाषिक माध्यम बनले आहे. त्यापूर्वीच्या काळी इंग्रजीला हे स्थान नव्हते.

ज्ञानाच्या भाषा म्हणून उदा. इंग्रजी, फ्रेंच, जर्मन ह्या सर्वसाधारणपणे सारख्याच तोलामोलाच्या भाषा होत्या. युरोपातील इतर भाषा ह्या भाषांच्या फार मागे नव्हत्या. ह्या सर्व भाषांचे एकमेकीशी सरळ दळणवळण असे. आज प्रगत जगातील विविध भाषिक समूह इंग्रजीशी आणि इंग्रजीद्वारा इतर भाषांत होणाऱ्या घडामोडीशी संपर्क साधणे सोयीचे मानतात ही वस्तुस्थिती आहे. पण प्रगत जगातील भाषा आणि इंग्रजी यांच्यामधील नाते, आणि मराठी व इंग्रजी यांच्यामधील नाते, ही सारखी नव्हेत. उदा. स्वीडनचे सर्व अंतर्गत व्यवहार स्वीडिश-मधून होतात. स्वीडिश ही स्वाभाविकपणे शिक्षणाच्या सर्व स्तरावर माध्यम आहे, कोणत्याही पातळीचे ज्ञान स्वीडिश भाषेतून घेता येईल अशी बरीचशी व्यवस्था आहे. महत्त्वाची पूरक भाषा हेच स्वीडिशच्या संदर्भात इंग्रजीचे स्थान आहे. मराठी आणि इंग्रजी यांच्यामधील संबंध ह्या स्वरूपाचा नाही हे उघड आहे.

स्वातंत्र्यानंतर भारतात जाणीवपूर्वक वैज्ञानिक आणि तांत्रिक शिक्षणाचा प्रसार करण्यात आला, मूलभूत वैज्ञानिक संशोधनाला उत्तेजन देण्यात आले, प्रगल्भ तत्त्वांवर आधारलेले उद्योग सुरू करून त्यांची पद्धतशीरपणे वाढ करण्यात आली. ह्या सर्व व्यवहाराची भाषा इंग्रजी राखण्यात आली. ह्याचा एक परिणाम असा झाला, की भारतीय वैज्ञानिक आणि तंत्रज्ञ हे मूलतः आंतरराष्ट्रीय वैज्ञानिक आणि तंत्रज्ञ यांच्या जमातीचे म्हणजे अमेरिकन वैज्ञानिक-तंत्रज्ञांच्या जमातीचे घटक बनले आणि ह्या जमातीतील त्यांचे स्थान स्वाभाविकपणे सीमेवरचे ठरले. वैयक्तिक गुणाच्या जोरावर काही शास्त्रज्ञांनी स्वतःसाठी यापेक्षा महत्त्वाचे स्थान प्राप्त करून घेतले यात शंका नाही. पण ज्या प्रमाणात त्यांना ह्या जमातीत अधिक अंतर्भागातील स्थान मिळाले त्या प्रमाणात ते तिच्या उद्दिष्टांत आणि व्यवहारांत अधिक गुरफटले गेले व त्यांचे भारतीयत्व औपचारिक ठरले.

वैज्ञानिकांची आंतरराष्ट्रीय जमात बनणे विज्ञानाच्या स्वरूपातच अंतर्भूत आहे. परस्परांशी बोलण्याची त्यांची एक भाषा उत्क्रांत होणेही अटळ आहे. ऐतिहासिक कारणामुळे ही भाषा आज इंग्रजी आहे. ह्या गोष्टीशी कुणाचेही वितुष्ट असण्याचे कारण नाही. पण जगात जोपर्यंत राष्ट्रे आहेत तोपर्यंत सर्वसाधारणपणे वैज्ञानिकांचे स्थान स्वतःच्या राष्ट्राच्या वैज्ञानिकांच्या जमातीचे सभासद आणि वैज्ञानिकांच्या आंतरराष्ट्रीय जमातीचे सभासद असे दुहेरी राहील. प्रगत राष्ट्राच्या बाबतीत ही स्थिती स्वाभाविकपणे असते आणि ही निरोगी स्थिती आहे. ही स्थिती भारतात क्षीणपणे आहे. वैज्ञानिकाने स्वतःच्या देशातील वैज्ञानिकांच्या जमातीत मानाचे स्थान प्राप्त करून घेण्याची महत्त्वाकांक्षा बाळगली पाहिजे. हे स्थान प्राप्त झाल्याचा स्वाभाविक परिणाम म्हणून त्याला आंतरराष्ट्रीय स्थान प्राप्त झाले पाहिजे. ह्याचा अर्थ असा, की देशातील वैज्ञानिकांच्या संघात उंच स्थान प्राप्त होण्यासाठी वैज्ञानिकाला वैज्ञानिक कामगिरी बजावावी लागेल. तिचा दर्जा असा असेल, की आंतरराष्ट्रीय पातळीवरही तिला स्वतःच्या गुणवत्तेमुळे मान्यता मिळेल. आज भारतात सर्वसाधारणपणे अशी परिस्थिती आहे, की भारतीय वैज्ञानिकांना आंतरराष्ट्रीय पातळीवर जी मान्यता असते तिच्यावर त्यांना देशात मिळणारी मान्यता अवलंबून असते. ह्याचा परिणाम असा होतो, की वैज्ञानिकांचे व्यावसायिक कार्यक्षेत्र, त्यांच्या संशोधनाचा रोख अमेरिकन विज्ञानातील प्रवाहांवरून निश्चित होतो. भारतीय औद्योगिक आणि सांस्कृतिक जीवनात भारतीय विज्ञानाला पुरेसे अधिष्ठान मिळत नाही. भारतीय विज्ञान अस्सलपणे भारतीय स्वायत्त बनू शकत नाही. भारताच्या सामाजिक आणि सांस्कृतिक जीवनाचे पोषण ते करीत

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाही आणि ह्या जीवनापासून त्याला प्रेरणा मिळू शकत नाही.

भारतीय विज्ञानाला भारतीय समाजात अधिष्ठान मिळण्यासाठी भारतीय समाजातून वैज्ञानिक आणि तांत्रिक ज्ञान खेळविण्यात आले पाहिजे. हे साधण्याचा दुहेरी मार्ग मला दिसतो. एक तर विद्यापीठातून भारतीय भाषांतून–महाराष्ट्रात मराठीतून–सर्व स्तरांवर विज्ञानाचे शिक्षण दिले पाहिजे. हे करण्याआड ज्या अडचणी म्हणून सांगण्यात येतात त्या बऱ्याचशा काल्पनिक असतात. परिभाषेची अडचण ही फालतू अडचण आहे. आपल्याला विषय माहीत असला, जो वाचक समोर आहे, त्याच्यासाठी म्हणून आपण लिहीत आहोत त्याची पूर्वतयारी किती आहे याची चांगली कल्पना आपल्याला असली आणि तो त्याला समजावा अशी आस्था असली तर त्याला समजेल अशा पद्धतीने आपण तो विषय त्याच्यासमोर मांडू. सरावाने हे काम आपण अधिक चांगल्या पद्धतीने करायला शिकू. विषय अशा पद्धतीने मांडताना, कोणतीही अपरिचित किंवा विशेष क्लिष्ट अशी संकल्पना विवेचनात प्रविष्ट करण्यापूर्वी तिच्या अर्थाचे स्पष्टीकरण करावे लागेल. अशा रीतीने आवश्यक ती पार्श्वभूमी तयार केल्यानंतर जी संकल्पना प्रविष्ट करण्यात येते तिला संस्कृतपासून बनविलेले एखादे नाव आपण दिले किंवा तिचे इंग्रजी नाव कायम ठेवून तेच वापरले तर ह्यामुळे विशेष फरक पडणार नाही. माध्यमिक पातळीपर्यंत मराठीतून विज्ञान चांगल्या प्रकारे मांडण्यात येते. म्हणजे शिक्षकांनी विषयांचे मराठीतून केलेले विवेचन ऐकून आणि मराठीतील पाठ्यपुस्तके वाचून विषयांच्या परीक्षेत उत्कृष्ट गुण मिळविता येतात, इंग्रजीतून ह्या विषयांचा अभ्यास केलेल्या केलेल्या विद्यार्थ्याला मिळतील तेवढे किंवा अधिकही गुण मिळविता येतात असा अनुभव आहे. मग त्यानंतरच्या अभ्यासक्रमात इंग्रजीचा आश्रय अनिवार्य का ठरतो? ह्या प्रश्नाचे उत्तर मराठी भाषेच्या कुवतीशी संबंधित आहे असे मला वाटत नाही. सर्व पातळ्यांवरील विज्ञान मराठीतून शिकल्याशिवाय महाराष्ट्रीय वैज्ञानिक एकमेकांशी विज्ञानाविषयी मराठीतून बोलणार नाहीत आणि ते एकमेकांशी मराठीतून बोलल्याशिवाय विज्ञान मराठी जीवनाचा भाग बनणार नाही.

वैज्ञानिक आणि तांत्रिक ज्ञान महाराष्ट्रीय समाजात खेळविण्याचा दुसरा, पर्यायी नव्हे तर पूरक मार्ग असा, की बारा ते अठरा ह्या वयोगटाच्या मुलांसाठी म्हणून लिहिलेले वैज्ञानिक साहित्य पुरेशा प्रमाणात उपलब्ध करून देणे. विज्ञानाच्या वाढीचा वेग आज विलक्षण आहे. आणि केवळ सरळ रेषेत वेगाने होणारी प्रगती असे ह्या वाढीचे स्वरूप नाही. ज्ञानात जी भर पडते तिच्यामुळे विज्ञानाच्या एखाद्या शाखेतील अंतर्गत व्यवस्था बदलते, त्या शाखेचे इतर शाखांशी असलेल्या संबंधाविषयीची कल्पना बदलते. नवीन शाखा उदयाला येतात, नवीन विशेषनामे धारण करून उदयाला येतात. ह्या घडामोडींची बिनचूक पण विद्यार्थ्यांना समजेल अशा पद्धतीने आणि अशा भाषेत माहिती करून देणारी पुस्तके मोठ्या प्रमाणावर मराठीतून प्रसिद्ध होणे आवश्यक आहे. ही माहिती विद्यार्थ्यांना असणे जितके महत्त्वाचे आहे तितकेच विज्ञानाच्या इतिहासाचे, त्याच्या सांस्कृतिक आणि सामाजिक पार्श्वभूमीचे आणि सांस्कृतिक-सामाजिक परिणामांचे त्यांना आकलन असणे महत्त्वाचे आहे. विज्ञान ही माणसाने घडवीत आणलेली रचना आहे, म्हणून तिला इतिहास आहे, ह्या इतिहासात नाट्यमय, रोमहर्षक प्रसंग घडलेले आहेत, महापुरुष होऊन गेले आहेत, विज्ञान-तंत्रज्ञानाने मानवी जीवनाचे बाह्यरूप आरपार पालटून टाकले आहे आणि माणसाच्या आंतरिक जीवनालाही वेगळे वळण दिले आहे. ह्याची व्यापक माहितीवर आधारलेली जाणीव वाढणाऱ्या विद्यार्थ्याला असली पाहिजे. ज्या बौद्धिक वातावरणात तो वाढतो त्याचा वैज्ञानिक वातावरण हा महत्त्वाचा भाग असला पाहिजे. आणि हे वातावरण मराठी भाषेच्या माध्यमातून त्याच्या भोवती निर्माण केले पाहिजे.

वेगवेगळ्या वैज्ञानिक विषयांची चोख आणि अद्यावत माहिती, महत्त्वाची किंवा मनोरंजक माहिती आणि इंग्रजी भाषा यांच्यामध्ये अनिवार्य नाते आहे ही कल्पना सोडून दिली पाहिजे. हे नाते आहे असे मानल्यामुळे ते निर्माण होते. मराठीचे विज्ञानाशी असे नाते जुळवून आणले पाहिजे. विज्ञानाला मराठी रूप दिले पाहिजे. ते देताना






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मराठीला वैज्ञानिक रूप प्राप्त होते आहे असे आपल्याला आढळून येईल.

जी गोष्ट विज्ञान-तंत्रज्ञानाची तीच सामाजिक शास्त्रे आणि मानव्य विद्या यांचीही आहे. उदा. समाजवाद हा एवढा कुतूहलाचा आणि भावनांना क्षुब्ध करणारा विषय ठरला आहे. पण समाजवाद म्हणजे नेमके काय, कोणकोणत्या भिन्न अर्थव्यवस्था, प्रत्यक्ष अस्तित्वात असलेल्या किंवा शक्य असलेल्या भिन्न अर्थव्यवस्था आज समाजवादी म्हणून ओळखल्या जातात, त्यांचे कोणते सामाजिक परिणाम घडून आले आहेत किंवा अपेक्षित आहेत ह्याची सर्वसामान्य लोकांना समजेल अशी माहिती करून देणारी किंवा नेमकेपणे सैद्धान्तिक चर्चा करणारी किती पुस्तके मराठीत आहेत ? अद्वैत वेदान्ताचे तत्त्वज्ञान हा खास भारतीय सांस्कृतिक वारसा आहे असे मानण्यात येते. ह्या तत्त्वज्ञानाची पद्धतशीरपणे मांडणी करणारी किती पुस्तके मराठीत आहेत ? आधुनिक जग कसे घडत आले– उदा. फ्रेंच राज्यक्रांतीचे स्वरूप काय होते, तिची आधारभूत तत्त्वे कोणती होती, ती कशी उदयाला आली त्यांचा अर्थ काय लावण्यात आला, समर्थन कसे करण्यात आले, त्यांचे सामाजिक, नैतिक, माणसांच्या मनोवृत्तीवर काय परिणाम झाले ह्याचे सांगोपांग विवेचन करणारी किती पुस्तके आहेत ? थोडक्यात असे म्हणता येईल, की सर्वच क्षेत्रांत वैचारिक साहित्याचा मराठीत शुकशुकाट आहे.

एक अस्वस्थ करून सोडील असा प्रश्न असा, की असे साहित्य निर्माण झाले तर ते वाचणार कोण ? हे वाचक विद्यापीठांतून निर्माण झाले पाहिजेत आणि ते आज होत नाहीत. ते होत नाहीत ह्याचे कारण विद्यापीठातील बौद्धिक जीवन क्षीण आहे. ह्याचा परिणाम आणि कारण असे, की समाजाचे बौद्धिक जीवन क्षीण आहे. हे घातचक्र कसे थांबविता येईल ? त्याला उलटी गती कशी देता येईल ? ह्या परिस्थितीचा भाषेशी काही संबंध आहे असे म्हणता येणार नाही. मराठी भाषेला मर्यादा आहेत म्हणून मराठी लोकांच्या वैचारिक जीवनाला मर्यादा पडतात असे म्हणणे हास्यास्पद ठरेल. विचार मूर्त होतो तेव्हा स्वतःची भाषा घेऊन तो मूर्त होतो. मराठी लोकांचे वैचारिक जीवन जर जोमदार असते, तर मराठी भाषा जोमदार बनली असती.

सामाजिक परिवर्तन म्हणजे एका विशिष्ट अवस्थेत असलेल्या समाजाला दुसरी एक विशिष्ट अवस्था प्राप्त करून देणे असे मी मानीत नाही. समाज ही जिला असे वेगवेगळे आकार द्यायचे असतात अशी सामग्री नव्हे. समाजातील प्रत्येक व्यक्तीला अधिक चांगले जीवन जगता यावे ह्यासाठी प्रयत्न करीत राहणे असे सामाजिक परिवर्तनाचे स्वरूप असते. ह्या अर्थाने सामाजिक परिवर्तन ही अखंडपणे चाललेली प्रक्रिया असते, तिला अंत नसतो. जोपर्यंत माणसे विचार करू शकतात, जोपर्यंत त्यांना एकमेकांविषयी आस्था आहे आणि त्याहून अधिक चांगल्या परिस्थितीची कल्पना त्यांना करता येते तोपर्यंत समाजपरिवर्तन चालू राहणार. कित्येक वेळेला चांगल्या जीवनाच्या आड येणाऱ्या परिस्थितीचे स्वरूप इतके अमानुष असेल आणि ही परिस्थिती इतक्या व्यापक प्रमाणावर फैलावलेली असेल, की ती नाहीशी करण्याच्या कामाला अग्रक्रम देणे, ह्या कामाला सर्व सामाजिक प्रयत्नांचे तातडीचे साध्य बनविणे अटळ ठरते– उदा. भारतीय दारिद्र्य किंवा अस्पृश्यता. अशा परिस्थितीत सामाजिक परिवर्तनाच्या प्रक्रियेला एक निश्चित उद्दिष्ट आणि कार्यक्रम लाभतो. पण हे उद्दिष्ट साध्य झाले म्हणून सामाजिक परिवर्तनाची प्रक्रिया थबकत नाही.

निसर्गाविषयी, जीवनाच्या उद्दिष्टांविषयी, माणसामाणसांतील संबंधाविषयी, भौतिक आणि सामाजिक परिस्थितीविषयी पद्धतशीरपणे आणि संवेदनशीलपणे विचार करणे हा चांगल्या मानवी जीवनाचा अनिवार्य भाग आहे आणि सामाजिक जीवन सुधारण्याचे ते अनिवार्य साधन आहे. ह्या विचारातून ज्ञान आणि मूल्ये निर्माण होतात आणि त्यांच्यामुळे पुढील विचाराला प्रेरणा आणि दिशा लाभतात. अशा विचाराची परंपरा मराठीत नाही. अजिबात नाही असे नाही, पण ती फार क्षीण आणि पुसट आहे. ह्यामुळे ज्ञान आणि विचार ह्यांचे माध्यम असलेली भाषा हे स्वरूप मराठीला कधी प्राप्त झाले नाही. विवेचक, गद्याचा, पुरावा आणि युक्तिवाद यांच्या आधारे सिद्धांतांचे खंडनमंडन करणाऱ्या गद्याचा विकास मराठीत फारसा झाला नाही. विवे-


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चक गद्याची समृद्ध परंपरा संस्कृतमध्ये आहे. दर्शने आणि शास्त्रे यांची मांडणी आणि विकास करणारे दार्शनिकांमधले वादविवादांचे माध्यम असलेले हे गद्य आहे.

नेमकेपणा, सुस्पष्टता आणि तार्किक सुसंगती हे अभिजात गद्याचे जे सारभूत गुण आहेत ते ह्या गद्यात प्रकर्षाने आढळतात. ही गद्याची परंपरा मराठीत कधी अवतरलीच नाही. हे गद्य ज्या शास्त्रांचे आणि दर्शनांचे माध्यम होते त्यांच्यांत बऱ्याच प्रमाणात ऐहिक आशय होता. उदा. न्याय–वैशेषिक किंवा व्याकरण ही मूलतः ऐहिक शास्त्रे आहेत. परंतु पुरोहितवर्गाच्या धार्मिक आध्यात्मिक परंपरेमध्ये ती बंदिस्त राहिली आणि ह्या परंपरेचा एक घटक म्हणूनच त्यांचा विकास झाला. आणि ह्याचा परिणाम असा झाला, की संस्कृत हेच त्यांचे भाषिक माध्यम राहिले. धार्मिक परंपरेशी असलेले आपले नाते सैल करून, आपल्या ऐहिक–सांस्कृतिक स्वरूपावर भर देऊन, आपल्या तार्किक प्रकृतीच्या गद्याच्या माध्यमातून ही शास्त्रे जर मराठीत अवतरली असती, तर महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास वेगळाच झाला असता. एक तर एक अतिशय उपयुक्त, विस्तृत आणि प्रगल्भ अशी, कोणत्याही बौद्धिक विषयाच्या मांडणीला आवश्यक असलेली परिभाषा मराठीत रुळली असती. आधुनिक युरोपीय भाषांतून प्रगल्भ बौद्धिक विषयांवर लिखाण होऊ लागले त्याच्या प्रारंभापासूनच त्या भाषांत ग्रीक व लॅटीन परिभाषा प्रविष्ट झाली. संस्कृतमध्ये निदान दोन हजार वर्षांच्या विचाराचे फलित म्हणून जी परिभाषा घडविण्यात आली होती ती मराठीमध्ये कधी अवतरलीच नाही. हा आपला मोठाच बौद्धिक वारसा आपण गमावला. ही परिभाषा मराठीत रुळली असती, तर त्याचा अर्थ असा असता, की तिच्यात मूर्त झालेला विचार मराठी विद्वानांनी आत्मसात केलेला होता आणि त्यांच्या बोलण्या-लिहिण्यातून तो प्रकट होत होता.

ह्या परिस्थितीतच पाश्चिमात्य अनुभवाधिष्ठित विज्ञाने आणि सामाजिक शास्त्रे आत्मसात करण्याचे कार्य अधिक सहजपणे घडले असते. त्यांचा आणि आपल्या पारंपरिक शास्त्रांचा सांधा बेमालूमपणे जुळविता आला असता. इंग्रजांनी ती आपल्याला शिकविली नसती, आपण ती त्यांच्यापासून शिकलो असतो. आणि त्यांचे माध्यम मराठी झाले असते. ती पूर्णपणे नवीन सुरुवात झाली नसती. आपल्या शास्त्रांनी घेतलेले ते एक अतिशय वेगळे वळण ठरले असते. प्रत्यक्षात वेगळे घडून आले. ही शास्त्रे इंग्रजांनी आपल्याला शिकविली, हे शिक्षण भारतीय बौद्धिक जीवनाचा नवीन प्रारंभ ठरला आणि बौद्धिक जीवनाची भाषा इंग्रजी ठरली.

ह्यातून जी बौद्धिक चालना मिळाली तिच्यातून आधुनिक मराठी विवेचक गद्य निर्माण झाले. हे लोकहितवादी, जोतिबा फुले, विष्णुशास्त्री, आगरकर–टिळक यांनी निर्माण केलेले गद्य. त्यांच्या ह्या थोर कामगिरीविषयी कृतज्ञता व्यक्त करूनही तिचा एकांगीपणा ध्यानात घेणे आवश्यक आहे. भारतीय, मुख्यतः हिंदू समाजाचे विश्लेषण, चिकित्सा आणि त्याचे पुनरुत्थान ज्या तत्त्वांच्या आधारे साधता येईल त्यांचे विवेचन हे ह्या साहित्याचे विषय होते. आपल्या समाजाच्या दृष्टीने ह्या साहित्याचे महत्त्व मूलभूत आहे यात शंका नाही. पण पाश्चात्त्य ज्ञानाशी परिचय झाल्याने बौद्धिक जीवनात प्रबळ चैतन्य उफाळून आले, नैसर्गिक आणि सामाजिक विज्ञाने, तत्त्वज्ञान, इतिहास ह्या क्षेत्रांतील ज्ञान आणि विचार अधाशीपणे आत्मसात करण्यात येऊ लागले. हे ज्ञान आणि विचार यांच्यावर आधारलेल्या भूमिका घेऊन सामाजिक, आर्थिक, धार्मिक प्रश्नांची चर्चा होऊ लागली असे दृश्य दिसत नाही. ह्या विषयांवर मराठीतून मूलभूत ठरेल असे लिखाण झाले नाही. बौद्धिक जीवन क्षीण होते ह्याचेच हे लक्षण आहे. ह्या लिखाणाचे लेखक आणि वाचक विद्यापीठे व माध्यमिक शाळा ह्यांतून बाहेर पडलेले सुशिक्षित लोकच असत. त्यांना ह्या ज्ञानाची भूक नव्हती असाच ह्या परिस्थितीचा अर्थ आहे.

स्वातंत्र्यानंतर चौतीस वर्षे लोटली, तरी ह्या परिस्थितीत पालट झालेला नाही. बौद्धिक जीवन क्षीण, विद्यापीठाच्या प्रांगणात बंदिस्त असलेले, औपचारिक स्वरूपाचे आहे. ह्या निःसत्त्वपणाची सामाजिक किंवा अधिक खोल स्वरूपाची कारणे काय असतील ती असोत. अजूनही इंग्रजी हीच आपली ज्ञानभाषा आहे. व्यक्तीच्या दृष्टीने पाहिले, तर ज्ञानाच्या बाबतीत ती स्वावलंबी असण्यासाठी

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तिला इंग्रजी उत्तम रीतीने वाचता येणे आवश्यक आहे. केवळ पूरक भाषा हे इंग्रजीचे स्थान नाही. ज्ञानाच्या जवळजवळ सर्वच प्रांतांच्या बाबतीत मराठी लोकांची ज्ञान मिळविण्याची प्रमुख भाषा आज इंग्रजी आहे.

ही स्थिती लाजिरवाणी आहे हे ज्यांना पटते, ते हे ज्ञान मराठीत आणण्याची खटपट करतात. अनेकदा हा कार्यक्रम चांगल्या इंग्रजी पुस्तकांचे मराठीत भाषांतर करणे ह्या स्वरूपाचा असतो. ही भाषांतरे सामान्यपणे फसलेली असतात असा अनुभव आहे. एक तर त्यांच्या भाषेवर मुळातील इंग्रजीची इतकी दाट छाया असते, अपरिचित पारिभाषिक शब्दांचा तिच्यात एवढा भरणा असतो, की त्यांना मराठी पुस्तके का म्हणावे हे समजेनासे होते. मी स्वतः अशा कार्यक्रमात गुंतलेलो असल्यामुळे भाषांतराविषयी अशा धाटणीच्या तक्रारी जेव्हा करण्यात येतात तेव्हा भाषांतरकर्त्याविषयी मला मनापासून सहानुभूती वाटत असते, पण ह्या तक्रारीत तथ्य आहे हेही मला पटत असते. भाषांतरांच्या यशापयशाच्या प्रश्नापेक्षा अधिक मूलभूत प्रश्न असा, की त्यांचे प्रयोजन तरी काय आहे ? ती कोणासाठी आहेत ? ज्यांना इंग्रजी चांगल्या रीतीने समजते त्यांच्या दृष्टीने ती अनावश्यक आहेत. ज्यांना इंग्रजी समजत नाही, फक्त मराठी येते त्यांच्या दृष्टीने ती अनुपयुक्त आहेत, कारण त्यातली मराठी भाषा समजण्यासारखी नसते. जे मराठी भाषांतर मूळ इंग्रजी पुस्तक समजलेले असल्याशिवाय समजू शकत नाही ते असून नसल्यासारखे आहे हे उघड आहे.

तेव्हा प्रमाण इंग्रजी पुस्तकांचे मराठीत भाषांतर करण्याचा कार्यक्रम हा ज्ञान मराठीत आणण्याच्या कार्यक्रमाचा दुय्यम भाग असावा, त्याचा प्रधान भाग असू नये. पुस्तक हा लेखकाने एका विशिष्ट प्रकारच्या वाचकाशी केलेला संवाद असतो. मराठी पुस्तक हे विशिष्ट प्रकारच्या मराठी वाचकाशी साधलेला संवाद असला पाहिजे. त्याची कुवत, पूर्वतयारी, त्याची एकंदर परिस्थिती यांचा संदर्भ राखून जे ज्ञान त्याला द्यायचे आहे ते त्याला देण्याचा प्रयत्न केला तर ते त्याला अधिक चांगल्या प्रकारे पचविता येईल. असे पचलेले ज्ञान त्याच्या विचारात, म्हणजे भाषेत उतरेल. त्याचा विचार आणि भाषा ह्या ज्ञानामुळे वेगळी बनतील. असा शिक्षित वाचकवर्ग पुरेशा संख्येने निर्माण झाला, आणि त्यांच्या तोंडी आपण लिखाणात ज्ञानाची वाहक असलेली मराठी भाषा रुळली, की प्रमाण इंग्रजी ग्रंथांची सरळ इंग्रजी भाषांतरे करण्याची पूर्वतयारी पुरी झाली असा त्याचा अर्थ होईल.

संबंध महाराष्ट्राची सामाईक मराठी भाषा ज्याप्रमाणे अजून घडायची आहे त्याप्रमाणे आधुनिक ज्ञानाचे माध्यम असलेली मराठी भाषाही अजून घडायची आहे. आज रुढ असलेल्या प्रमाणित मराठीचा ज्यांना अतिरेकी लळा आहे, त्यांच्या ध्यानात ही गोष्ट येत नाही. 'हे शुद्ध मराठी नव्हे' किंवा 'हे मराठी वाक्य म्हणजे संस्कृत शब्दांचे बनलेले इंग्रजी वाक्य आहे' अशा तक्रारी जेव्हा करण्यात येतात, तेव्हा प्रमाणित मराठीचे आजचे स्वरूप बहुसंख्य मराठी माणसे मुकी असण्यावर आणि आधुनिक ज्ञान मराठीला वर्ज्य असण्यावर आधारलेले आहे ही गोष्ट ध्यानात घेतली जात नाही. 'अशुद्ध' मराठीला 'शुद्ध' मराठीइतकेच मराठीत स्थान असण्याचा अधिकार आहे. कारण प्रत्येक माणसाला बोलण्याचा अधिकार आहे. आणि आज मराठी माणसे प्रत्यक्ष ज्या भाषेत बोलतात त्या त्यांच्या स्वतःच्या भाषेत बोलण्याचा अधिकार आहे. "तुम्ही आमच्यासारखे बोलायला लागेपर्यंत तुम्ही बोलता कामा नये" हे चालणार नाही. आणि ह्याचप्रमाणे विशिष्ट ज्ञान मराठीत मांडण्यासाठी संस्कृत शब्दांची बनलेली इंग्रजी वळणाची वाक्ये बोलणे किंवा लिहिणे जर आवश्यक असेल, तर ही वाक्येही मराठी म्हणून स्वीकारली पाहिजेत. पण ती प्रत्यक्ष मराठी बनली पाहिजेत, म्हणजे ती लेखकाची, विशेषतः भाषांतरकर्त्याची खाजगी वाक्ये असता कामा नयेत. ती लोकांच्या तोंडातून आणि लेखणीतून उतरली पाहिजेत. ती भाषेत प्रविष्ट करण्यापूर्वी आवश्यक ती पूर्वतयारी करण्यात आली पाहिजे.

आज प्रमाणित मराठीचा प्रत्यक्षात कुठे वापर होतो ? ललित लेखनात व साहित्यसमीक्षेत होतो, वर्तमानपत्रांत होतो, सार्वजनिक व्याख्याने आणि सभा-समारंभ यांच्यांत होतो. शेतांत आणि कार-



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

खान्यांत, बँकांत, न्यायालयांत, शासनात, प्रयोगशाळांत होत नाही. सुसंस्कृत जीवनाच्या ह्या सर्व महत्त्वाच्या ठिकाणी वेगवेगळी, पण परस्परसंबंधित रूपे घेऊन कार्यक्षमतेने आणि डौलाने वावरणारी मराठी अजून घडायची आहे. ह्याचा अर्थ असा, की स्वायत्त आणि जोमदार असे महाराष्ट्रीय जीवन अजून घडायचे आहे.

माणसांविषयी आणि जीवनाच्या गुणवत्तेविषयी उत्कट आस्था असल्याशिवाय असे जीवन घडविता येणार नाही. ही आस्था आज पुरेशा प्रमाणात नाही आणि ती कशी चेतविता येईल हे मला माहीत नाही. मला एवढेच म्हणावेसे वाटते की, आपल्या देशात अभिमान, आपल्या समाजाचा अभिमान, आपल्या भाषेचा अभिमान ह्या भावना व्यर्थ झालेल्या नाहीत आणि कधी व्यर्थ होणार नाहीत. फक्त अभिमान म्हणजे बढाईखोरपणा नव्हे किंवा आंधळा लळा नव्हे हे ओळखले पाहिजे. अभिमान म्हणजे आपल्या स्वत्वाची जाणीव, स्वत्व टिकवून धरण्याच्या आणि त्याचा परिपोष करण्याच्या अधिकाराची आणि ह्या अधिकाराशी संलग्न असलेल्या जबाबदारीची जाणीव. आपल्या समाजाचा अभिमान म्हणजे समाजातील प्रत्येक व्यक्तीच्या मानवी प्रतिष्ठेविषयी आत्मीयता असा ह्या अभिमानाचा अर्थ जर आपण लावला, तर आपल्यावरील जबाबदारीचे समग्र स्वरूपही आपल्या ध्यानात येईल आणि ती पार पाडायची प्रेरणाही आपल्याला मिळेल.

१९४७–१९५४ पर्यंत झालेल्या मराठी पुस्तकांत प्रथम क्रमांकाचे साहित्य अकादमी (नवी दिल्ली)चे रु. पाच हजार पारितोषिक प्राप्त झालेले

**वैदिक संस्कृतीचा विकास**

पृ. ६०० ] (सुधारून वाढविलेली नवीन आवृत्ती) [किंमत ३० रु.

लेखक– तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी.

प्रकाशक : प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई (जि० सातारा)









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# मराठी भाषेच्या विकासाविषयी : अ. रा. कामत

गेली दोन अडीच वर्षे महाराष्ट्राच्या समाज-जीवनात मराठी भाषेचा वापर अधिक प्रमाणात आणि समृद्धपणे कसा होऊ शकेल, त्याकरिता अवश्य तो भाषाविकास कसा होऊ शकेल, याविषयी बरेच विचार मांडले गेले आहेत. याचाच एक महत्त्वाचा भाग असा, की सरकारी व्यवहारात मराठी भाषा अधिकाधिक उपयोगात यावी या हेतूने एक वर्ष राजभाषा वर्ष म्हणून साजरे झाले. त्याही निमित्ताने बरीच वादचर्चा झाली. मनात असूनही काही कारणामुळे त्यावेळी मला लिहिता आले नाही. या वर्षीही याविषयीची चर्चा काही परिसंवादांतून होत आहे, आणि या चर्चा व भाषाविकासाचे प्रयत्न पुढे चालूच राहणार आहेत. त्यातून उद्भवणाऱ्या काही प्रश्नांबाबत काही विचार मी या लेखात वाचकापुढे ठेवीत आहे.

लेखाच्या पहिल्या विभागात समाजात घडून येणाऱ्या बदलामुळे भाषेसमोर नवी आव्हाने कशी उभी राहतात, ती आव्हाने ती कशी पेलते, त्यातून भाषाविकास कसा घडून येतो, आणि भाषेपुढील आजची आव्हाने कोणती याविषयी महाराष्ट्राच्या संदर्भात विचार केला आहे. दुसऱ्या विभागात मराठी भाषेतील शब्दसंपत्ती आणि शब्दशोध, विशेषतः पारिभाषिक शब्दांचा शोध, यांचा आजच्या परिस्थितीच्या अनुषंगाने विचार केला आहे. तिसऱ्या विभागात भाषाविकासाचे सध्या जे प्रयत्न चालू आहेत त्यांचा थोडक्यात सटीक आढावा घेऊन नवे प्रयत्न कोणत्या दिशेने व्हावेत याविषयी मी काही सुचविले आहे.

## १. आधुनिक मराठीचा विकास आणि बदलते सामाजिक वास्तव

सामाजिक वास्तवात मूलगामी बदल होऊ लागले, की भाषेतही बदल होतो. सामाजिक बदलाचे अनेक पैलू असतात. आर्थिक घडी बदलते, नवे तंत्रज्ञान, नव्या उत्पादनपद्धती, येतात, त्यातून नवे उत्पादन-संबंध रूढ होतात, नवे उद्योग व व्यवसाय निर्माण होतात, एक नवी आर्थिक संरचना उभी होते. नवी राज्यपद्धती, सरकार आणि कारभारव्यवस्था, तसेच नवे कायदे व न्यायव्यवस्था अमलात येतात. समाज-रचना आणि सामाजिक संबंध यातही बदल घडून येतात. ज्ञानविज्ञान, तंत्रज्ञान, समाजविज्ञान आणि तत्त्वज्ञान यांचाही नवा प्रवास सुरू होतो. परिणामी शिक्षणव्यवस्थाही बदलते. अर्थातच या सर्वांचा परिणाम विचारविश्व तसेच वाङ्मय व कला इत्यादींचे सांस्कृतिक विश्व यांवरही होतो. नव्या सामाजिक वास्तवाला बांधणारे किंवा त्याला धरून जे नवे विचार, कल्पना आणि विचारप्रणाली मूळ धरू लागतात, त्यामुळे या वास्तवाला बांधणारा नवा विचारव्यूह निर्माण होऊ लागतो. नवे विचार, त्यांचा आविष्कार व प्रसार, तसेच अनेकविध सामाजिक व्यवहार हे मुळात मुख्यतः शब्दरूपाने व्हावे लागतात. त्यामुळे भाषेसमोर नवी आव्हाने उभी राहतात. ती समर्थपणे पेलण्यासाठी नवी भाषाशैली निर्माण होते, शब्दसंपत्तीचा विचार होतो आणि नव्या कल्पनांना शब्दरूप देण्यासाठी शब्दशोध, शब्दवेध सुरू होतो. सारांश, सामाजिक वास्तव बदलत असताना समाजाच्या भाषेतही बदल व्हावा लागतो, होऊ लागतो.

महाराष्ट्राच्या (तसेच भारताच्या) आधुनिक इतिहासाकडे, म्हणजे इंग्रजी साम्राज्यसत्तेने या देशात पाय रोवल्यानंतरच्या काळाकडे, आणि या काळातील मराठी भाषेच्या (तसेच भारतीय भाषांच्या) विकासाकडे या दृष्टीने बघता येते. सोयीसाठी दीडशेहून अधिक वर्षांच्या या काळाचे तीन उपकालखंड मानता येतील, ते असे :

अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

(१) अव्वल इंग्रजीचा तसेच पहिल्या महायुद्धापर्यंतचा काळ की ज्याचे स्थूलपणे (अ) १८८०–९० पर्यंतचा, आणि (आ) नंतरचा, १९१५–२० पर्यंतचा असे दोन पोटविभाग पडतात, (२) दोन महायुद्धांमधील, म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंतचा काळ, आणि (३) स्वातंत्र्योत्तर काळ. या कालखंडांतील महाराष्ट्रातील सामाजिक बदल आणि मराठी भाषेचा विकास यांचा संयुक्त विचार थोडक्यात पुढील काही परिच्छेदांत केला आहे.

एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत सर्व हिंदुस्थानवर ब्रिटिश साम्राज्यसत्ता या ना त्या स्वरूपात स्थापन झाली. तिचे स्वरूप केवळ राजकीय अधिराज्य एवढेच नव्हते. हे आक्रमण राजकीय तसेच आर्थिक, सामाजिक, वैचारिक म्हणजे सांस्कृतिकही होते. नवा भांडवलदारी अर्थव्यवहार सुरू झाला. यंत्रोद्योग, कारखाने निघाले; रेल्वे, आगबोटी, टपाल, तारखाते या रूपाने दळणवळणाची नवी साधने पसरली; बँका, व्यापारी व औद्योगिक कंपन्या निघाल्या; नवे व्यवसाय निर्माण झाले; शेती आणि शेतीव्यवहार यांचे स्वरूप बदलले. सारांश, भारतातील जुनी सरंजामदारी अर्थव्यवस्था जाऊन तिच्या जागी भांडवलदारी व्यवस्था तिच्या वासाहतिक स्वरूपात, म्हणजे ब्रिटिश साम्राज्यवादी अर्थव्यवस्थेला अंकित, तिच्या शोषणकार्याला साहाय्यक, अशा स्वरूपात रूढ झाली.

इंग्रजांनी अर्थातच इथे नवी राज्यपद्धती, कारभारपद्धती, कायदे आणि न्यायसंस्था अमलात आणल्या. नवी विद्या म्हणजे आधुनिक ज्ञानविज्ञान, तंत्रज्ञान, समाजविज्ञान, यांचा भारतीयांत परिचय व प्रसार होऊ लागला, आणि ही सर्व अर्थातच इंग्रजी भाषेतून, त्याच्या ब्रिटिश तऱ्हेच्या आविष्कारातून येथे आली. म्हणजेच नवी इंग्रजी शिक्षणपद्धती अमलात आली. नवी मूल्ये, नवे विचार, भांडवलदारी उदारमतवादाचे अंतःसूत्र असलेली, पण प्रत्यक्षात साम्राज्यवादी शोषण आणि कारभार यांचा पाठपुरावा करणारी विचारप्रणाली, इंग्रज राज्यकर्त्यांनी आपल्याबरोबर आणली. त्यामुळे सामाजिक-राजकीय क्षेत्रात व्यक्तीच्या प्रतिष्ठेचे व समानतेचे तत्त्व आपल्या परिचयाचे झाले, तर धनाधिष्ठित व्यवहार आणि कराराचे स्वातंत्र्य ही अर्थव्यवहाराची पायाभूत तत्त्वे बनली.

याविषयी दोन-तीन बाबी आपल्या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत. एक असे, की सुरुवातीच्या काळातला इंग्रज साम्राज्यवाद्यांचा भारताविषयीचा काहीसा प्रागतिक दृष्टिकोण १८५७ सालच्या उठावानंतर सर्वस्वी प्रतिगामी बनला. यापुढे त्यांचे राजकीय धोरण येथील आर्थिक सरंजामदारी संस्कृतीला विरोधण्यापेक्षा चुचकारण्याचे राहिले. दुसरे असे, की राज्यकारभार, न्यायसंस्था, अर्थव्यवहार आणि शिक्षण या सर्व बाबतींत मध्यम आणि उच्च स्तरावर सर्व व्यवहार सर्रास इंग्रजी भाषेतून होऊ लागले. मात्र खालच्या स्तरांवरील शिक्षण आणि व्यवहार देशीभाषांतून होणे आवश्यकच होते. तिसरी गोष्ट अशी, की या सर्वंकष प्रभावाखाली हिंदवासियांत आणि विशेषतः नव्या शिक्षित वर्गात नवे विचार, आचार आणि आर्थिक-सामाजिक-राजकीय व्यवहार सुरू झाले. एकीकडे या नव्या इंग्रजी शिक्षित वर्गाचा भर नव्या जमान्यात निर्माण झालेल्या आर्थिक लाभाच्या व प्रतिष्ठेच्या जागा मिळवून वैयक्तिक, जातिविशिष्ठ आणि विभागीय प्रगती साधण्याचा होता. दुसरीकडे या नव्या व्यावहारिक आणि वैचारिक बदलामुळे स्वतत्त्वाचा शोध आणि जाण होऊन सामाजिक-धार्मिक सुधारणांच्या चळवळी सुरू झाल्या आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य आणि राजकीय सत्ता यांच्या संपादनासाठी आंदोलन उभे राहू लागले.

सामाजिक बदलाच्या या प्रक्रियेमुळे, त्याविषयीचा विचार, व्यवहार आणि प्रसार यांच्या आवश्यकतेमुळे, मराठी भाषेपुढे ( तसेच इतर भारतीय भाषांसमोर ) नवी आव्हाने अपरिहार्यपणे उभी राहिली. ती पेलण्यासाठी भाषाविकास, म्हणजेच भाषेचा आविष्कार, शैली व शब्दसंपत्ती, यांत अनेकविध बदल घडून येऊ लागले. बरेचसे व्यवहार, ज्ञान-संकल्पना आणि विचार सर्वस्वी नवे होते, तेव्हा समर्पक नव्या शब्दांचा शोध आणि उपयोग हेही ओघाने आले. या भाषाविषक प्रक्रियेचा विचार करताना ज्या एका बाबीचा विशेष उल्लेख करायला हवा ती ही, की मराठीचा नवा व्यवहार करणारा हा इंग्रजीशिक्षित मध्यम वर्ग त्यावेळी मुख्यतः



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

समाजातील उच्चवर्णीय (ब्राह्मण, कायस्थ इत्यादी), उच्चवर्गीय (म्हणजे शासनातील वरिष्ठ वर्ग, शिक्षक-प्राध्यापक आणि व्यावसायिक वर्ग इत्यादी) होता. या सर्वांची मराठीच्या भाषिक विकासावर दाट छाया पडावी यात नवल नाही.

या सर्वांचा परिणाम म्हणून भाषेचा विकास आणि बदल अनेक अंगांनी, सर्वच अंगांनी झाला. आजच्या विवेचनात यापैकी दोन प्रमुख महत्त्वाच्या अंगांचा विचार अभिप्रेत आहे. मराठीला सर्वस्वी नवीन असलेले निबंधात्मक गद्य आणि शब्दशोध किंवा नव्या परिभाषेचा शोध. इंग्रजी ग्रंथांच्या परिचयाने, परिशीलनामुळे, एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापासून मराठी गद्याचा नवा अवतार निर्माण झाला, रूढ झाला आणि विकास व विस्तार पावला. नव्या जमान्यात व्याख्याने व वृत्तपत्रे आणि ग्रंथ ही लोकशिक्षणाची तसेच लोकजागृतीची महत्त्वाची साधने होती, त्यासाठी सुलभ, सुटसुटीत आणि मुद्देसूद लिहिणे (आणि बोलणे) आवश्यक होते, अशा रीतीने अर्वाचीन मराठी गद्याची घडण बनत गेली.

अगदी सुरुवातीचा काळ पाहिला, तर नवीन गद्य-शैली आणि नवी शब्दसंपत्ती बऱ्याच अंशी सरळ, सुबोध होती. जुन्या ग्रंथांतील परिचित मराठी व संस्कृत शब्द आणि बोली भाषेतील बालबोध शब्द, हा त्याचा पाया होता आणि मराठीत रूढ झालेले अरबी-फारशी शब्द, इंग्रजी शब्दांची रुळू पाहणारी रूपे, यांचा कोणताही विधिनिषेध किंवा हातचा न ठेवता उपयोग केला जाई. जिथे संकल्पनात्मक विचार असे तेथे सोप्या संस्कृत शब्दरचनेचा आधार घेतला जाई. या काळात मराठी भाषेतून नवे ज्ञानविज्ञान देण्याचे प्रयत्न झाले, त्यात केवळ वाङ्मयच नव्हे तर रसायनशास्त्र (केमिस्ट्री), भौतिकी (फिजिक्स) आदी विज्ञानशाखा, तसेच गणित, अर्थशास्त्रासारखी समाजविज्ञाने तसेच यांत्रिकी (इंजिनिअरिंग) आणि वैद्यक यांचाही समावेश होता. महाराष्ट्रात नव्या पाश्चात्त्य ज्ञानविज्ञानाचे वितरण मराठी भाषेच्या द्वारा व्हावे यासाठी हा प्रयत्न होता. पण १८६०–७० या दरम्यान (माध्यमिक व विद्यापीठीय) उच्च शिक्षणाची आणि उच्चस्तरीय राज्यव्यवहाराची भाषा केवळ इंग्रजी झाल्यामुळे या प्रयत्नांना आणि त्यामुळे होणाऱ्या भाषाविकासाच्या प्रयत्नांना फटका बसला. प्राथमिक शिक्षण, वृत्तपत्रे व ग्रंथ यांचे द्वारा शिक्षणक्षेत्राबाहेरचे लोकशिक्षण, लोकजागृती हीच भाषाविकासाची मुख्य उद्दिष्टे व क्षेत्रे राहिली. असो.

यापुढील काळात सामाजिक आणि राजकीय जागृतीचे अधिक पद्धतशीर प्रयत्न होऊ लागले, तेव्हा यासंबंधी दोन-तीन मुख्य प्रवाह दिसू लागले. एक, धार्मिक–सांस्कृतिक पुनरुज्जीवनाचा पुरस्कार करून त्या पायावर राष्ट्रवाद उभारू पाहणारा, आणि म्हणून मराठी भाषेचा मुख्यतः संस्कृतनिष्ठ विकास करणारा प्रवाह. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांना तिचे प्रमुख अध्वर्यू म्हणता येईल. दुसरा, लोकहितवादी, आणि नंतरच्या काळात फुले व त्यांचे सहकारी, यांचा सामाजिक समतेचा पुरस्कार करणारा आणि म्हणून सुबोध मराठीवर भर देणारा प्रवाह. आगरकर, टिळक इत्यादी प्रथितयश विचारवंतांना मध्यममार्गी समजता येईल. कारण त्यांचा भर संस्कृतनिष्ठेवर नव्हता, तर मुख्यतः भाषेतील रूढ शब्दांपासून पण आवश्यक तेथे संस्कृताकडे वळून नवी शब्दसंपत्ती निर्माण करून प्रभावशाली मराठी गद्य लिहिण्यावर त्यांची भिस्त असल्याचे दिसते. या तिन्ही प्रवाहांवर अर्थातच इंग्रजी गद्यरचनेची छाप पडली होती, आणि ते एका अर्थी स्वाभाविक होते; कारण या सामाजिक–राजकीय तसेच भाषिक प्रबोधनाचे मूलकारण आणि प्रयोजन इंग्रजी सत्ता आणि इंग्रजी भाषेतून आलेले नवे ज्ञानविज्ञान आणि विचारधारा हेच होते. अशा गद्याला पूर्वीची एतद्देशीय परंपरा फारशी नव्हती.

भाषिक विकासाच्या प्रयत्नामधील या दोन मुख्य प्रवृत्तींचा सामाजिक संदर्भात विचार करता येतो. इंग्रजी अमदानीतील नवा शिक्षित वर्ग प्रामुख्याने उच्चवर्णीय, उच्चवर्गीय होता. पण त्याचबरोबर बहुजनसमाजातील, ब्राह्मणेतर विभागातील काही थोडी मंडळीही शिकून पुढे येत होती. तसेच उच्चवर्णीय, उच्चवर्गीय शिक्षितांतही लोकाभिमुख सामाजिक समतेचा पुरस्कर्ता असा एक विभाग होता. तेव्हा वरील भाषिक प्रवृत्तीचे वर्गीकरण 'शिष्ट' किंवा 'पंडिती' (एलिटिस्ट) आणि 'लोकाभिमुख' अशा प्रकारे करता येईल. यांपैकी दुसरीचा भर मराठी भाषेत रूढ असलेल्या तसेच



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

रुळू पाहणाऱ्या शब्दसंपत्तीवर आणि तशा तऱ्हेच्या शब्दशोधावर होता. तर पहिलीचा म्हणजे 'शिष्ट' प्रवृत्तीचा भर संस्कृतोद्भव शब्दसंपत्तीवर होता. पंडिती प्रवृत्तीविषयी दोन अनिष्ट वळणे लक्षात घेतली पाहिजेत. एक म्हणजे केवळ तथाकथित भारदस्तपणाच्या अथवा आवेश निर्माण करण्याच्या निमित्ताने रूढ मराठमोळे अथवा अन्यभाषिक, पण मराठीत रूढ झालेले (अरबी-फारशी) शब्द टाकून त्याऐवजी संस्कृत शब्दांच्या वापरावर भर देणे. दुसरे म्हणजे इंग्रजी शब्दांच्या शुद्धतेबद्दलचा, म्हणजे तथाकथित शुद्ध उच्चारांविषयीचा, आग्रह. (तथाकथित म्हणण्याचे कारण मराठी किंवा अन्य भारतीय भाषिकांचे इंग्रजी उच्चार, काही थोडे अपवाद वगळता, कधीच खरोखरी शुद्ध 'इंग्रजी' नव्हते आणि नसतात!) याचा एक परिणाम असा झाला, की सुरुवातीला नवी ओळख झालेल्या इंग्रजी शब्दांना मराठी वळण, मराठी झिलई देऊन त्यांना भाषेत सामावून घेण्याची प्रक्रिया बहुतांशी खुंटली, तसे करण्याची लाज वाटू लागली. जगातील इतर अनेक भाषा गरजेनुसार परकीय शब्द आपल्या भाषेच्या घडणीला अनुरूप असे वळण देऊन, म्हणजेच 'अपभ्रष्ट' किंवा 'प्राकृत' करून स्वभाषेत रुळवितात. आपण मात्र यासंबंधी अनिष्ट असा निर्भेळ 'शुद्धवाद', त्यातील वर उल्लेखिलेला अभिजात गावठीपणा लक्षात न घेता स्वीकारला आहे.

शिक्षणप्रसार, राजकीय आणि सामाजिक जागृती आणि चळवळी यांच्या विस्तारामुळे पुढील कालखंडात मराठी भाषा अधिक विकास पावू लागली. वृत्तपत्रे, सभाभाषणे, ग्रंथ, ललित वाङ्मय अशा अनेक प्रकारे मराठी गद्य अधिक सामर्थ्यशाली झाले. पहिल्या महायुद्धानंतरच्या काळात शिक्षणाचा प्रसार समाजाच्या मध्यम स्तरापर्यंत पोचू लागला आणि तळच्या स्तरातील काही थोड्या लोकांनाही त्याचा लाभ मिळू लागला. याचा एक परिणाम असा झाला, की माध्यमिक शालान्त परीक्षेपर्यंतचे, म्हणजेच मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण आता बहुतांशी मराठी भाषेतून होणे अनिवार्य झाले. तसेच सामाजिक-राजकीय जागृती आणि प्रत्यक्ष स्वातंत्र्य चळवळ अधिकाधिक विस्तृत आणि सामर्थ्यशाली बनली. तेव्हा या घडामोडींना अनुरूप असा भाषाविकास – शब्दसंपत्तीचा वापर, नवा शब्दशोध आणि नवी शैली या – सर्वच बाबतीत होत गेला. पण या सर्वांत वर सांगितलेल्या शिष्ट आणि लोकाभिमुख या दोन प्रवृत्ती नव्या स्वरूपात वावरत होत्याच. यापैकी एका टोकाला शि. म. परांजपे, सावरकर (काही अंशी, कारण त्यांनी मराठी भाषेने नवी आव्हाने पेलावी यासाठी काही अभिनव प्रयत्नही केले,), उत्तर काळातील मा. त्रिं. पटवर्धन इत्यादींची अविवेकी, प्रचारी संस्कृतनिष्ठा आणि अरबी-फारशी विरोध दिसून येतो. दुसऱ्या टोकाला ब्राह्मणेतर चळवळीने निर्माण केलेल्या प्रचारी लिखाणातून जोरकस, मराठी घडत होती. मुख्य प्रवाह अर्थातच मध्यममार्गी होता आणि त्याची भाषा काही अंशी सुलभ, पण आशय व शैली या दोन्ही दृष्टींनी इंग्रजी वळणाची होती. आणि तिच्यावर बोली भाषेतील जोर आणि रोखठोकपणा यांचेपेक्षा संस्कृतनिष्ठेचा आणि शुद्धवादी इंग्रजी प्रवृत्तीचा अधिक प्रभाव होता. या मधल्या काळात मराठी भाषेने मूळ अरबी-फारशी, पण कालगतीने मराठी बनलेले किती तरी प्रभावी आणि अर्थवाहक शब्द गमावले; यात तिची हानीच झाली. तसेच त्या प्रमाणात भाषेचे अंगभूत सामर्थ्य घटले असेच म्हणावे लागेल.

सत्तेचाळीस साली हिंदुस्थान स्वतंत्र झाला, आणि नवा कालखंड सुरू झाला. नवे यंत्रोद्योग, आधुनिक कारखानदारी, ऊर्जाकेंद्रे, प्रचंड धरणे, भांडवली तऱ्हेची नगदी पिकांची आधुनिक शेती, इत्यादी रूपांनी आर्थिक व्यवस्थेत मोठाले बदल घडून आले. आर्थिक नियोजन आणि अवजड उद्योगांचा सार्वजनिक विभाग यांनी या प्रगतीला पायाभूत आधार दिला. अर्थकारण आणि राजकारण यांची सूत्रे आता भारतीय वरिष्ठ वर्गीयांच्या, शहरी आणि ग्रामीण धनिक वर्गाच्या हाती आली. सार्वत्रिक प्रौढ मताधिकारावर बेतलेली राज्यव्यवस्था अमलात आल्याने लोकशाहीकरणाने पुढील टप्पा गाठला. शिक्षणप्रसाराला गती आली. या सर्व बदलापोटी नवी भाषिक आव्हाने उभी राहणे अपरिहार्य होते.

ही आव्हाने विशेषतः पुढील बदलांमुळे निर्माण झाली. प्रौढ मताधिकार आणि शिक्षणप्रसार यामुळे ग्रामीण धनिक शेतकरी आणि इतर धनिक वर्ग

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यांच्या हाती राज्यस्तरापर्यंतचे पुढारीपण आले. तसेच भाषिक राज्यरचनेमुळे राज्यस्तरापासून खालचा बराच राज्यकारभार मराठीत होणे ओघानेच आले. जिल्हा परिषदा, पंचायती संस्था इत्यादी रूपाने सत्तेचे काही प्रमाणात झालेले विकेंद्रीकरण, आणि शिक्षण, आरोग्य, ग्रामीण विभागात शेतीसाठी व अन्य कारणाने निर्माण झालेल्या बँका, सहकारी संस्था, कारखाने वगैरे अनेक सोयी-सुविधा यांमुळे जिल्हास्तरापासून खालच्या ग्रामीण क्षेत्रात नवा सेवकवर्ग काम करू लागला. तसेच उच्चशिक्षणापर्यंतचे शिक्षण, विशेषतः आर्ट्‌स आणि व्यापार शाखेतील शिक्षण, आता बहुसंख्य विद्यार्थी, आणि बहुतेक ग्रामीण विद्यार्थी मराठीतून घेऊ लागले. आणि या विद्यार्थ्यांत तळागाळातील निरक्षर आईबापांच्या मुलांचाही शिरकाव होऊ लागला की ज्यांना प्रमाण मराठी भाषेचा स्पर्शही झालेला नव्हता. परिणामी अर्थव्यवस्था, व्यापार, राज्यकारभार, शिक्षण, ज्ञानविज्ञान आणि सांस्कृतिक क्षेत्रे यांमधील उच्चस्तरावरील व्यवहार जरी इंग्रजीतून होत असले आणि त्यामुळे इंग्रजीची प्रतिष्ठा सध्याच्या काळात अधिकच वाढली असली, तरी या सर्व क्षेत्रांत मध्यम आणि खालच्या स्तरावरील व्यवहारांत मराठी भाषेचा वापर अधिकाधिक प्रमाणात होणे भाग होते. त्यासाठी शब्दसंपत्ती, शब्दशोध आणि मराठी गद्याची घाटणी या सर्वच बाबतीत भाषिक प्रश्न उभे राहिले आहेत, राहत आहेत. त्यांची सोडवणूक करण्याचे प्रयत्नही होत आहेत, पण ते समाधानकारक आहेत असे म्हणता येणार नाही. पण त्याविषयी संगतवार विवेचन करण्यापूर्वी वर्तमानकाळाबरोबर भविष्यकाळातील संभाव्य सामाजिक बदल, विशेषतः इष्ट वाटणारे सामाजिक भवितव्य, हीही विचारात घ्यावी लागतील.

आज भांडवलदारी अर्थव्यवस्था आणि ब्रिटिश तऱ्हेच्या सांसदीय पद्धतीची राज्यव्यवस्था यांच्या चौकटीत काही एक प्रमाणात सामाजिक–आर्थिक–राजकीय बदल घडून आले. काही एका टप्प्यापर्यंत या सर्वांचे लोकशाहीकरणही घडून आले, सामाजिक क्षेत्रातही मर्यादित प्रमाणात पुढे पाऊल पडले. पण गेल्या पंधरावीस वर्षांतील घडामोडी पाहिल्या, तर या सर्व क्षेत्रांतील प्रगती कुंठित झाली आहे, तिला स्थगिती येत आहे असे स्पष्टपणे दिसून येते. ( याचे विवेचन प्रस्तुत लेखकाने अन्यत्र केले आहे, आणि या लेखात तेवढ्या विस्तृतपणे त्याचा परामर्शही घेता यायचा नाही. ) यापुढील प्रगतीला प्रस्थापित हितसंबंधाचे अनेक अडसर आहेत. ते दूर व्हायचे असतील, तर आजची आर्थिक, राजकीय आणि सामाजिक संरचना बदलल्याशिवाय गत्यंतर नाही. आजची अपुरी प्रगती, अधुरे लोकशाहीकरण, समानतेकडे जायचा अपुरा प्रवास जर पुरा व्हायचा असेल, तर आमूलाग्र समाज परिवर्तनाशिवाय दुसरा पर्याय नाही. थोडक्यात सांगायचे, तर आजच्या समाजात जे शोषित वर्ग आहेत, जे सर्वहारा आहेत, ते राजकीय–आर्थिक सत्तेच्या आणि सामाजिक प्रतिष्ठेच्या केंद्रस्थानी आल्याशिवाय आपल्या समाजाला उज्ज्वल तर राहोच, पण बरेसेदेखील भवितव्य नाही.

हे समाजपरिवर्तन कोणत्या प्रकारे घडून येईल, त्याला किती कालावधी लागेल, कोणत्या समाजशक्ती ते घडवून आणतील याचा विचार येथे करावयाचा उद्देश नाही. पण स्थूलपणे म्हणायचे, तर प्रबोधन, जनसंघटन, संघर्ष, सत्तांतर आणि नवनिर्माण म्हणजे नव्या समाजव्यवस्थेची स्थापना, अशा सर्व अवस्थांतून त्याला जावे लागेल. या सर्वांचा अर्थातच भाषेशी, भाषाविकासाशी अतिनिकटचा संबंध आहे. म्हणजेच स्वातंत्र्योतर काळात आतापर्यंत जे सामाजिक बदल घडून आले आहेत आणि यापुढील काळात समाजपरिवर्तनाच्या दिशेने जी वाटचाल व्हायची आहे, त्याच्या संदर्भात आपले भाषाविकासाचे प्रश्न व प्रयत्न तपासायला हवेत.

आज मराठी भाषेच्या विकासाविषयी जे काही होत आहे त्याची सामान्य सार्वजनिक व्यवहारातील भाषा, राजकारणी लोकांची म्हणजेच पुढाऱ्यांची सार्वजनिक व्याख्यानांतील भाषा, वृत्तपत्र भाषा, प्राथमिक शाळेतील भाषा, माध्यमिक शिक्षणाची भाषा, उच्चशिक्षणाची भाषा आणि उच्च सरकारी व राज्यकारभारी क्षेत्रांतील भाषा अशी अनेक क्षेत्रे व स्तर मानता येतील. ही चढती भांजणी सामान्य व्यवहारातील बोलीभाषेला जवळ असलेल्या भाषेपासून शिष्टसंमत प्रमाणित अशा उच्चशिक्षणीय

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणि शासकीय भाषेपर्यंत पोचते. कॉलेज व विद्यापीठे यांमधील शिक्षणासाठी जे ग्रंथ लिहिले जात आहेत, त्यात बहुधा त्यासाठी तयार केलेली प्रमाण (संस्कृतनिष्ठ) परिभाषा वापरली जाते किंवा निदान तसा संकेत व प्रयत्न असतो. या परिभाषेवर अखिल भारताला, निदान द्रविड भाषांखेरीज इतर भारतीय भाषांना, समान परिभाषा, संस्कृतनिष्ठ हिंदीचा पगडा असलेली समान परिभाषा, असावी अशा आग्रहाचा फार प्रभाव आहे. सरकारी क्षेत्रांतील परिभाषेसाठी जे खटाटोप झाले त्यांवरही तीच छाप आहे, शिवाय त्यात आज कारभारविषयक इंग्रजीत ज्या शैली व रचना आहेत (ज्या आपण जुन्या इंग्रजी परंपरेवरून बऱ्याच अंशी कायम ठेवल्या आहेत), त्यांचा मनस्वी प्रभाव आहे. **पद्मनाभ कोश** आणि **शासन व्यवहार कोश** यावरून हे स्पष्टपणे दिसून येते. त्यातल्या त्यात तुलना करावयाची, तर दुसरा कोश पहिल्यापेक्षा कमी क्लिष्ट आहे.

एकूण विचार करता असे दिसते, की राजकारणी आणि राजकीय पुढारी, विशेषतः नवे ग्रामीण नेते, यांनी आपल्या बोलण्या-व्याख्यानांत मराठी भाषा इष्ट दिशेने, सोपेपणाने वाकविली आहे, ती बरीच लोकाभिमुख होत आहे. तर अध्यापकीय आणि राज्यकारभारविषयक पंडित मराठी भाषेला अधिकाधिक पंडिती वळण देत आहेत. महानगरातील काही पंडिती संपादकही त्यात सामील झाले आहेत. आणि मध्यम व सामान्यजनांना अनुकरणाने त्यांचेमागे अगतिकपणे जावे लागत आहे. थोडक्यात सांगायचे, तर काही प्रमाणात लोकशाहीकरण झाले असले, शिक्षणप्रसार अधिक खालपर्यंत उतरला असला, तरी उच्चवर्गीय, उच्चवर्णीय भाषिक वळण आणि त्यात समाविष्ट असलेल्या प्रतिष्ठेच्या कल्पना यांचाच आजच्या भाषाविकासावर अधिक प्रभाव पडला आहे. बहुजनसमाजातून तसेच तळच्या स्तरातून उच्चशिक्षित झालेले लोकही भाषा सोपी करण्याचा आग्रह न धरता या प्रतिष्ठित शिष्टवर्गात सामील होऊन भाषेच्या या पंडितीकरणाला हातभार लावीत आहेत. याविषयीचे चित्र हे असे आहे.

## २. भाषाविकासाचे आजचे प्रश्न, त्यांचे स्वरूप

आतापर्यंत गेल्या दीडशे वर्षांत महाराष्ट्रात झालेले सामाजिक बदल आणि त्यासमवेत झालेला भाषाविकास यांच्या परस्परसंबंधाचा मागोवा घेतला. तसेच स्वातंत्र्योत्तर काळात या संदर्भात काय घडले व घडते आहे आणि नजीकच्या भविष्यकाळातील भवितव्य यांचा साक्षेपाने विचार केला. आता या पार्श्वभूमीवर आजच्या काळातील भाषाविकासाविषयीच्या प्रश्नांचे अवलोकन करू.

प्रथमच एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी, की भाषा वेगवेगळ्या स्तरांवर, वेगवेगळ्या सामाजिक क्षेत्रांत वापरली जाते. या वेगळेपणाला अनुसरून भाषाविकासाचा, म्हणजेच भाषाशैली, शब्दसंपत्ती आणि शब्दशोध यांचा विचार व्हायला हवा. क्षेत्रभिन्नतेची, स्तरभिन्नतेची काही परिमाणे आपण वर पाहिली आहेत. इतर प्रकारचाही वेगळेपणा लक्षात घ्यायला हवा. उदाहरणार्थ, १) वृत्तपत्रीय लिखाण, राजकारण व समाजकारण यामधील प्रचाराची व उद्बोधनाची व्याख्याने इत्यादींची भाषा; २) ललित गद्य; ३) सरकारी म्हणजेच राज्यकारभारविषयक व्यवहाराची भाषा; ४) समाजशास्त्रीय लिखाणाची भाषा; ५) वैज्ञानिक लिखाणाची भाषा; वगैरे. यातही पुन्हा भिन्नता आहेच. उदाहरणार्थ, समाजशास्त्रीय किंवा वैज्ञानिक लेखन त्यामधील तज्ज्ञांचे परस्परसंवाद आणि वादचर्चा, तसेच शिक्षणातील उच्चस्तरावरील अध्ययन-अध्यापन, यासाठी असू शकेल, किंवा मध्यमस्तरावरील विद्यार्थी किंवा शिक्षित जनसामान्य यांना उच्चस्तरावरील वैज्ञानिक ज्ञान आणि संशोधन यांचा परिचय करून देण्यासाठी असू शकेल, अथवा केवळ साक्षर किंवा प्राथमिक पाच-सात इयत्ता पार झालेल्यांना विज्ञान आणि वैज्ञानिक दृष्टिकोण यांची प्राथमिक ओळख करून देण्याच्या हेतूने लिहावयाचे असेल. समाजशास्त्रे, सरकारी व्यवहार इत्यादी क्षेत्रांतही असे अनेक थर स्वाभाविकपणे पडतील आणि त्याला अनुरूप अशी भाषेची सुलभता, अथवा प्रौढत्व म्हणजेच प्रगल्भत्व असावे लागेल. म्हणजेच हे सर्व लक्षात घेऊन भाषाविकासाचा साक्षेपी विचार



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व्हावा लागेल आणि तसे करताना आजचा वाचकवर्ग पूर्वीच्या जमान्यातल्याप्रमाणे एकसंध राहिलेला नाही, भंगलेल्या समाजाप्रमाणे नवा वाचकवर्गही भंगलेला आहे, हे लक्षात घ्यावे लागेल. आजच्या भाषाविकासाची भाषाशैली आणि शब्दसंपदा प्रगल्भ होत असताना, त्यांनी प्रगल्भ विचारांचे समर्थ वाहक व्हावे या हेतूने प्रयत्न करीत असताना, पंडिती किंवा शिष्ट परंपरेच्या प्रभावाखाली ती किती अवास्तवपणे बोजड बनतात किंवा बनविली जातात यांचा उल्लेख मागे आला आहे. तसेच हे घडून येण्याला एका बाजूने आपल्यावर असलेला इंग्रजी भाषा आणि तिच्यातील शिष्ट परंपरा यांचा प्रभाव आणि दुसऱ्या बाजूने संस्कृत आणि आता स्वातंत्र्योत्तर काळात संस्कृतनिष्ठ हिंदी यांचा हव्यास, कशी कारणीभूत आहेत यांचाही निर्देश वर केला आहे. त्याविषयी येथे थोडा अधिक विस्तार करणे योग्य होईल.

प्रथम आजच्या मराठी जीवनावरील इंग्रजीचा प्रभाव आणि मराठी भाषेचा (आणि एकंदरीने भारतीय भाषांचा) विकास यांचा अन्योन्य संबंध लक्षात घ्यायला हवा. (विस्तृत विवेचनासाठी पहा : 'इंग्रजी भाषेचे स्थान', स. प्र. पत्रिका, अंक, सप्टेंबर–आक्टोबर १९७९.) याविषयी थोडक्यात असे म्हणता येईल, की इंग्रजीचा अवास्तव पगडा, तिची मगरमिठी, दूर झाल्याशिवाय मराठी भाषेचा सर्वांगीण विकास होऊ शकणार नाही. जेवढ्या प्रमाणात इंग्रजी भाषा आपल्या आर्थिक–सामाजिक–राजकीय जीवनातून हटेल, तेवढ्याच प्रमाणात मराठी भाषा नवी उमेद धारण करील. आज भारतीय आर्थिक-राजकीय– सामाजिक जीवनात इंग्रजीचा अनिवार्य वापर आणि म्हणून तिला प्रतिष्ठा आहे. ती यातील उच्चस्तरावरील अखिल भारतीय व्यवहाराची तसेच अभिजाततेची पंडितमान्य व राजमान्य भाषा आहे. सामाजिक–राजकीय नेते, शिक्षण–संशोधन – सांस्कृतिक जीवन यामधील प्रतिष्ठित, तसेच सत्तामत्ताधारी, यांचेकडून तिला अशा तऱ्हेची मान्यता मिळालेली आहे. सत्ता, मत्ता व प्रतिष्ठा यांची केंद्रे आजच्या वरिष्ठ वर्गांकडून जेव्हा सामान्य जनतेच्या हाती येऊ लागतील तेव्हाच या परिस्थितीत बदल होऊ शकेल. म्हणजेच समाजपरिवर्तनाच्या वाटचालीचा, लोकशाहीकरणाचा पुढील टप्पा आपण जेव्हा आणि ज्या प्रमाणात गाठू, तेव्हाच आणि तितक्याच प्रमाणात इंग्रजी मागे पडून तिची जागा मराठी (आणि इतर भारतीय भाषा) भाषा घेईल. आज जो सामाजिक बदल घडून आला आहे, येत आहे, त्यानुसार मराठी भाषा अधिक वापरली जात आहे. पण आज अपुऱ्या परिवर्तनामुळे, अधुऱ्या लोकशाहीकरणामुळे हे सर्व चाचपडत, अडखळत, पंडिती वळणाने चालले आहे.



भारतीय जीवनातून बोधभाषा म्हणून इंग्रजी हटल्यास आंतरभारतीय संपर्काची, ज्ञानवैज्ञानिक अथवा राजकीय व सरकारी व्यवहारांतील संवादाची व संपर्काची भाषा कोणती राहील ? या प्रश्नाचा गुंता कसा सुटेल हा प्रश्न महत्त्वाचा असला, तरी आजच्या विषयात तो तितकासा गुंतलेला नाही. ( मला हे इथे नमूद केले पाहिजे, की तो प्रश्न मला मुदलातच टाळायचा आहे असे नाही, फक्त त्याची चर्चा इथे फारशी प्रस्तुत नाही असे मला सुचवायचे आहे. ) पण तरीसुद्धा भारतीय भाषांतील ज्ञान-विज्ञानाची आणि कारभाराची परिभाषा बऱ्याच प्रमाणात समान असणे, निदान शक्य तितकी समान असणे हिताचे नाही का ? मग संस्कृतनिष्ठ परिभाषा सर्व भारतीय भाषांनी स्वीकारणे योग्य नाही का ? हे प्रश्न साहजिकच उभे राहतात.

याविषयी विचार करताना एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे, की आपला देश ६०/७० कोटींचा विविधभाषी, खंडात्मक विस्ताराचा, प्रदेश आहे. त्यांतील कित्येक भाषिक लोकसमूह युरोपातील किंवा अन्यत्र असलेल्या भाषिक राष्ट्रांपेक्षा बरेच मोठे आहेत. त्यांच्या भाषा या बोलीभाषा ( डायलेक्ट्स) नसून अनेक शतकांची परंपरा असलेल्या विकसित प्रमाणभाषा बनलेल्या अशा आहेत, आणि त्यांत निदान उत्तर भारतीय (म्हणजे संस्कृतशी नाते सांगणाऱ्या, पण वेगवेगळ्या प्राकृत भाषांतून अवतरलेल्या) आणि दाक्षिणात्य असे दोन भिन्न गट आहेत. अशा परिस्थितीत त्यांचा विकास समान किंवा बहुशः समान अशा अशा परिभाषेच्या दावणीला बांधून कितपत साधता येईल ? तसा साधण्याचा आपण अट्टाहासी आग्रह धरणे बरोबर नाही. कारण येथे उच्चस्तरीय पंडिती व्यवहाराच्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सोयीसाठी भाषाविकास की जनसामान्यांच्या शैक्षणिक व सांस्कृतिक विकासासाठी भाषाविकास असे हे विरोधी सामाजिक द्वंद्व आहे. आणि पुढील परिवर्तनाच्या दृष्टीने पाहता त्याचा निकाल जनसामान्यांच्या बाजूने लावणे योग्य ठरेल. जे शब्द सुलभ असतील आणि देशात समान पारिभाषिक होऊ शकतील ते जरूर मराठीत रुळवावे. पण इंग्रजी शब्दसुद्धा नव्याने पाडलेल्या संस्कृत शब्दा-इतकाच कठीण नाही का, अशा तर्कटी दृष्टीने याकडे पाहू नये. आपली भाषा मूलतः मराठी आहे, संस्कृत नाही, ( इंग्रजीही नाही, ) या दृष्टीने या प्रश्नाकडे पाहायला हवे. थोडक्यात, आजच्यासारखा समान परिभाषेच्यासाठी म्हणून संस्कृतनिष्ठ शब्दांचा हव्यास, 'अट्टाग्रह' किंवा 'अट्टाहास' असू नये.

मग प्रश्न असा, की समाजपरिवर्तन होईपर्यंत, सामान्यजन सत्तेच्या व प्रतिष्ठेच्या केंद्रस्थानी येई-पर्यंत, भाषाविकास स्थगित व्हायचा का ? जैसे थे ठेवायचा का ? या प्रश्नांचे उत्तर अर्थातच 'नाही' असेच आहे. एक तर बदलणाऱ्या समाजाला हे कधीच मंजूर नसते, भाषाविकास थांबत नसतो. तेव्हा यासंबंधी जे प्रयत्न करायचे ते वर सांगितलेली आमूलाग्र समाजपरिवर्तनाची दीर्घकालीन उद्दिष्टे लक्षात घेऊन व्हायला हवेत. म्हणजेच भाषा-विकासाची वाटचाल दूरदर्शी पद्धतीने झाली पाहिजे. याचा अर्थ असा, की खोटया प्रतिष्ठेचे, पंडिती परंपरेचे इंग्रजी, संस्कृत आणि संस्कृतनिष्ठ हिंदी यांच्या वर्चस्वाचे आज जे जोखड भाषाविकासाच्या अधिकृत प्रयत्नांवर पडले आहे, पडत आहे, ते जाणीवपूर्वक दूर करायला हवे. असा दृष्टिकोण अंगिकारण्याचे बाबतीत जो एक मोठा अडथळा आहे तो माझ्या मते, मूलतः भाषिक नसून सामाजिक आहे. त्याचे मुळाशी थोडक्यात सांगायचे तर 'ते' आणि 'आम्ही' हे द्वंद्व आहे. 'त्यांनी' 'आमच्या' पर्यंत म्हणजे 'आमच्या' शिष्टसंमत पंडिती भाषे-पर्यंत यावे, 'आम्ही' 'त्यांच्या' दिशेने जाणे हे आपल्या (म्हणजे कोणाच्या 'आमच्या', 'त्यांच्या', की सर्वांच्या ?) भाषेच्या विकासाच्या दृष्टीने योग्य नाही असे हे द्वंद्व आहे. म्हणून इतर बाबतीप्रमाणेच भाषाविकासाच्या बाबतीतही प्रतिष्ठित वर्गाला जनसामान्यांविषयी कितीसा जिव्हाळा आहे, आत्मीयता आहे, हाच मला खरा महत्त्वाचा प्रश्न वाटतो.

आज भाषाविकासाचे जे प्रयत्न सरकारी किंवा विद्यापीठीय स्तरावर चालू आहेत, त्यांवर पंडिती दृष्टिकोणाचाच अधिक प्रभाव आहे. यासंबंधी ज्या सरकारी वा इतर समित्या आहेत, त्यांवर मराठी वास्तववादी विद्वानांपेक्षा संस्कृताच्या पंडिती प्राध्या-पकांचाच अधिक भरणा असतो, परिभाषेच्या म्हणजेच शब्दशोधाच्या बाबतीत त्यांचाच प्रभाव अधिक पडतो, असे म्हणतात; आणि परिणामातही तसे दिसते. अशा परिस्थितीत वरील दृष्टिकोण कितपत मान्य होईल, शब्दशोधाची दिशा लोकाभि-मुख कितपत होईल, याबद्दल रास्त शंका वाटते. कारण आजचा प्रचलित दृष्टिकोण चालू राहिला, तर भाषाविकासाची वाटचाल अधिक अवघड होईल. त्यामुळे समाजपरिवर्तनाचे कार्य अडून बसणार नसले, तरी तितक्या प्रमाणात अधिक अवघड होईल. आजच्यासारखेच चालू राहिले, तर नवी शब्दसंपत्ती अवघड होईल. इंग्रजी धरून कित्येक युरोपीय भाषांत हे अठराव्या एकोणीसाव्या शतकांत घडले. जर्मन भाषेसंबंधी तर हे अधिकच झाले असे जाणते लोक म्हणतात. कारण त्या काळात त्या देशातील भाषिक विकासात पंडितांचीच मक्तेदारी होती, जनसामा-न्यांसाठी भाषाविकास हे सूत्र फारसे पुढे आलेले नव्हते, किंबहुना जनसामान्यांना सामाजिक व्यव-हारात तितके महत्त्वही प्राप्त झालेले नव्हते. त्याची फळे, म्हणजे वैज्ञानिक व शासकीय भाषेचा कमा-लीचा बोजडपणा आज तेथील समाज अनुभवीत आहेत, त्याबद्दल असमाधान आहे, आणि भाषेच्या सुलभीकरणाचे प्रयत्न चालू आहेत. आजच्या काळात आपल्या देशात जनसामान्य केंद्रस्थानी नाहीत हे खरे; पण ते आपल्या आकांक्षा बोलून दाखवू लागले आहेत. तेव्हा सध्याचा पंडिती आग्रह कितपत योग्य होईल याचा पंडितांनीच विचार करावा.

इथे व्यक्त केलेला हा विचार भाषा विकसित करू पाहणाऱ्यांना कितपत मान्य होईल हे सांगणे अवघड आहे. न झाला तर समाजपरिवर्तनाची वाटचाल अडून बसणार आहे असे नाही. पण ती वाटचाल अवजड आणि अवघड भाषेच्या बेड्यांचे

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अडसर हातापायांत वागवीत होत राहील. तिची प्रगती त्या रोखीत राहतील, हे भाषाविकासी सुज्ञांनी लक्षात घ्यावे.

## ३. मराठी शब्दसंपत्ती आणि शब्दशोधाच्या दिशा

या विभागात प्रथम मराठीतील शब्दसंपत्ती आणि शब्दशोध यांचा मराठी भाषेच्या व्याकरणाच्या संदर्भात विचार केला आहे. सुरुवातीस यासंबंधीची आजची परिस्थिती, मराठीला राजभाषा करण्याचे प्रयत्न जमेस धरून, संक्षेपाने पाहू. यासंबंधी मला ज्या दोन मुख्य अपप्रवृत्ती दिसतात, त्यांचा उल्लेख वर केलाच आहे.

अ) संस्कृत शब्दांचा अवास्तव सोस, त्यातच सध्याचा संस्कृतप्रचुर हिंदी शब्दांचा सोसही येतो. याचे लक्ष्य मुख्यतः दोन प्रकारचे असते. एक : मराठीत रुळलेल्या तथाकथित परकीय म्हणजे अरबी, फारशी आणि इंग्रजी शब्दांची हकालपट्टी करून त्यांना अनावश्यक संस्कृत पेहराव देणे, म्हणजेच धर्माभिमानी पद्धतीने 'शुद्धिकरणाचे' लक्ष्य; (त्यातही खरा आवेश इंग्रजी शब्दांपेक्षा अरबी–फारशी शब्दांचे बाबतीत असतो. कारण मुसलमानापेक्षा 'साहेब' जवळचा, साहेब हा शब्द यावनी असला तरी ! ) दोन : साधे मराठी शब्द, यांचे मूळ वास्तविक संस्कृत किंवा मराठी आहे, असे शब्दही निकालात काढून प्रगल्भत्वाच्या मिषाने त्यांचे संस्कृतीकरण करणे.

आ) इंग्रजी शब्दांचे बाबतीत शुद्ध उच्चारांचा आग्रह; म्हणून एक तर ते टाकून वर सांगितल्या-प्रमाणे संस्कृत शब्द योजणे किंवा लिहिताना त्यांचे मराठीत रुळलेले रूप टाकून डिक्शनरीतील उच्चार-रूप घेणे.

याची उदाहरणे सर्वांस माहीत आहेत. केवळ वानगीदाखल काही पुढे देत आहे. कंसातील शब्द रुळलेले, सोपे मराठी शब्द आहेत.

अ–१ ) **'परकीय' शब्दांची हकालपट्टी :** पथ ( रस्ता ), सहस्त्र ( हजार ), विकान ( दुकान ), विक्रेता (दुकानदार) उत्तरदायित्व (जबाबदारी), मुद्रणालय (छापखाना), महाविद्यालय (कॉलेज), रुग्णालय (इस्पितळ), प्रशासन (सरकार), तोलन (वजन), तोलयंत्र (ताजवा, तराजू), दुर्ग (किल्ला, गड) इत्यादी. मराठीत विज्ञान आणण्याची प्रतिज्ञा करणाऱ्या पत्रिकासुद्धा या हव्यासापोटी मे–जून महिन्यांत 'हवा कशी होते' याचा विचार न करता 'वातावरणाच्या प्रकृतीचे' शोध घेऊ लागतात !

अ– २ ) **साध्या मराठीचे वावडे :** कुक्कुट ( कोंबडा), वराह ( डुकर ), विद्युत ( वीज ), लिपिक ( कारकून ), पालन करतो (पाळतो) इत्यादी.

अ–३ ) **हिंदीचा अनावर सोस :** संपन्न ( साजरा, समाप्त ), सजग ( जागरुक ), सहवेदना (सहानुभूती ), शोभायात्रा ( मिरवणूक ), निर्वाचन ( निवड, निवडणूक ), अनुरोध ( विनंती ), स्वर्गीय (कैलासवासी, दिवंगत) इत्यादी. या अपप्रवृत्तींची अर्थाच्या दृष्टीने हास्यास्पद उदाहरणे असंख्य देता येतील. ती देऊन जागा अडविण्याचा मोह टाळतो. (पु. ल. देशपांडे यांचेशिवाय इतर अनेकांनी यासंबंधी लिहिले आहे, उदा. प्रसिद्ध भाषापंडित ना. गो. कालेलकर.)

आ ) **'शुद्ध इंग्रजीचा आग्रह' :–** प्लॅटफॉर्म ( फलाट ), बोल्ट ( बोलट ), स्टेशन (ठेशन ), काँग्रेस ( कांग्रेस ), लंडन ( लंदन ), इंजिनियर ( इजनेर ), डॉक्टर ( डागदार ), हॉस्पिटल ( इस्पितळ ) इत्यादी.

शब्दसंपत्ती वाढविण्याचे, शब्दशोधाचे प्रयत्न कोणत्या तऱ्हेने असावेत हे सांगण्यापूर्वी प्रथम मराठी शब्दसंपदेचे स्वरूप उजळणीवजा थोडक्यात सांगून त्यासंबंधीचे आजपर्यंतचे संकेत कोणत्या प्रकारचे आहेत हेही नमूद करणे आवश्यक आहे.

मराठी शब्दसंपदा प्रामुख्याने पुढील प्रकारची आहे :

१) **तत्सम** म्हणजे मूळ संस्कृतासारखे,
२) **तद्भव** म्हणजे मूळ संस्कृतातून मराठीत येताना रूपभेद झालेले,
३) **देशी** म्हणजे या मातीतले,
४) **परभाषीय :–** याचे मुख्य तीन पोटप्रकार :
   अ) भारतीय देशभाषांतील,
   आ) अरबी–फारशीतील,
   इ) इंग्रजी, पोर्तुगीज वगैरे युरोपियन भाषांतील.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मूळ शब्दापासून नवीन किंवा साधित शब्द बनविताना ते प्रामुख्याने पुढील प्रकारे होतात :

१) **उपसर्ग** लावून, २) **प्रत्यय** लावून, किंवा ३) शब्द जोडून म्हणजे **समास** करून. हे उपसर्ग, प्रत्यय किंवा समास प्रकार अ) संस्कृत भाषेतल्या प्रमाणे असतील, आ) देशी प्रकारचे असतील अथवा इ) परभाषीय, म्हणजे मुख्यतः अरबी–फारशी प्रकारचे असतील. असे प्रत्यय, उपसर्ग अथवा समास जोडण्यात 'शब्दसंकर' होऊ नये असा सामान्य दंडक आहे. ( तो घातक आहे असे माझे म्हणणे आहे. ) याला मराठी भाषेसंबंधीच्या व्याकरणाचा संदर्भ आहे, पण इथे त्यासंबंधी विवेचनाला जे थेट उपयोगी आहे तेवढ्याचाच विचार केला आहे. त्याविषयीच्या बारकाव्यांत शिरण्याचा हेतू नाही. ( तसा माझा अभ्यासी अधिकार आहे असे मी मानीत नाही.)

शब्दशोधाविषयी आजपर्यंतचे संकेत कोणते हे आता पाहू. याचा ऐतिहासिक मागोवा घेता येईल. पण या लेखात त्याची भरताड करण्याची आवश्यकता नाही. तरीसुद्धा अव्वल इंग्रजीच्या सुरवातीच्या काळात मराठी गद्याचा नवा अवतार होत असताना ज्या मुख्य प्रवृत्ती दिसून येत होत्या त्यांचा उल्लेख करणे मला जरुरीचे वाटते. कारण मी सुचविणार असलेले नवे संकेत बहुतांशी हेच किंवा तशा प्रकारचे आहेत. त्यावेळी भाषाविकासी शब्दशोधात पुढील प्रवृत्ती होत्या.

१) इंग्रजी ( किंवा अन्य युरोपीय भाषांतील अवश्य ते) शब्द अपभ्रष्ट करून, त्यांना मराठीच्या वळणाला जुळवून घेऊन आपलेसे करणे, उदा. बुक, मास्तर, नट, बोलट, फलाट, लाट (लॉर्ड), बटाटा, तंबाखू वगैरे.

२) मराठीत रुळलेले अरबी-फारशी शब्द तसेच वापरीत राहणे.

३) देशी शब्दसंपत्ती, जुनी मराठी, तसेच बोलीभाषेतील शब्दसंपत्ती धुंडाळणे.

४) आणि जेथे अडेल तेथे संस्कृतकडे वळणे.

शब्दसाधितांच्या प्रकारांचा वापरही याच तऱ्हेने होत असे.

नंतरच्या काळात म्हणजे सामाजिक व राजकीय जागृतीच्या व पुनरुत्थानाच्या सुरवातीच्या काळापासून हे सर्व बदलू लागले आणि पहिल्या दोन विभागांत उल्लेख आलेले ग्रह, आग्रह सुरू झाले; भाषाशुद्धीवर भर येऊ लागला; त्यामुळे आपण भाषाविकासाचे संभाव्य सामर्थ्य गमावले. त्याला अनावश्यक मर्यादा पडल्या, असे मला वाटते. आजचे सरकारप्रणीत तसेच शिष्टसंमत म्हणजे पंडिती संकेत कोणते आहेत याचा थोडक्यात पुन्हा एकदा उल्लेख करतो म्हणजे पुढे सुचविलेल्या नव्या संकेतांचा वेगळेपणा आणि त्यांच्या संभाव्य सामर्थ्याची कल्पना येऊ शकेल. (त्यांचा खरा प्रत्यय अर्थातच त्यांच्या वापरानंतरच दिसेल.) सूत्रमय पद्धतीने सांगायचे, तर आजचे शब्दशोधाचे, नवी शब्दसंपदा निर्माण करण्याचे संकेत असे आहेत :

१) **इंग्रजी निष्ठा,** (शैली व 'शुद्ध' रूपांचे बाबतीत) इंग्रजी शब्दांना 'अपभ्रष्ट' करून मराठीत न रुळविता, त्याऐवजी क्लिष्ट संस्कृत शब्दांचा वापर.

२) **संस्कृतचे अवास्तव स्तोम,** आणि त्यात अखिल भारतीय परिभाषा करण्याच्या हव्यासामुळे पडणारी भर,

३) साध्या मराठभोळ्या देशी शब्दांकडे अजाण किंवा सुजाण दुर्लक्ष,

४) मराठीत रुळलेल्या अरबी, फारशी शब्दांची पद्धतशीर वगळण,

५) 'राष्ट्रभाषे'च्या दुरभिमानापोटी किंवा केवळ दाखवेगिरीच्या पोटी संस्कृतनिष्ठ हिंदी शब्दांचा सोस.

याची उदाहरणे वर आलीच आहेत, आणि थोड्या शोधक दृष्टीने पाहिल्यास आपल्या आजूबाजूला सर्वत्र आढळतील.

हे सर्व विचारात घेऊन शब्दशोधाविषयी, शब्दसंपत्ती वाढविण्याविषयी पुढील संकेत स्वीकारावेत असे मला वाटते :

अ) मराठीत आज जे शब्द रूढ आहेत किंवा साठ-सत्तर वर्षांपूर्वीपर्यंत रूढ होते ते सर्व **मराठी** शब्द आहेत, **आपले** शब्द आहेत. व्युत्पत्तीविचाराशिवाय इतर कारणांसाठी त्यांच्या पूर्वपीठिकेत जाऊन त्यांच्या मूळ कुलानुसार काही वर्ज्य, इतर योग्य, असे मानण्याचे कारण नाही. मग ते तत्सम, तद्भव, देशी, अरबी-फारशी, इंग्रजी किंवा फिरंगी, अथवा इतर भारतीय भाषांतील कुठलेही असोत.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आ) आज जे मराठीत वेगवेगळे शब्दसिद्धीचे प्रकार आहेत, उपसर्ग, प्रत्यय किंवा समासप्रकार आहेत, तेही सर्व शब्दसिद्धीचे **मराठीच** प्रकार आहेत, **आपले** प्रकार आहेत, असे समजावे. व्युत्पत्तिविचाराशिवाय इतर कारणासाठी त्यांच्या कुळात शिरून त्यात तरतमभाव, ' शिवाशिव ' मानू नये.

इ) हे सर्व शब्दसिद्धीचे **मराठी** प्रकार वर स्वीकारलेल्या सर्व **मराठी** शब्दांना सर्रास वापरायला मुभा असावी. असे करताना त्याचे व्युत्पत्तिमूळ म्हणजेच कुळ आडवे येऊ नये.

ई) अशा प्रकारे शब्दशोध घेताना, शब्दसंपदा वाढविताना नवा शब्द भाषेत फक्त चपखल बसावा, फारसा बेंगरूळ दिसू नये, (थोडासा बेगरूळपणा असायला हरकत नसावी, ) तो अर्थवाही असावा, त्याचा अर्थ अल्प प्रयत्नाने समजावा, एवढी काळजी घ्यावी. म्हणजे ' शिवाशिव ', ' शब्दसंकर ' इत्यादी शुद्धाशुद्धत्वाच्या कल्पना सोडून द्याव्या.

उ) इंग्रजी व फिरंगी शब्दांसंबंधी आपला दृष्टिकोण अव्वल इंग्रजीच्या काळातील मराठी लेखकांप्रमाणे असावा. म्हणजे अवश्य असतील तेव्हा हे शब्द मराठी भाषेत आणावे, त्यांना मराठीत रुळवून घेण्यासाठी, म्हणजे मराठी भाषेच्या घाटणीला त्यांना जुळवून घेण्यासाठी त्यांना जरूर ' अपभ्रष्ट ' करावेत, त्यांची अवश्य ती ' मोडतोड ' करावी. रशियन धरून सर्व युरोपीय भाषा एकमेकींमधले शब्द उचलतात आणि आपल्या भाषेच्या घाटणीप्रमाणे त्यांना नवे रूप देतात. त्याचप्रमाणे चिनी व जपानी भाषाही करतात. संस्कृतनेसुद्धा तिच्या काळी हेच केले आहे यात शंका नाही. तेव्हा आपण साहेबापेक्षा साहेबी किंवा संस्कृतपेक्षा सोवळे बनण्याचे कारण नाही.

ऊ) संकेत (उ) विषयी अधिक विचार असा की,

१) युरोपीय ( आणि मुख्यतः ) इंग्रजी भाषेतील आपल्या कल्पनाविश्वाला अपरिचित असलेले व वस्तुवाचक शब्द तशीच सामान्यनामे उचलावीत व त्यांना रुळवून घ्यावे. उदा. विलेक्ट्रान ( इलेक्ट्रॉन ), प्रोटान (प्रोटॉन), सेट ( सेंट ), वगैरे.

२) त्यांपासून संकल्पनात्मक किंवा प्रक्रियात्मक शब्द बनविताना या शब्दांना **मराठी** म्हणजे **आपले** आहेत असे समजून त्यांना संकेत (अ) ते ( ऊ ) यानुसार उपसर्ग प्रत्यय, समास इत्यादी शब्दसिद्धीचे सर्व प्रकार लावावेत.

३) तरीसुद्धा कित्येक संकल्पनात्मक किंवा प्रक्रियात्मक शब्दांसाठी संस्कृतकडे वळावे लागेल, तसे ते वळावे. पण त्यासाठी शब्दांचे जडजंबाल किंवा अवडंबर माजविण्याची प्रवृत्ती टाळावी. उदाहरणार्थ मूड, डायलेक्टिक यांसारखे काही थोडे रूपांतराला अतिकठिण असणारे शब्द आपल्या भाषेला जुळवून तसेच घ्यावे.

(ए) वरील संकेतानुसार शब्दवेध घेताना साहेबी, पंडिती भूमिका किंवा ' शुद्धि 'वेड यापासून तसेच ' राष्ट्रभाषे 'विषयीच्या भावनात्मक आग्रहापोटी संस्कृतनिष्ठ हिंदीच्या सोसापासून कटाक्षाने दूर राहण्याची आवश्यकता आहे. उदाहरणार्थ इंग्रजी, फ्रेंच, वगैरे युरोपीय शब्द मराठी भाषेत घेताना तो तथाकथित ' शुद्ध ' इंग्रजी, फ्रेंच उच्चारात असण्याची बिलकूल जरूर नाही. ( नाहीतरी आपण उच्चारतो तो फार तर डिक्शनरी उच्चार असतो, खरा उच्चार नसतोच, म्हणजेच हे शब्द आपल्याला त्या भाषेतील सहज उच्चाराने क्वचितच उच्चारता येतात ! ) याविषयी जो कटाक्ष पाळावयाचा तो आपण ती भाषा बोलत, किंवा लिहीत असताना जरूर ठेवावा, मराठी बोलता-लिहिताना नको इतकेच. तीच गोष्ट काही अंशी संस्कृत शब्दांबद्दलही. उदाहरणार्थ पंजाबातील सटेशन (स्टेशन), करण (कर्ण), सिंग (सिंह) यांनी भाषा समृद्ध होते, भ्रष्ट होत नाही हे लक्षात घेणे जरूर आहे.

(ऐ) अखिल भारतीय समान परिभाषेचा आग्रह, आणि त्यासाठी शब्दसिद्धीची संस्कृत टांकसाळ, हा सर्व खटाटोप सोडावा. जे शब्द समान किंवा समानदृश होतील ते होतील, त्याबद्दल आनंदच आहे. पण त्याविषयी वर सांगितल्याप्रमाणे ' अट्टाग्रह ' किंवा ' अट्टाहास ' असू नये.

(ओ) सारांश, आपली भाषा संस्कृत नाही, इंग्रजी नाही किंवा अन्यभाषा नाही, तिच्यात परभाषेतील शब्द मुक्तपणे मराठी पेहराव देऊन अवश्य घ्यावेत. म्हणजेच आपली भाषा मराठी आहे, हा समज पक्का ठेवून त्याप्रमाणे भाषा समृद्ध करावी. या संकेतांची खरी कसोटी ते वापरण्यातच लागणार आहे. पण वानगीदाखल उदाहरणे देऊन ते अधिक

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विषद करता येतील. उलट आजच्या संकेतामुळे येणाऱ्या मर्यादा आणि संस्कृतावर अवास्तव भर दिल्यामुळे येणारी दुर्बोधता यांचीही उदाहरणे देता येतील. पण या लेखाचा उद्देश सामाजिक बदल आणि भाषिक विकास यांचा परस्परसंबंध आणि भाषिक विकासाचे नवे संकेत मानण्याची आवश्यकता एवढाच आहे. लेखाच्या आजच्या कक्षेत अधिक विस्तार व तपशील बसणार नाही, म्हणून वगळला आहे.

तसेच शब्दशोधासाठी वर सुचविलेल्या संकेत-संचाऐवजी दुसरे एखादे त्याच तऱ्हेचे किंवा अन्य व्यापक संकेतसंच सुचविले जावेत. त्या सर्वांमधून निवड व्हावी. अशा कोणत्याही संकेतामागे मुख्य उद्देश असा असायला हवा, की भाषाविकास हा अखेर बहुजन मराठी भाषिकांसाठी आहे, तो केवळ पंडितांसाठी नाही, म्हणून तो लोकाभिमुख पद्धतीने व्हायला हवा. 'आम्ही' सांगू ती भाषा, 'त्यांनी' ती स्वीकारली पाहिजे, असे म्हणून चालणार नाही. आज हे लक्षात ठेवायला हवे, की संस्कृतप्रचुर, आलंकारिक व्याख्याने देऊन किंवा लेख लिहून फड जिंकण्याचा काळ मागे पडला. आज बहुजनांना भाषा शिकविण्यापेक्षा त्यांचेकडून त्या संदर्भात शिकणे महत्त्वाचे आहे. स्वातंत्र्योत्तर काळात सत्तेमुळे म्हणा किंवा लोकशाहीकरण पुढे गेल्यामुळे म्हणा 'पाहिजेल आहे' हे मराठीत प्रतिष्ठा पावले आहे, आणि तसे व्हायलाच हवे, हे पंडितांनी, म्हणजेच 'आम्ही' ओळखले 'पाहिजेल आहे'. कारण या देशात आमुलाग्र समाजपरिवर्तन व्हायचे असेल, तर भाषाविकास याच दिशेने व्हायला हवा.

समारोपादाखल एवढे म्हणता येईल. आपल्या देशात समाजपरिवर्तन हा आजचा महत्त्वाचा सवाल आहे. इंग्लंडसारख्या ज्या देशात तो नाही, तेथेसुद्धा गेल्या तीस-चाळीस वर्षांत आज वापरात असलेली सरकारी क्षेत्रातील, तसेच वैज्ञानिक व समाज-वैज्ञानिक क्षेत्रातही, अवजड, अवघड भाषा सुलभ व्हावी यासाठी प्रयत्न चालू आहेत. वृत्तपत्रीय, सरकारी आणि समाजशास्त्रीय लिखाणाची भाषा अकारण दुर्बोध बनली आहे अशी तेथेसुद्धा तक्रार आहे. त्यामुळे साक्षर, शिक्षित अशा सामान्य नागरिकाला साधे फॉर्म समजून भरणे किंवा आम जनतेसाठी काढलेल्या सरकारी नोटीसा समजणे कसे दुरापास्त होते याची चर्चा होत आहे. त्यावर इलाज होण्याची मागणी होत आहे. हे निवारण्यासाठी, निदान सरकारी इंग्रजी सुधारण्यासाठी म्हणजे ती सुलभ करण्यासाठी 'साधे इंग्रजी' (प्लेन वर्ड्स) 'अधिक साधे इंग्रजी' अशा तऱ्हेची अतिशय वाचनीय पुस्तके निघाली आहेत. चालू पंडिती जडजंबालाला धक्के मिळत आहेत. केवळ धक्केच मिळत नसून अशा तऱ्हेच्या पुस्तकांद्वारा सरकारी इंग्रजी सोपी करण्याचे प्रत्यक्ष धडेही मिळत आहेत. तसेच प्रयत्न किंबहुना अधिकच पोटतिडिकेने आपल्याकडे व्हायला हवेत. दुर्दैवाने याकडे कोणी फारसे लक्ष देताना दिसत नाही. उलट नेमकेपणाच्या आणि नेटकेपणाच्या नावाखाली लेखी भाषा अधिक दुर्बोध आणि हास्यास्पद होत आहे. चाळीस वर्षांपूर्वी आम्ही काही मित्रमंडळी पुण्यातील काही वृत्तपत्र-मासिकांतील भाषा 'ब्राह्मणेतरांना समजेल' या भीतीने मुद्दाम दुर्बोध केली जाते असे (काहीसे गमतीने) म्हणत असू. (उदा. 'प्रश्न' म्हणायचे नाही, 'समस्या' म्हणायचे; 'कठीण' नाही, 'दुर्गम' म्हणायचे इत्यादी.) तशीच प्रवृत्ती अद्यापही चालू असावी हे अतिशय खेदजनक आहे.

मी भाषाशास्त्री नाही, भाषा विकासाविषयी आस्था असलेला एक सामान्य विचारक आहे. हा लेख लिहायला मी प्रवृत्त झालो; कारण भाषाविकासाच्या दिशेचा समाजपरिवर्तनाच्या वाटचालीशी जो संबंध आहे तो ठामपणे मांडून भाषेविषयी काळजी वाहणाऱ्यांच्या विचारासाठी एक व्यापक पाया देणारी संकेतयोजना उदाहरणादाखल ठेवावी एवढाच आहे. आंतरभारतीय परिभाषेचे अडसर भाषाविकासाच्या पायात अडकवू नयेत, भाषाशुद्धी ही शुद्धिसंघटनासारखीच कालबाह्य कल्पना आहे, वरील योजनेत सुचविल्याप्रमाणे रूढ, बालबोध शब्द आणि अरबी –फारशी किंवा इंग्रजी–फिरंगी शब्द, भाषेत राहू देणे किंवा नवे इंग्रजी रुळवून घेणे ही काही त्या शब्दांवर किंवा ते शब्द सहज समजणाऱ्या बहुजनांवर मेहरबानी नाही, तो त्या शब्दांचा आणि ते शब्द बोलणाऱ्यांचा रास्त हक्क आहे, हे सर्व इतर काही दूरदर्शी विद्वानांनी कित्येकदा मांडलेले आहे त्याचाच पाठपुरावा करण्यासाठी हा लेखनाचा खटाटोप केला. त्याविषयी भाषापंडितांना आणि माझ्यासारख्या वाचनप्रेमी अपंडित वाचकांना काय वाटते हे समजल्यास मला आनंद वाटेल.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# कायदा आणि मराठी

न रे न्द्र  च प ळ गा व क र

## १) कायदा पाळणारांना न समजणाऱ्या भाषेत कायदे.

आपल्या विशिष्ट भूप्रदेशातील नागरिकांचे जीवन नियमित करण्यासाठी शासनसंस्था जे नियम करते त्याला आपण कायदा म्हणतो. हा नियम किंवा कायदा नागरिकांनी पाळण्यासाठी असतो. यासाठी दोन गोष्टी आवश्यक असतात. एक तर हे कायदे ज्यांनी पाळावयाचे त्यांच्या भाषेत ते असावेत व दुसरी म्हणजे ते त्यांना समजावून सांगण्यासाठी एखादी यंत्रणा असावी. दुर्दैव असे की, तर्कदृष्टचा जी गोष्ट एवढी स्वच्छ आहे, ती आपल्या देशात अस्तित्वात नाही. सर्व कायदे बहुसंख्यांना न समजणाऱ्या भाषेत—इंग्रजीत—असतात व ते सामान्य नागरिकांना समजावून सांगण्याचा कोणताही उल्लेखनीय प्रयत्न होत नाही.

जेत्यांच्या भाषेत— राज्यकर्त्यांच्या भाषेत— आपल्याकडे कायदे करण्यास प्रारंभ झाला व अद्यापही त्याच भाषेचा आपण वापर करतो. विशिष्ट प्रांतात विशिष्ट भाषा आपण राजभाषा केली, तरी कायदा त्या भाषेत तयार होत नाही. इंग्रजी न जाणणाऱ्यांनी निवडून दिलेले इंग्रजी न जाणणारे प्रतिनिधी इंग्रजीतील कायदे संमत करीत असतात.

## २) तकलादू कारणे

कायदे प्रादेशिक भाषेत न करण्यामागे जी कारणे सांगितली जातात त्यांतले एक म्हणजे प्रादेशिक भाषा पुरेशी परिपक्व नाही हे व दुसरे म्हणजे सर्व देशातील न्यायालयांचे कामकाज हे जर एका भाषेत चालले नाही, तर सर्वोच्च न्यायालयात लोकांना खालच्या कोर्टाच्या निकालाची तपासणी कशी करता येईल हे. ही दोन्ही कारणे अधिक विचारांती चुकीची आहेत, हे आपल्या सहज लक्षात येते.

पहिली गोष्ट म्हणजे मराठीसारखी भाषा कोणताही कायदा त्या भाषेत करण्याइतकी निश्चितच समृद्ध आहे व कायदे करण्यास—पर्यायांनी वापरण्यास मराठीत सुरुवात झाली म्हणजे भाषा एकसारखी याहूनही समृद्ध होत जाईल. आज अनेक कायद्याचे जे अनुवाद मराठीत प्रसिद्ध झाले आहेत, त्यांवरून ही गोष्ट स्पष्ट होईल.

दुसरे कारण तर अगदीच तकलादू आहे. कायदा पाळणारे लोक पंच्याण्णव टक्क्यांहून जास्त. यांना कायदा समजला पाहिजे की नाही ? कायदा मोडणारे अगदीच थोडे, त्यांची प्रकरणे न्यायालयात येणार. त्यातूनही तालुका, जिल्हान्यायालये व त्यानंतर उच्चन्यायालयापर्यंत पोहोचणारी प्रकरणे फार थोडी. तेथपर्यंत तर मराठीचा वापर होण्यास कोणताही प्रत्यवाद नाही. सर्वोच्च न्यायालयापर्यंत ज्या कोर्टात विविध भाषा बोलणाऱ्या प्रांतांतील प्रकरणे येतील, तेथपर्यंत फारच थोडी प्रकरणे येतात. तेथेही साक्षपुराव्याची छाननी फारशी होत नाही. निकालपत्रांचे भाषांतर इंग्रजीत किंवा हिंदीत करवून हा प्रश्नही सोडविण्यासारखा आहे. एकूण लोक-

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संख्येपैकी फारच थोड्या, अगदी नगण्य लोकांची प्रकरणे सर्वोच्च न्यायालयासमोर जात असल्यामुळे प्रादेशिक भाषा समजणार नाही म्हणून आम्ही इंग्रजीचा वापर कायदे करण्यासाठी करतो या कारणमीमांसेत काही तथ्य नाही, हे आपल्या सहज लक्षात येईल.

### ३) परिभाषेचा प्रश्न

कायदे इंग्रजीत केले जातात याचे अजूनही एक कारण सांगितले जाते ते म्हणजे कायद्यातील अनेक संकल्पना या इंग्रजी भाषेत विशिष्ट शब्दाने व्यक्त होतात व त्यांना मराठी प्रतिशब्द सुचविणे कठीण होते किंवा बऱ्याच मोठ्या शब्दसमूहाने मग मराठीत त्याचा अर्थ सांगावा लागतो. हे कारण सकृतदर्शनी खरे वाटते. पण एखादी संकल्पना एखाद्या शब्दाने सूचित होण्याचा प्रारंभ बऱ्याच काळाने तो उपयोग सर्वांच्या अंगवळणी पडल्याने होतो. गेल्या शतकात जेव्हा इंग्रजीत कायदे आपल्या देशात होण्यास सुरुवात झाली, त्यावेळी इंग्रजी शब्दांनाही असे नेमके अर्थ होतेच असे नाही. इंग्लंडमधील इंग्रजी कायद्यांचा वारसा मिळालेला असतानाही इंग्रजी परिभाषेच्या निर्मितीस थोडा काळ जावा लागलेला आहेच. मराठीमध्ये जर कायदे होण्यास प्रारंभ झाला, तर हळूहळू चांगली मराठी परिभाषा निश्चित अस्तित्वात येईल. अर्थात त्यासाठी थोडा वेळ लागेल; पण कधीतरी त्याचा प्रारंभ झाला पाहिजेच. पूर्वीच्या निझामी राजवटीत जेव्हा निर्धारपूर्वक उर्दूचा वापर सर्व कायद्यासाठी झाला, तेव्हा उर्दूतही परिभाषा निर्माण होऊ शकली व आज कायद्यांचे अनुवाद प्रसिद्ध करताना मराठीतही परिभाषेची अडचण सहसा पडत नाही. या दोन गोष्टींचे स्मरण येथे केले पाहिजे.

### ४) मूलभूत अधिकाररक्षणार्थ मराठी

आपल्या राज्यघटनेने सर्व नागरिकांना कायद्याचे लेखी समानत्व बहाल केले आहे. हा मूलभूत अधिकार खऱ्या अर्थाने अस्तित्वात यावयाचा असेल, तर त्या नागरिकाला कायदा आहे तरी काय हे निश्चित कळले पाहिजे. तरच तो आपल्याला इतर नागरिकांप्रमाणेच लेखण्यात आले की नाही हे पाहणार. म्हणूनच कायदा त्याला समजेल अशा भाषेत पाहिजे.

भारताच्या संघराज्यपद्धतीत राज्याच्या अधिकारकक्षेतील बाबीसंबंधी राज्यविधिमंडळे कायदे करतात, तर संघराज्याच्या अधिकारकक्षेतील बाबीसंबंधी संसद कायदे करते. त्यामुळे निदान प्रादेशिक विधिमंडळांनी त्या त्या प्रांतातील लोकभाषेत कायदे करावेत व केंद्र सरकारचे कायदे इंग्रजी– हिंदी यासारख्या भाषेत असावेत व या कायद्याची अधिकृत भाषांतरे सर्व घटनामान्य प्रादेशिक राजभाषांत ताबडतोब उपलब्ध व्हावीत अशी अपेक्षा करणे तर्कसंगतच नव्हे, तर न्यायदृष्टयाही आवश्यक आहे.

### ५) तरीही इंग्रजीच का आहे ?

असे असले तरी इंग्रजीतच कायदे का होतात ? प्रादेशिक भाषा व हिंदीचा वापर करण्याच्या घोषणा प्रत्यक्ष अंमलबजावणीत का येत नाहीत ? याची कारणे पुढील असू शकतात.

अ : विधिमंडळाची इच्छा जाणून त्याप्रमाणे मुळातच कायदे आपल्याकडे लिहिले जात नाहीत. कायद्याचे मसुदे तयार करणारा जो नोकरवर्ग आपल्याकडे आहे, तो सामान्यतः जुन्या कायद्यातील इकडचे तिकडचे तुकडे व शब्दयोजना उचलून कारकुनी नकला करणारा व निकृष्ट प्रतीचा आहे. प्रत्येक नवा कायदा अशा रीतीने जुन्या कायद्याच्या अनेक कलमांची सहीसही नक्कल ठोकूनच तयार होतो. त्यातल्या कर्मचारीवर्गास नवा कायदा स्वतः होऊन मराठीत लिहिणे अजिबात जमणार नाही असे वाटते.

ब : विधिमंडळाच्या सभासदांना कायद्याची शब्दरचना व भाषा यांत रस घेण्याची इच्छा व वेळ नाही.

क : कायदे करणे व त्यांची अंमलबजावणी करणे या सर्व व्यवहारांत गुंतलेल्या वरिष्ठ नोकरवर्गास मराठीचे ज्ञान फार कमी आहे व ते आवश्यक असते अशी जाणीव देण्यात आलेली नाही. त्यांच्या नोकरीचे हितसंबंध इंग्रजी चालू राहण्यात गुंतलेले आहेत.

### ६) मराठीचा वापर अंमलबजावणीतही नाही

कायदे मराठीत का होत नाहीत या प्रश्नाचा विचार केल्यावर अंमलबजावणीक्षेत्रात आज मराठीचा वापर कितपत आहे याकडे आपण वळू.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

१. विविध कायद्यांनी काही गोष्टी जनतेच्या माहितीसाठी प्रसिद्ध कराव्यात अशी तरतूद केलेली असते. अशी प्रकटने मराठीत प्रसिद्ध होणे कायद्याच्या हेतूच्या परिपूर्तीसाठी आवश्यक असते. परंतु ती सहसा होत नाहीत. उदा. भूसंपादन कायद्याखालील प्रकटने व पोलीस कायद्याखालील निर्बंध जारी करण्यासंबंधीची प्रकटने.

२. काही कायद्यांप्रमाणे किंवा त्यांखाली केलेल्या नियमांप्रमाणे काही माहितीचे तक्ते भरून योग्य अधिकाऱ्याकडे सादर करावे लागतात. असे तक्ते मराठीत उपलब्ध असले पाहिजेत. ते बहुश: इंग्रजी-तच असतात. इंग्रजी व मराठी अशा दोन्ही भाषांत असतील तर मराठी प्रती फार कमी काढतात व सर्वत्र इंग्रजी वापरावे लागते.

३. काही कायद्यांखाली नागरिकांना विशिष्ट गोष्टीसाठी परवान्याचे अर्ज करावे लागतात. हे अर्जाचे नमुनेही सर्व वेळी मराठीत उपलब्ध नसतात.

४. सरकारी अधिकारी जेव्हा न्यायाधिकरण म्हणून काम करतात, तेव्हा कामकाज मराठीत चाल-वीत नाहीत व आपले निकालपत्र इंग्रजीत लिहितात.

५. न्यायालयांत जेथे पुरावा शब्दश: न नोंद-विता पुराव्याचा सारांश नोंदवावयाचा आहे, तेथे तो इंग्रजीत नोंदविला जातो.

६. न्यायालयाची निकालपत्रे इंग्रजीतच लिहावी लागतात.

वरील गोष्टींशिवाय आणखी अनेक छोटया छोटया बाबी मराठीचा वापर करण्यास प्रतिबंध करतात किंवा निदान त्यात अडथळा उत्पन्न करतात. जर मराठीचा वापर अधिकाधिक करण्याचा सर-कारचा निर्णय ढोंगीपणाचा व दिखाऊ न राहिला व तो प्रामाणिकपणे अंमलात आणण्याचे सरकारने ठरविले, तर हे सर्व अडथळे दूर होऊ शकतील. त्यांतील काहींचा निर्देश येथे करतो.

१. न्यायालयांत पुरेशा संख्येत मराठी टंकलेखन यंत्रेच नाहीत. मराठी टंकलेखकही नाहीत. त्यामुळेही मराठीऐवजी अनेकवेळा, पत्रव्यवहार वगैरेत इंग्र-जीचा जास्त वापर होतो.

२. न्यायालयांतील प्रशासनिक कारभार पूर्णपणे मराठीत ताबडतोब करता येणे शक्य असूनही केला जात नाही.



३. न्यायालयांत दाखल होणारा दावा, त्याचे उत्तर म्हणजे कैफियत व फौजदारी प्रकरणातील फिर्याद ही मराठीतच हवी असा नियम करता येईल. जर ती इंग्रजीत असेल, तर ज्याला त्याला उत्तर द्यावयाचे आहे त्याला ते कळवण्याचा अधिकार असल्यामुळे त्याचे मराठी भाषांतर जोडण्याची सक्ती केली जाऊ शकेल.

४. काही कायद्यांखाली राज्यसरकारला नियम करण्याचा अधिकार दिलेला असतो. असे सर्व नियम अगोदर मराठीत तयार केले पाहिजेत व गरज भासल्यास त्यांचे इंग्रजी भाषांतर नंतर सरकारने प्रसिद्ध करावे.

५. प्रशासनातील कोणताही पत्रव्यवहार विशेष कारण नसताना इंग्रजीत करणे हा गैरकारभार व हलगर्जीपणा मानण्यात यावा.

६. न्यायालयाचे समन्स, वारंट किंवा नोटीस ही मराठीतच हवी.

७. आपले वकील आपली बाजू कशी मांडतात हे कळण्याचा प्रत्येक अशीलास अधिकार असल्यामुळे न्यायालयांतील युक्तिवाद मराठीतच व्हावेत, असा आग्रह धरण्यात आला पाहिजे.

८. न्यायालयांतील व अभिलेखगृहात कागद-पत्राची इंग्रजी नक्कल मिळण्यास हल्ली मराठी नकलेपेक्षा कमी खर्च येतो. त्यामुळे लोक मराठी-ऐवजी इंग्रजी नक्कल काढून काम भागवितात. मराठी नक्कल इंग्रजीपेक्षा स्वस्त दराने शासनाने पुरविली पाहिजे.

९. महाराष्ट्र राज्यातील निदानपक्षी कनिष्ट न्यायालयांत ज्यांना मराठीचे पुरेसे ज्ञान नाही त्यांना न्यायाधीश नेमता कामा नये.

१०. राजपत्रात एखादी गोष्ट प्रसिद्ध झाली म्हणजे ती सर्वांना समजली असे कायद्यात सम-जण्यात येतें, जर असे प्रसिद्धीपत्रक मराठीत प्रसिद्ध झालेले नसले, तर लोकांना ते कळाले असे गृहीत धरण्यात येऊ नये.

न्यायालयीन कामकाजात मराठीचा वापर कर-ण्याचा प्रयत्न हा केवळ भाषांतराच्या माध्यमातून सुरू झाला म्हणजे साहजिकच भाषा बोजड बनते. भाषांतर (कायदा व नियम यांचे) करावेच लागेल;

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पण नवे कायदे, नवे नियम, नवे तक्ते, नवे नमुने हे सर्व मूळ मराठीत विचार करून लिहिले गेले, तर ते अधिक सोपे होतील.

जुन्या कायद्याचे भाषांतराचे प्रचंड काम तातडीने पूर्ण करावयाचे असेल, तर त्यासाठी सध्याची यंत्रणा अपुरी आहे. व अधिक मोठ्या प्रमाणात तज्ज्ञांचे साहाय्य त्यासाठी घ्यावे लागेल. तसेच, व्यवहारांत काही प्रतिशब्द बोजड वाटत असले, तर अधिक चांगले सुचविण्यासाठी व दुरुस्त्या सुचविण्यासाठी प्रत्यक्ष वकिली व्यवसाय करणारे वकील व भाषेचे तज्ज्ञ यांच्या समित्या नेमून त्यांना भाषांतराची तपासणी करण्याचे काम सांगण्यात आले पाहिजे.

आज काही कायद्याचे व नियमांचे मसुदे जनविचारार्थ प्रसिद्ध केले जातात ते मसुदे मराठीत जर प्रसिद्ध झाले, तर निरनिराळ्या वकीलसंघांनी त्याची उपेक्षा न करता अशा मसुद्यांतील आशयाबरोबर भाषेचीही तपासणी करून आपला अभिप्राय सरकारला व विधिमंडळांना कळविला पाहिजे.

कायदे सोप्या भाषेत लोकांना समजावून सांगणे ही सरकारची नैतिकच नव्हे तर वैधानिक जबाबदारी समजली गेली पाहिजे. त्यासाठी कायद्यातील महत्त्वाच्या तरतुदींची योग्य प्रसिद्धी सरकारने वृत्तपत्रे, नभोवाणी, दूरदर्शन यांसारख्या माध्यमांतून केली पाहिजे. तद्वतच राज्यसरकारने कायदेविषयक एक मासिक मराठीत प्रसिद्ध केले पाहिजे, ज्यात नवे कायदे, नियम प्रगटने व महत्त्वाचे न्यायालयीन निवाडे यांचा समावेश असेल. हे प्रकाशन अगदी स्वस्त दरात सर्व न्यायालये, न्यायाधीश, वकील, सरकारी कार्यालये, जिल्हा परिषद, नगर परिषद व ग्रामपंचायती आणि नागरिक यांना उपलब्ध करून देण्यात आले पाहिजेत.

नव्या कायद्यातील तरतुदी लोकांना समजावून सांगण्यासाठी लोकप्रतिनिधी, सार्वजनिक कार्यकर्ते, वकील यांच्या एकत्र बैठका घेऊन त्यांत हे काम करण्यात आले पाहिजे.

महाराष्ट्रातील कायद्याचे शिक्षण देणाऱ्या महाविद्यालयांत मराठी भाषा (वाङ्मय नव्हे) व तिचा कायद्यासाठी वापर हा सक्तीचा विषय असला पाहिजे.

मराठीच्या जास्तीत जास्त वापरात मुख्य अडथळा हा मानसिक आहे. लोकांना न कळणाऱ्या भाषेत लिहिणे आणि बोलणे हे मोठेपणाचे लक्षण मानण्याचे आपली पद्धत आहे. काही गुलामीचे परिणाम, काही स्वार्थ जपण्याचे काही वर्गाचे प्रयत्न या सर्वांतून निर्माण झालेले मनोगंड आपल्याला किती लवकर झटकता येतील त्यावर आपल्या या दिशेने करावयाच्या प्रगतीचा वेग अवलंबून आहे. जे निझामाला जमले ते लोकांच्या सरकारला जमणार नाही, असे मानणे ही एक विकृती आहे.

---



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कायदा आणि मराठी ह्यांचा विचार मुख्यतः दोन संदर्भात करायचा आहे. कायद्याचे ज्ञान सामान्य माणसाला असायला हवे. ज्यांच्या हितासाठी कायदे केले जातात, त्यांना त्या कायद्यांची जाण असली तरच कायद्याचे राज्य स्थापन होऊ शकते. ही तो विषय त्याच्या अध्ययनाच्या मुख्य विषयाशी संबंधित नसतो. त्याला जर विज्ञान व वाणिज्य ह्या शाखेशी संबंधित साहित्य देऊन तो शिकवला, तर त्याला त्यात जास्त रसही वाटेल व त्याचा उपयोगही होईल. कायदेशिक्षणाबाबतही हेच महत्त्वाचे.

# कायद्यासंबंधी लोकांचे व विद्यार्थ्यांचे शिक्षण :

सत्यरंजन साठे

कायद्याची जाण सामान्य माणसांत निर्माण करणे आवश्यक आहे. हे ज्ञान लोकभाषेतूनच करून द्यावे लागेल. म्हणजेच कायद्याची साक्षरता ( legal literacy) हा कार्यक्रम महाराष्ट्रात मराठीतून द्यावा लागेल. दुसरा संदर्भ आहे व्यावसायिकांच्या शिक्षणाचा. आज कायदेशिक्षणाचे माध्यम इंग्रजीच आहे. ते मराठी व्हावे हे केव्हाही संयुक्तिक आहे. पदवीपर्यंतचा अभ्यासक्रम जर विद्यार्थी मराठीत शिकू शकतो, तर त्याने पुढला कायद्याचा अभ्यासक्रमही मराठीत शिकायला हरकत नाही. मात्र असे झाले तरी त्याला कायद्याच्या इंग्रजीच्या सरावाची आवश्यकता पडेलच. आणि कायद्याच्या अभ्यासाचे माध्यम इंग्रजी आहे तोवरदेखील त्याला व्यवहारात मराठी वापरावी लागणार असल्याने ती भाषाही अवगत असायलाच हवी. ज्यांची मातृभाषा मराठी आहे त्यांनाही मराठीत कायदेविषयक संवाद किंवा पत्रव्यवहार करता येईलच असे नाही. त्याकरता त्यांना विशेष प्रशिक्षण देणे निश्चितच हिताचे होईल.

भाषेचा अभ्यास म्हणजे साहित्याचा अभ्यास असे समीकरण आपल्या शैक्षणिक जगात दृढ झाले असल्याने भाषा-अभ्यासाबद्दल विद्यार्थी नाखूष असतात. विज्ञान किंवा वाणिज्यशाखेच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी किंवा मराठी हे विषय जरी सक्तीचे असले, तरी त्या विषयांचे गुण त्यांच्या यशाचे मोजमाप करताना लक्षात घेतले जात नाहीत. कसातरी ती पेपर द्यायचा आणि मोकळे व्हायचे अशी त्या विद्यार्थ्यांची वृत्ती असते. ह्याचे मुख्य कारण पूर्वी कायद्याच्या शिक्षणक्रमात इंटरनंतर प्रवेश दिला जायचा. त्यावेळी इंटरनंतर येणाऱ्या विद्यार्थ्यांना इंग्रजीचा एक पेपर द्यावा लागे व त्यात पास व्हावे लागे. पण थॉमस हार्डीची कादंबरी किंवा असेच काही तरी साहित्यिक मूल्य असलेले वाङ्मय त्याला अभ्यासावे लागे. त्या अभ्यासामुळे त्याच्या इंग्रजीवर काही विशेष परिणाम होत नसे. त्या अभ्यासामुळे त्याला वकिली व्यवसायात जे इंग्रजी वापरावे लागे त्यातही फारशी मदत होत नसे.

आज कायद्याच्या अभ्यासक्रमाला प्रवेश घेणारा विद्यार्थी हा कुठल्यातरी शाखेचा पदवीधर असतो. त्याचे पदवीपूर्व शिक्षण मराठी माध्यमातून झाले असेल किंवा इंग्रजी माध्यमातून झाले असेल. काही अपवाद वगळता बहुतेक विद्यार्थ्यांना इंग्रजी वाचून समजणेही अवघड असते. बोलणे तर आणखीनच कठीण. पण ह्या विद्यार्थ्यांना मराठीही बोलता येत नाही. कायदा-विषयावर आपले विचार मराठीत मांडणेही त्याला शक्य होत नाही. बहुतेक विद्यार्थी हे जिल्हा किंवा तालुकापातळीवरच व्यवसाय करत असणार असल्याने त्यांना बहुतेक व्यवहार मराठीतच करावा लागेल. अशीलाशी बोलणे, न्यायालयात साक्षीदारांची तपासणी व उलटतपासणी घेणे, महत्त्वाची कागदपत्रे व दस्तऐवज हे सर्व मराठीतच असते. न्यायालयांचे कामकाजही आजकाल पुष्कळसे मराठीतच होते. घटनांबाबत ( Facts ) युक्तिवाद प्रायः मराठीतच करण्यात येतो. कायद्याबाबतचा युक्तिवाद इंग्रजी व मराठी ह्या दोन्ही भाषांतून होतो. त्यामुळे महाराष्ट्रात वकिली व्यव-

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

साय करणारास मराठीचे ज्ञान असणे आवश्यकच आहे. त्यास दोन्ही भाषा–मराठी व इंग्रजी–व्यावहारिक पातळीवर चांगल्या याव्या लागतील. ह्याकरता व्यावहारिक इंग्रजी व मराठी या अभ्यासाचा अंतर्भाव कायद्याच्या शिक्षणक्रमात व्हायला हवा.

विद्यापीठात इंग्रजी व मराठी भाषांचे विभाग आहेत. त्यात मुख्यतः इंग्रजी किंवा मराठी साहित्याच्या संदर्भात भाषेचा अभ्यास होतो. ह्या विभागांनी ह्या दोन्ही भाषा व्यावहारिक पातळीवर (functional) शिकवण्यासाठी अभ्यासक्रम तयार करावेत. असे अभ्यासक्रम सुरवातीला ऐच्छिक म्हणून द्यावेत व ते पूर्ण करणाऱ्यास त्याबद्दलचे प्रशस्तिपत्रक द्यावे. त्या अभ्यासक्रमाची उपयुक्तता पटल्यावर जास्ती विद्यार्थी तो घेतील व मग त्याचा अंतर्भाव त्या विषयाच्या अभ्यासक्रमात करता येईल. आय्. एल्. एस्. विधि-महाविद्यालयात इंग्रजीचा असा अभ्यासक्रम आमच्या महाविद्यालयाच्या ग्रंथपाल श्रीमती सुनीती वाठ व श्रीमती आशा मुंडले ह्यांनी तयार केला असून तो ऐच्छिक म्हणून कायद्याच्या विद्यार्थ्यांना शिकवण्यात यावयाचा आहे. ह्या उपक्रमाला सुरवातीला हवा तसा प्रतिसाद कदाचित मिळणार नाही. कारण व्यावहारिक इंग्रजी (Functional English) हा प्रकार अजून लोकांच्या परिचयाचा नाही. आपल्याकडे लिटरेचरचा (साहित्य) अजून येवढा प्रभाव आहे, की चांगले इंग्रजी यावयाचे तर ते इंग्रजी लिटरेचरच्या अभ्यासातूनच शक्य आहे असे लोकांना वाटते. भाषाशास्त्रज्ञांनी ह्याबाबत लोकशिक्षण करायला हवे.

कायद्यासंबंधीची मराठी तयार करताना व्यवहारात जे शब्द रूढ झाले आहेत तेच घ्यावे लागतील. तरीदेखील पारिभाषिक शब्द लागतीलच व ते तयार करावे लागतील. ते तयार करताना शक्यतो सोपे शब्द घ्यायला हवेत. कितीही प्रयत्न केले तरी अपरिचित शब्द हे सुरवातीला नकोसे वाटतात, पण कालांतराने ते रूढ होतात. संसद, शासन, विधि ह्या शब्दांवर सुरवातीला खूप टीका झाली, पण आज ते शब्द रुळले आहेत. ह्याचा अर्थ मी कठिण शब्दांचे समर्थन करतो असा कृपा करून घेऊ नये. परंतु कृत्रिमपणा न आणता शोधलेल्या शब्दांना केवळ ते अपरिचित म्हणून विरोध असू नये. महाराष्ट्र शासनाने जो न्याय-व्यवहारकोश तयार केला आहे, तो बहुतांशी उपकारक आहे असे मला वाटते. माझ्या मराठी लेखनात मी त्या कोशाची मदत पुष्कळदा घेतो. पण शेवटी कोशातल्या शब्दांनी भाषा विकसित होत नसते. ती होते तिच्या वापराने. मराठीत कायद्यावर जास्त लेखन व्हायला हवे. शेवटी आपण 'लोकशाही', 'कायद्याचे राज्य' ह्यांचा अनेकदा उच्चार करतो– पण ह्या संकल्पना जर सजीव व्हायच्या असतील, तर कायद्याची संस्कृती (legal culture) निर्माण व्हावी लागते. कायद्याचे ज्ञान सामान्यांपर्यंत नेणे आणि कायद्याला अभिप्रेत असलेली मूल्ये समाजात रुजवणे ह्या दोन मार्गांनी ती संस्कृती निर्माण होईल. आज दुर्दैवाने कायद्यावरील लेखन करायला पुरेशी नियतकालिके नाहीत. व्यावसायिकांनी ह्याकडे दुर्लक्ष केले आहे. आपला धंदा नसून व्यवसाय आहे ह्याचे भान आज फार थोड्या व्यावसायिकांना असल्यामुळेच कायद्यावरील लेखन–इंग्रजी व मराठी–ह्याकडे दुर्लक्ष झालेले आहे. कायदेशिक्षणाची आजची सदोष पद्धत ह्याला फार मोठ्या प्रमाणावर जबाबदार आहे. पूर्णवेळेच्या प्राध्यापकांचा अभाव व जे आहेत त्यांत अध्यापन-अध्यापनाच्या सवयींची उणीव ह्यामुळे कायदेशास्त्रावरील वाङ्मय आपल्याकडे निर्माण झालेले नाही. ह्याला काही थोडे अपवाद आहेत हे खरे; पण ते फार थोडे. शासनाने मराठीत कायद्यावरील लेखन करणाऱ्यांना उत्तेजन द्यायला हवे. तसेच 'समाज प्रबोधन पत्रिका', 'नवभारत' ह्यांसारख्या नियतकालिकांनी ह्या विषयावरचे वाङ्मय प्रसिद्ध करण्याचा अधिक प्रयत्न करायला हवा.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# डॉक्टर आणि अशिक्षित रुग्ण यांचा संवाद

सुभाष पत्की

खेडवळ व्यक्ती म्हटली म्हणजे आपल्या डाळ्यां-पुढे एक अशिक्षित, चालीरीती माहीत नसलेली, बावळट, अस्वच्छ, आणि स्वतःची वेगळी भाषा असलेली व्यक्ती उभी राहते. पण ही समजूत फारशी खरी नाही. आपण शहरी दृष्टिकोणातून त्यांच्याकडे पाहत असतो त्यामुळे अशी समजूत होते. पण आपण त्यांच्या वातावरणात गेलो आणि त्यांच्या सभोव-तालच्या परिस्थितीतून त्यांच्याकडे बघितले, किंवा त्यांच्याशी विचारविनिमय केला तर ही समजूत फारशी खरी नाही हे लक्षात येते.

माझा खेडुतांशी संबंध कुटुंबनियोजनामुळे आला. खेड्यात (खऱ्या अर्थाने खेडे) जाऊन त्यांच्या भाषेत तेथील लोकांना समजेल, रुचेल अशा शब्दांत कुटुंब-नियोजनाची ओळख करून देणे हे एक अवघड काम होऊन बसले होते. तुमच्याबद्दल त्यांना विश्वास निर्माण केल्याखेरीज खेडूत माणूस तुमचं काहीही ऐकायला तयार होत नाही. त्यामुळे त्यांना त्यांच्या इतर अडचणीत वैद्यकीय मदत देणे, व त्याबदल्यात त्यांचा विश्वास संपादन करणे, आणि त्यातून कुटुंब-नियोजनासारखे कार्य करणे एवढी एकच गोष्ट शक्य होती. पण ह्या सर्व गोष्टी करत असताना त्यांची राहण्याची पद्धत, भाषा, चालीरीती वगैरे गोष्टी समजावून घ्याव्या लागल्या. खेडूत हा तुमची पद्धत किंवा भाषा कधी उचलत नाही. त्याकरता तुम्हा-लाच त्यांच्या गोष्टी अवगत कराव्या लागतात.

खेडूत माणसं डॉक्टरकडे कधी एकटी येत नाहीत. नेहमी ५–६ जणांच्या घोळक्याने येतात. कारण डॉक्टरकडे येण्यापूर्वी रुग्णाविषयी काय करायचे याची चर्चा करून त्या घोळक्याने निर्णय घेतलेला असतो. त्या रुग्णाला या निर्णयात फारसा भाग घेऊ दिला जात नाही. आजारी माणसाला काय होत आहे याची माहिती नेहमी तिसराच देत असतो. त्यामुळे आजारी कोण आहे याची नीट चौकशी अगोदर करावी लागते. 'नाव काय ?' असा प्रश्न विचारल्यास तो तिसरा माणूस आपलं नाव सांगून मोकळा होतो.

त्यांच्याशी बोलताना आवाज चढवून बोलावे लागते. 'कोण आजारी आहे ?' असा प्रश्न अगदी सौम्य स्वरात हळुवार शब्दांत विचारल्यास त्यांच्या चेहऱ्यावरची रेषा हलत नाही. 'अरे, कोण आजारी आहे ?' असे दरडावून विचारावे लागते. कारण मोठा आवाज ऐकण्याची त्यांना सवय असते.

डॉक्टरांचे प्रश्न हे जवळ जवळ ठरलेले असतात. कुठली व्यक्ती आजारी आहे, हे ठरल्यानंतर, चौकशी चालू होते. "तुझं वय काय ?" नेहमीचाच प्रश्न जरा जोरात विचारला जातो. सर्व घोळक्याच्या चेहऱ्यावर प्रश्नचिन्ह ! त्यातील म्होरक्या एकदा रुग्णाकडे नजर टाकून "काय, आता डॉक्टर, आम्हाला काय ठावं ? तुम्हीच आपलं कायतरी लिहुनशान टाका" असे एक बचावात्मक उत्तर नेहमी मिळते.

रुग्ण जर खेडूत बाई असेल, आणि असा प्रश्न विचारला तर, "वयाचं काय बघा, बघा बारा पोरं हायती. धाकटं अजुनशान दूध पेतंय" अशा प्रकारची उत्तरं मिळतात. बिचारा डॉक्टर गणित सोडवायला बसतो. धाकटं दूध पितंय म्हणजे त्याचं वय १ ते २ वर्षे. त्या अगोदर ११ पोरं. वर्षाला एक याप्रमाणे कमीतकमी बारा वर्षे. मासिकपाळी यायच्या आत पोरीचं "लगीन झासेलं असतं." पहिली मासिक-पाळी १२ ते १३ व्या वर्षी धरली तर १३ + १२ = २५ असे वयाचे गणित करावे लागते.

आता बाईला मूल नसेल तर 'अजून बाहिर बसली नाय' किंवा 'बाहिर बसून म्हस वर्सं झाली' किंवा 'आता बाहिर बसत नाय' अशा उत्तरांवरून तुम्हाला वयाचा अंदाज बांधावा लागतो. डॉक्टरला

अनुक्रमणिका

मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

गणिताची किती जरूरी आहे हे पुढील उताऱ्यावरून कळेल. 'आत्ता ? वय काय विचारता ? थोरल्या मुलाला चार पोरं झाली.' सर्व वयाचे आडाखे हे पाळी, मुलं, लग्नाला आली, बाहेर बसत नाही, लग्न झाले वगैरे नैसर्गिक गोष्टींशी निगडित असतात. आणि ही सर्व उत्तरे आपापसात विचारविनिमय करून येतात. उत्तर आल्यानंतर सर्व घोळका डोके हलवून त्याला संमती देतो. अशा तऱ्हेने डॉक्टरला आपले परीक्षेतले गणिताचे मार्क आठवायला लावून सर्व घोळका पुढील प्रश्नांची वाट बघतो.

'काय त्रास होतोय ?' पुढचा प्रश्न. थोडा वेळ स्तब्धता. म्होरका उत्तर देतो. 'त्याचं असं हाय की पोटात दुखतंया लई. डाक्टर केलं, म्हस औषदं दिली, पन गुन नाय. शेवट म्हनलं, आता तुमच्यावर उपाय नाय. आन आलो घिउनशान. ते तुमी— आमच्या गावच्या पाटलाची तिसरी पोर, नव्हं का— बरी केली. तिच्या पोटात जसं दुखत होतं— आंग आशी, तसंच पोटात दुखतंया बघा.'

डॉक्टरचं थोडं कौतुक करण्यात त्यांचा हातखंडा असतो. एकदा का डॉक्टर वर चढला की बिलाच्या वेळी त्याला खेचायला त्यांना सोपं जातं.

डॉक्टरला पाटलाची तिसरी पोर आठवली तर ठीक, नाही तर "आर ? तमी वरी केली, आन् तुम्हाला ठाव नाय ?" असा शेरा मारून डॉक्टरला आपल्या स्मरणशक्तीच्या दुबळेपणाची जाणीव करून देतो.

तरी पण डॉक्टर माहिती काढायचा प्रयत्न करतो. "किती दिवस झाले दुखतंय ?" "ह्या गेल्या दिवाळीपासून किंवा दसऱ्याच्या आगोदरच म्हणा, किंवा असतील एक धा दिस पुढं मागं" असे उत्तर येते. किंवा "लई जुनं दुखनं, म्हस वर्स झाली बगा." ह्यातून डॉक्टरला गोळाबेरीज करावी लागते.

"कुठं दुखतंय ?" या प्रश्नाला म्होरक्या रुग्णाकडे तोंड वळवून त्याला दटावतो. "अरे ए ! दाव की, हो म्होरं ! च्या मारी पोटात कुणाच्या दुखतंय ?" असं म्हणून तो रुग्णाला एकदम डॉक्टरजवळ पाठवतो. रुग्ण त्याचं उत्तर बहुधा बोट दाखवून देतो.

"कसं दुखतं ?" पुढचा प्रश्न.

"नळ फुगतो (पोट फुगतं) आन् गोळा फिरल्या गत दुखतं. (पोटात जोरात आवाज येतात). वरचा श्वास वर अन् खालचा खाली. (पोट फुगल्यामुळे श्वास घ्यायला त्रास होतो) काटं रुतल्यागत दुखतं. (काटा टोचल्यासारखं दुखतं) वाडुळ माशावानी तडफड व्हती. (कळा येतात)"

किंवा

"कसं दुखतं, काय विचारता ? दुखलं की काय सुदरत नाय. (कळा सहन करण्यापलीकडे असतात) ग्वाड दुखतं (सौम्य). पाय कापत्यात (अशक्तपणा वाटतो)."

असे दुखण्यांचे अनेक प्रकारे केलेले वर्णन ऐकल्यानंतर पेशंट तपासायला घ्यावा लागतो. डॉक्टर पेशंटला कसं तपासतो याची सर्व लोक नीट पाहणी करतात. कित्येक वेळा 'डॉक्टरसाहिब, कानाला नळी लावून छाती नाय तपासली ? पोटाला हात नाय लावला ? वाईच जीब बघा, नाडी नाय बगितली ?" वगैरे सूचना डॉक्टरला देऊन त्याला त्याच्या कामाची जाणीव देतात.

तपासताना 'दुखलं की सांग' अशी सक्त ताकीद रुग्णाला द्यावी लागते. नाही तर "डॉक्टरांनी तपासताना थोडं दुखायचंच" असं समजून खेडूत रुग्ण तक्रार करत नाही. ह्या गोष्टीची जाणीव मला एकदा एक ऑपरेशन करताना झाली. भूल देणाऱ्या डॉक्टरने पाठीत इंजेक्शन देऊन पेशंट ऑपरेशनला तयार असल्याचे सांगितले.

ऑपरेशन चालू करण्यापूर्वी भूल आली की नाही हे पाहण्याकरता मी चाचणी घेतली. पेशंट हालत होता. पण शस्त्रक्रियेच्या हत्यारांनी त्याला दुखत नव्हतं. शेवटी न राहून त्याला विचारले "काय दुखतंय का ?" तेव्हा पेशंट म्हणाला, "दादा, दुखतंय की, पण म्हटलं आता ऑपरेशन करायचं तर दुखायचंच की हो, म्हणून गप्प बसलो."

म्हणजे त्या दिवशी भूल आली नसताच ऑपरेशन करावे लागले असते. म्हणून, 'दुखलं की सांग' असे असे अगोदर सांगावे लागते.

रोगाचे सर्वसाधारण निदान व उपचाराची पद्धत सांगितली, की सार्वजनिक चर्चा करूनच भग डॉक्ट-






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

रला प्रश्न विचारले जातात. ही बहुधा डॉक्टरांची उलटतपासणी असते.

"नीट परीक्षा झाली का ? का अजून काही फोटू वगैरे काढायचाय ? रगत वगैरे तपासून घ्या." पेशंट गरीब असल्याने त्याला खर्च होऊ नये असे वाटून डॉक्टर काही करायचं टाळत असेल, तर तशी सोय नसते. काही वेळेला दुसऱ्या डॉक्टरांचे इलाज, विचार आपल्याला ऐकवले जातात.

"तुमि छाती खराब म्हनता, तर त्यो डाक्टर म्हनतो पोट खराब झालंय. त्या अगुदर आमचा डाक्टर म्हनतुया की किडनी ट्रबल हाय. तर मग आता हाय तरी काय ?" असा एक डॉक्टरला दरदरून घाम आणणारा सवाल येतो. डॉक्टर आपल्या वैयक्तिक निदानपद्धतीला मनातल्या मनात शिव्या वाहतो.

शेवटी काय करायचं हे ठरल्यावर पैशाचा प्रश्न यतो. गरिबी उफाळून येते. वेगवेगळ्या फिया मांडल्या जातात. ह्या रस्सीखेचीत बहुधा खेडूत रुग्णच जिंकतो.

"बरं केलं, आता तुमचे उपकार जन्मभर विसरणार नाही." असे सांगून बहुधा खेडूत कायमचाच गायब होतो.

ह्या सर्व गोष्टींवरून खेडुतांची भाषा ही सुशिक्षितांनी शिकावयास पाहिजे, ह्या गोष्टीची जाणीव ठेवणे जरूर आहे आणि ही भाषा विद्यापीठात न शिकवता शिकणाऱ्यास खेडेगावातच मुक्काम ठोकणे जरूर आहे. पण सरपंचाकडे नको, कारण त्याची भाषा याहूनही वेगळी आहे.

---

प्राज्ञ प्रकाशन

महाराष्ट्र शासनाचा १९७७-७८ चा पुरस्कार लाभलेला

❀ समीक्षा ग्रंथ ❀

आनंदाचा डोह

– तुकारामाच्या अभंगवाणीचे रसिकावलोकन करणारा मराठीतील अनन्यसाधारण ग्रंथ

लेखक : प्रा. रा. ग. जाधव

मूल्य : रु. ८–००

मागणी : कार्यवाह, प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई – ४१२८०३

( जि० सातारा )

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कारखान्याच्या आवारातील भाषेचा विचार करू लागलो की, एक गोष्ट प्रकर्षाने जाणवते ती म्हणजे इंग्रजी भाषेचे जबरदस्त वर्चस्व.

नावापासून सुरुवात करुया. बहुसंख्य कारखाने इंग्रजी नावे धारण करून आहेत. अगदी कामगार संघटनादेखील इंग्रजी नावे घेऊनच वावरतात. महाराष्ट्र शासनाशी संबंधित कारखाने भाषांतरित नावे धारण करतात. महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, शासकीय मुद्रणालय वगैरे. ग्रामीण भागात मात्र नावांचेबाबत साखर कारखान्यांनी आपले मराठीपण टिकवले आहे.

कारखान्याच्या आत डोकावलो तर, आढळले की, सर्व विभाग इंग्रजीतूनच ओळखले जातात. अॅडमिनीस्ट्रेशन, वर्कशॉप, फाऊंड्री, सिक्युरिटी. कारखान्यांचे स्वरूपाप्रमाणे त्यात थोडाफार बदल. पदाधिकाऱ्यांचे हुद्दे इंग्रजीतच. कुठे मॅनेजिंग डायरेक्टर, तर कुठे जनरल मॅनेजर, चीफ एक्झीक्युटिव्ह ऑफिसर, वापर होत नाही व इतर ठिकाणी नावे दुर्बोध असल्याने ती प्रचारात येत नाहीत.

आपण प्रत्यक्ष उत्पादनप्रक्रियेकडे वळलो म्हणजे इंग्रजीचा प्रभाव फारच जाणवतो. यंत्रसामग्री, सुटे भाग इत्यादी, अवजारे, उत्पादित माल यांची ओळख इंग्रजीतूनच होते. सर्व प्रमुख प्रक्रिया इंग्रजीतूनच. वेल्डिंग, मोल्डिंग, फिटिंग, शेपिंग, प्रेसिंग, ड्रिलिंग, बोअरिंग आणि अनेक उत्पादनाशी निगडित सर्व विभाग– खरेदी, विक्री, उत्पादन इत्यादी– इंग्रजी शब्द आणि भाषेचा वापर करूनच व्यवहार करतात. वरिष्ठ व्यवस्थापकीय अधिकारी तर अभावानेच मराठीचा वापर करतात. कामगारांना सूचना देताना इंग्रजी शब्द वापरूनच त्या द्याव्या लागतात. एखाद्याला "व्ही टी सिक्स फॅन कॉइल फिट कर" किंवा " सिलेंडरला बॅक हेड बसव " असे बोलावे लागते. संरक्षण खात्यामधील अगदी अशिक्षित कामगारालासुद्धा कामासंबंधी सूचना देताना "overhead tank leaking due to long use and

# कारखान्याच्या आवारातील भाषा

वि. नि. पेंडसे

डिव्हिजनल कंट्रोलर, चीफ इंजिनियर. निरनिराळ्या थरांपासून तो थेट कामगारांपावेतो नावे इंग्रजीतच आढळतात. साखरकारखान्यातील एखादा कामगार त्याला उच्चारावयास कठीण 'सेंट्रीफ्युगल मेट' या शब्दांत आपली ओळख करून देईल. रेल्वेमध्ये अॅब्रिव्हेशन्स वापरतात. एखादा सी. अँड डब्ल्यू. डी. मध्ये काम करतो तर दुसरा एम. एल. आय. ओ. मध्ये. अधिक विचारले की कळते, की तो कॅरेज अँड वॅगन खात्यात असून दुसरा मेकॅनिकल लोको इन्स्पेक्टर ऑफिसमध्ये आहे.

काही कारखान्यांतून ( विशेषतः शासकीय ) विभाग, हुद्दे इत्यादींचे हिंदीकरण, मराठीकरण केलेले आढळते. परंतु त्याचा वापर होत नसल्याने ते पाट्यांपुरते मर्यादित राहते. खरे तर राज्य परिवहन खात्यात अतिशय अन्वर्थक नावे देण्यात आली आहेत. डेपो मॅनेजर– आगार व्यवस्थापक, ट्रॅफिक कंट्रोलर –वाहतूक नियंत्रक, ट्रेंड आर्टिझन– प्रमुख कारागीर, ड्रायव्हर – चालक, कंडक्टर – वाहक. पण त्यांचा unservicabilty. Bidg No 2 B, 2nd floor," अशी दिली जाते. गंमत म्हणजे हा कामगार त्या इमारतीत जातो, काय लागणार याचा अंदाज घेतो. त्याच्या वरिष्ठांकडे जाऊन लागणाऱ्या वस्तूंची नावे लिहून घेतो, स्टोअरमध्ये जाऊन प्राप्त करतो व काम हातावेगळे करतो.

कामगारांना विचारले असता साधारणतः सवयीमुळे काम जमते असे उत्तर मिळते. कामगारांचे तांत्रिक ज्ञान वाढविण्याची सोय नसल्याने व ते ज्ञान इंग्रजीतूनच देता येत असल्याने कार्यक्षमता वाढण्यास मदत होत नाही.

आज जवळ जवळ सर्व तंत्रज्ञान इंग्रजीतूनच उपलब्ध आहे. इंजिनियरींग कॉलेजपासून औद्योगिक प्रशिक्षण संस्थापावेतो शिक्षण इंग्रजीतूनच दिले जाते. कारखान्याची उभारणी, ले-आऊटपासून त्याच्या व्यवस्थापनापावेतो सर्व विद्याशाखा आज इंग्रजीतून चालताहेत. साहजिकच त्याचा परिणाम कारखान्याच्या भाषेवर होणारच. हिंदुस्थान अँटि-

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बायोटिक्स कारखान्याचे ग्रंथालय अतिशय संपन्न आहे. पुस्तकांव्यतिरिक्त जवळ जवळ ४०० जर्नल्स येतात, पण ती सर्व इंग्रजीतूनच. काही कारखान्यांतून प्रशिक्षण केंद्रेही आहेत. एक तर प्रशिक्षण म्हटले म्हणजे ते अधिकारीवर्गासाठी अशी समजूत असल्याने ते त्यांचेसाठीच अभ्यासक्रम आयोजित करतात. तेही इंग्रजीतूनच. कामगारांसाठी प्रशिक्षण, अभ्यासक्रम फारच थोडे. क्वचित माध्यम मराठी, पण तंत्रज्ञानविषयक माहितीसाठी इंग्रजीचा आधार आहेच.

उत्पादनविषयक तांत्रिक भाषेचा प्रश्न देशाचे पातळीवर, ठराविक धोरण आखून सोडवावयाचा असल्याने एकवेळ बाजूला ठेवला, तरी कारखान्यातील सर्वसाधारण पत्रव्यवहार हादेखील इंग्रजीतून चालताना दिसतो. महाराष्ट्र शासनाचे अंतर्गत कारखान्यांतून कनिष्ठ पातळीवर पत्रव्यवहार, कागदपत्रे मराठीतून; पण वरिष्ठ कार्यालयातून परिपत्रक, आदेश, पत्रव्यवहार हा अजूनही इंग्रजीतून होतो.

महाराष्ट्रात कारखान्याचे उत्पादनकार्यात गुंतलेले बहुसंख्य कामगार हे मराठीभाषिक आहेत. त्यांचा दैनंदिन संबंध ज्या बाबींशी येतो, त्या मराठीतून असाव्यात ही रास्त अपेक्षा पूर्ण होताना दिसत नाही. रोज कामावर जाताना जे कार्ड पंच करावे लागते, ते इंग्रजीच; वेतनपत्रिका इंग्रजीतून, रजेचे रेकॉर्डदेखील इंग्रजीतूनच. कामगारांचे दृष्टीने रजा, गैरहजेरी, गैरवर्तन, शिक्षा, अन्यायनिवारण यासाठी महत्त्वाचा कायदा म्हणजे " स्टँडिंग ऑर्डर्स ॲक्ट ". वास्तविक कायद्यातील तरतुदीनुसार या कायद्यांचे संक्षेपात भाषांतर सर्वांना कळेल अशा भाषेत प्रदर्शित करावे ही अपेक्षा; पण याचा अभावानेच अंमल होतो. या कायद्यातील कलमांचा आधार घेऊन कामगारांना त्यांच्या गैरकृत्यांबद्दल इंग्रजीतूनच जाब विचारला जातो व त्यांनी समाधानकारक खुलासा करावा अशी अपेक्षा असते.

संरक्षणखात्यातून अत्यंत तपशीलवार 'डेली ऑर्डर' इंग्रजीतून प्रसिद्ध होतो. त्याचे प्रसिद्धीकरण असे होते. एखादी व्यक्ती मृत झाल्यास तिच्या जवळील नातेवाइकास शोकसंदेश मात्र हिंदीतून पाठविला जातो.



या स्टँडिंग ऑर्डर्सचे मराठी भाषांतर करून त्याच्या लहान पुस्तिका काही कारखान्यांतून दिल्या जातात. तसेच आरोपपत्र, चौकशी इत्यादीही काही ठिकाणी मराठीतून होते. राज्यपरिवहन, साखर कारखाने, नगरपालिका या ठिकाणी पगारचिठ्ठी-पत्रके मराठीतून आहेत. रजा, कर्ज यांचे अर्ज, त्यांची उत्तरे मराठीतून उपलब्ध आहेत. खाजगी कारखान्यांतूनही या पद्धतीचा हळूहळू अवलंब होत आहे.

कारखान्याचे आवारात लहानसहान प्रश्नांपासून ते महत्त्वाच्या बाबी सोडविण्याचे कार्य, कामगार संघटनांचे. संघटनांच्या प्रतिनिधींशी वाटाघाटी करण्याची पद्धत आता बरीच रूढ आहे. याशिवाय उपहारगृह, सुरक्षा, कल्याणकारी योजना इत्यादी-साठी अनेक समित्या आहेत. चर्चा साधारणतः मराठीतून होते, परंतु त्याचे इतिवृत्त इंग्रजीतून. हे आजही आपण पाहतो. संघटनांशी केलेले करार तर इंग्रजीतूनच. याही बाबतीत काही कारखान्यांतून कराराचे मराठीत भाषांतर केले जात आहे. त्यात इंग्रजी शब्दांची खूप रेलचेल आढळते.

कायद्याने कामगाराला संरक्षण आणि हक्क प्राप्त करून दिले आहेत. पण एक तर ते मुळात इंग्रजीत असतात व त्याची भाषांतरे मूळ कायद्यापेक्षाही किचकट असतात.

'वेतन' याचा कायद्याप्रमाणे अर्थ असा : 'वेतन' या संज्ञेचा अर्थ पैशाच्या स्वरूपातील दर्शविण्यात आले ते किंवा अशा रीतीने दर्शविता येण्याजोगे जे कोणतेही पारिश्रमिक, नोकरीच्या स्पष्ट किंवा गर्भित शर्ती पूर्ण करण्यात आल्या असता, कामावर लावलेल्या इसमास त्याच्या नोकरीबद्दल किंवा अशी नोकरी करीत असताना केलेल्या कामाबद्दल देण्याजोगे झाले असते असे.

याचा नेमका अर्थ लावून न्यायालयापावेतो जाण्याकरिता सर्वसामान्य कामगाराला वकीलाचे मदतीवर किंवा कायद्याचे ज्ञान असलेल्या कार्यकर्त्यावर अवलंबून राहवे लागते.

कायद्याप्रमाणे मिळणारे लाभ, भविष्य निर्वाह निधी, राज्य कर्मचारी योजनेअंतर्गत मिळणारी वैद्यकीय मदत, ग्रॅच्युईटी यासाठी अनेक गुंतागुंतीचे फॉर्म्स आहेत. त्यांचे मराठीकरण करण्यात आले

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे, पण ते भरतानादेखील कामगाराला जडच जाते.

कारखान्यातील इंग्रजी आणि मराठी भाषे-व्यतिरिक्त एक आणखी भाषा असते, ती म्हणजे तणावाची भाषा. अविश्वास, गैरसमज यावरोबर कामाबद्दल असमाधान, असुरक्षितता, आर्थिक अपेक्षा यामुळे तो गुंतागुंतीची झाली असते. औद्योगिक संबंधाच्या क्षेत्रात या भाषेला फार महत्त्व आहे. या ठिकाणी भाषा हे माध्यम थिटे पडते. म्हणूनच कामगार आणि त्याच्या संघटना जे साधू शकतात, वरिष्ठ पातळीवरील व्यवस्थापकीय वर्ग जे आपसात साधू शकतो, ते नेमके दोन गटांत साधले जात नाही.

हा संवाद साधण्याचा अल्पसा प्रयत्न म्हणून काही कारखान्यांतून निरनिराळ्या कल्याणकारी योजना, प्रसिद्धीपत्रके, हाऊस मॅगेझिन्स प्रसिद्ध केली जातात व तीही शक्यतो मराठीतून. कामगारांशी हितगुज करण्याचा प्रयत्न यांतून केला जातो.

कामगारसंघटना कामगारांसाठी म्हणून मराठी-तून प्रचंड साहित्य निर्माण करतात. साप्ताहिके, मासिके, मुखपत्रे, प्रचारपत्रके, शैक्षणिक साहित्य वगैरे. त्या मानाने व्यवस्थापकांकडून निर्मित मराठी भाषेतील साहित्य फारच थोडे असते. उत्पादकता मंडळ व विशेषत: केंद्रीय कामगार शिक्षण मंडळाने कामगारांना मराठी माध्यमातून शिक्षण देण्या-व्यतिरिक्त सोपे व फार चांगले साहित्य निर्माण केले आहे.

कारखान्याच्या आवारातील भाषेचा वरील विवेकाचे आधारावर विचार करू लागलो, की लक्षात येते की मराठी भाषा फक्त बोलण्याकरिता, पण संबंधित व्यवहार संपूर्ण इंग्रजीतून. हा इंग्रजीचा प्रभाव कमी व्हावा या दृष्टीने थोडे प्रयत्न होत असले, तरी ते फारच अत्यल्प आहेत हे खटकलेच.

---

'प्राज्ञ' प्रकाशन :

**ज्ञानदेव चिंतन**

संपादक :

**डॉ० वसंत स० जोशी**

प्रस्तावना :

तर्कतीर्थ **लक्ष्मणशास्त्री जोशी**

मूल्य वीस रुपये.

लिहा :

**चिटणीस, प्राज्ञ पाठशाळामंडळ, वाई.**

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# जाहिरातव्यवहार आणि मराठी

र. कृ. जोशी

जाहिरातक्षेत्राच्या व्यवहारात मराठीचा वापर जरुरीपुरता होतो व तो अल्पस्वरूपाचा असतो. जाहिरातक्षेत्रात मराठी ही भाषा दहाजणींमधली एक असल्याने व या क्षेत्रातला बराचसा अधिकारीवर्ग बिगरमहाराष्ट्रीयन असल्याने दैनंदिन व्यवहारात मराठीचा वापर फक्त मराठी मनाच्या महाराष्ट्रीयनापुरताच मर्यादित राहतो. त्यातही परिभाषेची अडचण येतेच.

काही दिवसांपूर्वी माझ्याच कलाविभागात दोन महाराष्ट्रीय कलाकारांमधील एक संवाद ऐकला तो असा :–

प्रश्न : त्या फिनिश्ड आर्टवर्कवर डायरेक्ट रिडक्शन मार्क केलंय का ?

उत्तर : हो, रिडक्शन साइजही मार्क केलीय.

यावेळी मी नेमका डॉ. प्र. चि. शेजवलकरांचा 'व्यापार–उद्योग आणि मराठी' हा निबंध वाचीत होतो आणि त्यात म्हटल्याप्रमाणे 'उद्योग किंवा व्यापार करताना संभाषण करण्यापेक्षा व्यापाऱ्यांचे लक्ष व्यवहाराकडे असते' (पृ. ४ व ५). तसे या दोन कलाकारांचे होते. शब्दांचे अवडंबर त्यांनी केले नाही. लवकरात लवकर दुसऱ्याशी संज्ञापन करावयाचे असल्यामुळे हुकमी शब्द त्यांनी वापरले. दोघांना अर्थबोध झाला, पारंपरिक भाषिक व्यवस्थेचे भान न ठेवूनही.

म्हणजे एका वाक्यात ५ इंग्रजी शब्द व ३ मराठी असे काहीतरी. कर्ता मराठी, कर्म इंग्रजी तर त्यावर सप्तमीचा प्रत्यय मराठीचा वगैरे वगैरे...

कोड मिक्सिंगचा हा प्रकार द्विभाषिक व्यवहारात स्वाभाविक प्रक्रियेचा एक भाग म्हणून मानावा असा एक भाषाशास्त्रीय विचार पुढे येत आहे. तेव्हा अशा पद्धतीची अभिव्यक्ती व्यावहारिक मराठीत मान्य पावणार आहे का, हा खरा प्रश्न आहे.

वर उल्लेखलेल्या संवादासाठी आवश्यक ते मराठी पारिभाषिक शब्द तयार करणे, त्यासाठी कलाव्यवहारातील स्वाभाविक प्रक्रियांचा शोध घेणे, असे तयार झालेले शब्द वापरण्याचा आग्रह धरणे व ते न वापरले गेले तर ते वापरले जावेत यासाठी योग्यशा तात्त्विक बैठकीचा आधार घेणे, ही दुसरी बाजू झाली. या दुसऱ्या बाजूने जाहिरातक्षेत्रात अजून प्रवेश करावयाचा आहे.

संशोधन, अध्ययन, अध्यापनाच्या व्यवस्थेद्वारा हे कार्य होण्याची शक्यता जास्त आहे. कारण (संज्ञापन) संदेशवहन संदर्भात रोजच्या तोंडी व्यवहारात तरी भाषिक व्यवस्थेचे भान ठेवण्याची गरज वा तद्‌विषयक वाटावी अशी खंत आज जाहिरातसंस्थांतून आढळत नाही. जाहिरातसंस्था ते व्यापारउद्योगसंस्था किंवा उत्पादक ते वितरक यांच्यामधील तोंडी व्यवहारासाठी मराठीच्या वापरावर साहजिकच मर्यादा असतात. याचे कारण विविधभाषी अधिकारवर्गाचे संविधानमान्य अस्तित्व व त्यांच्याशी ठायी ठायी येणारे संबंध हे होय. अगदी महाराष्ट्रातसुद्धा.

इथे मराठीच्या प्रसार–वापराचा प्रश्न नाही. व्यापार–व्यवहार सोईचा, कार्यक्षम व तात्काळ समृद्धीचा कसा होईल याचीच चिंता उद्योगपती व व्यापारी मंडळींना असणार हे स्वाभाविक आहे. अगदी महाराष्ट्रीय उद्योगपतींनासुद्धा.

सारांश : व्यापार, उद्योगाशी निगडीत असलेल्या जाहिरातक्षेत्रातल्या तोंडी व्यवहारांत व्यावहारिक

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मराठीचा वापर मर्यादित प्रमाणात द्विभाषिक स्वरूपाचा व प्रचलित अंगाचा असतो याचे हे त्रोटक विवेचन झाले.

जाहिरातक्षेत्रात पत्रव्यवहार किंवा इतर कागदपत्रासाठी मराठी लेखन अत्यल्प असण्याची कारणेही वरील विवेचनात सापडतील. तथापि जाहिरातीत प्रसिद्ध होणाऱ्या मजकुराचे लेखन–म्हणजेच जाहिरातलेखन या संदर्भात मराठी भाषेचा उपयोग जाहिरातसंस्थांना करावाच लागतो, ही तरी ज़मेची बाजू धरून त्याविषयक गरजा, मागणी व पूर्ती यासंबंधी थोडेसे विवेचन अशाप्रमाणे.

मराठीतील जाहिरातलेखन चार प्रकारांत मोडते.

१) भाषांतरित, २) स्वैर भाषांतरित, ३) स्वतंत्र, ४) नैमित्तिक.

### १) भाषांतरित :

इंग्रजी, हिन्दी वा अन्य भारतीय भाषांतरित मजकुरांचे शब्दशः भाषांतर केलेली मराठी. अशा मराठीत कित्येक वेळा कृत्रिम वाक्यरचना ( १ अ ) भाषांतरित न झालेले दुसऱ्या भाषेतील शब्द ( १ आ ) व त्यामुळे अस्सलपणाचा अभाव इत्यादी गोष्टी आढळतात. सोईस्कर, बिनधोक्याची, कमी खर्चात व कमी वेळेत तयार झालेली, पण बव्हंशी वाचताना खटकणारी ( १ इ ), मनाचा ठाव न घेणारी अशी मराठी (१ ई). राष्ट्रीय पातळीवरून जाहिरातीतील संदेशयोजना सर्वत्र व एकसारखी करावयाची झाल्यास काहीही आवश्यक. तांत्रिकविषयक जाहिरातीच्या संदर्भात तर ती अधिकच आवश्यक असते.

नमुने : १ अ – उघडीत आहे आज

१ आ – मान्य रिटेक केंद्र

१ इ – सुरक्षितता जेव्हा एकाच कुलुपावर अवलंबून असते तेव्हा भरवशाचे एक कुलूप

१ ई – हँडलूम हाऊसतर्फे सणासुदीच्या अभिष्टचिंतनासहित २० टक्के सूट सर्व वस्तूंवर :

### २) स्वैर भाषांतरित :

इंग्रजी, हिन्दी वा अन्यभाषेतील मजकुराच्या आधारे पण कल्पनासाहचर्यतत्त्वावर रूपांतरित झालेली मराठी. अशा पद्धतीत, राष्ट्रीय पातळीवरील जाहिरातीतील संदेशरचना एकसूत्रात बांधली गेली असली तरी, प्रत्येक भाषेत तिचे रूप भाषापरत्वे बदलत असल्याने त्या त्या भाषिकांना ती जवळची वाटून, मूलसूत्र अधिक प्रकर्षाने गवसण्याचा संभव जास्त असतो. अशा मराठीत मूळ कल्पनेशी प्रामाणिक राहूनही मराठी वाचकाला रुचतील असे शब्दविशेष, जाणवतील अशी विशेषणे, पटतील असे वाक्यप्रयोग किंवा म्हणी (२ अ, २ आ) इ. वापरण्यात आलेली असतात. सर्व भाषांतील संदेशासाठी वापरावयाचे मूलसूत्र न गमवण्याचे व तरीही त्यात 'मराठी' रूप ओतण्याचे अवघड व वेळप्रसंगी थोडेफार धोक्याचे काम भाषांतरकाराला करावे लागते व ते करताना स्थल, काल व व्यय यांच्या मर्यादा पाळाव्या लागतात.

विविध विषयांच्या जाहिरातीसाठी ही पद्धत अधिक परिणामकारक व पूर्ण व्यावहारिक स्वरूपाची असल्याने त्याविषयी अधिक अभ्यास, संशोधन व योग्य पात्रतेच्या द्विभाषिक मराठी मनुष्यबळाचा पुरवठा शैक्षणिक क्षेत्रातून होणे जरुरीचे आहे.

२ अ) पावसाळ्यात :

खोलीला बंदिस्त कोठडीचे स्वरूप येते
खिडकी उघडली की, शॉवर बाथ
नाहीतर उकाड्याने जीव जातो.

२ आ) नको घोडा नको गाडी आम्हाला
आपली सायकल बरी पण सिएट
टायरची जोडी मागेपुढे हवीचहवी,
सायकल की सवारी न घोडा न गाडी
सिएटके टायर अगाडी और पिछाडी

२ इ) बँक ऑफ इंडियाकडे राईचा पर्वत करण्याची योजना आहे.
(दिशाभूल करणारे स्वैर भाषांतर)

### ३) स्वतंत्र :

दुसऱ्या कोणत्याही भाषेचा आधार न घेता एखाद्या जाहिरातयोजनेसाठी स्वतंत्रपणे लिहिलेली मराठी. अशा मराठीत मूळ कल्पना व तिच्या विस्ताराची विचारसाखळी मराठी भाषेतून घडत असते. अशी मराठी कृत्रिम वाटण्याचा वा अर्थबोधात थिटी पडण्याचा संभव कमी. अशा मराठीत मराठी मनाला









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भिडतील असे विचार, जाणवतील अशा बोधकल्पना, ओतप्रोत भरलेला अस्सलपणा, अनुभवलेले सांस्कृतिक, भौगोलिक संदर्भ इत्यादी गोष्टी आढळतात. यामुळे मराठी वाचकाशी अधिक जवळीक साधली जाऊन संदेशवहनाचा हेतू साध्य होतो. त्याबरोबर माल किंवा सेवेविषयी विधायक वृत्तीही निर्माण होण्यास मदत मिळते.

महाराष्ट्रासाठीच खास व स्वतंत्र जाहिरातयोजना करावयाची असेल तर अशा पद्धतीने मराठी लेखन जास्त योग्य ठरते.

अन्यथा अतिखर्चिक, संपूर्ण विचारांनिशी न योजल्यास धोकादायक पण अतिशय परिणामकारक अशा या जाहिरातलेखनासाठी जाहिरातलेखनाची जबाबदारी ओळखणारी व एखादा अस्सल मुद्दा वेळप्रसंगी दुसऱ्या भाषेतून पटवून द्यायची तयारी असलेली मराठी माणसे, वेळेवर सर्व ताकदीनिशी उपस्थित हवीत.

३ अ ) नेरोलॅक रंगाच्या जाहिराती—
डावीकडील फिक्की हिरवी चटणी
उजवीकडील गडद तपकिरी वांग्याची भाजी,
सोनेरी मुकुट, लाल गंधाचा टिळा,
शेंदरी सोंड डावी
सरस्वतीबाईंना जरा हं म्हणा, की तीन गोष्टींची अघळपघळ चर्चा करण्यात दिवस बुडालाच म्हणून समजा.

३ आ) नाच ग घुमा– स्टेट बँक ऑफ इंडिया.

३ इ ) बेडेकर मसाले.
सांगली बँक, युनायटेड वेस्टर्न बँक इत्यादींच्या काही मराठी जाहिराती इत्यादी.

## ४ ) नैमित्तिक :

हवे नको, सापडला, मेला, दिवाळी, दसरा, त्वरा करा, सहल, प्रदर्शन, नाटक, सिनेमा इत्यादींच्या नैमित्तिक संदेशवहनासाठी, वापरलेली मराठी. या सर्वांमध्ये तातडीची छाप सर्वतोपरी पाडण्यासाठी आकर्षक, बऱ्याच वेळा चुकीची तथापि परिणामकारक विशेषणे ( ४ अ ), त्या त्या विषयातील काही तांत्रिक उल्लेख ( ४ आ), उत्कंठा वाढवण्यासाठी सोडून दिलेली तुटक वाक्ये... ( ४ इ ) इत्यादींची रेलचेल असते. अल्पवेळ टिकणाऱ्या अशा जाहिरातींसाठी झटकेबाज लेखन करण्याची एक खास शैली असते. अशा मराठीमध्ये विषयपरत्वे द्विभाषिक शब्द सुखरूप वसवले व पचवलेही जातात.

४ अ ) कडक रोमान्स—
दिलखेचक नृत्ये :
प्रेम, तिरस्कार व अनेक चुका यांच्या कात्रीत सापडलेल्या एका तरुण माणसाची जोरदार कथा.

४ आ ) उत्तम साहसदृश्ये आणि तीदेखील ' डमी उमेदवार ' न वापरता. आजच्या स्किमा ता. २–१–८० बुध. ५ टोटलचे ठीक सातवे हप्ते बुध वलो. १ आहे. एकच खुलता सिंगल रामबाण, मनाचे डायरीत नोट करा.

४ इ ) रॉक्सी मुंबईची द्वारकामाई बनली इत्यादी.

या चारही प्रकारांत आढळून येणारे मराठी अस्सलपणाच्या कमीजास्त पातळीवर वावरत असते. जाहिरातलेखनामध्ये वापरलेल्या काही प्रभावी तंत्रामुळे विक्री किंवा सेवाव्यवहार घडवून आणण्यास मदत होते. अशा दृष्टीने वाङ्मयीन लेखनापेक्षा त्यावर जबाबदारी अधिक असते. स्थल, काल, व्यय व अन्य तांत्रिक मर्यादा त्यावर पडलेल्या असतात. तारेवरची ही कसरत या व्यावसायिक क्षेत्रात मराठी भाषेच्या बाबतही अधिकउण्या गुणवत्तेनुसार घडते आहे.

जाहिरातक्षेत्रात व्यावहारिक मराठीचा उपयोग या संदर्भात सारांशरूपाने खालील मुद्दे मांडता येतील.

१) मराठीतील जाहिरातलेखनासाठी भाषांतरित, स्वैर भाषांतरित, स्वतंत्र, नैमित्तिक अशा चारही पद्धती जरुरीप्रमाणे स्वीकाराव्या लागतील. त्यामुळे विविध प्रकारच्या जाहिरातींतील मराठीसाठी एकच कसोटी लावता येणार नाही.

२) तांत्रिक स्वरूपाच्या जाहिरातीतील मराठी अन्यभाषीय शब्दांनी भरलेले आहे. त्यासाठी हुकमी, हमखास संदेश देणारे पर्यायी मराठी शब्द त्या त्या क्षेत्रात प्रथम वापरले गेले पाहिजेत तर ते जाहिरातलेखनात येतील.

३) स्वैर भाषांतरित व स्वतंत्र मराठी लेखनासाठी योग्य पात्रतेचे मनुष्यबळ तातडीने हवे आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अध्ययन, अध्यापनात याची नोंद होणे आवश्यक आहे.

४) जाहिरातयोजनेमध्ये महाराष्ट्रीय कारखानदार उद्योगपतींनी महाराष्ट्रासाठी स्वतंत्र मराठीतील जाहिरातीसाठी आग्रह धरला पाहिजे.

५) जाहिरातक्षेत्रात मराठी भाषेचा योग्य तो व अधिक वापर ही बाब केवळ भाषिक मर्यादेत बसणारी नसून तिला विविध व्यावहारिक संदर्भ प्राप्त झाले आहेत. मराठी वापरून झालेला व्यवहार सुलभ, तातडीचा व कार्यक्षम होण्यासाठी मिश्र ( मिसळ हा शब्द बरा वाटतो ) मराठीचा उपयोग केला जात आहे. याला व्यावहारिक मराठी म्हणावयाचे काय ? अशा मराठीमुळे भाषिक क्षमता वाढणार आहे की कमी होणार आहे ?

६) भाषेच्या तोंडी व्यवहाराबरोबर लेखी व्यवहाराचाही अधिक वापर अपेक्षित असला, तर मराठीसाठी वापरल्या जाणाऱ्या देवनागरी लिपीचा संदर्भ आपणांस टाळता येणार नाही. भाषाशास्त्राने लिपीच्या लेखी अंगाविषयी दाखवलेली उदासीनता व्यापक लेखनव्यवहाराला पूरक ठरणार नाही. शिवाय भाषेचा ऐकू येणारा सहज तोंडवळा (मुखडा) व शिष्टता पांघरून अवतरणारे तिचे लिखित रूप यामधील परिणामांचे मूल्यमापन मराठीच्या संदर्भात करणे आवश्यक आहे.

आणि शेवटी ...... माणूस मराठी असतो
मराठी भाषा बोलतो
पण त्याचं मन मराठी नसतं
अशा मराठी भाषेचा उपयोग काय ?
माणूस मराठी असतो मराठी भाषा बोलतो
दुसऱ्या भाषांवर प्रभुत्व मिळवतो
त्यांच्या तौलनिक अभ्यासातून
मराठी कल्पनाविचारांचा
प्रखर शोध-बोध घेतो
ते दुसऱ्यांना समर्थपणे पटवून देतो
आपलं अस्सल मराठी मन शोषून ठेवतो
त्याच्या मराठीचा व्यवहारात
अधिक उपयोग होईल.

एकभाषाप्रभुत्व मराठी वाङ्मयाच्या निर्मिती-प्रसारसंबंधात आवश्यक, भारतीय एकात्मतेच्या संदर्भात अपुरे व जाहिरातक्षेत्राच्या व्यवहाराला मर्यादा घालणारे ठरेल. जाहिरातलेखन-व्यवहारात 'अधिक' मराठीच्या सुदृढ वापर-विस्तारासाठी द्विभाषिक पथ्यांची आज गरज आहे. या मागणीची पूर्तता आपण करणार आहोत का ?

---

**प्राज्ञ प्रकाशन**

शिवाजी विद्यापीठाचा पाचशे रुपयांचा पुरस्कार लाभलेला ग्रंथ
प्राचीन मराठी साहित्यावरील संशोधनपर विविध लेखांचा संग्रह

**संशोधन – साधना**

लेखक:– डॉ. वसंत स. जोशी
मूल्य रुपये बारा फक्त : ( पृष्ठे १९४ )

'मराठी वाङ्मयाच्या इतिहासामध्ये या 'संशोधन साधने'ने लक्षात भरण्यासारखी निखालसपणे भर टाकली आहे. ही गोष्ट मराठी वाङ्मयेतिहासज्ञांच्या लक्षात आल्याशिवाय राहणार नाही.'
– तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ( प्रास्ताविक )

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ( जि. सातारा )

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# व्यापार-उद्योग आणि मराठी

प्र. चिं. शेजवलकर

व्यापारी आणि औद्योगिक क्षेत्रांत मराठी भाषेचा वापर मोठ्या प्रमाणावर अद्याप का होऊ शकत नाही आणि तो वापर करावयाचा झाल्यास मराठी भाषा ही अर्थव्यवहारात आणि वाणिज्य क्षेत्रात कितपत सुलभतेने वापरता येईल ह्या प्रश्नांसंबंधी अजूनही विवेचन करण्याची वेळ आपल्यावर येते हीच खरी म्हणजे खेदजनक गोष्ट आहे. जगात ओद्योगिकदृष्टया जे समृद्ध आणि प्रगत झालेले देश आहेत त्या देशांमध्ये त्या त्या लोकांची मातृभाषा अभिमानाने आणि सुलभतेने औद्योगिक आणि व्यापारी क्षेत्रांत वापरली जाते. आणि त्यामुळे साहजिकच विश्वविद्यालयीन क्षेत्रात वाणिज्य आणि औद्योगिक विद्याशाखांमधून त्या त्या देशातील मातृभाषेचा सुलभतेने आणि आवर्जून वापर केला जातो. पश्चिम जर्मनी आणि जपान या दोन औद्योगिकदृष्टया समृद्ध असलेल्या देशांचे ठळक उदाहरण याबाबत घेता येईल. जपानमधील औद्योगिक व्यवहाराची पाहणी करण्याकरता गेलेल्या येथील एका संशोधकाला तेथील अधिकाऱ्यांशी आणि कामगारांशी इंग्रजीतून बोलणे अशक्य आहे, असे आढळून आले. कारण तेथील बहुतेकांना इंग्रजी फारसे येत नव्हते आणि त्यांचा सर्व व्यवहार जपानी भाषेतून होत होता. हा दाखला देण्याचे कारण इतकेच, की राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत उद्योग आणि व्यापार वाढावयाचा असल्यास इंग्रजी भाषेचा वापर अपरिहार्य आहे आणि याउलट मराठी भाषा ही एक अडचण होऊन बसेल अशी जी एक समजूत आहे ती चुकीची आहे. अर्थात ही गोष्ट खरी आहे, की जे लोक उद्योग आणि वाणिज्य क्षेत्रांत आघाडीवर असतात त्या लोकांची भाषा त्यांच्या औद्योगिक प्रगतीबरोबरच आपोआप पुढे जाते. आपला देश आणि विशेषतः महाराष्ट्र, आंतरराष्ट्रीय स्तरावर औद्योगिक आणि व्यापारीदृष्टया कधीच आघाडीवर नव्हता आणि त्यामुळेच इतर लोकांनी मराठीचा आश्रय घेऊन महाराष्ट्रात व्यापार वाढविणे ही गोष्ट कधीच आवश्यक वाटली नाही.

उद्योग आणि वाणिज्य क्षेत्रांत – म्हणजे प्रत्यक्ष व्यवहारात आणि त्यामुळे आपोआपच पर्यायाने विश्वविद्यालयीन वाणिज्य अध्यापनात मराठी माध्यमाचा वापर करता येणे शक्य आहे का याचे उत्तर 'होय' असेच ठामपणे देता येण्यासारखे आहे. केवळ मराठी भाषेचा आपणास अभिमान आहे म्हणून 'होय' असे उत्तर आहे असे नव्हे. जिथे जिथे प्रयत्नपूर्वक आर्थिक व्यवहारात आणि विश्वविद्यालयीन वाणिज्य शाखेत मराठीचा आजपर्यंत ज्यांनी वापर केला, त्यांना आपली मराठी भाषा ही त्या दृष्टीने वापर आणि विकास करण्यास अतिशय समृद्ध आहे असे आढळून आले. गेल्या पंचवीस वर्षांत सुदैवाने अनेक प्राध्यापकांनी मराठी माध्यमातून वाणिज्य शाखेतील विद्यार्थ्यांकरिता अनेक पाठचपुस्तके लिहिली. त्यातील कित्येक पाठचपुस्तके चांगल्या दर्जाची निघाली आणि त्या पाठचपुस्तकांतून वापरलेली मराठी भाषा ही समृद्ध आहे. अर्थात दर बारा कोसांवर भाषा बदलते या समजुतीनुसार विदर्भातील प्राध्यापकांनी आणि सातारा, कोल्हापूरकडील प्राध्यापकांनी वापरलेली मराठी भाषा ही पुण्यातील मराठी भाषेपेक्षा थोडीबहुत वेगळी असणार हे स्वाभाविकच आहे. महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातील सर्व प्राध्यापकांनी एका ठराविक पठडीतच मराठी भाषा आणि मराठी पारिभाषिक शब्द वापरावे ही अपेक्षा करणेदेखील चुकीचे आहे. किंबहुना असा आग्रह धरण्यात आल्यामुळेच कळकळीने मराठी पाठचपुस्तके लिहिणाऱ्या काहीजणांच्या प्रयत्नांत अडसर निर्माण झाला. डॉ. रघुवीर यांनी सुचविलेल्या संस्कृतोद्भव मराठी शब्दांचा वापर केलाच पाहिजे असा आग्रह धरणारा प्रतिष्ठित वर्ग जेव्हा महाविद्यालयांतून सत्ता मिरवीत होता तेव्हा मराठी माध्यमातून

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पाठ्यपुस्तके कशी लिहिता येतील हा प्रश्न लोकांना आणि त्याचबरोबर प्रकाशकांना पडला. सुरवातीला महाराष्ट्र सरकारने पदनाम कोष प्रसिद्ध करून त्यानिमित्ताने डॉ. रघुवीर यांचेच शब्द वापरण्याचा आग्रह धरण्याचा प्रयत्न केला. भाषा संचालनालयाने सुदैवाने आता व्यावहारिक दृष्टिकोण स्वीकारला आहे असे समजते आणि ही स्वागतार्ह गोष्ट आहे.

महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांनी वाणिज्य आणि औद्योगिक विद्याशाखांमधून निदान पदवीपरीक्षेपर्यंत का होईना, मराठी माध्यमातून शिकविण्यास आणि पेपर लिहिण्यास परवानगी दिली हीदेखील एक स्वागतार्ह गोष्ट आहे. अर्थात काही एका कालखंडात जिल्ह्यांच्या आणि तालुक्यांच्या गावी अनेक महाविद्यालये निघाली. तेथील विद्यार्थ्यांना इंग्रजी भाषेतून परीक्षा देऊन पुणे आणि मुंबई येथील विद्यार्थ्यांशी स्पर्धा करणे स्वाभाविकच अशक्य होते. त्या ग्रामीण भागातील महाविद्यालयांच्या चालकांचे प्रतिनिधी त्या त्या विद्यापीठात सदस्य म्हणून आल्यामुळे मराठी भाषेच्या वापराचा प्रश्न त्यांनी धसाला लावला व तो सुलभ झाला. पुण्या-मुंबईतील इंग्रजी भाषेतून उच्च विद्याविभूषित झालेले अनेक लोक सुरवातीला मराठी माध्यमातून अध्ययन आणि अध्यापन करू देण्यास विरोध करत होते, ही गोष्ट डोळ्याआड करून चालणार नाही. हा उल्लेख करण्याचे कारण हेच, की आपल्या भाषेचा व्यापार आणि व्यवहारात विस्तार व्हावयाचा असेल, तर विविध संघटनांमधून आणि विश्वविद्यालयांमधून जिथे कोणी सत्तारूढ प्रतिष्ठित बसलेले असतील, त्यांनी सामाजिक गरजा आणि मराठी भाषेचा स्वाभिमान बाळगून मराठी भाषेचा वाणिज्य क्षेत्रात आणि व्यवहारात वापर होऊ देण्यास हातभार लावणे ही आजची गरज आहे हे येथे मुद्दाम नमूद करावेसे वाटते. अजूनही कळत न कळत का होईना, परंतु उच्चभ्रू लोक संभाषणातून मराठीचा आधार घेताना जणू काही ती प्रतिष्ठेला कमीपणा आणणारी गोष्ट आहे असेच मानतात. मराठी भाषा एखाद्या विद्याशाखेत चांगली रुजण्यासाठी त्याची सुरुवात विविध संघटनांमधून जबाबदारीच्या जागांवर असणाऱ्या लोकांनी त्या भाषेचा संभाषणांतून, व्यवहारांतून आणि लेखनातून वापर करण्यास सुरुवात करून केली पाहिजे. मोठ्या लोकांनी याबाबत पुढाकार न घेतल्यास त्यांच्या हाताखालचे लोक किंवा अगदी लहान कामधंदे करणारे आणि छोटी दुकाने चालविणारे लोकदेखील इंग्रजीचाच वापर करण्याची केविलवाणी धडपड करतात. चाकण, खेड, मंचर-सारख्या लहान गावी बाजारपेठेत तुम्ही फेरफटका मारला, तर तिथेसुद्धा दुकानांमधील दहापैकी आठ-नऊ पाट्या इंग्रजी भाषेतील आढळतात. त्यांची छापील पावतीपुस्तके इंग्रजीत असतात. ह्याउलट अेखाद्या कार्यकारी संचालकाने मराठी बोलणाऱ्या हाताखालच्या अधिकाऱ्याला मराठी भाषेतून कामासंबंधीचे पत्र लिहिले, तर त्याचा अनुकूल परिणाम होऊन हाताखालचे लोकदेखील पत्रोत्तर मराठीत देतात. सांगण्याचा मुद्दा हा, की मराठी भाषेचा वापर आणि विस्तार औद्योगिक आणि वाणिज्य क्षेत्रांत व्हावयाचा असेल, तर तो विस्तार कायदा, नियम वा ठराव करून किंवा घाईघाईने लादून होण्यासारखा नाही. स्थित्यंतराच्या काळात मराठी भाषा अशी लादून चालणार नाही. प्रथम ती व्यवहारातूनच रुढ कशी होईल हे पाहिले पाहिजे. आणि बोलण्याचालण्यातून जेव्हा ती व्यवहारामध्ये रुढ होईल तेव्हासुद्धा अमुक एक प्रकारची पारिभाषिक भाषा स्वीकारलीच पाहिजे असा आग्रह कोणी धरता कामा नये. त्यात सांप्रदायिकपणा येता कामा नये. याउलट लवचिकता आली पाहिजे. असे केल्यास काही पारिभाषिक शब्द संस्कृतोद्भव होतील. काही वेळा उर्दू भाषेतून मराठी शब्दांचा जन्म झालेला आढळेल. काही इंग्रजी शब्द जसेच्या तसे मराठी शब्दांमधून ओळखले जातात. तसे होऊ देण्यास प्रत्यवाय नसावा. आपली मराठी भाषा अजिबात बदललेली असता कामा नये हा आग्रह धरणे चुकीचे आहे. क्रिकेटसंबंधी बोलताना क्रिकेट हा परकीय खेळ असल्यामुळे काही इंग्रजी शब्द मराठीत वापरले जातील व ते वापरू द्यावे. परंतु त्याचबरोबर 'यष्टिरक्षक' यासारखे आता रुढ झालेले शब्द आपोआप पुढच्या पिढीतील लोक वापरतील हेही लक्षात घ्यावे. 'सेक्रेटरी' या शब्दाकरता 'सचिव' शब्दच वापरला पाहिजे, 'चिटणीस' शब्द वापरता कामा नये असा आग्रह धरता कामा नये. 'आयोग', 'आयुक्त', 'अभियंता', 'स्वाक्षरी,'

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'संपर्क', 'संचालक' यांसारखे काही शब्द विद्यार्थ्यांच्याही तोंडी चपखल बसले आहेत. कालांतराने हे शब्द सामान्य दुकानदारांच्या बोलण्यातूनही वापरले जातील.

या संदर्भात एका चांगल्या गोष्टीचा उल्लेख करावासा वाटतो व तो म्हणजे हल्ली खेडोपाडी वृत्तपत्रे वाचली जातात आणि आकाशवाणीवरील संवाद ऐकले जातात. त्यामुळे एरवी थोडेसे कठीण वाटणारे संस्कृतोद्भव मराठी शब्ददेखील वृत्तपत्रे वापरू लागल्यामुळे लोकही व्यवहारातून वापरू लागले आहेत. आकाशवाणीच्या माध्यमाचा प्रभावदेखील ठळकपणे याबाबत लक्षात घेण्यासारखा आहे. काही शब्दांना भारतीय बैठक येणेच शक्य नाही हेही वाणिज्य शाखेतील मराठी भाषेच्या उत्साही लोकांनी लक्षात घेणे आवश्यक आहे. उदा. प्लॅस्टिक, प्रेशर-कुकर, गॅस, चेक, कॉन्टॅक्ट लेन्स हे किंवा यांसारखे शब्द दुर्दैवाने मराठीत रूढ होण्याचा संभव आहे. परंतु त्यालाही इलाज नाही.

वाणिज्य शाखेत मराठी पारिभाषिक शब्द आणताना स्वाभाविक प्रक्रियेतून निर्माण झाले पाहिजेत. कारण उद्योग किंवा व्यापार करताना संभाषण करण्यापेक्षा व्यापाऱ्यांचे लक्ष व्यवहाराकडे असते. शब्दांचे अवडंबर ते करत नाहीत. शब्द हे केवळ त्यांच्या दृष्टीने माध्यम आहे. व्यवहार लवकर झाला पाहिजे हे ते बघतात. वाणिज्य शाखेत मराठीचा सुलभतेने वापर होण्यासाठी शब्दामागील संकल्पनेला महत्त्व आहे व हे जाणत्याने लक्षात घ्यावे. जो शब्द आपण वापरू त्यामागील अर्थ लवकरात लवकर स्वच्छपणे व्यक्त झाला पाहिजे. आणि म्हणूनच 'बीज भांडवल' किंवा 'व्ययचिकित्सा' यांसारखे शब्द त्यांतील संकल्पना स्पष्ट झाल्यामुळेच लवकर रूढ झाले आहेत. परंतु त्याचबरोबर ग्रामीण भागात 'बीजगुणन प्रक्षेत्र' हा शब्द रूढ न होता 'सीड फार्म' हा शब्द रूढ झाला. ज्याप्रमाणे परिभाषा कोणत्याही परिस्थितीत दुर्बोध असता कामा नये, त्याचप्रमाणे एखादी वाक्यरचनादेखील दुर्बोध होता कामा नये. विशेषत: औद्योगिक आणि व्यापारी क्षेत्रांत लवकरात लवकर दुसऱ्याशी संज्ञापन करावयाचे असल्यामुळे जे शब्द हुकमी असतील तेच शब्द वापरले जातील हे ध्यानात ठेवावयास हवे. असे शब्द व्यापारी आणि कारखानदार वापरत असतील, तर त्या शब्दांचा आधार प्राध्यापकांनी अध्यापनात घ्यावा. येथे हे स्वच्छ मांडले पाहिजे, की व्यवहारात भाषा आधी रूढ होईल व नंतर ती अध्यापनातून आणि अध्ययनातून रूढ होईल. निदान वाणिज्य आणि औद्योगिक क्षेत्रात तरी हे विधान मान्यच करावयास हवे. इंग्रजीऐवजी मराठीतून पत्रव्यवहार आणि अन्य व्यवहार झपाट्याने आणि लवकर करावयाचा असेल, तर इंग्रजी भाषेचे जसेच्या तसे मराठी भाषांतर करण्याचा अट्टाहास धरता कामा नये. उदा. औद्योगिक कंपन्यांच्या सभांमधून मंजूर करण्यात आलेले इंग्रजी भाषेतील ठराव लांबच्या लांब असलेल्या एकाच वाक्यामध्ये उद्धृत केलेले असतात. त्या एकाच वाक्याचे मराठी भाषेतही भाषांतर एकाच वाक्यात मांडणे हास्यास्पद ठरेल. मराठी भाषेतून तोच ठराव मांडताना इंग्रजीतील एका मोठ्या वाक्याची तीन-चार लहान व समजण्यास सोपी अशी वाक्ये केली पाहिजेत. मराठीतून पत्रव्यवहार करतानादेखील जर छोटी वाक्ये वापरण्यास सुरुवात केली, तर मराठीतील वाणिज्य आणि औद्योगिक विषयांवरील पत्रव्यवहार लवकर समजेल आणि रूढ होईल. इंग्रजीतील वाणिज्य शाखेतील पत्रव्यवहार हा अद्यापही पूर्वीच्या प्रथेनुसार मोठमोठाल्या वाक्यांमधून मांडलेला असतो. अर्थात आता तेथील पत्रव्यवहार करतानाही छोटी वाक्ये वापरावी असा नवा दृष्टिकोण आलेला आहे.

विश्वविद्यालयीन वाणिज्य शाखेतील मराठीचा वापर सुलभ होण्यासाठी खालील गोष्टी करावयास हव्यात.

( १ ) आज आपणास महाविद्यालयांतून वाणिज्य विषय शिकवणारे प्राध्यापक हे पूर्णवेळचे प्राध्यापक असल्यामुळे त्यांचे प्रत्यक्ष कारखानदारांशी आणि व्यापाऱ्यांशी संबंध येत नाहीत. दुर्दैवाने कित्येक प्राध्यापकांनी घाऊक व्यापारी किंवा किरकोळ व्यापारी यांचे व्यवहार स्वत: पाहिलेले नसतात. कारखानदारांचे बाहेरचे दार त्यांनी कधी पाहिलेले नसते. त्यांचा औद्योगिक अधिकाऱ्यांशी आणि घाऊक व्यापारी किंवा कमिशन एजंट्स यांच्याशी संबंध आलेला नसतो. एरवीदेखील वाणिज्य विषयांमधील शिक्षकांनी कारखानदार आणि व्यापारी यांच्याशी घनिष्ठ संपर्क ठेवावा असे आग्रहाने म्हणावेसे वाटते. परंतु मराठी भाषेचा अगदी योग्य असा वापर होण्यासाठी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

आमच्या अर्थव्यवहाराच्या शिक्षकांनी जास्तीत जास्त प्रमाणावर व्यापारी लोकांशी संबंध ठेवले पाहिजेत. त्यांच्याशी संभाषण केले पाहिजे. त्यांचा पत्रव्यवहार वाचला पाहिजे. त्यांच्या खरेदी-विक्रीचे व्यवहार प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले पाहिजेत. म्हणजे मग ते वापरत असलेली मराठी भाषा आमच्या वाणिज्य शिक्षकांना अध्यापनातूनही आणता येईल.

(२) औद्योगिक आणि वाणिज्य क्षेत्रांतील विषय महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना शिकविण्यासाठी जास्तीत जास्त प्रमाणावर त्या क्षेत्रांतील व्यावसायिक आणि व्यापारी यांना पाचारण केले पाहिजे. जाहिरातशास्त्र शिकविताना जाहिरातीचा व्यवसाय करणारे लोक सुलभतेने जी मराठी भाषा वापरतात ती जाहिरातविषयक पाठ्यपुस्तकांतून असलेल्या भाषेपेक्षा खूपच वेगळी असते.

(३) तज्ज्ञांच्या समित्या नेमून मराठी पारिभाषिक शब्द विद्यार्थ्यांच्या आणि अध्यापकांच्या गळी उतरविण्याचा प्रयत्न अजिबात करता कामा नये.

(४) काही विद्यापीठांच्या वाणिज्य शाखांमधून पदव्युत्तर स्तरावरील विषय मराठीतून शिकविले जात नाहीत. पुणे विद्यापीठाच्या वाणिज्य विद्याशाखेने ॲम्. कॉमच्या विद्यार्थ्यांना मराठी भाषेतून उत्तरपत्रिका लिहिण्यास परवानगी दिलेली नाही याचा खेद होतो. मी त्या विद्याशाखेचा प्रमुख असताना अनेक सदस्यांचे मन वळवून पाहिले. परंतु मराठी भाषेतून उत्तरपत्रिका लिहू दिल्यास आपल्या ॲम्. कॉमच्या पदवीचे महत्त्व कमी होईल हा दृष्टिकोण चर्चेत अधिक प्रभावी ठरला. वास्तविक एखाद्या पदवीचे महत्त्व अध्ययनाचा आणि अध्यापनाचा दर्जा घसरल्यास कमी होते. परीक्षा मराठी भाषेतून झाली की इंग्रजी भाषेतून झाली त्यामुळे ते कमी होत नाही, ही अगदी उघड गोष्ट केवळ काही प्रथांचा बाऊ करून कित्येकांनी डोळ्यांआड केली.

(५) महाराष्ट्राच्या ग्रामीण भागात वाढत जाणाऱ्या अर्थव्यवहाराच्या वाणिज्य शाखांमधून खऱ्या अर्थाने संशोधन व्हावयाचे असेल, तर वाणिज्य विद्याशाखेतील 'पीएचडी'चे प्रबंध मराठी भाषेतून लिहू देण्यास परवानगी दिली पाहिजे. 'पीएचडी'चा प्रबंध मराठी भाषेतून लिहू देणे अजूनही कित्येक वाणिज्य शिक्षकांना कमीपणाचे वाटते, हीदेखील खेदजनक गोष्ट आहे. मुंबई विद्यापीठाने त्याबाबत पुढाकार घेतला तर मुंबई विद्यापीठाचे अनेक बाबतीत अनुकरण करणारी आजची विद्यापीठे आणि वाणिज्य शाखेतील शिक्षक मराठीचा पदव्युत्तर स्तरावर स्वीकार करतील. मुंबई विद्यापीठ वाणिज्यशाखा अजूनही याबाबत सनातनी आहे हीदेखील एक दुःख देणारी गोष्ट आहे.

(६) महाराष्ट्र अर्थशास्त्रज्ञांनी मराठी अर्थशास्त्र परिषद स्थापन केली आहे आणि त्या परिषदेतील सर्व चर्चा मराठीतून होते या गोष्टीचे स्वागत करावेसे वाटते. त्याच धर्तीवर मराठी वाणिज्य परिषद आणि महाराष्ट्र औद्योगिक परिषद आम्ही प्राध्यापकांनी स्थापन केली पाहिजे. आणि त्या परिषदांनी आवर्जून औद्योगिक अधिकाऱ्यांना व व्यापारी मंडळींना बोलाविले पाहिजे.

(७) महाराष्ट्रात ज्या ज्या ठिकाणी चेंबर्स ऑफ कॉमर्स आणि व्यापारी व औद्योगिक संघटना आहेत त्या सर्वांनी आपले कार्यक्रम, व्याख्याने, चर्चा, परिसंवाद इत्यादी आणि त्याचबरोबर आपला सर्व पत्रव्यवहार मराठी भाषेतून केला पाहिजे. त्याबाबत थोडी अडचण येईल ही गोष्ट खरी आहे. कारण अशा चेंबर्समधून बिगरमहाराष्ट्रीय उद्योगपतीदेखील प्रभावी सदस्य म्हणून काम करीत असतात. मराठा चेंबरने 'संपदा' नियतकालिक आणि महाराष्ट्र चेंबरने 'वैभव' हे नियतकालिक चालू ठेवून मराठीतून औद्योगिक व्यवसायासंबंधी विचारविनिमय करण्याचे एक नवे विचारपीठ निर्माण केले आहे ही आनंदाची गोष्ट आहे.

(८) वाणिज्य विद्याशाखेमधील अभ्यासक्रमात परिसंवाद आणि संभाषणे यांवर फारसा भर नाही. वास्तविक पाहता तोंडी परीक्षा आणि गटवार चर्चा यांवर आधारित विद्यार्थ्यांचे मूल्यमापन करणे इतर दृष्टीने आवश्यक आहे. परंतु मराठीचा वापर अधिक व्हावयाचा असेल, तर वाणिज्य अभ्यासक्रमामध्ये गटवार चर्चा आणि संभाषणे यांवर आधारित मूल्यमापन करण्यास सुरुवात झाली पाहिजे.

**भाषा ही एक सजीव वस्तू आहे. अनुभव हा तिचा आत्मा आहे. जो प्रत्यक्ष दैनंदिन व्यवहार करतो तोच भाषा आणि परिभाषा रूढ करू शकतो,** हे मान्य केल्यास औद्योगिक आणि वाणिज्य क्षेत्रांत मराठीचा अधिक वापर होण्याच्या दृष्टीने आमच्या व्यापारीवर्गाने आणि कारखानदारांनी पुढाकार घेतला पाहिजे असे आग्रहाने म्हणावेसे वाटते.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

# प्रसारमाध्यमे आणि बोलभाषा

व्यंकटेश माडगूळकर

एखाद्या माणसाचा गौरव 'वेल्‌रेड' या शब्दानं इंग्रजीमध्ये ज्या प्रकारे होईल, त्या प्रकारे मराठीत मात्र तो बहुश्रुत शब्दानं करावा लागेल. कानांनी ऐकून माहिती घेण्याची आपली परंपरा फार पुरातन आहे. एखादी बातमीसुद्धा आपल्यापर्यंत पोहोचते, ती कर्णोपकर्णीच. "डोळ्यांनी बघतो, ध्वनी परिसतो। ही ईश्वराची कृपा" असं कवीनं सांगून ठेवलेलं आहे.

प्रसारमाध्यमांतील डोळ्यांनी पहायचं आणि कानांनी ऐकायचं जे माध्यम दूरदर्शन, त्याच्याशी माझा फारसा परिचय नाही. आकाशवाणीशी मात्र गेली पंचवीस वर्षं आहे. त्यातही, ग्रामीण विभागासाठी होणाऱ्या कार्यक्रमांशी माझा विशेष संबंध, जवळ जवळ वीस वर्षं होता. म्हणून, माझं बहुतेक विवेचन त्या रोखानं होणं अपरिहार्य आहे.

खेड्यापाड्यांत पसरलेल्या आपल्या अशिक्षित लोकांना, धर्माविषयी, व्यवहारनीतिविषयी, मानवी जीवनाविषयी, ऋषिमुनींनी, पुराणकारांनी, साधुसंतांनी, कवींनी, पंडितांनी जे काही सांगितलं आहे, ते, कधी सुबोध कथांतून, कधी आख्यानांतून, कधी सोंगांतून तर कधी गाण्यांतून तर कधी चित्रांच्या साहाय्यानं कथन करण्याचं एक महत्त्वाचं काम लोकसंस्कृतीचे भटके पाईक करत असत. ह्यांत अनेक जातिजमातींचे, पंथांचे लोक होते. वाघे, भुते, आराधी, गोंधळी, भराडी, वासुदेव, बाळसंतोष होते. चित्रकथी, काशीकापडी, कोकेवाले, गोसावी होते, कीर्तनकार, प्रवचनकार, सोंगीभारूड लळित खेळणारे, गाणारे होते. हा भला मोठा पसारा होता. कुणाच्या निमंत्रणाची वाट न बघता हे गावोगाव जात. घरोघर हिंडत. पाप-पुण्य, नीति-अनीती, नेटका संसार, चोख व्यवहार ह्यांविषयी लोकांना सांगत, त्यांचं रंजन आणि उद्‌बोधन करत. ह्या


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

सेवेपायी गावचे लोक त्यांना नवी-जुनी वस्त्रं, धान्य, क्वचित पैसा-अडका देत. तो घेऊन हे समाधानानं पुढच्या गावी जात. ह्यांखेरीज निव्वळ करमणूक करणारेही काही होते. गारुडी, मदारी होते, डोंबारी-कोल्हाटी होते, दरवेशी, नंदीवाले, माकडवाले होते. हेही सुगीसराई साधून येत आणि जन लोकांचं रंजन करत. निर्वाहापुरतं अन्नवस्त्र त्यांनाही मिळत असे.

वर्षानुवर्षं असा हा गावगाडा चाललेला होता. दुसरं महायुद्ध झालं आणि ही घडी विस्कटली. समाज ढवळून निघाला. जुनापुराणा गावगाडा हळूहळू पार मोडून गेला.

शिक्षणसंस्था, वाचनालयं, व्याख्यानमाला, थिएटरं असले नवे नागरी प्रकार अद्याप खेड्यापाड्यांपर्यंत पोचले नव्हते आणि ही ज्ञान आणि रंजन देणारी जुनी, फिरस्ती संस्था बुडाली. भटक्या लोकांनी फिरस्तेपणा टाकून दिला. शहराच्या जवळपास दुसरे उद्योग बघितले, कारण त्यांना पहिल्यासारखी प्राप्ती होईना. लोकांचा देता हातही आखडला, कारण महागाई-टंचाई नव्यानं येऊ लागली होती. त्यामुळं खेड्याकडं, सुगीसराईच्या वेळा साधून का होईना, धावणारा फिरस्त्या लोकांचा लोंढा आटला. ज्ञान सांगणारं, माहिती देणारं, करमणूक करणारं कोणी नाही अशी एक पोकळी आपल्या ग्रामीण भागात निर्माण झाली.

आणि, नेमक्या ह्या वेळेलाच बहुरूपी बनून रेडिओ खेड्यापाड्यांत गेला. त्याचे सोंग स्वाभाविकपणेच बहुरुप्याचे होते, आणि भाषाही बहुरुप्याचीच होती. सुरुवातीला फार सुपीक अशी जमीन आपल्या आकाशवाणीला विशेषतः ग्रामीण कार्यक्रमांना मिळाली.

खेडोपाडी ग्रामपंचायती झाल्या. त्यांना बॅटरीवर चालणारे रेडिओ सेट्स सरकारकडून पुरवले गेले. ग्रामपंचायतीसमोर लावलेला कर्णा गावकऱ्यांशी कानगोष्टी करू लागला. संध्याकाळच्या वेळी पंचायतीसमोर घोळामेळानं बसून लोक ऐकू लागले.

एकोणीसशे छप्पनसाली, युनेस्कोच्या मदतीने, कॅनेडीयन फार्म फोरमच्या धर्तीवर, इंडियन रेडियो रूरल फार्म फोरम ही प्रायोगिक योजना भारतात आली. ती प्रथम महाराष्ट्रात पुणे आकाशवाणीतर्फे राबवण्यात आली. शहरापासून दूरची अशी खेडी निवडून वीस लोकांचं एक मंडळ प्रत्येक खेड्यात निवडलं गेलं, आणि त्यांना आठवड्यात दोन असे एकूण वीस कार्यक्रम ऐकवले गेले. प्रत्येक कार्यक्रम वीस मिनिटांचा. ह्यात, खेड्याची स्वच्छता, प्रौढशिक्षणाची आवश्यकता, लोकशाही, शेतीतील उंदरांचा नायनाट, अंधश्रद्धा असे वेगवेगळे वीस विषय होते.

खेड्याची स्वच्छता ह्यावर आधी एक नाटुकलं होतं. त्याचं नाव 'सोयरिक मोडली आणि जमली.' मोडली का तर गाव घाण होतं. सांडपाणी, डुकरं, कचऱ्याचे ढीग असत. ते बघताच सोयरिक जमवायला आलेले पाटील म्हणाले, 'इथं पोरगी देण्यापेक्षा ती बिनलग्नाची ठेवीन'. पोरीचा बाप म्हणाला, 'का ?' तर 'गाव घाण आहे, पाण्याची सोय नाही.' ह्या अपमान सहन न होऊन पोराच्या बापानं पैज मारली आणि गावाच्या मदतीनं दोन महिन्यांत गाव स्वच्छ केलं, मोडलेली सोयरिक पुन्हा जमली. ह्या नाटुकल्यानंतर, गावची स्वच्छता कशी करता येईल ह्या विषयावर एका तळमळीच्या समाजकार्यकर्त्याची दहा मिनिटांची मुलाखत होती. उंदराच्या नायनाटीसंबंधीच्या वगात मुरलीवाल्याची गोष्ट होती. मुरली वाजवून, गावातले उंदीर त्यानं नदीत बुडवले. आणि त्या कामगिरीबद्दल खूप मोबदला मागितला. तो गावकऱ्यांनी नाकारला तेव्हा, मुरलीवाल्यानं गावातली पोरं, उंदरांप्रमाणेच मुरलीच्या आवाजानं भुरळवली, आणि ती नदीकडं जाऊ लागली. गावकरी घाबरले, म्हणाले, "अरे बाबा, म्हणशील ती रक्कम देतो, पण पोरं बुडवू नकोस" इथंच गोष्ट संपवली होती. आणि निवेदन होतं, 'ही एक गोष्ट आहे. आज जर तुमच्या शेतात उंदीर झाले असतील, तर असा कोणी जादुगार मुरलीवाला तुम्हाला भेटणार नाही. कारण तो फक्त कथेतच असतो. प्रत्यक्षात तुम्हाला पीकसंरक्षण अधिकारी बोलवावा लागेल.' आणि नंतर, ह्या अधिकाऱ्याची दहा मिनिटांनी मुलाखत होती. त्यात त्यानं उंदरांचा नायनाट कसा करावा, ह्याविषयी उपाययोजना सांगितल्या.

ही सर्व योजना यशस्वी ठरली. टाटा इन्स्टिटयूट ऑफ सोशल सायन्सेसनं सगळ्या एकशे पंचेचाळीस





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मंडळांना भेटी दिल्या. लोकांना प्रश्न विचारले आणि योजनेवरचा आपला निष्कर्ष युनेस्कोला दिला. युनेस्कोचे तज्ज्ञ अधिकारीही सुरुवातीपासून देखरेखीसाठी होतेच. ह्या सर्व प्रायोगिक योजनेची फलितं देणारा ग्रंथ युनेस्कोतर्फे एकोणिसशे एकोणपन्नासमध्ये प्रसिद्ध झाला आहे. 'ॲन इंडियन एक्स्पेरिमेन्ट इन फार्म रेडिओ फोरम्स' असं त्याचं नाव आहे. माझ्या स्मरणाप्रमाणे जे. सी. माथूर आणि पॉल न्यरथ ह्या तज्ज्ञांनी तो लिहिला आहे.

एकदा सविस्तरपणे ह्या प्रयोगासंबंधी सांगण्याचं कारण हेच की, लोकांना समजेल, रुचेल अशा भाषेत दिल्यामुळेच हे वीस कार्यक्रम यशस्वी झाले. ही योजना पुढे जम्मू आणि काश्मीर वजा जाता, सर्व राज्यांतील भारतीय आकाशवाणीच्या केंद्रांवरून सुरू करण्यात आली.

गेल्या पंचवीस वर्षांत आकाशवाणीचा व्याप खूप वाढला आहे. तीन होती ती आठ आकाशवाणी केंद्रं आता महाराष्ट्रात आली आहेत. खेड्यात वीज पोचली आहे. ट्रान्झिस्टर पोचला आहे. गुराखी मुले, ट्रान्झिस्टर घेऊन रानात जाऊ लागली आहेत. रेडिओ अगत्यानं ऐकणारा श्रोता हा अजून, बहुसंख्य असा खेड्यातलाच, अशिक्षित किंवा अर्धशिक्षित हाच आहे. आणि रेडिओ ह्या प्रसारमाध्यमाच्या भाषेचा विचार करताना ही वस्तुस्थिती आवर्जून ध्यानात घेतली पाहिजे.

अगदीच प्राथमिक गोष्ट म्हणजे प्रसारमाध्यमाची भाषा समजायला अवघड असून चालणार नाही. कारण ती ऐकताच समजली पाहिजे. आणि एकदा ऐकदाच समजली पाहिजे. आज, असं होताना दिसत नाही. आजार आणि औषध किंवा आणखीही एखादं माहितीपर भाषण ऐकल्यावर श्रोते पत्र पाठवतात, की "भाषणातील माहिती फारच उपयुक्त होती. पण, ती नीट समजली नाही. आम्हाला प्रत पाठवा. सोबत पोस्टाची तिकिटं आहेत" म्हणजे एक तर झालेलं भाषण नसतं, ते वाईट पद्धतीने लिहिलेलं, आकर्षक रचना नसलेलं टिपण असतं. त्यात फार माहिती कोंबलेली असते. आणि ते बोललेलं नसतं, तर स्वतःपुरतं मोठ्यांदा वाचलेलं असतं.

बोलायची भाषा आणि लिहायची भाषा वेगळी असावी लागते ही जाण सहसा नसतेच. 'व' चा वापर सर्रास असतो.

'आज मी व बाबा नाटकाला जाऊ', असं आपण बोलताना म्हणत नाही.

लिखित खर्ड्यात येणारा 'खालील' आणि 'वरील' हा शब्दही सर्रास वापरला जातो. टी. व्ही. वरच्या बातम्यातसुद्धा...

'आमच्या प्रतिनिधीशी बोलताना त्यांनी खालील माहिती दिली.'

म्हणजे कुठली ?
किंवा
'वरील विधानानंतर ते पुढं म्हणाले.'
वरील म्हणजे छपरावर की काय ?

'इ. इ.', 'इ. स. पू.' असले संक्षेपही बोलताना आपण वापरत नाही. उपशीर्षकं, क्रमांक हेही रेडिओचं भाषण लिहिताना उपयोगाचे नाहीत.

भाषण लिहिताना, वाक्याच्या शेवटी येणाऱ्या क्रियापदामुळे जो एकसुरीपणा येतो तो टाळावा म्हणून काही क्रियापदं गाळावी लागतील. पण हा मुद्दा रेडिओ भाषणातील कलाकुसरीचा म्हणून आपण सोडून देऊ.

पाच मिनिटांचं एक जिल्हावार्तापत्र ऐकलं तर त्यात, आपण कोणती भाषा वापरतो याचा नमुना मिळतो.

| | |
|---|---|
| आगमन झालं. | आले. |
| उस्फूर्त स्वागत | मनापासून स्वागत |
| सुशोभित केलं होतं | सजवलं होतं |
| जनसमुदाय | गर्दी |
| आवाहन केलं | आग्रहानं सांगितलं |
| उज्ज्वल | उजळ |
| प्रतिपादन केलं | सांगितलं |
| नामकरण | नाव दिलं / ठेवलं |
| पार्श्वभूमी | मागची हकिगत |
| आत्मसात करणं | शिकून घेणं |

प्रत्येक जोडीतला पहिला शब्द, भारदस्त शैलीतला आहे, तर दुसरा रोजच्या सवयीतला, म्हणून सगळ्यांना समजणारा आहे.

हे झाले जिल्हावार्तापत्रातले शब्द. आता मराठी (दिल्ली) बातम्या दहा मिनिटं ऐकल्या, तर...

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्वत:ची प्रतिमा उजळण्यासाठी
जातीय वैमनस्य
पैशाचं आमिष दाखवण्यात आलं
आक्षेपार्ह राजकीय हेतूनं प्रेरित
राजकीय परिस्थितीत हस्तक्षेप करावा
पोलिसांशी संपर्क साधू शकलो नाही
आगामी आर्थिक वर्ष
निर्णय घेतला
वार्षिक उद्दिष्ट
जनतेचा व्यापक सहभाग
निवेदनाचं स्वागत केलं
हस्तक्षेप
स्वागतार्ह
याचा समावेश आहे.
समारंभ आयोजित करण्यात आला
आवाहन केलं
—ही भाषा कानावर येते.

हे शब्द सर्वांसाठी ज्या बातम्या असतात त्यांतले आहेत. म्हणजे जी लिहिताना वापरतात तीच भाषा आपण बातम्यांतही वापरतो. ती प्रसारमाध्यमाला योग्य नसते, इकडे दुर्लक्ष करतो.

आकाशवाणीवर वेगवेगळे कार्यक्रम होत असतात. ते विशिष्ट श्रोत्यांसाठी असतात. महिलांसाठी, ग्रामीण महिलांसाठी, मुलांसाठी, ग्रामीण मुलांसाठी, युवकांसाठी, विद्यार्थ्यांसाठी, शिक्षकांसाठी, शेतकऱ्यांसाठी, म्हणजे काही वेळा, प्रसारमाध्यमाच्या भाषेचं भान आणि कार्यक्रम ज्या विशिष्ट श्रोत्यांसाठी आहे, त्या श्रोत्यांचं भान हे दोन्हीही ठेवणं आवश्यक असतं. उदाहरणार्थ, जे शब्द भारदस्त म्हणून बातमीमध्ये अनाठायी वाटतील, त्यांतले काही शब्द भाषणामध्ये सहज खपतील.

मुलाखत, चर्चा असे काही प्रकार सोडले, तर रेडिओवरचे बहुतेक उच्चारित शब्द हे आधी लिहिण्याची मुभा असते. पण, ते बोलले जाणार आहेत, छापले जाणार नाहीत, हे भान बहुधा ठेवलं जात नाही. परिणाम असा की, जोमदार अशा नित्याच्या लोकव्यवहारातील बोलभाषेऐवजी ग्रांथिक भाषेलाच प्राधान्य मिळाल्याचं दिसतं.

लोक, भाषा शिकण्यासाठी रेडिओ ऐकत नाहीत. ऐकताना शब्दांचं भाषांतर करण्याची पाळी त्यांच्यावर येऊ नये. सोपे, सुटसुटीत, सहज समजणारे असे असंख्य शब्द आपण टाकून दिले आहेत. त्यामुळे लोकांशी होणारा व्यवहार कठीण होऊन बसला आहे. नेहमी रेडिओ ऐकणाऱ्या माणसाला रोजच्या व्यवहारातील मराठीचं वळण, सगळ्या मराठी माणसांना कळतील असे शब्द आणि वाक्यप्रयोग ऐकू आले पाहिजेत.

लोकांच्या दैनंदिन व्यवहारापासून अलग पडलेली, अलंकारानं नटलेली, प्रतिमा-प्रतीकांनी खच्चून भरलेली, संस्कृताळलेली, इंग्रजी वळणाची, बंदिस्त, स्थिर अशी भाषा, ही प्रसारमाध्यमाची भाषा असणं हा एक मोठाच सांस्कृतिक तोटा आहे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## वाचिक अभिनय : एक अभ्यासक्रम

कमलाकर सोनटक्के

मराठी भाषेच्या व्यावहारिकतेचा विचार करता, मराठी भाषा व्यवहारात कशी वापरली जाते याचाच प्रामुख्यानं विचार करावा लागेल. व्यवहाराची व्यापकता ही जीवनाएवढीच सर्वव्यापी, म्हणून सर्वसमावेशक. इथं माणसाच्या जन्मापासून तो मृत्युपर्यंतचे सारे व्यवहार येतात. माणसाचं व्यक्तिगत जीवन, कुटुंबातील नाती, समाजातील जबाबदारी आणि राष्ट्राचं नागरिकत्व आदी बाबी, त्यांतून निर्माण होणारे परस्परसंबंध महत्त्वाचे ठरतात. या संबंधांत प्रत्येक व्यक्तीचा सामाजिक आणि सांस्कृतिक ठेवा, आर्थिक स्थिती, व्यक्तिगत परिपक्वता, प्रगल्भता, नीति–अनीतीच्या कल्पना, व्यक्तिगत प्रेम, राग, लोभ आदी भावना यांचाही समावेश होतो. या आणि अशा मूल्यांसाठी माणूस जसा इतरांवर अवलंबून असतो तसेच त्याच्यावरही कुणी अवलंबून असतं. या परस्परसंबंधात जसे त्याचे काही अधिकार असतात तशाच काही जबाबदाऱ्याही त्याच्यावर पडतात. भौतिक गरजांच्या पाठी तो सारखा धडपडत असतो आणि त्याच्या मोबदल्यात काही सुखाचीही अपेक्षा तो करीत असतो. हे सुख त्याला शारीरिक भोगांपासून कलात्मक आनंदापर्यंत अनेक स्तरांवर मिळत असतं. आपलं जीवन अधिकाधिक समृद्ध आणि संपन्न करण्याचा तो सतत प्रयत्न करीत असतो. संपन्नतेच्या आणि समृद्धीच्या मोहापोटीच तो सारखा जगत असतो, धावत असतो. मिळालेल्या सुखापेक्षा न मिळालेल्या सुखाची मृगतृष्णाच त्याला जीवन जगायला भाग पाडीत असते.

जगण्याच्या या साऱ्या व्यापात इतरांशी संवादसंपर्क साधण्याचं, आपलं मनोगत अभिव्यक्त करण्याचं त्याचं एकमात्र साधन असतं वाचिक संकेत. इतर कुठल्याही साधनांपेक्षा सोईचं, सुटसुटीत, शक्ती आणि खर्चाचा कमीत कमी व्यय करणारं साधन म्हणजे वाचिक संकेत. वाचिक संकेत जेव्हा रूढ होतात, तेव्हा त्यांचं रूपांतर शब्दांत होतं आणि भाषा जेव्हा लिखित स्वरूप घेते तेव्हा तिला प्रतिष्ठा प्राप्त होते आणि प्रतिष्ठित भाषेचा वर्षानुवर्षे वापर तिला प्रगल्भ बनवितो. भाषा जसजशी प्रगल्भ होत जाते, तसतसं तिला एक जडतेचं स्वरूप प्राप्त होतं. आणि तिच्या वर्धापनासाठी, सजीवतेसाठी तिला एका मुक्ततेची गरज भासते. ही मुक्तता लिखित स्वरूपात प्रथम कविता प्रदान करते. कारण प्रचलित भाषेच्या चौकटी तोडण्याचा, अतिसूक्ष्म आणि अतितरल अभिव्यक्तीसाठी नवे शब्द घडविण्याचा स्थायीभाव कवितेचा. दुसऱ्या बाजूला ही मुक्तता बोलीभाषा प्रदान करतात. भाषेच्या स्थित्यंतराच्या आणि संक्रमणाच्या काळात भाषेची दोन रूपं प्रामुख्यानं ध्यानात येतात. जगण्याच्या भौतिकतेच्या बाजूला समृद्ध करणारी शास्त्रशुद्ध भाषा, जिचा वापर विज्ञान, शास्त्र आदी शाखांमधून केला जातो आणि दुसरं रूप जीवन अधिकाधिक आनंदमयी करण्यासाठी वापरली जाणारी भाषा, जिचा वापर काव्य, ललित साहित्य, लोककला, लोकजीवनात होतो. शास्त्रशुद्ध आधारापेक्षा हे रूप अधिक मुक्त, अधिक शोधक असतं.

**वाचिक अभिनय** : नाटकाला पंचमवेदाची महती आमच्या परंपरेने प्रदान केली. ऋग्वेदातून पाठ्य, सामवेदातून गेयता, यजुर्वेदातून भावभावना आणि अथर्ववेदातून रस सत्त्व. भरताच्या नाट्यशास्त्रानुसार अभिनयाचे चार प्रकार मानले जातात. आंगिक अभिनय, वाचिक अभिनय, आहार्य अभिनय आणि सात्त्विक अभिनय. आंगिक अभिनयात शरीराच्या हालचाली, हातपाय, चेहरा, चेहऱ्याचे स्नायू आदींच्या अभिनयाचा, आहार्य अभिनयात नेपथ्य, वस्त्रालंकार, नटानं मंचावर वापरावयाच्या गोष्टी आदी शरीरबाह्य तत्त्वांचा, तर सात्त्विक अभिनयात भावभावनांच्या मानसिक आणि मानसशास्त्रीय आंदोलनाचा अंतर्भाव होतो. वाचिक अभिनयाला भरत परंपरेपासून अभिनयाचं प्राणतत्त्व मानलेलं आहे. ॲरिस्टॉटलच्या मतप्रणालीनुसार घटना,

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चरित्र आणि आयुष्याच्या महत्त्वानुसार भाषा आणि गीतांना तेवढंच महत्त्व आहे. लोकपरंपरा या तर मौखिक परंपरांचाच अवलंब करतात.

अंधार आणि उजेडात सारखीच परिणाम साधण्याची शक्ती फक्त वाचिकात आढळते. वाचिक अभिनय हा प्रेक्षकांना बांधून ठेवतो, नाट्यभावना प्रेक्षकांपर्यंत पोचवितो. लिखित शब्द हे पूर्ण विचार नसतात. वाचिक अभिनयाची जोड ही लिखित किंवा अलिखिताला वैचारिक संदर्भ, अर्थवत्ता, स्थळकाळाचे भान आणि एक चरित्र बहाल करते. नाट्यगत दृकतत्त्वांना विविधता आणि प्राण अर्पण करण्याचं काम वाचिक अभिनय करतो. मानवी मनाला बोलकं करतो आणि मानवी मनाची आंदोलनं स्पष्ट करतो. शब्दाच्या रूढ सांकेतिक अर्थाच्या पलीकडे नेऊन संगीताच्या संदर्भात अर्थाला सौंदर्य प्राप्त करून देतो. थोडक्यात, वाचिक अभिनय हे नाटकाचं श्राव्य विधान आहे,

पौर्वात्य आणि पाश्चिमात्य रंगभूमीच्या स्थित्यंतराच्या काळात रंगभूमीच्या कथ्य, तंत्र, अभिनय आदी घटकांचं महत्त्व कमीअधिक होत गेलं; परंतु वाचिक अभिनयाचं महत्त्व कधीही कमी झालेलं नाही.

रूढ अर्थानं वाचिक अभिनय हा शब्दप्रयोग रंगभूमीच्या संदर्भात उपयोगात येत असला, तरी दैनंदिन व्यवहारापासून जीवनव्यवहाराच्या प्रत्येक दालनात, शिक्षण, व्यापारउदीम, प्रशासन, न्यायदान, समाजकार्य, राजकारण आणि जिथंजिथं म्हणून माणसांचा संवादसंपर्क येतो, संबंध येतो, तिथं देवाण-घेवाणीचं समर्थ, सोपं आणि साधनविरहित साधन म्हणून वाचिक अभिनयाचा उपयोग होतो.

मानवाच्या उत्क्रांतिकालापासून मानवी संस्कृतीच्या उलाढालीत मौखिक परंपरेचे फार महत्त्व आहे. ते मानवाएवढंच पुरातन आहे. लिखित, मुद्रित, ध्वनिमुद्रित चित्रफिती, ध्वनिफितीपर्यंतची भाषेला जतन करण्याची सारी शास्त्रीय साधनं असूनही मौखिक परंपरेचं आणि वाचिक अभिनयाचं महत्त्व कमी झालेलं नाही.

अभिनयतत्त्वाचा भाग गृहीत धरल्यास विवेचनासाठी वाचिक अभिनयात समाविष्ट असलेले दोन महत्त्वाचे घटक म्हणजे आवाज आणि शब्द किंवा शब्दांनी आकारबद्ध झालेली भाषा.

भाषेचा शोध लागण्यापूर्वी माणसाच्या आद्यावस्थेत परस्परांना आपलं हृद्गत समजावून सांगण्यासाठी केवळ आवाजाचा वापर केला जायचा. भाषेची जाण येण्यापूर्वी लहान मूल आपल्या क्रिया-प्रक्रिया आवाजाद्वारेच व्यक्त करतं. पशुपक्ष्यांच्या संबंधात फक्त वेगवेगळ्या आवाजांचा वापर केला जातो आणि तो अर्थपूर्णही ठरतो. भाषेचे नसले, तरी आवाजाचे संकेत पशुपक्षी, जनावरं जाणू शकतात. परप्रांतांत किंवा परभाषी प्रांतात भाषेचा गंध नसतानासुद्धा आवाजाच्या संकेतातून आदान-प्रदान केलं जातं. प्रगत समाजातसुद्धा भाषा आणि शब्दविरहित आवाज अर्थपूर्ण ठरतात, नव्हे भावनाविष्काराच्या परमोच्च क्षणी आणि भावनातिरेकाच्या वेळी फक्त आवाजाचा उपयोग अटळ ठरतो. उदा. रडणे, विव्हळणे, किंचाळणे, दचकणे, उसासा टाकणे, जांभई देणे किंवा हसणे. भाषेच्या आविष्काराच्या असमर्थतेमुळेच नाट्यात, भाषेचा विरोधाभास, भाषाविरहित आवाज आणि मौनाच्या वापराकडे अधिक कल दिसून येतो.

**आवाजाची निर्मिती :** वाचिक अभिनयातील आवाजाचं महत्त्व विशद केल्यानंतर आवाजाची निर्मितिप्रक्रिया जाणून घेणं महत्त्वाचं ठरतं.

कुठल्याही वस्तूवर आघात केल्यानंतर कंपनं निर्माण होतात. ती कंपनं भोवतालच्या हवेत भारतात आणि त्याचा कानाच्या पडद्यावर परिणाम होतो. ही जाणीव मेंदूपर्यंत पोचते आणि आपल्याला आवाज ऐकू आल्याची जाणीव होते.

कुठल्याही तंतुवाद्याचं किंवा व्हायोलिनचं उदाहरण आपल्याला घेता येईल. व्हायोलिनची धनुकली तारांना छेडते आणि कंपनं निर्माण करते. या कंपनांतून ध्वनिलहरी निर्माण होतात. या ध्वनिलहरींतून निर्माण होणाऱ्या स्वरांचा जीव अतिशय लहान असतो. व्हायोलिनच्या लाकडी पेटीमुळे या स्वराला घुमारा मिळतो आणि तो मोठा होतो. निर्माण होणाऱ्या स्वराची तीव्रता किंवा खर्ज तारांच्या लांबीवर आणि तानांवर अवलंबून असतो. त्यांच्यावर वादक आपल्या बोटांनी नियंत्रण ठेवतो. कंपित तारेची लांबी जेवढी कमी, ताण जेवढा जास्त

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तेवढी स्वराची तीव्रता अधिक. एकाच व्हायोलिनच्या आवाजात वाजवण्यामुळे फरक पडेल. तसेच एका व्हायोलिनचा आवाज दुसऱ्या व्हायोलिनपेक्षा भिन्न असू शकेल.

मानवनिर्मित स्वरयंत्रात जर ही भिन्नता आढळते, तर निसर्गनिर्मित मानवाच्या स्वरात ती भिन्नता निश्चितच आढळेल आणि म्हणूनच प्रत्येक मानवाच्या आवाजात वेगळेपणा असतो.

मानवी आवाजाच्या निर्मितीतदेखील व्हायोलिनप्रमाणेच प्रक्रिया घडते. श्वास इथं धनुकलीचं काम करतो. आवाज निर्माण करण्याच्या शक्तीनुरूप नादनलिकेचे स्नायू एकत्र येतात, त्यांना उच्छ्‌वास आघात करतो आणि कंपनं निर्माण होतात. या कंपनांना वादकाच्या बोटाप्रमाणे व्यंजनस्थानं नियंत्रित करतात आणि छाती, जबडा, चेहरा, नाकपुड्या, कवटी आणि डोक्याच्या हाडातील पोकळीद्वारे आवाजाला घुमारा येतो. व्हायोलिनच्या लाकडी पेटीप्रमाणे.

**आवाज आणि वातावरण** : आवाजाचं आणि त्याच्या सभोवतालच्या परिसराचं नातं परस्परपूरक आणि मारक असतं. वातावरणच माणसावर संस्कार घडवीत असतं. माणूस जे ऐकतो त्यावर हे नातं अवलंबून असतं. आपला कान किती तयार आहे हे आपण किती सूक्ष्मपणे ऐकतो, जाणून घेतो यावर अवलंबून असतं. या ग्रहणशक्तीवरच आवाज वापरण्याच्या शक्यता अवलंबून असतात. एकीकडे ग्रहणशक्ती तर दुसरीकडे निर्मितीशी आवाजाचा संबंध येतो. बोलताना स्नायू जेवढे अधिक लवचिक असतील, मनोवैज्ञानिक आणि बौद्धिक पातळी जेवढी परिपक्व असेल, तेवढा वाचिकावरील ताबा अधिक, तेवढा सभोवतालच्या वातावरणावर, व्यक्तींवर परिणाम अधिक.

**निवड** : माणसाचं दैनंदिन जीवन असो अथवा रंगमंचावरील पात्राचं जीवन असो, अनेक उपलब्ध गोष्टींमधून मोजक्या व नेमक्या गोष्टींची आपण निवड करतो आणि बाकी अनावश्यक बाजूला सारतो. या निवडण्या आणि टाळण्यासाठी प्रेरकशक्ती म्हणून आपल्या स्वभावगत आणि भावनिक प्रतिक्रिया, ज्या आपल्या संवेदनक्षमतेवर अवलंबून असतात, त्या व्यक्त करताना वापरताना आपल्याला बरं वाटतं, संवाद–संपर्क साधल्याचं समाधान वाटतं.

**आवाजाची प्रतिमा** : आपल्या आवाजाची स्वतःला जाणवणारी प्रतिमा ही बऱ्याच वेळा प्रत्यक्ष आवाजापेक्षा वेगळी असते, फसवी असते. ध्वनिमुद्रित केलेला आवाजसुद्धा यंत्राच्या मर्यादेमुळे प्रत्यक्ष आवाजापेक्षा वेगळा असतो. कित्येक वेळा आवाजाचा वापर योग्य न केल्यामुळे आपल्या हेतूंबद्दल आणि विचारांबद्दल गैरसमज होऊ शकतात. नेमकं काय व्यक्त करण्यासाठी कुठल्या आवाजाचा वापर करावा याची जाणीव नसते किंवा पुरेशी दक्षता घेतली जात नाही. आत्मसंतुष्ट वृत्तीमुळे किंवा अज्ञानामुळे आपण बऱ्याच वेळा स्वतःच्या आवाजावर लुब्ध असतो. तटस्थपणे आपला आवाज ऐकतो, तेव्हा आपल्या बोलण्यातील उणीवा आपल्याला जाणवतात. अगदी छोटेमोठे बदलदेखील या उणीवा कमी करू शकतात आणि देवाणघेवाणीत खऱ्या अर्थानं सुसंवाद घडवून आणू शकतात.

**आवाजनिर्मिती आणि श्वसन** : निर्दोष आणि योग्य आवाजासाठी निर्दोष श्वसनाची नितांत गरज असते. श्वास हा आवाजनिर्मितीत इंधनाचं काम करतो. योग्य श्वसनानं माणसाचं सारं शरीर आवाजाशी एकरूप होऊ शकतं आणि आवाजाला निश्चिती, धार, सुस्पष्टता देऊन हेतूंची साध्यता करू शकतं. निर्दोष श्वसन ही आवाजाची गुरुकिल्ली आहे. उत्तम श्वास म्हणजे भरपूर श्वास हे समीकरण नसून योग्य आणि प्रमाणबद्ध श्वास. श्वासाचं माणसाच्या मनाशी नातं असतं. योग्य आणि उत्तम श्वास सुद्य ताणविरहित शरीरातच शक्य आहे. पाठीचा वरचा भाग, खांदे, मान, चेहऱ्याच्या कुठल्याही भागावर असलेल्या अनावश्यक ताणातून स्वरदोष निर्माण होतात. घुमाऱ्यावर विपरीत परिणाम होतो. शब्दनिर्मितीत स्वरयंत्र शक्यतो नेहमी सैल असावं आणि ज्या भागाचा वापर विशिष्ट उच्चारासाठी आवश्यक असेल तेवढंच कार्यरत व्हावं. यामुळे सुस्पष्ट शब्दाबरोबर शक्तीचा व्ययही वाचतो.

**शब्द** : आवाजाच्या विचारानंतर महत्त्वाचा घटक म्हणजे आवाजाद्वारे निर्माण होणारे, आवाजाला अर्थवाही बनविणारे शब्द. शब्दाचे साहित्य



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणि कवितेत येणारे गुणधर्म मान्य केल्यास वाचिक अर्थापासून ध्वनित अर्थापर्यंत लिखित आणि बोलभाषेतील शब्दाच्या आनुषंगिक आणि प्रासंगिक छटा मान्य केल्यास, शब्दाचा वापर विशिष्ट परिस्थितिजन्य हेतूंच्या पूर्तीसाठी असतो हे मूलतत्त्व. शब्दांच्या संग्रह-संवर्धनाबद्दल भाषाशास्त्रात बरंच विवेचन येतं. शब्दाचं वाचिक अभिनयसामर्थ्य वाढविण्यासाठी सर्व शैलींच्या गद्य-पद्यांच्या मोठ्यानं वाचण्याची सवय असावी. आपला आवाज सतत वापरल्यानं, इतरांचे आवाज सतत ऐकल्यानं शब्दांच्या वापरातील योग्यायोग्यतेची कल्पना येते.

**उच्चारण :** बोलताना स्वर-व्यंजनाचा अचूक वापर, बोलण्यासाठी योग्य ध्वनींची निवड ही प्राथमिक बाब ठरते. चुकीच्या ध्वनींची योजना चुकीची पात्रयोजना निर्देशित करते, चुकीचे विचार सादर करते. अभिनेत्यानं किंवा बोलणारानं प्रथमतः सर्वमान्य उच्चारांचा अभ्यास आणि व्यासंग वाढवायला हवा. लिखित भाषेतील किंवा व्यवहार भाषेतील अर्थोचित, प्रसंगोचित बदलांप्रमाणे उच्चारांना योग्य मुरड घालणं नंतर सहज शक्य होतं.

**घुमारा किंवा आवाजाची फेक :** दैनंदिन व्यवहारांत, विशेषतः घरात शब्द वापरताना ५ फूट ते १० फूट आवाज पोचण्याची गरज असते. रंगमंचावर किमान ५० फूट ते १०० फुटांपर्यंत आवाजाची फेक आवश्यक असते. काय बोललं जातंय याकडे प्रेक्षक आपोआप आकर्षित व्हायला हवा. कुठलाही ताण न पडता ऐकायला आलं, तर प्रेक्षक आपली शक्ती ते का बोललं गेलं, कशासाठी बोललं गेलं याचे अर्थ लावण्यासाठी वापरू शकतो. न ओरडता मोठ्यानं बोललेला आणि हळुवार असूनही सुस्पष्ट ऐकू जाणारा आवाजच फक्त इच्छित परिणाम साधू शकतो.

**विविधता :** स्वरांमधील आरोह, अवरोह, घनता, आघातगती, पोत, रंग यांच्या वापरातून वाचिकेचे वेगवेगळे आकृतिबंध तयार होतात. एकसंच प्रकारचे आकृतिबंध साचेबद्ध म्हणून कंटाळवाणे. पुनरावृत्ती टाळून, विविधतेनं केलेला आकृतिबंधांचा कुशल वापर वाचिकाला जिवंत, महत्त्वपूर्ण आणि प्रवाही करतो.

**ताल :** सजीवाच्या जगण्याच्या स्पंदनाप्रमाणे वाचिकाला ताल आणि लयाची गरज असते. ताल म्हणजे जलद किंवा हळू लयीत बोलणे नव्हे. शब्द, मौन आणि प्रत्येक शब्दाच्या लांबी-रुंदीतून ताल व्यक्त होतो. तालाचा अभाव म्हणजे संपूर्ण निर्जीवपणा किंवा मृत्युवत अवस्था. तालाचा प्रमाणाबाहेर वापरही तेवढाच धोकादायक, तो व्यक्तिविशेषाचा मानसिक आणि शारीरिक असमतोल व्यक्त करतो, घबराट व्यक्त करतो, अर्थवत्ता आणि योग्य भावाचं वहन होत नसेल, तर जलद बोलणंही परिणामहीन ठरेल किंवा नितांत संथ, योजनाबद्ध बोलूनही नाट्यपूर्ण परिणाम साधता येईल. मौनस्थळांचा वापर महत्त्वाच्या शब्दाआधी किंवा नंतर येऊन शब्दाचं महत्त्व वाढवितो किंवा दोहोंनाही सारखंच महत्त्व प्रदान करतो.

वाचिक अभिनयातील मौनस्थळं ही नेहमीच व्याकरणाच्या विरामचिन्हांचा वापर करतातच असं नाही. कित्येक वेळा नाट्यवत्ता वाढविण्यासाठी नाट्यविरामांचा आणि मौनाचा वापर केला जातो. शब्दाशब्दांमधील मौनस्थळं ही कित्येक वेळा शब्दापेक्षा अधिक प्रभावी ठरतात. तालाचा आणि गतीचा सुयोग्य वापर करणाऱ्या नटाचं स्थान फार वरचं मानलं गेलंय. मौनाचा अयोग्य वापर मौनाचं महत्त्व कमीही करू शकतो.

**रंग आणि पोत :** रंग आणि पोत आवाजाची जात आणि शब्दांचे गुणधर्म व्यक्त करतात. हा भावनिक गुणधर्म आहे. आवाजाच्या पोताचं शब्दाच्या जातीबरोबर योग्य नातं निर्माण झाल्यानंतर आवाजाची गुणवत्ता आणि शब्दाची अर्थवत्ता वाढते आणि वाचिकाला संगिताची उंची प्राप्त होते.

**उत्स्फूर्तता :** वाचिकातील ताजेपणा हा उत्स्फूर्ततेवर अवलंबून असतो. बोलले गेलेले शब्द ठरविल्या किंवा पाठ केल्याप्रमाणं आले, तर ऐकणाऱ्याचं औत्सुक्य संपेल. ते स्वयंस्फूर्त विचारांप्रमाणे प्रवाही असावेत. बदलणाऱ्या प्रत्येक नव्या विचाराबरोबर त्यांचा वापर इतक्या बेमालूमपणे व्हावा, की बोललेले शब्द मनाच्या प्रक्रियेचे ध्वनिरूप वाटावेत.

**वास्तवता आणि वास्तवाभास :** नैसर्गिक आणि वास्तववादी रंगभूमीवर काहीच नसतं. जे असतं, ते वास्तवाचा आभास निर्माण करण्यासाठी वापरलं


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

जातं. वाचिक अभिनय ह्यादेखील याला अपवाद नाही. रंगमंचावरील वाचिकाचा उपयोग हा जाणीवपूर्वक योजनाबद्ध असतो. जीवनापेक्षा अधिक सघन आणि संवर्धित असतो. वास्तवाभास असूनही परिणामी वास्तवापेक्षा अधिक नाट्यपूर्ण असतो.

**गुणवत्ता :** एकाच स्वरात लावलेल्या घंटा, व्हायोलिन, तंतुवाद्यं वेगवेगळ्या प्रकारचे नादपरिणाम निर्माण करतात. मानवी आवाजातसुद्धा ही गुणवत्ता आढळते.

**आघात :** प्रत्येक वाक्यात किंवा वाक्यांशात, प्रत्येक मौनस्थळातील बोललेल्या शब्दात एक महत्त्वाचा शब्द असतो; त्यावर आघात देऊन, त्याला केंद्रबिंदू मानून वाक्याची फेक केली जाते. आघात हे अर्थाप्रमाणं भिन्न असतात. तो विजेसारखा तीव्र, ढगांसारखा गडगडाटी, इंद्रधनुष्यासारखा किंबहुना, निसर्गात दिसणाऱ्या आणि ऐकू येणाऱ्या सौंदर्यस्थळांचा द्योतक असतो. बोलण्यातील आशय आघातच प्रेक्षकांपर्यंत पोचवितात. आघात हा नेहमी जोरकसच असायला हवा असं नाही. निर्जीव आघात किंवा शैलीही तेवढीच नाट्यपूर्ण ठरू शकते.

**भावभावना :** प्रत्येक शब्दाच्या भावच्छटा वेगवेगळ्या संदर्भांत बदलतात. हे बदल सूक्ष्म छटांसह पोचविण्यासाठी वरील कुठल्याही तंत्राचा वापर करता येतो.

**वाचिक दोष :** अस्पष्टता, तोतरेपणा, स्वर-व्यंजनांची भेसळ, एका शब्दाऐवजी चुकून दुसरा शब्द येणं या स्वभावगत दोषांबरोबरच वरील गोष्टींच्या अनवधानानं, अयोग्य वापरानं अनेक दोष निर्माण होतात. नाटकातील आवाजतंत्र आवाजनिर्मितीच्या अनेकानेक पद्धती आणि तंत्रं आहेत. माणसाच्या स्वरयंत्राच्या विविध प्रकारच्या हालचालींमधून अक्षरशः हजारो प्रकारचे ध्वनी निरनिराळ्या भाषांमध्ये विविध प्रकारे निर्माण केले जातात. जेवढी भाषा अधिक समृद्ध तेवढी उच्चारणपद्धतीतील विविधता. मराठी भाषेपुरता विचार करावयाचा झाल्यास मूळ स्वर आणि व्यंजनांचा विचार करावा लागेल. व्यंजनं भाषेला अर्थ देतात आणि स्वर नाद पुरवतो. नादनलिका स्वरनिर्मितीत मदत करते, तर कंठ, दात, ओठ, टाळू आणि तोंडातील विविध भागांना स्पर्श करून जीभ व्यंजननिर्मितीचे नियंत्रण करीत असते. संगीतात स्वरांचा जेवढा वापर केला जातो, त्याच्या अगदीच मर्यादित स्वरूपात नाटकात आणि बोलभाषेत केला जातो. नाट्यप्रशिक्षणात आणि अभ्यासक्रमात ज्या महत्त्वाच्या गोष्टींचा वापर केला जातो त्या खालीलप्रमाणे :–

१. **आवाजाच्या पट्टया :** तार (उंच), मध्य आणि खर्ज अशा तीनच महत्त्वाच्या पट्ट्यांच्या मिश्रणांचा रंगमंचावर वापर केला जातो. सामान्यपणे तारस्वराचा वापर बोलीभाषा आणि काव्यमय भाषेसाठी केला जातो. मध्यपट्टीचा गद्य-पद्यासाठी आणि खर्जाचा वाङ्मयीन विचारांसाठी, तात्त्विक आणि शास्त्रीय विचारांसाठी.

घुमार : घुमार आणि आवाजाची दूरवरची पोच आणि फेक गद्य, वाङ्मयीन आणि बोलीभाषेसाठी, मध्यम पद्य आणि काव्यासाठी, कमी फेक काव्यात्मतेसाठी वापरली जाते.

आवाजाच्या वेगवेगळ्या जाती वेगवेगळ्या भावस्थिती, मनोदशा व्यक्त करण्यासाठी वापरल्या जातात. चरित्रचित्रणासाठी बसका, घोगरा, सानुनासिक, किनरा, कर्कश किंवा भसाड्या आवाजाचा, तर दुसऱ्या बाजुला मधुर, मंजुळ, धारदार, भारदस्त आदी जातींचाही वापर होतो.

आवाजाच्या पट्टया, जाती, घुमाऱ्याच्या प्रमाणात गती, उच्चारण आघात, ताल, रंग, पोत, गुणवत्ता आदींचा आवश्यकतेनुसार वापर केला जातो.

२. **वर्गीकरण :** बोलणारा कोणाला उद्देशून बोलतो, कुठल्या परिस्थितीत, कुठल्या कारणासाठी, कुठल्या परिणामासाठी बोलतो यावरून ढोबळ स्वरूपाचं वर्गीकरण करता येईल. १. बोलणं, २. संभाषण, ३. संवाद, ४. अनेक पात्रांचा संवाद, ५. स्वगत, ६. आत्मगत, ७. नाट्यछटा, ८. आकाशभाषित, ९. स्वप्नामित, १०. आकाशवाणी या प्रचलितांपासून प्रेक्षकांशी प्रत्यक्ष संपर्क आदी प्रकार येतात. या ठिकाणी शब्द आणि इतर घटक तेच असून त्यांच्या उच्चारणपद्धतीतून हे भेद प्रवाही करता येतात.

३. **विचार ते परिणाम :** नाटककाराच्या मनातील विचारबीजापासून तो नाट्याच्या परिणामापर्यंतचा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रवास-आराखडा नाट्यप्रशिक्षणात कमीअधिक फरकानं वापरला जातो.

नाट्यबीज विचार व्यक्तिरूप= पात्रविचार
पात्रविचार आवाजविचार = पात्राचा रोख
पात्राचा रोख भाषा = नाटकातील संवाद
संवाद विचारांची मांडणी = नाट्यपरिणाम.

यात गद्य, पद्य, छंदात्मक, मुक्तच्छंदात्मक, काव्यमय बोलीभाषा आदी भाषाधर्मांपासून तो विषयानुरूप सामाजिक, पौराणिक, शोकात्म, सुखात्म प्रहसन, रूपकात्मक वास्तव, शैलीबद्ध व नाट्य, तालनाट्य, लोकनाट्य आदी प्रकार येतात.

नाट्यगुण – अभिनेयता हा नाट्याचा गुणधर्म किंवा नाट्यपूर्णता हा गुणविशेष केवळ नाटकातच नव्हे, तर नाटकाप्रमाणे नृत्य, मूकनाट्य, वक्तृत्व, संगीत आदी कलावंतांनी सदेह साकार करावयाच्या साऱ्याच कलांना लागू पडतो. चित्र, शिल्प आदी दृक्कलांचाही नाट्य हा स्थायी भाव किंवा सौंदर्यभाव असतो.

**भाषाविचार :** आवाज, अभिनय, यानंतर वाचिक अभिनयाचा महत्त्वाचा घटक म्हणजे भाषा. भाषा हे आवाजाचं प्रगल्भ, प्रचलित, मान्यवर रूप आहे. असं मान्य केल्यानंतर, तिच्यातील संकर आणि संक्रमणाचा विचार केल्यानंतर भाषेच्या महत्त्वाला व्यवहारजीवनात आणि रंगमंचावर नितांत महत्त्व असतं. भाषा ही बोलणाऱ्याची नाट्यार्थ वाणीद्वारे ऐकणाऱ्यापर्यंत पोचविणारी फार मोठी शक्ती आहे. रंगमंचावर नट हा बोलणारा पक्ष गृहीत धरला, तर तो बोललेल्या भाषेद्वारे दुसऱ्या नटापर्यंत आपले विचार पोचवितो. या देवाणघेवाणीत नाटकाच्या विषय-आशयाला एक ताप प्राप्त होतो. आणि तो संघर्षबिंदूकडे पोचवितो. या साऱ्यांचा सांघिक परिणाम प्रेक्षकांवर होतो. हीच प्रक्रिया व्यवहारात एका व्यक्तीपासून दुसऱ्या व्यक्तीपर्यंत किंवा व्यक्तिसमूहापर्यंत संवादसंपर्कात होत असते. महाराष्ट्रापुरते बोलायचे झाले, तर कथा, कीर्तन, पुराण, प्रवचन आणि लोककला आणि लोकनाट्य यांनी बहुविध मार्गांनी भाषेची जोपासना केली आणि लिखित आणि वाचिक अभिनयाची परंपरा समृद्ध केली. वास्तववादी कर्कश नाट्यपरंपरेलाही वाचिकाची कास सोडता आली नाही. न-नाट्यपरंपरेत उत्स्फूर्त नाट्यात ग्रोटोवस्कीच्या 'पॉवर्टी' नाटकात, बादलबाबूंच्या 'रस्ता' नाटकातसुद्धा वाचिकाचा एका वेगळ्या पद्धतीनं स्वीकार केलेला दिसतो. बेकेट, आयनेस्को, जेने, अल्बी, पिंटर आदींच्या न-नाट्यांत रूढ भाषेच्या रूढ परंपरेला तडा गेला असला, प्रचलित शब्दांचे प्रमाण कमी झाले असले, तरी आवाजाच्या नव्या अर्थवत्तेचा, एका वेगळ्या भाषेचा स्वीकार केलेला दिसतो.

बोलीभाषेत विशिष्ट सांस्कृतिक बैठक भाषेला बदलताना दिसते. लिखित शब्दाचे रूप इथं अनेक कारणांसाठी, अनेक कारणांमुळे बदललेले दिसते. समाजातील विविध स्तरांतील लोकांत रूढ शब्द, सोप्या पद्धतीने उच्चारण्याची किंवा ते शब्द अधिक अर्थवाही बनविण्याची धडपड दिसून येते. ही प्रथा विनासायास सहज गरज भागविणारी म्हणून महत्त्वाची. तिचा ताळमेळ लिखित शब्दापेक्षा त्या शब्दातील कृतीशी किंवा प्रक्रियेशी अधिक जवळचा असतो. म्हणून जेव्हा ही कृती किंवा प्रक्रिया बदलते, तेव्हा त्यानुसार त्या शब्दाचं वाच्यरूपही आपोआप बदलतं. जसं, चमचा चळवळ इत्यादी. या पद्धतीचा महत्त्वाचा घटक म्हणजे कृतिरूप शब्द. कृतीच्या किंवा उपयोगितेच्या जवळीकतेने शब्दांची रूपं बोलीभाषेत बदलतात. प्रत्येक समाजात एक पदसिद्ध हावभावांची आणि हालचालींची भाषा असते. ("या" किंवा "जा" या शब्दाबरोबर हातांची हालचाल, पायांची हालचाल, पायाची ठेवण, डोळ्यांचा रोख, चेहऱ्याचा कोन यावरून विशिष्ट संस्कृतीची जाणीव होते) (वनप्रदेश, डोंगराळ प्रदेश, समुद्रकिनारा, सुसंस्कृत शहरी समाज इ.) कृतिरूप शब्दांची, अर्थगर्भ शब्दांची बोलीभाषेत विपुलता असते आणि अशा शब्दांमधून आणि वाक्प्रचारांतून बोलीभाषा समृद्ध होते. (दशावतारातील चुळबूळ, बदबद, कामगाराचं हय्या हो) हे आणि असे वाक्प्रचार स्वयंपूर्ण अभिनयाचे भागखंड असतात. कृतिगर्भ शब्दाचा आणखी एक विशेष म्हणजे सारं अनुभवविश्व तो समृद्धपणे साकार करतो. जीवनाच्या सादप्रतिसादांचं त्यात दर्शन घडतं. लोककलांमध्ये अशा नाट्यगर्भ शब्दांचा वापर विपुल असतो. कलात्मकतेपेक्षा त्यांचा भर व्यावहारिकतेवर अधिक असतो. त्यातील

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सशक्तता ही नैसर्गिकतेतून जन्माला येते म्हणून त्याच्या वास्तवतेचा दर्प तिथे जाणवतो.

भरताच्या वाचिक अभिनयाबद्दल काही गोष्टी ध्यानात ठेवायला हव्यात. भरताच्या काळी शैली, गुहाकार नाट्यगृहाची रचना आणि ध्वनिसंवर्धकाचा अभाव, या गोष्टींमुळे फक्त पट्ट्याचा चढउतार आणि आवाजाच्या घुमाऱ्यातील चढाव, उतार या दोन मितांचाच फक्त वापर प्रकर्षानं दिसून येतो. आवाजाच्या पोताचा, जातीचा आणि अधिक तरल रंगाचा वापर कितपत होत असेल, याबद्दलचे प्रश्न अनुत्तरीत राहतात. नाट्यधर्मी नाट्यपद्धतीत नृत्याच्या किंवा नृत्यसदृश्य हालचालींच्या वापरामुळे पोत, जातीच्या विविध छटांचा वापर अशक्यप्राय वाटतो. ह्याच कारणामुळे आवाजाच्या जातीबद्दलचे, पोताबद्दलचे मनोविश्लेषणात्मक विवेचन अभावानेच आढळते.

दुसरा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे नाट्यशास्त्रानुसार अंगिक आणि आहार्य अभिनयापेक्षा वाचिक अभिनय कमी प्रतीकात्मक आणि म्हणूनच अधिक नैसर्गिक आणि प्रभावी वाटतो.

प्रेक्षकः– नाट्यमय वाचिक अभिनयात प्रेक्षक हा आपल्या दाद, उसासे, श्वासोच्छ्वास, विविध आरोहावरोहांनी नाट्यप्रक्रियेत भाग घेऊ शकतो. आणि अप्रत्यक्षपणे गुणवत्तेला बांध घालू शकतो अथवा गुणवत्ताही वाढवू शकतो. प्रेक्षागृहाचे आकारमान नाटकाच्या गतीवर प्रत्यक्ष निर्बंध आणते. जेवढा अधिक प्रेक्षकसमुदाय तेवढी अधिक वाचिक अभिनयाची रचनाबद्धता हवी. रचनाबद्धता प्रेक्षकांना न समजलेल्या गोष्टी भरण्यास कारणीभूत ठरते. निश्चित अशा स्तब्ध, मौन, निःशब्द स्थलांची योजना ही प्रेक्षकांवर पकड मजबूत करते आणि प्रेक्षकांची नाटकावर. नाटकातील मौनस्थले ही केवळ व्याकरणप्रणीत विरामचिन्हे नसतात, तर नटाच्या परिणामकारकतेची आणि प्रेक्षकांच्या प्रतिक्रियेची ती सार्थ संधिस्थळे ठरतात. मौनस्थलांच्या लघुगुरुतेबद्दल विचार करताना बरंच विस्तारानं विवेचन केलेलं आहे. आवाजाच्या पट्ट्या, घुमारा आणि पोताच्या विविधतेचा वापर ध्वनिवर्धकाच्या साहाय्याने आज सुकर झाला असला, तरी गतीबद्दल मात्र फारशी प्रगती दिसत नाही.

नाटक, चित्रपट, दूरदर्शन आणि आकाशवाणी नाटकाचा स्थायीभाव म्हणजे नाटक ज्याक्षणी प्रेक्षकापुढे सादर केल जातं, तेवढ्याच क्षणापुरतं ते जिवंत असतं. नंतर उरतात ती छायाचित्रं, ध्वनिफिती किंवा प्रयोगांच्या स्मृती.

नटाचं शरीर हेच महत्त्वाचं माध्यम, साध्य आणि साधन. नाटक हे अतिशय प्रतीकात्मक आणि संकेताधिष्ठित. खोटं असूनही खरं मानण्याची, विश्वासार्ह मानण्याची प्रेक्षकांची तयारी नाटकात गृहीत धरलेली असते.

नाटकाच्या प्रयोगात प्रेक्षकांचा सहभाग, त्यांच्या प्रतिक्रिया, दाद, नापसंती, निःश्वास आदींमधून, तसेच मंत्रमुग्ध स्तब्धतेमधून व्यक्त होत असतो. नाटक आणि प्रेक्षक हा नवा अवतार असतो. नाटकात प्रकाश, नेपथ्य, पार्श्वसंगीत आदी अंगांनी तंत्राचा वापर होतो; पण तो केवळ नाट्यपरिणामांना अधोरेखित करण्यासाठी. याउलट चित्रपट, दूरदर्शन, आकाशवाणी ही माध्यमे पूर्णपणे यंत्रनियंत्रित.

चित्रपटात निवडक चित्रांची आणि ध्वनिलहरींची मांडणी दृष्टिसातत्याच्या आणि ध्वनिसातत्याच्या तत्त्वावर कुठल्याही कृतीच्या सत्यतेचा आभास निर्माण करते. चित्रपटाचा जन्म १८९५ सालचा, तर नाटक हे मानवी संस्कृतीएवढं पुरातन.

प्रत्येक सेकंदाला चोवीस चित्रचौकटी आणि आणि अठ्ठेचाळीस अंधारजागा या प्रमाणात दृष्टिसातत्याच्या तत्त्वावर चित्रपटाचं अस्तित्व अवलंबून असतं.

कॅमेऱ्याच्या वापरानं आपण वस्तू किंवा घटनेच्या जवळ पोचतो. कश्मीरच्या वनश्रीत गाणाऱ्या नायिकेबरोबर किंवा कडेकपारीतून मार्गक्रमण करणाऱ्या नायकाबरोबर आम्ही जाऊ शकतो. कॅमेरा हा एकाच वेळी चित्र निर्माण करणाऱ्याच्या आणि बघणाऱ्याच्या डोळ्यांचेही काम एकाच वेळी करतो. पृथ्वीपासून अवकाशातील कुठल्याही घटनेचं दर्शन चित्रपटात क्षणार्धात घडतं. अवकाशाच्या व्यापाला कमी करण्याचं काम चित्रपट करतो.

चित्रपटातील चित्रांच्या जडमाध्यमाला समूहांकनाच्या तत्त्वानुसार तरलतेची आणि भावनिकतेची



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जोड दिली जाते. कॅमेरा हा प्रेक्षकांना कृतीच्या अगदी मध्यभागी पोचवितो.

चित्रपटातील मूलघटक:– १) दृश्यविभाजन, २) कॅमेऱ्याच्या जागा, ३) विविध भिंगांचा वापर, ४) प्रतिमेचं चौकटीशी नातं, ५) रंग आणि पोत, ६) प्रत्येक दृश्याची लांबी.

एडिटिंग किंवा जोडबांधणीच्या तत्त्वांनी वेगवेगळ्या दृश्यखंडांतून सातत्याची भावना निर्माण होते. नटाला इथे फारसे काही करावे लागत नाही. नाटकासारखं प्रगट करावं लागत नाही. प्रेक्षकाचा सहभाग चित्रपटाला घडवू किंवा तोडू शकत नाही. आकाशवाणी आणि दूरचित्रवाणीवर चित्रपटाच्या बऱ्याच तंत्रांचा वापर केला जातो. आकाशवाणी ध्वनिलहरींच्या गुणवत्तेचा वापर करते, तर दूरचित्रवाणी ध्वनी आणि दृक्‌लहरींचा.

---

## साभार पोच

* "'बहिष्कृत भारता' तील डॉ. आंबेडकरांचे स्फुट लेख"– संपादन रत्नाकर गणवीर; रत्नमित्रा प्रकाशन, आर. बी. ४, ९९६ बी, सी रोड, ४० बंगला, भुसावळ, जि. जळगाव; १९८१; पृ. २९४; किं. ३६ रु.

* 'भजन'– नरहर कुरुंदकर; श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे ३०; १९८१; पृ. १२५ किं. रु. १७·५०.

* 'कंदुकूरि वीरेशलिंगमु' (संक्षिप्त आत्मकथा) संक्षेपकार कोडवटिगंटी कुटुंबराव; अनु. इंदुमती केळकर, प्रका. नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया, ए– ५ ग्रीनपार्क, नवी दिल्ली– १६; १९७९; पृ. १५१; किं. रु. १२·५०.

* 'ढग पांगले'– मूळ आसामी लेखक योगेश दास; मराठी अनु. सुमती सरन; प्रका. नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया, नवी दिल्ली– १६, १९७९; पृ. १३६; किं. रु. १०·५०.

* 'अनादी' (कवितासंग्रह) – अर्जुन कांबळे, तक्षक प्रकाशन, १२ म्युनिसिपल क्वार्टर्स, चोवशी हॉस्पिटल कंपाउंड, मार्वे रोड, मालाड (प.); मुंबई– ४०००६४; १९८१; पृ. ६४; किं. १० रु.

* 'समाजवादाचे तत्त्वज्ञान' – मॉरिस कॉर्नफोर्थ; मागोवा प्रकाशन, १२५९/२, जं. म. रस्ता, पुणे ४११००४; १९८१; पृ. ६०, किं. ३ रु.

* 'तीन पथ-नाटिका' – अरविंद विश्वनाथ; कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, १९८१; पृ. ६०, किं. ६ रुपये.

* 'विदर्भ संशोधन मंडळ'– वार्षिक १९८०; संपा. प्रा. श्री. मा. कुलकर्णी; प्रकाशक कार्यवाह वि. सं. मंडळ, नागपूर; पृ. २८४; किं. १५ रु.

* 'ओढ' – अशोक प्रभाकर डांगे; कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे ३०, १९८१; पृ. १७१, किं. १२ रुपये.

* 'आपले काम आपले जीवनसर्वस्व' – स. आ. सप्रे; नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया, नवी दिल्ली; १९८०; पृ. ८५, किं. १२ रु.

* 'बर्ट्रांड रसेल' – सु. वा. बखले; दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, ४५६ रविवार पेठ, पुणे ४११००२; १९८१; पृ. १६५; किं. २५ रु.

* 'गर्भफूल' – (कथासंग्रह) रोहिणी कुलकर्णी, अमेय प्रकाशन, नागपूर; १९८१; पृ. १३२; किं. १५ रुपये.

---




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नभोनाटयरूपांतर आणि नाटयरूपांतर : भाषिक प्रश्न

पुष्पा भावे

नभोनाटयरूपांतर आणि नाटयरूपांतर या दोन्हीच्या संदर्भात उपस्थित होणारे काही प्रश्न काहीसे वेगळ्या स्वरूपाचे असल्यामुळे ते या निबंधात मी अलगपणे मांडीत आहे. तसेच ही चर्चा प्राधान्याने भाषिक प्रश्नाविषयीची असली, तरीही नभोवाणी या माध्यमाचे स्वरूप विशद केल्यामुळे काही प्रश्न अधिक स्पष्ट होतील असे वाटते. कारण नभोनाटयरूपांतर या शब्दात कथा वा कथाकाव्य वा कादंबरी, नाटक याचे नभोनाटयात रूपांतर अभिप्रेत आहे. म्हणजेच या रूपांतराचे स्वरूप माध्यमाशी निगडित आहे.

नभोवाणी या माध्यमाविषयी नकळत श्रोत्यांच्या काही सवयी निर्माण झालेल्या आहेत. नभोवाणी पार्श्वभूमीसारखी चालू ठेवून श्रोते आपले इतर अनेक उद्योग आटपीत असतात. नभोवाणीवरील गाण्यांसारख्या इतर कार्यक्रमांना हे फारसे त्रासदायक नसेल; परंतु नाटक मग ते प्रेक्षागृहातील असो वा नभोवाणीवरील असो, हेतुपूर्वक ऐकणाऱ्या श्रोत्यांची मागणी करीत असते. नभोवाणी हे माध्यम घरात पोहोचत असल्याने त्याला एक प्रकारची अनौपचारिकता प्राप्त होते. नभोनाटय सादर करताना ही अनौपचारिकता प्राप्त होते. नभोनाटय सादर करताना आणि तत्पूर्वी त्याची संहिता तयार करताना ही अनौपचारिकता छेदून वा तिचा प्रत्यक्ष नाटयात्म वापर करूनच पुढे जावे लागते. किंबहुना, नभोनाटयाच्या संहितेला पुढे मांडलेल्या एका द्वंद्वाला सतत सामोरे जावे लागते. नभोनाटय घरात जात असल्याने व्यक्तिगत जवळीक निर्माण करू शकते, तर पात्रांचे चेहरे न दिसल्याने त्यास एक प्रकारे व्यक्तिभावरहित स्वरूपही प्राप्त होते. नाटयसंहितेतील भाषिक निवड ही वरील प्रश्नांचा शोध घेणारी असावी लागते. या प्रश्नांप्रमाणेच इतरही आनुषंगिक प्रश्न निर्माण होतात. नभोवाणी हे खऱ्या अर्थाने समूहापर्यंत पोहोचणारे माध्यम आहे, त्यामुळे ज्या श्रोत्यांशी संवाद साधावयाचा त्यांच्या मूळ भाषाद्रव्याची कल्पना करणे फार अवघड आहे. नाटयगृहात नाटक सादर केले जाते, तेव्हा नाटयगृहाचे स्थळ, प्रयोगाचा दिवस, वेळ यामुळे काही मर्यादेत एकजिनसी श्रोतृवर्ग असू शकतो. याउलट, आकाशवाणी हे शहरापासून ग्रामीण भागापर्यंत वेगवेगळ्या स्तरांवर ऐकले जाणारे माध्यम असल्यामुळे भाषिक प्रश्नांची चर्चा करताना उपस्थित होणारा महत्त्वाचा मुद्दा — भाषिक संवाद कोणाशी किंबहुना कोणाकोणाशी साधावयाचा असतो ?

नभोनाटय आकाशवाणीवर विविध कार्यक्रमांत. वापरले जाते. उदा. कामगारांसाठी, वनितामंडळ, शेतकऱ्यांसाठी वा मुलांसाठी होणाऱ्या कार्यक्रमांत, अशा प्रत्येक कार्यक्रमात संवादाचे लक्ष्य वेगवेगळे आहे. केवळ श्रोत्यांचा समूह वेगळा आहे असे नाही, तर कार्यक्रमातून पोहोचविण्याचा आशयही वेगळा आहे. या नभोनाटयांतून केला जाणारा प्रयत्न कधी त्या त्या श्रोत्यांच्या समूहाला परिचित अशाच वातावरणात नेण्याचा असेल, तर कधी परिचित वातावरणाचा आधार घेऊन नव्या विचाराकडे, क्वचित संकल्पनांकडे नेणाराही असेल. यांतल्या प्रत्येक प्रयत्नात समोर येणारे प्रश्न वेगवेगळ्या स्वरूपाचे असतील. तरी चर्चेच्या सोयीसाठी आपण सर्वसाधारण प्रश्न एकत्रच मांडुया.

कथा-कादंबरी इत्यादी रूपांचे नभोनाटय करताना उपस्थित होणारे प्रश्न :

— नभोनाटय स्वरूपात वातावरण, स्थलाभास, पात्रांच्या हालचाली हे सारेच भाषेतून आणि ध्वनिसंकेतांच्या आधारे व्यक्त करावे लागते.

— मात्र कथा–कादंबरी जर निवेदकाचा आश्रय घेणारी असली, तर नभोनाटयातही तो निवेदक वापरता येतो ( विविध शैलींचा वापर ).

— हे रूपांतर करताना उच्चारित शब्द योजूनही ते व्यावहारिक संभाषणापेक्षा अधिक अर्थघन



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असण्याची काळजी संहिताकाराला घ्यावी लागते. अर्थाच्या नेमकेपणाविषयी काहीशी उदासीन असणारी दैनंदिन संभाषणाची भाषा जशीच्या तशी नाट्यात वापरणे अवघड असले, तरी प्रसंगी ती नाट्योपयोगी ठरू शकेल. एका बाजूला ' नाटकी ' भाषा आणि दुसऱ्या बाजूला आज सामान्यपणे वापरली जाणारी निर्घन संभाषणभाषा यांतून तोल साधत नभोनाट्याच्या भाषेला जावे लागते.

नभोनाट्य एखादा सुस्काराही श्रोत्यांपर्यंत पोहोचवू शकते हे लक्षात घेता या माध्यमात अल्पाक्षरसामर्थ्याला महत्त्वाची जागा मिळाली पाहिजे. परंतु प्रत्यक्षात खूप शब्दवंबाळ संवाद म्हणजे श्रुतिका असेही समीकरण दिसते.

— तसेच श्रुतिकांमध्ये वापरली जाणारी मराठी वाक्यांची लयमोडणी हा एक स्वतंत्र विषय आहे. श्रोत्यांना समजावून सांगण्यासाठी मराठी वाक्यरचनेतील नैसर्गिक वळणे बदलून कृत्रिम खटके, खोटा लाडिकपणा वापरला जातो, तो आज नभोवाणीकडून नुकतेच व्यासपीठावर वा रंगमंचावर येणाऱ्या बाल वा तरुण वक्त्यांपर्यंत आलेला आहे. महाविद्यालयात येणाऱ्या विद्यार्थ्यांना, विशेषतः मुलींना या नभोवाणी-मराठीचा विसर व्हावा यासाठी बरेच काही करावे लागते. मुलांसाठी आणि महिलांसाठी केल्या जाणाऱ्या कार्यक्रमांत भाषेचे हे कृत्रिम वळण विशेष ऐकू येते. कृतक साहित्यिक संस्कार नभोवाणीवरील मराठीची अविश्वसनीयता अधोरेखित करतात. मराठीची ही उच्चारसरणी क्वचित प्राथमिक शाळांतील शिक्षिकाही वापरताना दिसतात. म्हणजेच त्या उच्चारांचे संस्कार पसरत जातात. ही मराठी वाक्यरचनेची मोडणी प्रत्यक्षात झाली कशी, रूढ कशी झाली हा संशोधनाचा विषय आहे. या वाक्योच्चारसरणीविषयी माझे आक्षेप पुढीलप्रमाणे आहेत.

१) नभोनाट्यात वाक्याच्या नैसर्गिक लयीचा शोध घेणे बाजूला राहून कृत्रिम लय लादली जाते. ही लय संवादात अडसर बनते.

२) लेखनभाषेचे रूपांतर नभोनाट्यात संवादभाषेत व्हावयास हवे. उलट, संवादभाषेवर लेखनभाषेचे कृतक संस्कार होतात.

३) मराठी भाषेचा स्वाभाविक थेटपणा या अनेक संपर्कमाध्यमांना न कळल्याने हळूहळू लोकस्मरणातून जात चालला आहे.

४) भाषेच्या अशा मोडणीमुळे नको तिथे भावनात्मक प्रतिसाद मिळून विचार बाजूला पडतो.

५) नभोनाट्यात एक पात्र दुसऱ्याशी बोलत असते. ते पात्र निवेदक नसेल, तर थेट श्रोत्यांशी बोलत नसते– याचे भान भाषेच्या उपयोजनात दिसत नाही.

नभोनाट्य ज्या मूळ लिखित संहितेचे रूपांतर असते तिचा वाचकवर्ग मर्यादित असतो. त्याच्या संदर्भात काही पूर्वकल्पना गृहीत असतात. काही वाङ्मयीन संकेत त्यास परिचित असतात. अशा संहितेचे रूपांतर नभोवाणीसाठी करताना यातील अनेक शब्द पारखून घेतले पाहिजेत. सोपे शब्द वा सोपी भाषा ही कल्पना फारच सापेक्ष आहे.

भाषेतील शब्द हा स्फटिकाप्रमाणे समाजजीवनातील काही परंपरा, संकेत यांनी घडविलेला असतो त्या शब्दामागील हे द्रव्य अपरिचित असेल, तर शब्द सोपा कसा होईल ? नभोनाट्यातच नाही, तर आपल्या सर्वसाधारण भाषिक व्यवहारात आपण संस्कृत, अध्यात्म, वाङ्मय, धर्मकल्पना यांचे ज्ञान गृहीत धरतो हे आज समूहाला सामोरे जाताना व्यवहार्य आहे का ? नभोवाणीवर तर असे शब्द सर्रास वापरले जातात, तर काही नागर कल्पनाही अनागर श्रोत्यांसाठी प्रक्षेपित केल्या जाणाऱ्या कार्यक्रमांत अनवधानाने वापरल्या जातात. हे नागर श्रोत्यांविषयीसुद्धा खरे आहे. शब्दांना असणाऱ्या कल्पनांसह चर्चेच्या संदर्भात आज महाविद्यालयीन विद्यार्थीसुद्धा इतका वंचित आहे की, इतर स्तरांवरील नागर श्रोत्यांच्या शब्दसंपत्तीची कल्पना येऊ शकते.

इथे मी असे सुचविण्याचा प्रयत्न करीत नाही, की नभोनाट्याच्या भाषेने केवळ समाजभाषेचे प्रतिबिंब असावे. परंतु नवे शब्द, नव्या संकल्पना हेतुपूर्वक वापराव्या लागतील, त्यासाठी पुढील काळजी घ्यावी लागेल.

— विविध श्रोतृवर्तुळाची शब्दसंपत्ती संशोधनाच्या मार्गाने निश्चित करणे.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

— त्यातील सुप्त किती आणि जागृत किती हे निश्चित करणे.

— त्यातील सुप्त शब्दसंपत्तीच्या आधारे वा अन्य मार्गाने जागृत शब्दसंपत्ती वाढविण्याचा प्रयत्न करणे.

— त्याहूनही महत्त्वाचे वेगवेगळ्या श्रोतृगटांत जी शब्दसंपत्ती आहे, परंतु जी मराठी भाषेच्या सामूहिक प्रचारात नाही, अशा शब्दांचा वापर करणे : उदा. व्यवसायगटांतील शब्द.

— नभोनाट्याच्या माध्यमातील शब्द चटकन विरून जातो, म्हणून नवा शब्द वापरताना तो जुन्या परिचित शब्दाचे बोट धरून येत आहे याची काळजी घेणे आवश्यक आहे.

— नवी संकल्पना वापरावयाची झाल्यास ती रुजण्यासाठी जरा आधी खोल आळं परिचित कल्पनांच्या नकारात्मक वापराने करून मगच पुढे जाता येईल.

— शेवटी हा प्रश्न केवळ भाषिक नसून समाज-मानसाच्या गुंतागुंतीच्या अभ्यासाचा आहे.

परंतु नभोनाट्यात वा इतर कार्यक्रमांत भाषे-विषयीचा जाणीवपूर्वक प्रयत्न महत्त्वाचा आहे. कारण या माध्यमातून होणारे भाषासंस्कार अजा-णता सहजपणे आत्मसात केले जातात.

आता या विवेचनाच्या दुसऱ्या भागाकडे आपण वळुया. नाट्यरूपांतर हा शब्द दोन प्रकारे वापरला जातो. कादंबरी वा कथा या वाङ्मयीन रूपाचे नाट्यात रूपांतर आणि एका भाषेतील नाट्यकृतीचे दुसऱ्या भाषेत भाषांतर न करता रूपांतर करण्याचा प्रयत्न हे दोन्ही नाट्यरूपांतर या शब्दाने सूचित होतात. यातील पहिला जो अर्थ आहे – अन्य वाङ्मयीन रूपातून नाट्यात रूपांतर त्याचा आधी विचार करू.

या नाट्यरूपांतराच्या संदर्भात अनेक मूलभूत वाङ्मयीन प्रश्न निर्माण होतात; परंतु ते तूर्त बाजूला ठेवून आपण अनुषंगाने निर्माण होणाऱ्या भाषिक प्रश्नांचाच विचार करुया. ज्या कथा वा कादंबरी-वरून नाट्यरूपांतर केले जाईल, त्या कथा-कादंबरीच्या स्वरूपावर हे प्रश्न बरेच अवलंबून राहतील. शिवाय नाट्यरूपांतराच्या संदर्भात प्राधान्याने कथाकादंबरीचा विचार आपण करीत असलो, तरी आज काव्याच्या नाट्यरूपांतराचेही प्रयोग होत आहेत ( आय. एन. टी. नारायण सुर्वे यांच्या कवितेवरील कार्यक्रम वा अनुया पालेकर यांचा ' क्षोभ '). मूळ कृतीच्या भाषिक पोताच्या संदर्भात नव्या कृतीतील भाषेचा विचार करावा लागेल. बहुधा मूळ कृतीत भाषा ही एका व्यक्ति-मत्त्वाची असते, तर नाट्यरूपांतरात ती बहुमुखी व्हावी लागते. मूळ साहित्यकृती असल्याने ती वाङ्मयीन परंपरेचे संकेत घेऊन येते, तर नाट्य-रूपांतरात ती सामाजिक व्यवहाराशी नाते साधणारी आणि तरी एका अर्थपूर्ण पातळीवर वावरणारी भाषा असावी लागते. नाट्यरूपात भाषेचे नाते एका त्रिकोणात निर्माण होते. नाटककाराला आविष्कृत करावयाचा अनुभव त्या अनुभवाची जात, निर्माण केलेल्या पात्राची स्वभावकृती आणि नटाच्या आवा-जाची जात, प्रेक्षकांची भाषिक जाणीव आणि संस्कार असे तीन महत्त्वाचे बिंदू असतात. ज्यावेळी कथा-कादंबरीचे नाट्यरूपांतर होते, तेव्हा मूळ कृतीतील विवरणात्मक निबंधशैलीशी वा प्रसंगी ललित निबंध-शैलीशी असणारे भाषेचे नाते सोडून नाट्यभाषेशी जोडावे लागते. त्यातून कादंबरीकार वेगळा आणि नाट्यरूपांतरकार वेगळा असेल, तर भाषेच्या मागील व्यक्तिमत्त्वातील बदलामुळे हा प्रश्न अधिक गुंता-गुंतीचा होतो. याशिवाय मराठी भाषिक परंपरे-तील काही अडचणी आहेत. कथा–कादंबरीत वा काव्यात मनातील विविध प्रतिक्रिया उलगडून दाखविताना लेखक एखाद्या पात्राचे जे मनोभाव व्यक्त करतो, तेच जर नाटकात त्या पात्राच्या तोंडी संवादरूपात व्यक्त झाले, तर कृत्रिम वाट-तात. याला मी मराठीची अडचण असं का म्हणते, हे स्पष्ट करणे आवश्यक आहे. मराठी ही स्पष्ट-वक्त्या माणसांची भाषा असेल, पण मानवी नात्या-विषयी ती फार संकोची आहे. प्रेम–माया–स्पर्श या गोष्टी शब्दांत व्यक्त करताना एक प्रकारचे अवघड-लेपण या भाषेला येते. त्यामुळे मराठी माणसाला नाटकातले संवाद चटकन नाटकी वाटू शकतात. स्त्री–पुरुष संबंधाविषयीची मुग्धता हा मराठीचा स्वभाव आहे. (त्याचे दुसरे टोक शिव्यांच्या भाषेत आहे.) त्यामुळे हाडामांसाची माणसे एकमेकांसमोर



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपल्या मनात जे आहे ते स्पष्ट शब्दांत व्यक्त करतात हे मराठी मनालाच विचित्र वाटते.

याशिवाय लेखकाश्रयी निवेदनातून पात्रांविषयक व्यक्त झालेले भाव वेगवेगळ्या स्तरांतील पात्रांच्या तोंडी कसे काय घालावयाचे हा नाटयरूपांतरातील कूटप्रश्न असतो.

आता आपण दुसऱ्या प्रकारच्या प्रश्नाकडे म्हणजे भाषिक नाटयरूपांतराच्या प्रश्नाकडे वळुया. भाषांतर की रूपांतर हा वाद आधुनिक मराठी साहित्याच्या प्रारंभकालापासून चालू आहे. हा प्रश्न विशेषतः परदेशी भाषांतील नाटयकृतींच्या संदर्भात उपस्थित होतो. केवळ एखाद्या परकीय भाषेतील नाटयकृतीचे यांत्रिकपणे भाषांतर केले असता तो नाटयानुभव आपलासा होईल का? की त्यासाठी मूळ नाटकातील पात्रांना आपल्या भाषेत बोलण्यासाठी आपल्या जीवन–चौकटीत स्थापित करावे लागेल? 'हॅम्लेटचे' 'विकारविलसित' करणाऱ्या आगरकरांपासून आजतागायत हा प्रश्न सुटलेला नाही. इतके भाषिक व्यवहार आणि मानवी जीवन यातील नाते अतूट आहे. हॅम्लेटचा चंद्रसेन केल्यावरही 'तेराव्याचे लाडू' आणि 'जे जोडे घालून माझ्या बापाच्या-शवयात्रेत' यांतील विसंगती मिटली नाही.

दोन वेगळ्या सांस्कृतिक गटांतील अनुभवांचे रूपांतर ही अवघड गोष्ट होते ती केवळ तपशिलांच्या अडचणीने नाही, तर जीवनविषयक दृष्टिकोणामुळे, अनुभव घेण्याच्या पद्धतीमुळे. 'Cat on A Hot Tin Roof' चे 'ज्वालेत उभी मी' हे रूपांतर शीर्षकातच संकल्पनांची गल्लत करते. या दोन वेगळ्या सांस्कृतिक गटांतील तफावतीबरोबरच मूळ भाषेतील नाटककार आणि मराठी नाटयरूपांतर करणारा नाटककार यांच्या व्यक्तिमत्त्वांतील अंतर भाषिक प्रश्न निर्माण करते. त्यातही रूपांतरकार स्वतःसिद्ध नाटककार असेल, तर हा प्रश्न अधिक बिकट होतो. कारण त्याच्या भाषेची घडण झालेली असते, ती मोडणे त्यास फार अवघड जाते. अशा नाटककाराने केलेले रूपांतर फसवे असते; कारण स्वतंत्रपणे रूपांतरित नाटक वाचता त्यातील भाषा अवघडलेली वाटत नाही, कारण तेवढे लेखनसौंदर्य असते. परंतु रूपांतर म्हणून मूळकृतीच्या शेजारी ठेवता त्यातील प्रश्न, अपयश स्पष्ट होत जाते. सिद्धहस्त नाटककार पु. ल. देशपांडे यांच्या 'सुंदर मी होणार' ते 'तीन पैशाचा तमाशा' या रूपांतरांचा प्रवास या दृष्टिकोणातून अभ्यास करण्याजोगा आहे. वेळेअभावी आपण इथे फक्त रूपांतराचे भाषिक प्रश्न मांडुयाः—

— मूळकृतीची भाषा आणि मराठी भाषा यांतील अंतरः– वाक्यरचना, शब्दकळा, मागील समाजमानस, असल्यास कालिक भेद.
— समाजजीवनाचे प्रतिबिंब. त्यास समांतर मूल्यात्मक ते तपशिलात्मक पर्याय शोधणे.
— लेखकाची-नाटककाराची शैली आणि रूपांतरकाराची शैली यांतील प्रवृत्ती भिन्न असणे –त्यातून अन्वय शोधणे.
— प्रयत्नपूर्वक झालेली रूपांतरे मराठी भाषेला काही अधिक देऊ शकतील, परंतु मराठीतील स्वाभाविक प्रवृत्ती आपल्याला सोयीचा तेवढाच नाटयानुभव रूपांतरित करण्याची आहे. नव्या भाषेला सामोरा जाणारा माणूस आपल्या सवयीचे तेवढेच ध्वनी ऐकतो, तसे मराठी नाटककार आजतागायत करीत आले आहेत.

वास्तविक नाटयरूपांतरे गेले एक शतकभर –अधिकच काळ– चालू आहेत. या रूपांतरांनी काहीच साधले नाही असे मला म्हणावयाचे नाही. परंतु मोलिएरपासून शॉपर्यंतच्या नाटककारांची रूपांतरे होऊनही मराठी शैलीतील विनोदाची घाटणी लवचिक झाली नाही वा शेक्सपियर ते इब्सेन यांच्या शोकात्मिकांची रूपांतरे होऊनही मराठी नाटयभाषेची शोकात्म अर्थगर्भता वाढलेली नाही.

नभोनाटय हे माध्यमही समर्थ नाटककारांनी क्वचित हाताळले. बव्हंशी हौशी (प्रायोगिक नव्हे) लेखकांच्या हाती ते असल्याने त्यावर व्हावा तसा विचार वा प्रयोग झालेले नाहीत. तत्त्वतः हे मान्यच आहे की, नभोनाटय वा नाटयरूपांतर मराठी भाषेची (लिखित व उच्चारित दोन्ही) लवचिकता वाढवू शकेल. परंतु प्रत्यक्षात खूप अर्थपूर्ण काही झालेले दिसत नाही.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# प्रशासकीय मराठी

गीता सुभाष भागवत

आजच्या निबंधाचा विषय ' प्रशासकीय मराठी ' असा दिला गेला आहे. येथे, प्रशासनक्षेत्रात वापरल्या जाणाऱ्या मराठीबाबत (म्हणजे administrative register in Marathi बाबत) विवेचन अभिप्रेत आहे. प्रशासकांची मराठी अभिप्रेत नसून प्रशासनक्षेत्रात वापरात असलेली मराठी अभिप्रेत असल्यामुळे ' प्रशासनिक मराठी ' हा शब्दप्रयोग अधिक समर्पक वाटतो. म्हणून, यापुढील विवेचनात ' प्रशासनिक मराठी ' हाच शब्द वापरला आहे.

आज प्रशासनिक मराठीपुढे दुहेरी आव्हान उभे राहिले आहे. एकीकडे, प्रशासन लोककल्याणकारी व्हावे म्हणून आरोग्य, बांधकाम, शिक्षण, उद्योगधंदे इत्यादी कमीअधिक तांत्रिक स्वरूपाचे व सर्वस्पर्शी विषय तिला सफाईने हाताळावे लागतात. तर दुसरीकडे, प्रशासन लोकानुसारी व्हावे म्हणून प्रजेशी सेवकभावाने व्यवहार करून सामान्य भाषेशी शक्य तितके जुळते स्वरूप राखणेही प्रशासनिक मराठीला आवश्यक होऊन बसते. नव्यानव्या क्षेत्रविशिष्ट शब्दांची विविधता व विपुलता आणि भाषेची विशिष्ट पातळीवरील सुबोधता या दोन्हीचा समतोल प्रशासनिक मराठीमध्ये अपेक्षित आहे. **साहजिकच प्रशासनिक मराठीचे अपेक्षित विकसित रूप म्हणजे एकीकडे भाषेची वाचनीयता, संवादसंस्थापनक्षमता, उच्चारसुलभता, संदेशवहनक्षमता, साधेपणा, सौजन्यपूर्णता आणि दुसरीकडे भाषेचा भारदस्तपणा, औपचारिकता, क्षेत्रविशिष्टता, प्रमाणता, अर्थाभिव्यक्तीची अचूकता यांचा समतोल साधणारे रूप अशी रास्त अपेक्षा निर्माण झाली आहे.**

राजभाषावर्षाच्या निमित्ताने गेल्या दोन वर्षांमध्ये मराठी भाषेच्या व्यावहारिक स्वरूपाबाबतच्या विचारास बरीच चालना मिळाली व तिच्या विविध अंगांबाबत विविध क्षेत्रांतील व्यक्तींकडून वैयक्तिक मतेही मोठ्या प्रमाणावर मांडली गेली. प्रशासनिक मराठीतील शब्दयोजना, वाक्यरचना व लेखनधाटणी या तिन्ही अंगांत आढळणारे दोष व त्यांची कारणे, ती दूर करण्याचे उपाय यांबाबत बराच ऊहापोह झाला आहे.

प्रथम, या सर्व चर्चेचा थोडक्यात आढावा घेऊ. टीकाकारांची प्रमुख तक्रार, नवनिर्मित दुर्बोध शब्दांमुळे आजची प्रशासनिक मराठी दुर्बोध झाली आहे

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

अशी दिसते. याउलट, नव्या क्षेत्रातील शब्दपर्याय बनविताना अशी दुर्बोधता येणे अटळ आहे असा काहींचा सूर दिसतो. गुंतागुंतीची वाक्यरचना सुबोधतेस मारक ठरते असा काहींचा आक्षेप ऐकू येतो. मुळातून मराठीत केलेल्या लेखनापेक्षा इंग्रजीतून अनुवादित वा इंग्रजीप्रभावित लेखन प्रशासनिक मराठीत अधिक होते. परिणामी, वाक्यरचना कधी अजाणता तर कधी अपरिहार्यत: व मुद्दाम इंग्रजीप्रमाणे केली जाते असे याबाबतचे समर्थन किंवा स्पष्टीकरण असते. याखेरीज, अप्रमाण मराठी, त्याचप्रमाणे वाईट मराठी म्हणजे व्याकरणदृष्टचा अशुद्ध मराठी (शब्दयोजना व वाक्यरचना या दोन्ही बाबतीत), सौजन्यहीन मराठी, शब्दबंबाळ मराठी अशा भाषेबद्दलही शेरे–ताशेरे एकू येतात. दुर्दैवाने, प्रशासनिक मराठीबाबतचे बहुसंख्य आरोप-प्रत्यारोप हे व्यक्तिनिष्ठ, एकांगी व विधायक सूचनांचा अभाव असलेले असे आहेत. त्याशिवाय आणखी असे, की इतक्या सर्व चर्चांमधूही प्रशासनिक मराठीच्या नेमक्या दुखण्याचे रोगनिदान व त्यावरील हमखास उपाय काही हाती आल्याचे दिसत नाही. जमेची बाजू ही, की तंत्रविज्ञानाचे क्षेत्र किंवा कायद्याचे क्षेत्र यांपेक्षा प्रशासनाच्या क्षेत्रात बऱ्याच अधिक प्रमाणात मराठीचा वापर होऊ लागला आहे. इतकेच नव्हे, तर मराठी कशी असावी याविषयी मराठी मन चिकित्सक विचारही करू लागलेले आहे हीही आनंदाची बाब आहे. प्रशासनिक मराठीच्या सध्याच्या स्वरूपाबाबत जनसामान्य आणि उच्चशिक्षित या दोहोंमध्येही सारखीच नाराजी आहे असे एकूण चित्र आज दिसते आहे. या पार्श्वभूमीवर, आज 'प्रशासकीय मराठी' या विषयावरील माझे विचार आपणासारख्या विद्वानांसमोर मांडण्याची संधी मिळाली आहे याचा मला आनंद होत आहे.

## प्रशासनिक मराठी: तांत्रिक की अ-तांत्रिक ?

प्रशासनिक मराठीबाबत प्रत्यक्ष विवेचन करण्यापूर्वी एक मुद्दा स्पष्ट करून घ्यायला हवा, की भाषेच्या संदर्भात 'प्रशासन' हे कार्यक्षेत्र तांत्रिक आहे की अ-तांत्रिक ? मला असे वाटते की, भौतिकी, रसायन, गणित आदी विज्ञाने किंवा अभियांत्रिकीसारखी तंत्रविज्ञाने आणि प्रशासन यांना एकाच तागडीत घालणे उचित होणार नाही. आधुनिक प्रशासनाला काही तांत्रिक विषय हाताळावे लागतात हे खरे असले, तरी त्या त्या क्षेत्रातील पारिभाषिक पर्यायांचा वापर करणे एवढ्यापुरताच त्या त्या क्षेत्रातील भाषेशी प्रशासनिक मराठीचा मर्यादित संपर्क येतो. प्रशासनांतर्गत विषयांत अंतर्भूत होणारे काही तांत्रिक क्षेत्रातील विषय आणि प्रशासनाची माध्यम-भाषा (medium of communication) यांची गल्लत होऊ न देणे इष्ट असे मला वाटते. दुसरे असे की, विज्ञान–तंत्र-विज्ञानाच्या क्षेत्रातील भाषिक व्यवहारात सहभागी होण्यासाठी औपचारिक पूर्वशिक्षणाची व विशिष्ट कौशल्याची जितकी अनिवार्य गरज भासते, तितकी प्रशासनक्षेत्रात सहभागी होण्यापूर्वी अपेक्षित नसते. प्रत्यक्ष सेवेत शिरल्यानंतर, अवलोकनाने, अनुभवाने व सरावाने होणारे ज्ञान वापरून प्रशासनक्षेत्रविषयक संकल्पना व कार्यपद्धती यांचा परिचय करून घेतला जातो व त्या क्षेत्रातील भाषिक व्यवहारात हळूहळू वाकबगारही होता येते. प्रशासनशास्त्रातील कोणतेही औपचारिक भाषाशिक्षण न घेताही–म्हणजे माध्यमिक शालान्त परीक्षेत किंवा पदवी वा पदव्युत्तर परीक्षेत 'प्रशासनशास्त्र' हा विषय न घेताही कोणतीही निजभाषिक मराठी व्यक्ती प्रशासनिक यंत्रणेत शिरू शकते व प्रशासनिक मराठीत लेखन करू लागते. या अर्थानेच, प्रशासनक्षेत्र हे अ-तांत्रिक (non–technical) ठरते. केवळ प्रशासनिक भाषा लेखनधाटणी व काही शब्दप्रयोग व वाक्यरचना या संदर्भात सर्वसामान्यांच्या भाषेपेक्षा वेगळी असावी लागते व असते. यामुळे ती 'तांत्रिक' ठरू शकत नाही. किंबहुना, प्रशासनिक मराठीचे कार्य व प्रयोजन यात 'सर्वसामान्य जनतेचा प्रशासनकार्यात पाठिंबा मिळवणे व त्या जनतेस ती आकलनीय असणे' या अतिभाषिक घटकांचाही अंतर्भाव केला गेला आहे. यावरून तिची 'अ-तांत्रिकता' अधिकच स्पष्ट होते.

शास्त्रीय व तंत्रविज्ञानाच्या भाषेचे प्रयोजन शास्त्रविषयक, तंत्रज्ञानविषयक संशोधन व त्याचा विकास हे असते. त्या क्षेत्रातील भाषेचे कार्य, ओघानेच, त्या प्रयोजनासाठी संवादसंस्थापन (communication) साधणे हे असते. साह-


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जिकच, तिचा वापर करणारे म्हणजे प्रेषक व ग्रहण-कर्ते हे दोन्ही सहभागी विशेषज्ञ (तज्ञ) असतात. ती भाषा त्यांच्यापुरतीच मर्यादित असते, तांत्रिक असते. या संदर्भात आणखी एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. समाजाच्या तळागाळापर्यंत शास्त्रे-विज्ञाने पोचवण्यासाठी जेव्हा त्या विषयावर लोकाभिमुख ( popular ) लेखन करायला एखादा शास्त्रज्ञ बसेल, तेव्हा त्यालाही 'तांत्रिकते'चे हे उत्तरीय आपल्या भाषेपासून दूर ठेवावे लागेल. तसे केले नाही, तर त्या लेखनाचे प्रयोजनच यशस्वी होणार नाही. विषयांतर नको म्हणून हा मुद्दा येथेच थांबवणे योग्य. पण, प्रशासनिक मराठी व विज्ञानक्षेत्रीय मराठी यांची केवळ बाबच वेगळी आहे असे नव्हे, तर त्या दोन भाषाप्रकारांच्या मूळ धाग्यांतच भेद आहे हे विसरता येणार नाही. दुसऱ्या शब्दांत, प्रशासनिक मराठी हा भाषेचा कार्यक्षेत्र-विशिष्ट भाषाप्रकार (register) आहे; पण त्याचे रूप सर्वसाधारण ( general) आहे, विशेष ( special) नाही.

## प्रशासनिक मराठी : सुबोधता आवश्यक

आधुनिक प्रशासनशास्त्र व व्यवस्थापनशास्त्र या दोन्हींमध्ये परिणामकारक संवादसंस्थापन (effective communication) या घटकाला अतिशय महत्त्वाचे स्थान दिले जाते आहे. चुकीच्या, विपरीत संवादसंस्थापनामुळे अनेक गैरसमज निर्माण होऊन प्रशासनाला खीळ बसू शकते याची जाणीव आज पुरेपूर झालेली आहे. साहजिकच, कामाची गती व दर्जा या दोन्हींसाठी प्रशासनिक भाषा साधी, सोपी व सरळ असावी, किंवा थोड्या वेगळ्या शब्दांत सांगायचे तर, सर्वांना आकलनीय व वाचनीय (readable) ठरेल अशी असावी याबद्दल सर्वांचेच तत्त्वतः एकमत आहे.

शासकीयेतर प्रशासनक्षेत्रामध्ये प्रशासनिक भाषा सुबोध असण्याला महत्त्व आहे ते मुख्यतः प्रशासन सुरळीत पार पाडणे या भाषिक प्रयोजनाच्या यशा-साठी; पण लोकशाहीतील शासकीय प्रशासनात प्रशासनिक भाषेवर अतिभाषिक प्रयोजन यशस्वी करण्याची आणखी एक जबाबदारी येऊन पडते. स्वातंत्र्योत्तर काळात, 'लोकांच्या राज्यात लोकांच्या भाषेत राज्यकारभार' या तत्त्वानुसार 'मराठी'चा वापर प्रशासनात होतो आहे. 'लोकानुसारित्व' हे आपले अतिभाषिक प्रयोजन नजरेआड करून तिला चालणार नाही. म्हणूनच, प्रशासनिक मराठीच्या संदर्भात आपल्याला दोन गोष्टी विशेष लक्षात घ्याव्या लागतील. १) प्रशासनिक यंत्रणेवर नियंत्रण ठेवण्याचा आपला हक्क जनतेला वापरता यावा आणि २) शासनाच्या योजनांना जनतेचा सक्रीय पाठिंबा मिळावा. यांपैकी पहिल्या गोष्टीसाठी प्रशा-सनिक मराठी 'सुबोध' हवी आणि दुसऱ्या गोष्टी-साठी ती 'परिणामकारक'ही हवी. भाषा ग्रहण-कर्त्याला कळलीच नाही, तर परिणाम होण्याची शक्यताच नाही. कळली, पण ती अस्वीकारार्ह, न रुचणारी म्हणजे अ-वाचनीय असली, तर परिणाम विपरीत होईल. थोडक्यात, 'सुबोधते'ला येथे भाषिक व अतिभाषिक अशा दोन्ही प्रयोजनांचा म्हणजे दुहेरी जोर आहे. म्हणूनच शब्दपर्यायांचा काटेकोरपणा व निःसंदिग्धता, घाटणीची औपचारि-कता आणि एकूण भाषेची सुबोधता या तीन घटकांचा परस्पर–तणाव निर्माण होईल, त्यावेळी कशाला महत्त्व द्यायचे याचा निर्णय फार काळजीपूर्वक घ्यावा लागेल. किंबहुना, कोणत्याही कारणासाठी सुबोधतेचा बळी जाऊ देणे अनिष्ट ठरेल.

वरील विवेचनाचा सारांश असा : १) प्रशासनिक मराठी ही कार्यक्षेत्रविशिष्ट भाषा असली, तरी ती तांत्रिक भाषा नाही, अ-तांत्रिक आहे. २) प्रशासनिक मराठी 'सुबोध' असणे जरूर आहे.

## सुबोधता म्हणजे काय ? : संवादसंस्थापनक्षमता

आजची प्रशासनिक मराठी 'सुबोध' असावी हा वरील विवेचनाचा निष्कर्ष, सध्याची प्रशासनिक मराठी 'अतिशय दुर्बोध' आहे हा टीकाकारांचा सूर, क्षेत्रविशिष्टतेमुळे तिला आलेले वेगळेपण व त्याच्या परिणामी अटळपणे येणारी दुर्बोधता यांचे समर्थन करणारा एक मतप्रवाह आणि प्रशासनिक मराठी सुबोध असावी याबद्दल सर्वांचेच तत्त्वतः असलेले एकमत या सर्वांची सांगड घालण्याचा मी प्रयत्न करणार आहे.

प्रशासनिक भाषा सुबोध असावी म्हणजे कशी असावी ? प्रेषकाच्या मनातील अर्थ त्याच्या सर्व



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बारकाव्यांसह जसाच्या तसा ग्रहणकर्त्यास समजेल अशी म्हणजे दोघांमध्ये 'संवाद' स्थापन करील अशी भाषा म्हणजे 'सुबोध' भाषा असे म्हणता येईल. दुसऱ्या शब्दांत, भाषेद्वारा संवाद स्थापन होण्यासाठी प्रेषक व ग्रहणकर्ता यांची भाषिक कुवत आणि प्रत्यक्ष भाषेचे स्वरूप यांचा समतोल साधला जाणे आवश्यक असते. म्हणूनच, भाषेची संवादसंस्थापनक्षमता (communicability) पाहण्यासाठी प्रेषकाची भाषिक कुवत व ग्रहणकर्त्याची भाषिक कुवत यांचाही संदर्भ लक्षात घ्यावा लागतो. या तिन्हींचा समतोल म्हणजेच भाषेची सुबोधता ऊर्फ संवादसंस्थापनक्षमता होय. सुबोधतेची अशी स्थूल व्याख्या केली, तरी भाषेची सुबोधता म्हणजे नेमके काय ? ती कशी जोखावयाची व मोजावयाची ? याबाबत कोणतेही आडाखे आज आपल्या हाताशी नाहीत. साहजिकच, प्रशासनिक मराठीची किमान आवश्यक सुबोधता किंवा चालवून घेण्याजोगी दुर्बोधता या तपशीलाबाबत परस्परगैरसमज व आरोप-प्रत्यारोप उपस्थित होत असतात. अशा परिस्थितीत, या अडचणीवर मात करण्यासाठी भाषाविज्ञानाने एखादी वस्तुनिष्ठ कसोटी पुरवण्याची आज निकड आहे. अशी एक कसोटी आज आपणापुढे चर्चेसाठी मांडण्याची माझी इच्छा आहे.

आपणास माहीत आहे, की भाषिक व्यवहाराद्वारा सहभागींमध्ये संवादसंस्थापन होण्यासाठी प्रेषकाची भाषिक निर्मितिक्षमता व अभिव्यक्तिक्षमता, ग्रहणकर्त्याची भाषिक ग्रहणक्षमता आणि भाषिक घटकांची अंगभूत संवादसंस्थापनक्षमता या बाबी परस्परपूरक असणे, किंबहुना त्यांचा समतोल साधला जाणे आवश्यक असते. हे संवादसंस्थापन परिणामकारक होऊन ग्रहणकर्त्याकडून अपेक्षित प्रतिसाद मिळायला हवा असेल, तर भाषेचा वापर करताना इतरही काही बाबी विचारात घ्याव्या लागतात. सहभागींचा परस्परसंबंध, भाषिक व्यवहारामागील मूलभूत व सहवर्ती प्रयोजने व अतिभाषिक प्रयोजने, भाषेकडून अपेक्षित कार्य, भाषिक व्यवहाराचे कार्यक्षेत्र, सामाजिक-सांस्कृतिक संदर्भ या सर्व गोष्टींकडे लक्ष द्यावे लागते.

आधुनिक प्रशासनिक मराठीचे प्रेषक बव्हंशी प्रशासनिक यंत्रणेतील घटकच असतात. जनतेकडून येणारे अर्ज, विविध नमुन्यांमध्ये भरली जाणारी माहिती अशा काही थोड्या बाबतींत जनताही 'प्रेषक' होते. पण, प्रशासनक्षेत्रातील भाषिक व्यवहारामधील जनतेची भूमिका बहुधा 'ग्रहणकर्ता' अशीच असते. प्रौढ मतदार २१ वर्षे वा त्याहून अधिक वयाचा असतो. म्हणून प्रशासनिक मराठीची अपेक्षित किमान सुबोधता ही कोणत्याही प्रौढ निजभाषिकाच्या (native speaker) संदर्भात ठरवणे भाग आहे. प्राथमिक मसुदालेखनाचे काम बहुतेकवेळा प्रशासनयंत्रणेतील निम्नस्तर लिपिक करतात व त्यांना दहावीपर्यंतचे शिक्षण पुरेसे मानले जाते. इयत्ता सातवीपर्यंत दिले जाणारे मोफत शिक्षण व कर्मचाऱ्यांचे किमान दहावीपर्यंतचे शिक्षण या दोन गोष्टी विचारात घेता, प्रशासनिक मराठीच्या प्रमाणभूत किमान संवादसंस्थापनक्षमतेची सांगड सातवी ते दहावीपर्यंत शालेय भाषा शिक्षणाशी घातली जाणे आवश्यक आहे.

मराठी भाषेबाबत अशी सामान्य (normal) संवादसंस्थापनक्षमता निश्चित करणारे परिमाण ठरवण्याचे कार्य मनोभाषाविज्ञान व शिक्षणशास्त्र या क्षेत्रांत केले जाण्याची आज नितांत गरज आहे. असे संशोधन उपलब्ध होईपर्यंत, कोणत्याही निजभाषिक प्रौढ व्यक्तीस जास्तीत जास्त किती लांबीचे वाक्य समजू शकेल ? जास्तीत जास्त किती पोटवाक्ये एका वाक्यात असल्यास समजू शकतील ? जोडाक्षरयुक्त किंवा दीर्घशब्दांची वारंवारता किती प्रमाणात मानवेल ? याबाबत काही ठोकताळे मात्र आपल्याला बांधता येतील.

## संवादसंस्थापनक्षमतेचे मूल्यमापन : काही रूढ चाचण्या

सध्या, एखाद्या भाषिक नमुन्याद्वारा परिणामकारक संवादसंस्थापन होत आहे किंवा नाही हे ठरविण्यासाठी 'क्लोझ् टेस्ट' (Cloze test) वापरून किंवा प्रश्नावलीद्वारा विविध व्यक्तींच्या प्रतिक्रिया अजमावून काम निभावले जाते. दिल्ली विद्यापीठात एका हिंदी नियमपुस्तिकेची संवादसंस्थापनक्षमता अजमावण्यासाठी इतर अनेक चाचण्यांबरोबर क्लोझ् टेस्टही वापरली गेली होती. काही निवडक व्यक्तींवर (informants)




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विसंबणारे असे मार्ग पुरेसे व्यक्तिनिरपेक्ष, वस्तुनिष्ठ नसल्याने सार्वकालिक व आव्हानातीत निष्कर्ष पुरवू शकत नाहीत. माहिती मागविण्यासाठी निवडलेल्या व्यक्तींचे शिक्षण, वय, कार्यक्षेत्र, आवडीचे विषय बौद्धिक कुवत, ज्ञानाचा व वाचनाचा आवाका, त्या विशिष्ट वेळची त्यांची मानसिक अवस्था (mood) व त्याहीपेक्षा आपल्या भाषिक कुवतीबाबत त्यांनी केलेल्या अंदाजाची वस्तुनिष्ठ सत्यता यात दर व्यक्तिगणिक फरक पडणे शक्य आहे. माहिती मागवण्यासाठी निवडलेल्या व्यक्तींची संख्या वाढवल्यास व त्यांचे निवडक्षेत्र व्यापक केल्यास ह्या पद्धती अधिकाधिक अचूक होऊ शकतील हे खरे असले, तरी त्या पूर्णार्थाने वस्तुनिष्ठ ठरू शकणार नाहीत. व्यावहारिक अडचणी लक्षात घेता व्यक्तींच्या संख्येसही मर्यादा पडतात हे वेगळेच ! दुसरे असे की, भाषेची वाचनीयता (readability) व ग्रहणीयता (comprehensibility) या बाबी ग्रहणकर्तासापेक्ष असतात, तर भाषेची संवादसंस्थापनक्षमता ही सहभागींच्या भाषाविषयक मूलभूत जाणीवेशी संबंधित असते. म्हणूनच, भाषेची संवादसंस्थापनक्षमता जोखण्यासाठी विवक्षित पातळीच्या भाषिक कौशल्याशी सांगड घालणाऱ्या वस्तुनिष्ठ कसोटीचीच आवश्यकता आहे.

## नवी कसोटी : दुर्बोधता निर्देशांक

डॉक्टरेटसाठी प्रशासनिक मराठीबाबत संशोधन करीत असताना मी मराठी भाषेची दुर्बोधता वस्तुनिष्ठपणे जोखण्यासाठी एक कसोटी तयार केली आहे व माझ्या प्रबंधात तिचे उपयोजनही केले आहे. तीच कसोटी मी आता आपणापुढे मांडणार आहे. या संदर्भात, इतर कोणत्याही पद्धतीने आणखी काही संशोधन केले गेले असल्यास, त्यातील निष्कर्षांवर आधारित अशा काही सूचना आल्यास त्यांचा विचार करायला मला आनंद वाटेल. आवश्यक असल्यास जरूर ते फेरफार करून प्रस्तुत कसोटी अधिकाधिक निर्दोष स्वरूपात प्रत्यक्ष व्यवहारात वापरली जाण्याच्या दृष्टीने आपल्या सूचनांचा फार उपयोग होईल.

भाषेची दुर्बोधता शब्दयोजना व वाक्यरचना या दोन भाषिक घटकांवर संयुक्तरीत्या अवलंबून असते. म्हणून, ती जोखण्यासाठी केवळ शब्दयोजना हाच घटक विचारात घेऊन चालणार नाही. शब्द व वाक्य यांचा कठीणपणाही वेगवेगळ्या बाबींवर अवलंबून असतो. शब्द कठीण वाटतो तो एक तर अपरिचितपणामुळे किंवा त्याच्या बोजडपणामुळे. अपरिचितपणा हा मजकुराच्या विषयाबद्दलचा असेल, तर त्या विषयाचा परिचय करून घेऊन तो दूर होऊ शकतो. पर्यायाचा परिचय नसेल, तर कोशसंदर्भाने तो अपरिचितपणा दूर होऊ शकतो. भाषा समजून घेण्याची ऊर्मी असणारी व्यक्ती इतकी तसदी घेईल अशी अपेक्षा अवाजवी ठरू नये. पण एकंदरीत पाहता, एका व्यक्तीस अपरिचित वाटणारा शब्द दुसऱ्या व्यक्तीस तसाच वाटेल असे नाही. इतकेच नव्हे, तर त्या पहिल्या व्यक्तीसच काही काळानंतर तो शब्द परिचित वाटू लागेल. दुसऱ्या शब्दांत, शब्दांची अपरिचितता ही व्यक्तिसापेक्ष व कालसापेक्ष असते. पण त्याउलट, शब्दाचा बोजडपणा त्यातील अक्षरांची संख्या व जोडाक्षरे यामुळे ठरत असल्याने शब्दाचा तो अंगभूत गुणधर्म असतो. म्हणून, वस्तुनिष्ठ अवलोकनासाठी शब्दाचा 'बोजडपणा' हाच विचारात घेणे उचित आहे हे सर्वमान्य व्हावे.

वाक्याचा कठीणपणा त्यातील कल्पनांची संख्या, गुंतागुंत, परस्परसंबंध आणि वाक्याची लांबी यांवर अवलंबून असतो. वाक्य मिश्र आहे, संयुक्त आहे की केवल आहे ? याप्रमाणेच, वाक्यात किती पोटवाक्ये आहेत व त्या पोटवाक्यांत शब्द किती, वाक्यातील एकूण शब्द किती ? यावरही वाक्याचा अर्थ सुलभतेने कळेल, की नाही हे ठरत असते. केवल वाक्य कळायला सोपे असे म्हणता येईल का ? ७० शब्दांच्या केवल वाक्यापेक्षा ४० व ३० शब्द असणाऱ्या दोन पोटवाक्यांनी बनलेले संयुक्त वा मिश्रवाक्य अधिक लवकर कळते. त्याउलट, २०।२५ शब्दांची ४ केवल वाक्ये ७०।८० शब्दांच्या मिश्र वाक्यांहून सोपी ठरतात. थोडक्यात, वाक्याच्या सुबोधतेच्या संदर्भात वाक्य केवल आहे की मिश्र ? त्यात किती पोटवाक्ये आहेत ? त्यांचा संबंध कसकसा आहे ? यापेक्षा वाक्याची लांबी (शब्दसंख्या) किती तेच महत्त्वाचे ठरते.

वरील मुद्दे विचारात घेऊन मी शब्दाचा कठीणपणा त्याच्या जोडाक्षरयुक्ततेवर व दीर्घाक्षरतेवर

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आधारित ठेवला आहे आणि वाक्याचा कठीणपणा त्यातील शब्दसंख्येवर आधारित ठेवला आहे. पण, उत्तम व परिणामकारक भाषेत सर्वच शब्द सोपे व सर्वच वाक्ये छोटी नसतात. काही प्रमाणात कठीण शब्द व काही प्रमाणात कठीण म्हणजे दीर्घ वाक्ये भाषेत येणे अपरिहार्यच असते. किंबहुना परिणामकारक संवादसंस्थापनाच्या (effective communication) दृष्टीने तसे होणे इष्टच असते हेही विसरता येत नाही. विविध प्रकारची म्हणजे केवल, संयुक्त, मिश्रवाक्ये तसेच कमी-अधिक लांबीची वाक्ये वापरणे व काही प्रमाणात कठीण शब्द भाषेत योजणे हे अनिवार्यच असते. म्हणूनच, भाषेची सामान्य सुबोधता म्हणजे कठीण शब्दांची सुसह्य वारंवारता व एकंदरीत वाक्यांची सुसह्य लांबी असणे होय असे मानले आहे.

कठीण शब्दांचे शेकडा प्रमाण म्हणजे दर शंभर शब्दांमागे कठीण शब्दांची संख्या व वाक्यांची सरासरी लांबी म्हणजेच एकूण वाक्ये व एकूण शब्द (एकूण शब्द भागिले एकूण वाक्ये) हा मूलभूत आधार आहे.

कठीण शब्द म्हणजे काय ? ते ठरवण्यासाठी काही नियम ठरविले आहेत. परिशिष्ट एक मध्ये ते थोडक्यात दिले आहेत. स्थूलमानाने तीनहून अधिक अक्षरी शब्द म्हणजे कठीण शब्द आणि तीन अक्षरी शब्दात जोडाक्षर असेल तर तो तीन अक्षरी शब्दही कठीण असे मानले आहे. श्रवणप्रत्ययी लेखनपद्धतीने सर्वमान्य प्रमाण (standard) उच्चार दर्शवणारे कोश जोपर्यंत तयार होत नाहीत, तोपर्यंत हाच मार्ग स्वीकारणे शक्य आहे. या नियमांनुसार काही सोपे शब्द ( म्हणजे परिचितपणामुळे जे सोपे वाटतात ) कठीण ठरतील. तसे झाले तरी हरकत नाही, पण एकही कठीण शब्द 'सोपा' म्हणून निसटता कामा नये अशा भूमिकेतून हे नियम ठरवले आहेत.

या नियमांबाबत असा एक आक्षेप येण्याची शक्यता आहे, की शब्दातील अक्षरांची संख्या व जोडाक्षरयुक्तता या घटकांखेरीज, विशिष्ट अक्षरांची अतिरेकी पुनरावृत्ती, अक्षरांचा विशिष्ट क्रम यांसारखे आणखी काही घटकही शब्दाच्या कठीणपणावर परिणाम करू शकतात. हे म्हणणे खरे असले तरी, कसोटी व्यावहारिकदृष्ट्या उपयुक्त व वापर-सुलभ रहावी अशी इच्छा असल्याने, कसोटीचा वापर करताना भाषावैज्ञानिक तपशीलांच्या खोलात शिरण्याची गरज पडू नये अशी काळजी घेणे जरूर होते. कोशकर्त्यांना नवीन शब्द तयार करताना वापरता येईल अशी, प्रत्येक शब्दाचा दुर्बोधता–निर्देशांक शोधून काढण्याची कसोटी तयार करताना अशा घटकांचा तपशीलाने विचार करता येईल. दुसरे असे की, शब्दातील अक्षरांच्या अशा अन्य भाषिक गुणधर्मांचा शब्दाच्या 'सोपेपणा'वर प्रतिकूल परिणाम होण्यासाठी मुळात तो शब्द दीर्घाक्षरी असणे जरूर राहील हेही लक्षात घ्यायला हवे. तीन वा तीनहून कमी अक्षरांनी बनलेल्या शब्दाबाबत असे परिणाम होण्याची शक्यता फार थोडी किंबहुना नगण्यच राहील.

## सामान्य संवादसंस्थापनक्षमता

सर्वसाधारण मराठी भाषेची सामान्य(normal) संवादसंस्थापनक्षमता काय आहे हे निश्चित करण्यासाठी इयत्ता ७, ८, ९ व १० या इयत्तांसाठी उच्चस्तर मराठी (पहिली भाषा) या विषयासाठी नेमलेली क्रमिक (graded) पाठ्यपुस्तके आधारभूत मानली आहेत. पहिला टप्पा म्हणून, या पुस्तकांतील काही उतारे घेऊन त्यांचे, वाक्यांची लांबी व कठीण शब्द या दोन घटकांच्या दृष्टीने विश्लेषण केले. त्यांतील वाक्यांची सरासरी लांबी व कठीण शब्दांचे शेकडा प्रमाण यांचा एक तक्ता तयार केला. या तक्त्यावरून असे दिसले, की चढत्या इयत्तेनुसार या दोन घटकांची बेरीज वाढत जाते. म्हणजे वाक्याची सरासरी लांबी व कठीण शब्दांचे शेकडा प्रमाण यांच्या बेरजेचे प्रमाण सातवीपेक्षा आठवीत, आठवीपेक्षा नववीत असे अधिकाधिक होत जाते. ७+८+९+१० ह्या इयत्तांच्या आकड्यांची बेरीज ३४ येते. ही बेरीज व वरील दोन घटकांची बेरीज यांचे प्रमाण त्यांच्या भागाकाराने मिळते. ३४ भागिले (सातवी ते दहावीच्या उताऱ्यांतील वाक्यांची सरासरी लांबी अधिक त्या उताऱ्यांतील कठीण शब्दांचे शेकडा प्रमाण)हे गणित सोडवल्यावर ०.२४ हे उत्तर येते. म्हणजे कोणत्याही मजकुरातील वाक्यांची सरासरी लांबी व त्यातील कठीण शब्दांचे शेकडा प्रमाण यांच्या बेरजेला ०.२४ ने गुणल्यावर जो अंक येईल त्या इयत्तेपर्यंतचे औपचारिक भाषाशिक्षण

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
अनुक्रमणिका

घेतलेल्या व्यक्तीस सुलभतेने समजेल इतपत तो मजकूर सुबोध आहे. या घटकांची बेरीज वाढली की गुणाकार वाढेल. म्हणजे तो मजकूर अधिक वरच्या इयत्तेतील भाषाशिक्षण असणाऱ्यांनाच कळेल. दुसऱ्या शब्दांत, वाक्ये जसजशी लांब होतील किंवा कठीण शब्दांची वारंवारता जसजशी वाढेल, तसतसा हा अंक वाढत जाईल. थोडक्यात, कोणत्याही मजकुरातील या दोन घटकांच्या बेरजेला ०·२४ गुणल्यावर येणारा अंक त्या मजकुराची इयत्तासापेक्ष दुर्बोधता निर्देशित करील. त्या अंकास आपण त्या मजकुराचा 'दुर्बोधता–निर्देशांक' असे संबोधू शकू. ०·२४ हा गुणक नेहमी कायम (स्थिर) असेल. आणि कोणत्याही मजकुराची दुर्बोधता जोखण्यासाठी आपण पुढील सूत्र वापरू शकू :

दुर्बोधता निर्देशांक=(वाक्यांची सरासरी लांबी+ कठीण शब्दांचे शेकडा प्रमाण) गुणिले (०·२४)

सामान्य (normal) संवादसंस्थापनक्षमतेच्या मजकुरातील वाक्यांची सरासरी लांबी वा कठीण शब्दांचे शेकडा प्रमाण हे येथे गृहीत धरले आहे त्यापेक्षा वेगळे असल्याचे अधिक संशोधनानंतर कळून आल्यास स्थिर गुणकाची किंमत थोडी बदलेल हे उघड आहे. मात्र, त्यामुळे प्रस्तुत सूत्राची उपयुक्तता कमी होणार नाही. कठीण शब्दाची व्याख्या थोडीफार बदलल्यास किंवा सामान्य संवादसंस्थापनक्षमतेचा आधारभूत मजकूर याहून थोडा वेगळा घेतल्यास असा फरक पडणे शक्य आहे. परंतु, तसे झाले तरी, त्यामुळे होणारा फरक, ज्याची सुबोधता जोखावयाची असेल त्या मजकुरासही तसाच लागू होईल. परिणामी, दुर्बोधता-निर्देशांक बदलणार नाही.

## प्रशासनिक मराठी : दुर्बोधता-निर्देशांक

मराठी भाषेतील कोणत्याही मजकुराच्या संदर्भात वापरता येईल अशी ही कसोटी मी माझ्या अभ्यासासाठी निवडलेल्या प्रशासनिक मराठीच्या नमुन्यांना लावली असता त्यांचा एकत्रित दुर्बोधता-निर्देशांक १३.३३ इतका आला. मराठी भाषेची सामान्य संवादसंस्थापनक्षमता दहावीच्या औपचारिक भाषाशिक्षणाशी समांतर आहे असे मानले, तर प्रशासनिक मराठी सामान्य मराठीच्या मानाने, थोडी दुर्बोधच ठरते. मात्र, या दुर्बोधतेच्या मुळाशी कठीण शब्दांच्या वारंवारतेइतकाच किंबहुना त्याहून अधिक प्रमाणात वाक्यांची दीर्घता हा घटकच जबाबदार असल्याचे दिसून आले. या नमुन्यामध्ये कार्यालयीन टिप्पण्या, शासननिर्णय, अधिसूचना अशा वेगवेगळ्या प्रकारांचे नमुने होते. या प्रकारांचा प्रकारवार दुर्बोधता-निर्देशांक अर्थातच वेगवेगळा आला. सदरहू निष्कर्ष दर्शविणारे दोन दंडालेख परिशिष्ट दोन व तीनमध्ये दिले आहेत.

माझ्या संशोधनाच्या निष्कर्षांवरून, मी, प्रशासनिक मराठी दुर्बोध ठरते असे म्हटले असले तरी, प्रशासनिक मराठीकडून सुबोधतेची अपेक्षा करताना आपण प्रशासनिक व्यवहारातील विविध क्षेत्रे–उपक्षेत्रे व त्याचा आडवा–उभा ओघ विचारात घेणे आवश्यक आहे. जनतासंपर्काची भाषा व कार्यालयांतर्गत व्यवहाराची भाषा, तसेच अधिकारीस्तरावरील व्यवहाराची भाषा व निम्नतर स्तरापर्यंत वापरली जाणारी भाषा यांच्या सुबोधतेस एकच माप लावणे अन्यायाचे होईल. दुर्बोधतेच्या धोक्याचा कंदील काही ठिकाणी '१०' च्या वरही ठेवणे आवश्यक ठरेल. स्थूलमानाने सांगायचे तर, जनतेस उद्देशून काढलेल्या सूचना किंवा आदेश यांचा दुर्बोधता-निर्देशांक १० किंवा त्याहूनही कमी ठेवणे इष्ट ठरेल तर अधिकारीस्तरावरील एखाद्या परस्परविनिमयाच्या पत्रव्यवहारात तो १० हून अधिक असला तरी चालेल. अर्थात कामाची गती मंदावेल इतकी दुर्बोधता अशा मजकुरात येऊ न देण्याची खबरदारी घेणे भागच पडेल. त्यात तांत्रिक शब्द अधिक वापरावे लागून कठीण शब्दांचे प्रमाण वाढल्यास त्याच्या व्यस्त प्रमाणात वाक्ये छोटी करण्याकडे अधिक लक्ष द्यावे लागेल. थोडक्यात, आवश्यक किमान सुबोधता व चालवून घेण्याजोगी कमाल दुर्बोधता यासंबंधी भाषावैज्ञानिक, संबंधित अधिकारी व अन्य तज्ज्ञ यांनीच परस्परविचाराने निर्णय घेणे इष्ट ठरेल.

प्रशासनिक क्षेत्रात मजकुराची दुर्बोधता जोखण्यासाठी ही कसोटी वापरली गेल्यास, मसुदालेखनात व अनुवादात 'बोजड शब्द टाळा' किंवा 'वाक्ये छोटी करा' अशा मोघम सूचना द्याव्या न लागता निःसंदिग्ध व स्पष्ट सूचना देता येतील. 'तीनहून अधिक अक्षरी शब्दांचे शेकडा प्रमाण विशिष्ट



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पातळीहून अधिक होऊ देऊ नये' किंवा 'वाक्याची सरासरी लांबी अमुक शब्दांहून जास्त होऊ देऊ नये' असे स्पष्ट सूत्र मनात बाळगून तशी काळजी घेणे शक्य होईल. ही काळजी घेताना लेखकाकडून आपोआपच, शब्दावडंबर, पुनरुक्ती, आडवळण असे परिणामकारकतेस बाधक ठरणारे दोष टाळले जातील. शब्दांची निवड अधिक साक्षेपाने करण्याकडे कल राहील, मारुतीच्या शेपटासारखी वाढती लांब वाक्ये रचण्याचे टाळले जाईल. याच कसोटीचा वापर करून दुर्बोध लेखनाचे पुनर्लेखनही करता येईल. परिणामी, प्रशासनिक मराठी आपले नियोजित कार्य अधिक सक्षमपणे पार पाडू शकेल.

प्रशासनिक मराठीच्या सुबोधतेच्या संदर्भात शब्द-योजनेइतकेच वाक्यरचनेलाही महत्त्व आहे हे सतत नजरेसमोर राहिल्याने नवनिर्मित कठीण शब्दांचा बाऊ करण्याचेही टळेल. शब्दांची अपरिचितता त्यांच्या वारंवार वापराने किंवा सहभागींच्या प्रबोधनाने, प्रशिक्षणाद्वारे नाहीशी करता येईल. आवश्यकता वाटल्यास, प्रशासनक्षेत्रातील, सामान्य जनतेस अपरिचित वाटतील अशा पर्यायांचा परिचय जनसंपर्काच्या विविध माध्यमांद्वारा ( टी. व्ही., रेडिओ, वृत्तपत्रे इत्यादी ) करून देता येईल. बोजड शब्दांची वारंवारता विशिष्ट पातळीपेक्षा–प्रमाणापेक्षा–वाढू न देण्याची काळजी घेतल्यास काही नव्या संकल्पना व्यक्त करणारे नवे बोजड शब्दही भाषेला पचवता येतील. मात्र नवे बोजड शब्द पचवण्याची, रुळवण्याची भाषिक क्षमता राबवण्यात अतिरेक होऊ न देण्याची काळजी घेणे जरूर राहील. तसेच, वाक्यांची लांबी व्यस्त प्रमाणात लहान ठेवण्याचा कटाक्ष ठेवल्यास संवादसंस्थापनात बाधा येणार नाही.

प्रशासनिक मराठीच्या अभ्यासाच्या निमित्ताने तयार केलेली ही वस्तुनिष्ठ कसोटी मराठीच्या अन्य कार्यक्षेत्रविशिष्ट भाषाप्रकारांबाबतही वापरता येईल असे वाटते. कायदा, विज्ञान, तंत्रज्ञान आदी विविध कार्यक्षेत्रांमधील वैशिष्टचपूर्ण मराठीसाठी त्या त्या भाषाप्रकाराच्या निर्बंधिततेनुसार व सहभागींच्या भाषिक व शैक्षणिक कुवती–क्षमतेनुसार 'धोक्याच्या कंदिला'चे स्थान ठरवता येईल.

आजच्या प्रशासनिक मराठीमध्ये 'दुर्बोधता' हा एकच एक दोष आहे व तो दूर झाला की 'प्रशासनिक मराठी' आलबेल होईल असा माझा अजिबात दावा नाही. 'दुर्बोध प्रशासनिक मराठी' इतकाच 'वाईट प्रशासनिक मराठी' हाही एका स्वतंत्र चर्चेचा विषय होऊ शकतो. व्याकरणदृष्टचा अशुद्ध मराठी, अप्रमाणमराठी, सौजन्यशून्य मराठी, सौजन्याभासी मराठी किंवा कृतकसौजन्यपूर्ण मराठी, अ–वाचनीय मराठी हे सर्व आपण 'वाईट' मराठीत समाविष्ट करू शकतो. पण गेल्या काही वर्षांमध्ये प्रशासनिक मराठीवर होत आलेला सर्वांत मोठा आरोप 'दुर्बोधते' चा आहे. इतर दोष दुय्यम मानले जातील इतका टीकाकारांचा रोख 'दुर्बोधते'वर आहे. वस्तुनिष्ठ भाषिक दुर्बोधता व व्यक्तिनिष्ठ अनाकलनीयता यांची गल्लतही झाल्याचे दिसते. या संदर्भात, प्रशासनिक मराठीच्या दृष्टीने, भाषेच्या दुर्बोधतेची वस्तुनिष्ठ कसोटी हा जिव्हाळयाचा विषय आहे.

संदिग्ध व आडवळणी लेखनधाटणी, शब्दावडंबर व शैलीचा डामडौल, अनावश्यक शब्दांची भारुडभरती अशा अनेक दोषांचा संसर्ग इतर क्षेत्रांतील मराठीप्रमाणेच प्रशासनिक मराठीलाही कमीअधिक प्रमाणात झालेला दिसतोच. पण हे दोष प्रशासनिक मराठीमध्ये हेतुपुरस्सर राखले व जोपासले जात आहेत असा पूर्वग्रह बाळगणे इष्ट होणार नाही. तसेच, सरकारी भाषाविषयक धोरणामधील काही कच्चे दुवे व प्रशासन यंत्रणेशी इमान राखण्यासाठी भाषेचा धूर्त वापर करण्याची प्रशासनिक कर्मचाऱ्यांची धडपड या दोन बाबीच त्या दोषांस मुख्यत्वेकरून जबाबदार आहेत असा कडवा सूर नि:पक्षपाती चिकित्सकाने काढू नये असे माझे मत आहे. या घटकांखेरीज आणखीही काही घटक त्या दोषास कारणीभूत होत आहेत. मार्गदर्शक ग्रंथांचा अपुरेपणा, कार्यमूलक व विविध क्षेत्रीय भाषावापराच्या शिक्षणाचा अभाव व भाषाशिक्षणामध्ये साहित्यपरिचयावर अकारण दिला जाणारा भर, भाषा वापरणाऱ्यांच्या मनातील भाषिक अस्मितेचा अभाव, सेवाप्रवेशोत्तर यथोचित भाषाशिक्षणाच्या बाबतीतील काही कमतरता अशी

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ही यादी आणखीही वाढवता येईल. या प्रत्येक घटकाच्या संदर्भात वेगवेगळी उपाययोजना करणेही आवश्यक राहीलच. पण, मुळात ते सर्व उपाय कमी–अधिक प्रमाणात दीर्घ काळ चालणारे आहेत. ते आंतरविद्याशाखाक्षेत्रीय ( inter disciplinary) असल्याने विविध विद्याशाखांच्या परस्पर-सहकार्यानेच पार पाडले जातील असे आहेत. आजच्या घटकेची गरज जलद व उचित उपाय-योजनेची आहे. शिवाय, वरीलप्रमाणे उपाय योजल्या-नंतरही त्यांच्या फलिताचा आढावा घेण्यासाठी एखादा केवळ भाषिक मापदंड हाताशी असणे जरूर आहेच. तसेच, मी अगदी सुरुवातीला म्हटल्या-प्रमाणे, प्रशासनिक मराठीतील विविध दोषांचा व त्यांमागील कारणांचा ऊहापोह गेल्या दोन वर्षांत भरपूर झालेला आहे. आणखी १५।२० वेगवेगळी उदाहरणे देऊन त्या चर्चांचीच पुनरावृत्ती करण्या-पेक्षा काही वेगळ्या अंगाने 'व्यावहारिक मराठी'चा विचार केला जावा म्हणून आजच्या माझ्या निबंधात मी या 'वस्तुनिष्ठ कसोटी'वर इतका भर दिला आहे.

येथे हे लक्षात घेतले पाहिजे की, हे सूत्र म्हणजे काही 'जादूची कांडी' नव्हे. सुचेल तसतसे लिहीत जाऊन नंतर त्या सूत्राधारे त्या लिखाणाचा पुन: आढावा घेणे हीच सूत्रवापराची रूढ पद्धत राहणे जरूर आहे यात वाद नाही. पण, विशिष्ट भागावर प्रश्नपत्रिकेत येऊ शकणाऱ्या प्रश्नांच्या स्वरूपाबद्दल अंदाज असला ( म्हणजे पूर्ण प्रश्न येणार, छोटचा टीपा येणार की फक्त 'गाळलेल्या जागा भरा' असा प्रश्न येणार याची कल्पना असली ), तर चाणाक्ष विद्यार्थी त्या आडाख्यानुसार अभ्यास करून चार–दोन गुण अधिक मिळवू शकतो हे आपण पाहतोच. त्याप्रमाणेच, सूत्रातील आधारभूत तत्त्व नजरेसमोर असले, तर लिहिणारा त्याचे भान अवश्य राखील. आपल्या लिखाणाची चाचणी करण्यासाठी एखादी 'वापरसुलभ कसोटी' हाताशी असली, तर त्या कसोटीच्या मर्यादा पाळूनही 'आडवळणी, संदिग्ध' लिहिण्याचा खोडसाळ प्रयत्न प्रशासनिक लेखक करील अशी अटकळ बांधणे प्रशासनिक लेखकावर अन्यायाचे होईल. असे सूत्र हाताशी असूनही एखाद्याने तसा अतिरेकी प्रयत्न केलाच तर त्याला खड्यासारखा वेचून काढणे सहज सुलभ जाईल. म्हणूनच, प्रशासनिक लेखकांबाबत सहानुभूतिशून्य व नकारात्मक भूमिका न घेता, भाषेच्या अभ्यासकांनी काही विधायक सूचना करणे जरूर आहे याच्याशी आपण सहमत व्हाल असे वाटते. प्रशासनिक मराठीतील बहुतांश संदिग्ध व दुर्बोध मजकूर, सदोष वा अपुऱ्या भाषाकौशल्यामुळे लिहिला गेलेला असतो असे अभ्यासानंतर लक्षात येईल. येथे अशा मजकुराची उदाहरणे देण्यास वेळ नाही. पण बरेचदा, यांत्रिकतेने केलेली इंग्रजी धर्तीवरील वाक्यरचना, शब्दांची आंधळेपणाने केलेली निवड, विचारांची धूसरता किंवा कामाची नसती घिसाड-घाई याच गोष्टी अशा सदोष लिखाणाच्या मुळाशी असतात असे मला आढळले आहे. भाषेचा हेतुपुरस्सर फसवा वापर केला असावा अशी शंका फारच क्वचित ठिकाणी आली.

भाषेतील शब्दयोजना व वाक्यरचना यांवर प्रस्तुत कसोटीने घातल्या जाणाऱ्या मर्यादा पाळूनही आड-वळणी, संदिग्ध व पुनरुक्तिपूर्ण लेखन करणे वाटते तेवढे सोपे नाही. एखादा भाषाप्रभू पैज मारून तसा मजकूर लिहून दाखवू शकेलही! परंतु अशा एखाद्या उदाहरणाने 'कसोटी' च निष्फळ ठरेल असे नव्हे. आपली अकार्यक्षमता लपविण्यासाठी, आपल्या विद्वत्ताप्रदर्शनासाठी किंवा प्रतिष्ठानिदर्श-नासाठी भाषेचा दुरुपयोग करणारा प्रशासनिक मराठीचा कोणताही सर्वसाधारण लेखक या कसोटी-पुढे टिकाव धरील असे वाटत नाही.

निबंधावरील चर्चेच्या ओघात पुढील मुद्देही विचारात घ्यावेत अशी विनंती आहे : १) अशा कसोटीची व्यावहारिक गरज आपणास पटते ना ? २) प्रत्यक्ष व्यवहारात अशी एखादी कसोटी हाताशी असल्यास उपयुक्त ठरेल असे वाटते ना? ३) प्रस्तुत कसोटीत आणखी कोणते भाषिक घटक विचारात घेणे जरूर आहे वा शक्य आहे असे आपणास वाटते ? ४) मराठी भाषेची सामान्य संवादसंस्थापनक्षमता ( normal communicability ) ठरविण्या-साठी आपण काय सुचवाल ?

× × ×




अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत





द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## काही निवडक संदर्भांची सूची

कालेलकर, ना. गो. " भारतीय भाषा : नव्या जबाबदाऱ्या ", भाषा : अंतःसूत्र आणि व्यवहार, संपा. मु. ग. पानसे, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, १९६९.

केळकर, अ. रा. " मराठीचे श्रवणप्रत्ययी लेखन ", मराठी संशोधन पत्रिका ( त्रैमासिक ), वर्ष २५, अंक २, पृष्ठे ३१ ते ४६, जानेवारी-मार्च १९७८.

प्रधान, ग. प्र. " शासनव्यवहाराची भाषा ", भाषा : अंतःसूत्र आणि व्यवहार, संपा. मु. ग. पानसे, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, १९६९.

ठाकुरदास, " प्रयुक्ति की संकल्पना और कार्यालय हिंदी ", हिंदीका सामाजिक संदर्भ, संपा. रवीन्द्रनाथ श्रीवास्तव, केंद्रीय हिंदी संस्थान, आगरा, १९७६.

मिश्र विद्यानिवास, " प्रयोजनमूलक हिंदी : उद्देश्य और कार्यसीमा ", प्रयोजनमूलक हिंदी, केंद्रीय हिंदी संस्थान, आगरा, १९७५

Anon. *Report of official Language Commission*, Govt. of India, 1956.

Crystal David and Dereck Davy, *Investigating English Style*, Longman Group Ltd. ( Longman Paperback ), 1976.

Flesch Rudolf, *The Art of Plain Talk*, Harper and Brothers Publishers, New York, 1949.

Gowers, Earnest, *The Complete Plain Words*, Second edition, Revised by Bruce Fraser, The English Language Book Society and Penguin Books, 1973.

Gunning, Robert, *The Technique of Clear Writing*, Mc Graw–Hill Book Company, 1958.

Halliday, M. A. K. et al, *The Linguistic Sciences and Language Teaching*. ELBS and Longman Group Ltd. 1964.

Hasan, R. " Code, Register and Social dialect ", *Class, Codes and Control : Vol. 2, Applied Studies towards a Sociology of Language*, Routledge and Kegan Paul, London and Boston, 1973.

Hyneman, C. S. *Bureaucracy in a democracy*, Harper and Brothers, New York, 1950.

Prasad, G. K. *Bureaucracy in India A Sociological Study*, Sterling Publishers Ltd. New Delhi, 1974.

Srivastava R. N. et al, *Evaluating Communicability in Village Settings*, Part I and Part II, UNICEF, New Delhi, Octo. 1978 and Dec. 1978,

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## परिशिष्ट एक

## कठीण शब्दांचे ठळक नियम

कठीण शब्द ठरविण्यासाठी पाच मूलभूत नियम निश्चित केले आहेत :—

१) कठीण शब्द ठरविण्यासाठी मूळ शब्दाची अक्षरसंख्येत लांबी व जोडाक्षरयुक्तता हे दोन गुण-धर्म विचारात घेतले आहेत.

२) अॅ, ऑ, ऋ व लृ हे स्वर व त्यांनी युक्त व्यंजने ही कठीण अक्षरे म्हणून जोडाक्षरे मानली आहेत.

३) अनुस्वाराऐवजी विकल्पाने परसवर्ण येत असेल तेथे परसवर्णामुळे जोडाक्षरत्व येते असे मानलेले नाही. उदाहरणार्थ : 'टेण्डर' मधील 'ण्ड' हे जोडाक्षर मानलेले नाही.

४) शब्दांची लांबी मोजताना विभक्तीप्रत्यय, आख्यातप्रत्यय वा शब्दयोगी अव्यय यामुळे वाढलेली लांबी, काही अपवाद वगळता विचारात घेतलेली नाही.

५) शब्दाचे सामान्यरूप वा अनेकवचन झाल्यामुळे येणारी जोडाक्षरयुक्तता विचारात घेतलेली नाही.

वरील नियमांवर आधारित असे पुढील नियम केले :—

१) चार किंवा त्याहून अधिक अक्षरे असलेले सर्व शब्द कठीण शब्द मानले.

२) ज्या तीन अक्षरी शब्दांतील एक वा अधिक अक्षरे जोडाक्षर असतील ते सर्व शब्द कठीण मानले.

३) ज्या दोन अक्षरी शब्दांतील दोन्ही अक्षरे जोडाक्षरे असतील ते शब्द कठीण मानले आहेत.

४) ज्या दोन अक्षरी शब्दांतील एकच अक्षर जोडाक्षर असेल, परंतु त्या जोडाक्षरात दोनहून अधिक व्यंजने अंतर्भूत असतील ते सर्व शब्द कठीण मानले आहेत.

५) ज्या एकाक्षरी शब्दांतील अक्षर जोडाक्षर असेल ते सर्व शब्द कठीण मानले आहेत.

६) अंकांच्या बाबतीत, चार व त्याहून अधिक आकड्यांनी बनलेले सर्व अंक कठीण शब्द मानले आहेत.

७) शब्दयोगी अव्यययुक्त शब्दातील शब्दयोगी अव्यय जोडाक्षरयुक्त असेल, तर संपूर्ण शब्दाला जोडाक्षरयुक्ततेचा नियम लागू केला आहे. तसेच, शब्दयोगी अव्यय तीनहून अधिक अक्षरांनी बनलेले असेल, तर त्याने युक्त शब्द कठीण मानला आहे.

८) विभक्तियुक्त कृदन्ताच्या बाबतीत शब्दाच्या जोडाक्षरयुक्ततेच्या नियमासाठी सामान्य रूपामुळे आलेली जोडाक्षरयुक्तता विचारात घेतलेली नाही. मात्र, लांबीचा नियम लागू करताना मूलभूत नियम ५ ला अपवाद करून संपूर्ण कृदन्त हा एक शब्द मानला आहे.

९) शब्दयोगी अव्यययुक्त कृदन्तांच्या बाबतीत, लांबीचा नियम लागू करताना मूळ कृदन्त व मूळ शब्दयोगी अव्यय यांची लांबी स्वतंत्रपणे विचारात घेतली आहे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




आधुनिक प्रशासनिक मराठी (विविध नमुना-प्रकार) आणि सर्वसाधारण मराठी (क्रमिक पुस्तकांतील इयत्तावार नमुने) यांचे, वाक्याची सरासरी लांबी व कठीण शब्दांचे शेकडा प्रमाण या दोन मोज-पट्ट्यांवर तुलनात्मक दर्शन घडविणारा दुपदरी दंडालेख (histogram).



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## परिशिष्ट तीन

| | |
|---|---|
| १८·६५ | आदेश १५ नमुने |
| १६·४१ | प्रसिद्धिपत्रके ७ नमुने |
| १५·५६ | शासन निर्णय ६ नमुने |
| १५·४८ | सूचना ११ नमुने |
| १५·२६ | अधिसूचना ६ नमुने |
| १३·८२ | प्रमाण प्रपत्रे ११ नमुने |
| १३·३७ | जाहिराती ६ नमुने |
| १३·०१ | परिपत्रके १० नमुने |
| १२·८९ | निविदा सूचना २० नमुने |
| १२·५१ | कार्यालयीन टिप्पण्या ११ नमुने |
| ११·५२ | सामान्य पत्रव्यवहार ५१ नमुने |
| १०·०० | सर्वसाधारण मराठी- इयत्ता दहावी ४ नमुने |

नमुना-प्रकारवार दुर्बोधता-निर्देशांकांची परस्परतुलना आणि सर्वसाधारण मराठीच्या दुर्बोधता-निर्देशांकापेक्षा (१०.००) अतिरिक्तता दर्शविणारा दंडालेख (histogram)



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# ग्रामीण उपेक्षित वर्गात काम करणारा कार्यकर्ता व मराठी

अनिल अवचट

---

या टिपणात ग्रामीण भागातल्या राबणाऱ्या वर्गात काम करणाऱ्या कार्यकर्त्याच्या भाषिक अडचणींसंबंधी विचार केलेला आहे. ज्या थरात तो काम करतो, तो थर सामाजिक–आर्थिकदृष्ट्या दडपल्या गेलेल्या लोकांचा आहे. त्या थरात तो कार्यकर्ता प्रामाणिकपणे व निष्ठेने काम करीत असल्याचे गृहीत धरले आहे. कारण त्या थरात स्वार्थी हेतूने काम करणारे कार्यकर्ते शोषणही करत असतात. प्रामाणिक व स्वार्थी कार्यकर्ते यांच्या भाषिक अडचणी सारख्या असल्या, तरीही येथे प्रामाणिक कार्यकर्त्यांच्या अडचणींचा विचार केलेला आहे.

ग्रामीण पातळीवर काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचे दोन ढोबळ प्रकार पाडता येतील. शहरामध्ये जन्मलेला, वाढलेला, सुशिक्षित, बहुधा उच्चवर्णीय तरुण ध्येयवादाने प्रेरित होऊन खेड्यात येतो हा एक प्रकार आणि दुसरा प्रकार म्हणजे खेड्यातच जन्मलेल्या, वाढलेल्या, स्वतःच्या बांधवांच्या प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी झटणाऱ्या कार्यकर्त्याचा. दोघांच्या भाषाविषयक प्रश्नांत काही साम्य व बराच फरकही आहे.

ग्रामीण कार्यकर्त्यास भाषाविषयक दोन आवश्यकता आहेत. एक म्हणजे त्या थरातील लोकांशी संपर्क साधणे आणि दुसरी म्हणजे नागरी समाजाशी, अधिकारी वर्गाशी संपर्क साधणे. ग्रामीण लोकांचे प्रश्न समजावून घेणे, त्यांना प्रश्न सोडविण्यासाठी उद्युक्त करणे, त्यांच्या हक्कांची, संबंधित कायदेकानूंची, जगात इतरत्र चाललेल्या घडामोडींची, त्यांच्या समस्यांना कारणीभूत असणाऱ्या समाजव्यवस्थेची त्यांना जाणीव करून देणे इ. बाबी पहिल्या आवश्यकतेत येतील. तर दुसऱ्या आवश्यकतेत बृहत्तर समाजाला तळागाळातल्या समाजातल्या प्रश्नांची जाणीव करून देऊन आपल्या लढ्याला समाजात अनुकूल वातावरण निर्माण करणे, लोकांचे प्रश्न पोलिस, तहसिलदार, कोर्ट न्यायाधीश, मंत्री आदी सरकारी वर्गासमोर मांडणे, त्यासाठी आवाहनरूपाने किंवा जिथे आवाहन पोचत नाही तिथे लढाऊ पवित्र्यात कायदेशीर सामग्रीसह मांडणी करणे इ. गोष्टी मोडतील.





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शहरातून खेड्यात गेलेल्या कार्यकर्त्यास ग्रामीण भागातल्या लोकांशी संपर्क निर्माण करणे अवघड असते, तर खेड्यातच वाढलेल्या व काम करणाऱ्या कार्यकर्त्यास शहरी समाजाशी संपर्क निर्माण करणे अवघड जाते, हे उघड आहे.

सरकारकडून काही भांडून मिळविण्याबाबत वरीलप्रमाणे परिस्थिती निर्माण होते. पण बरेच प्रश्न खेड्याच्या पातळीशीच निगडित असतात. उदाहरणार्थ "एक गाव एक पाणवठा" या प्रश्नाबाबत हक्क मागणारे आणि हक्क नाकारणारे हे ग्रामीणच असतात. या पातळीवरची विषमता घालविण्यासाठी नवे मूल्य रुजवावे लागते. हे मूल्य वा संकल्पना नागरी भाषेत सांगून चालत नाही. म्हणून त्याची फोड करून, ग्रामीण परिसराशी संबंधित अशी उदाहरणे देत देत समजावून द्यावे लागते. हे प्रश्न वर वर्णिलेल्या दोन्हीही प्रकारच्या कार्यकर्त्यांना पडतात.

या भाषिक अडचणींवर मात करण्यासाठी काय करता येईल ते पाहू. इथून पुढला भाग माझ्या अनुभवावर आधारित आहे. नागरी समाजाशी, अधिकारी वर्गाशी संपर्क साधण्याच्या भाषेविषयी प्रथम पाहू. ग्रामीण भागात एखादा दलित अत्याचार झाला तर तिथल्या कार्यकर्त्यास त्याची माहिती वर्तमानपत्रासाठी लिहून द्यायला मी सांगतो. नेहमीचा अनुभव असा आहे की, डी. एस्. पी. किंवा तहसिलदार यांना अर्ज करतात त्या भाषेत तो ती घटना लिहून पाठवतो. "सदर इसमाने गंगाबाई या हरिजन महिलेचा विनयभंग केला ... तिला जातीवरून शिव्या दिल्या ... तरी सदर इसमास कलम ३०७, १४९, १५० या अन्वये अटक व्हावी अशा पद्धतीने बहुधा लिहिलेले असते. वर्तमानपत्रात वा साप्ताहिकात लेखरूपाने घटना लिहून पाठवताना दृश्य डोळ्यासमोर उभे करण्याची आवश्यकता असते. सर्वसाधारण समाजाच्या मानवतेला ते आवाहन असते. अशा वेळी 'जातिवाचक शिव्या' किंवा 'विनयभंग' अशा ढोबळ शब्दांत ते व्यक्त न करता अत्याचाराचे दृश्यवर्णन प्रभावी पद्धतीने करण्याची गरज असते. वास्तविक माझ्याशी बोलताना तसे वर्णन त्यांनी केलेले असते. मी 'तुम्ही आता जसं सांगितलं तसं लिहून पाठवा' म्हटलं, तरी बरेच जण वरील पद्धतीचा रुक्ष मजकूर पाठवतात. नुसत्या अत्याचाराच्या प्रभावी वर्णनानेही भागत नाही. ती घटना ही आधीच्या अनेक लहानसहान घडामोडींचा परिपाक असते. मी अशा घटनेची चौकशी करायला जातो, त्यावेळी या बारीकसारीक घडामोडींची चौकशी करतो त्याचे तिथल्या कार्यकर्त्यांना आश्चर्य वाटते, पण ती घटना ग्रामीण समाजातल्या अनेक लहानमोठ्या चक्रांशी जोडल्याशिवाय तिची स्वतःस उकल होत नाही आणि सर्वसाधारण समाजास तिची उकल मांडता येत नाही.

सरकारी अधिकाऱ्यापुढे कैफियत मांडताना किंवा भांडताना बऱ्याचदा कायदेशीर भाषा वापरावी लागते. कार्यकर्त्यास हेच काम वारंवार करावे लागत असल्याने तो या बाबतीत तयार होत जातो. डोंगराळ भागातल्या आडवळणी गावात गेलो असता तिथे तिसरी-चौथी पास असलेला कार्यकर्ता धडाधड कलमांचे आकडे माझ्यापुढे फेकतो, तेव्हा मला कित्येकदा काही कळतच नाही. कायदेशीर शब्दांचे अपभ्रंशही करीत असतो. एका ठिकाणी एका कार्यकर्त्याने 'आमच्यावर रॅट केस घातली' असे सांगितल्यावर काही कळले नाही. चौकशी केल्यावर समजले की, त्याला 'रायट केस' म्हणायचे होते. (इंग्रजी शब्दांचे अपभ्रंश तर अनेकदा कानावर पडतात, 'साहेब, त्यांनी आमचा इनसाट केला.') ही कायदेशीर भाषा प्रभावी करण्यासाठी कार्यकर्त्यांना कायदेशीर माहिती उपलब्ध करून देता येईल. दलित वर्गाला छळण्यासाठी त्यांच्यावर 'बेकायदेशीर जमाव केला, मारहाण केली' वगैरे नेहमीचे आरोप असतात. दलितांना सवर्णांवर करण्याचे "विनयभंग, अत्याचार, बलात्कार, खून अथवा मृत्यूस कारणीभूत, जातिवाचक शिव्या वा वर्तन" हे नेहमीचे आरोप असतात. दलितांच्या इनाम जमिनींचे खटले गावागावांतून चाललेले असतातच. जमिनीवर अतिक्रमण करणे, दलितांच्या जमिनीतल्या उभ्या पिकात गुरे घालणे या घटना नेहमीच्या आहेत. या सर्वांविषयी अगदी महिन्याभरात कार्यकर्त्यांना कायदेशीर माहिती देणे सहज शक्य आहे. अस्पृश्यतेविरुद्धचा नागरी संरक्षण कायदा व वर उल्लेखिलेल्या घटनांशी संबंधित कायदे यांविषयी सांगोपांग माहिती कार्यकर्त्यास अतिशय उपयुक्त ठरेल. त्याच शिक्षणात



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अधिकाऱ्यांना पाठवायच्या अर्ज वा पत्रलेखनाचेही शिक्षण देता येईल. हे सर्व शिक्षण आधी उल्लेखीलेल्या दोन्ही तऱ्हेच्या कार्यकर्त्यांना आवश्यक आहे.

आता ग्रामीण समाजाच्या संपर्कातल्या अडचणींचा विचार करू. ग्रामीण समाजात जन्मलेला कार्यकर्ता तिथल्याच भाषेवर पोसलेला असला, तरी शिक्षणामुळे त्याच्या भाषेची वाढ नंतर नंतर तुटू लागते. त्यामुळे ग्रामीण अस्सल शब्दांचा भरणा त्याच्याही भाषेत फारसा नसतो. ग्रामीण भाषेविषयी न्यूनगंड फार असतो. त्यामुळेही स्वतःच्या घरातल्या लोकांशी बोलतानाही तो शहरी भाषेत बोलायचा प्रयत्न करीत असतो. या भाषेमुळे त्या घरातल्या लोकांना त्याच्या विद्वत्तेविषयी किंवा चलाखपणाविषयी आदर वाटत असला, तरी संपर्काच्या दृष्टीने ती भाषा फारच अपुरी पडते आणि कामाच्या दृष्टीने त्याचा तोटाच होतो. तेव्हा हा न्यूनगंड दूर करून ग्रामीण भाषेचा वापर करण्यास त्याला उद्युक्त करावे लागेल.

ग्रामीण समाजात जी मूल्ये रुजवावी लागतात, त्यांबाबत ग्रामीण भाषेत शब्द अपुरे आहेत. नवी मूल्ये संकल्पनात्मक भाषेत मांडण्याऐवजी त्या मूल्यांचे मर्म लोकांपर्यंत पोहोचू शकेल अशा उदाहरणांतून त्या पोहोचवता येतील. त्या भाषेची बैठकही यास अनुकूल आहे. सरळ न सांगता याच्या 'वाणी' हे आहे, अशा स्वरूपात तिथे सांगितले जाते. दृश्य उभे करायची ताकद तिथे असते. म्हणींचा वापर केल्याने चटकन पकड घेता येते. मराठी वाक्संप्रदायकोशाचे दोन खंड म्हणजे मराठीतला अमोल ठेवा आहे. यातल्या म्हणी मी पाठ करून अनेकदा खेड्यात वापरल्या, तेव्हा ती माणसे खूष होऊन मनातलं बोलू लागल्याचा मला अनुभव आला. दोन्ही प्रकारच्या कार्यकर्त्यांनी या ठेव्याचा भरपूर उपयोग करावा.

शहरी कार्यकर्त्याची संपर्काची अडचण अधिक गुंतागुंतीची आहे. त्याला ग्रामीण समाजाच्या समस्यांचा अभ्यास करावा लागतो. त्याचबरोबर त्या समस्यांसाठी त्यांना संघटितही करायचे असते. या दोहोंसाठी ग्रामीण भाषेचे नेमके मर्म त्याला अवगत करावे लागते. ग्रामीण लोकांना तो 'आपला' वाटणे आवश्यक असते, त्यासाठी त्याची भाषा ग्रामीण लोकांना समजेल अशी तर लागतेच. पण तो प्रयत्नपूर्वक, संपूर्ण ग्रामीण भाषेतच बोलू लागला तर त्यात कृत्रिमता येते आणि लोकांना त्याचे हे 'नाटक' वाटू लागते. तेव्हा एखादी गोष्ट पटवताना अस्सल ग्रामीण उदाहरणांचा वापर करीत, सोप्या शहरी भाषेचा वापर करीत त्याला दोहोंचे व्यवस्थित मिश्रण करावे लागते. आपलं बोलणं समोरच्यांना कितपत पटलं आहे, याचा सतत पडताळा घेत त्याला पुढं जावं लागतं. त्यासाठी सभेपेक्षा चर्चात्मक कार्यक्रम त्याच्या अधिक उपयोगी पडतो. सभेतही अधूनमधून लोकांना प्रश्न विचारून त्यांना बोलकं करीत, प्रतिक्रिया घेत घेत भाषण करणं अधिक हिताचं पडतं.

हे करणं अनुभवातून जमतं हे खरं असलं, तरी खेड्यात जाऊ इच्छिणाऱ्या कार्यकर्त्याला ग्रामीण भाषेविषयी किमान माहिती आधी उपलब्ध करून देणं शक्य आहे. ग्रामीण भाषा म्हणजे सरसकट एक भाषा नव्हे. त्यात ढोबळ विभागीय फरक तर आहेतच; पण एका गावातली भाषाही सरसकट एक धरून चालू नये. गावातल्या निरनिराळ्या जातींमध्ये बोलली जाणारी भाषा वेगवेगळ्या ढबीने बोलली जाते. हा फरक ध्यानात घेणे फार आवश्यक आहे.

तुलनात्मक रीतीने पाहता गावातला सवर्ण मराठा भाषेचा फारसा वापर करीत नाही. दलितांच्या प्रश्नांची चौकशी करायला खेड्यात गेलो असता तिथून फाटका सवर्ण जरी चालला असेल, तरी दलितांची तोंडं गप्प होतात. म्हारड्या, मांगट्या असं सहसा म्हणायची त्याला वेळच येत नाही. 'का, रं' असं म्हणताच खालच्या जातीचे लोक नांग्या टाकतात. दलिताने काही तक्रार केली तर 'लई शाना झालास' एवढं जरी सवर्ण समाजातला मातब्बर माणूस म्हणाला तरी दलित त्याचा पुढचा अर्थ बरोबर समजतात. तेव्हा अशा सवर्ण सधन माणसाच्या भाषेचा अर्थ संकेतांनी, पूर्वीच्या त्याच गावातल्या काही अनुभवांनी ध्यानात घ्यावा लागतो. ते जेव्हा शांतपणे, सौम्यपणे, समजावणीच्या सुरात सांगतात, "गावाच्या गाड्यांना खीळ कशाला घालता, बाबानु... गावगंगेच्या इरुध जावू नायी शान्या मानसांनी... पायरी दिलीय देवानं तिथं र्‍हावं, गावाचं नाव घालवू नाही" या बोलण्या-

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
अनुक्रमणिका

तल्या "गाव" या शब्दाचा अर्थ साधा नसतो. ती झुंडशक्तीची गर्भित धमकी असते.

बलुतेवर्गाची भाषा निराळी, सवर्ण मराठ्यापेक्षा हा खूप बोलका वर्ग. 'खळ्यावर गेल्यावर तोंडाचा पट्टा चालू ठेवायचा. पडली तर तेव्हाच एखादी दुसरी पेंढी जास्त पडायची' असं एका बलुतेदारानं सांगितलं. न्हावी हजामती करत असताना सतत बडबडत असतो. पावसाळ्याचे दोन-तीन महिने काम संपल्यावर मग बलुतेदारांना उरलेल्या वर्षभरात सलग असे काम नसते. तेव्हा पारावर बसून गावगप्पा मारणे हा नेहमीचा उद्योग. त्यांच्यात्यांच्यात बोलताना सगळ्यांच्या उखाळ्या-पाखाळ्या काढतील, पण सवर्णांशी बोलताना अतिशय सावध भाषा असते. सवर्णांशी तोंडावर, प्रत्यक्ष स्पष्ट बोलता येत नसल्यामुळे बलुतेदारांच्या भाषेला आडवळणी घाट आलेला आहे. तो गावाबरोबर तक्रार करताना सरळसोट भाषेचा वापर करणार नाही. मुळशी तालुक्यातल्या एका गावातल्या न्हाव्याला थोडी जमीन होती. तिच्यात त्याने विहीर खणली. त्यामुळे थोडी विहीर बागायत त्याने केली. पुढे तो ग्रामपंचायत निवडणुकीला उभा राहिला, त्यात त्याला दाबण्याचा खूप प्रयत्न झाला. सवर्णांतल्या एका गटाने याच्या वांग्याच्या, टोमॅटोच्या वाफ्यांमधून म्हशी घातल्या आणि पीक उद्ध्वस्त केले. न्हाव्याने गावासमोर गाऱ्हाणं मांडताना म्हटलं, 'मला गावानं शिक्षा द्यावी. मी गुन्हा केला आहे.' गावकऱ्यांनी विचारलं, 'तू असं का बोलतोस? काय गुन्हा केला आहेस?' त्यावर तो म्हणाला, 'माझ्या विहिरीला पाणी लागलं, हा माझा गुन्हा झाला आहे, मला गावानं शिक्षा करावी.' सगळेजण त्याच्यावर गरम झाले. 'तिढ्यात बोलू नको, सरळ सांग' असे म्हणू लागले.

आधीच्या वर्षी ज्यानं बलुतं बुडवलं आहे असं खट कूळ काम परत घेऊन आलं, की हा बलुतेदार म्हणणार, 'बाबारे, मला जरा दाणं ठेवायला जागा देतो का? पोत्यांनी घर भरलंय, दाणं ठेवायला जागाच नाही.' खट कूळ काय समजायचं ते समजतं. मी परटाकडे बसलो असता गावातले दोनचार जण आले, ते फुकटे होते. त्यांना ऐकवण्यासाठी परीट मला सांगत होता 'साहेब, परटाचं काम लई वाईट. पन असं ऐकलंय की परटाला मेल्यावर स्वर्गात लई मोठ्ठं स्थान आहे. पन काय तिकडं वर नक्की काय हाय ते कोनी डोळ्यानं पाहिलंय, नायतर हे हितलं सोडून आधि तिकडंच धावत गेलू असतू. पन नक्की माहित नाही म्हून काही करता येत नाही.'

सवर्ण बलुतेदार आणि अस्पृश्य बलुतेदारांपैकी चांभार यांचीही वरील प्रकारे ठेवण असते. यांच्यांत वावरताना कार्यकर्त्याला काही बाबी ध्यानात ठेवाव्या लागतात. आधी सांगितल्याप्रमाणे आडवळण घ्यावं लागतंच, पण त्याचबरोबर दुसरे टोक म्हणजे अतिशयोक्तीने खळ्यावर जाऊन बलुत्यासाठी उभं राहणं हा एक जरा प्रतिष्ठित स्वरूपाचा पण भीक मागण्याचाच एक प्रकार आहे. मागताना आपलं कसं भागत नाही याचं अतिशयोक्त वर्णन करणं हा त्यांच्या धंदेवाईक भाषेचा भाग असतो. म्हणून कार्यकर्त्याला जेव्हा ते आपले अन्याय-जुलूम सांगतील, तेव्हा त्याने इतर लोकांना विचारून त्यातली अतिशयोक्ती किती याचा सतत पडताळा घ्यावा लागेल.

महार-मांग, रामोशी यांच्या भाषेचा घाट वेगळा आहे. महार हा गावच्या पाटील, देशमुखाचा घरकाम्या शिपाई. सरकारी अधिकारी आल्यास त्याची सरबराई करणं हे याचं परंपरागत काम. शिवाय पूर्वी गावच्या जमिनीच्या हद्दी ठरवताना महाराची साक्ष प्रमाण मानीत. म्हणून महारांच्या भाषेला कायदेशीर घाट असतो. मराठ्याच्या वागण्यात त्यांच्या जातीच्या संख्याबळाची रग असते, तशी रग महार हा दलितांमधला बहुसंख्य असल्याने महाराच्या वागण्यात असते. त्याला बलुतेदारी वेल्हाळपणा आणि सरकारी कायदेशीरपणाची जोड मिळून ती भाषा खूपच समृद्ध झालेली असते. आधी उल्लेख केलेले, तोंडाबर ३०७, १४९ अशी कलमे फेकणारे कार्यकर्ते महारच जास्त करून असतात. खेड्यातला मराठा शेतकरी एरवी कितीही रंगीन असला, तरी तो कोर्टबाजीला घाबरतो. महाराला हे मर्म माहीत असतं. त्यामुळे तो दलितांमधील एक सजग, जागरूक जात बनला आहे. अत्याचार इतर अस्पृश्य जातींवरही होतात, पण महाराच्या बाबतीत काही झालं, तर तो डी. एस.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पी. ला अर्ज पाठवून त्याच्या नकला मुख्यमंत्र्या-पर्यंतच काय पण प्रधानमंत्री, राष्ट्रपतीपर्यंत पाठवून शिवाय वर्तमानपत्राकडे धाडून मोकळा होतो. हे धैर्य इतर बलुतेदार सवर्ण व अस्पृश्य जातीत नसते.

महार समाजात काम करताना कार्यकर्त्यांना काही दक्षता घ्याव्या लागतात. तो पुढे ठेवतो तो अर्ज– त्याच्या भाषेत पिटीसन – जसाच्या तसा खरा मानून चालत नाही. त्याच्या कायदेशीर वृत्तीमुळे तो अत्याचारात सामील नसलेल्या गावच्या चारसहा प्रमुखांची नावेही गोवून टाकतो. पुढे खटल्यामध्ये ही घुसडली गेलेली माणसे आपण घटनास्थळी नव्हतो असे जेव्हा सिद्ध करतात, तेव्हा न्यायाधीशांच्या मनातील दलिताविषयीची विश्वासार्हता कमी होऊन अत्याचार होऊनही खटला ढासळतो. आता अशा काही फसलेल्या खटल्यांच्या अनुभवामुळे महार समाजातले नवे कार्यकर्ते ही चूक टाळतानाही दिसतात, हे नमूद केलं पाहिजे.

मांगाची स्वतःच्या जातीत बोलण्याची पारोशी नावाची वेगळीच भाषा आहे. मी टिपलेले जास्तीत जास्त शंभरएक शब्द आहेत. कार्यकर्त्याने हे अवगत केले, तर त्या समाजाचा फार, पटकन विश्वास मिळविता येतो असा अनुभव आहे.

खेड्यात स्थायिक नसलेल्या, पण खेड्यामधून फिरत व्यवसाय करणाऱ्या भटक्या विमुक्त जातींच्या भाषेचीही दखल घेतली पाहिजे. बहुतेक जमाती आंध्र किंवा कर्नाटकातल्या भाषा व मराठी यांचे मिश्रण असलेली भाषा आपसात बोलताना वापरतात. या मिश्र भाषेचा अभ्यास होणे आवश्यक आहे. सर्व जमाती या महाराष्ट्रात पोट भरत असल्याने त्यांना मराठी भाषा येतेच. जोशी, जव्हरी, भराडी, गोंधळी, वासुदेव व चित्रकथी या जमाती देवाची गाणी म्हणून, कथा सांगून पोट भरीत असल्याने यांची भाषा प्रासादिक वळणाची, दृष्टांत देत देत जाणारी असते. बोलताना वाक्याच्या शेवटच्या शब्दाची यमके जुळवत बोलतात.

वैदू, डोंबारी, माकडवाले, कैकाडी यांसारख्या व्यावसायिक जमातींच्या भाषेत पूर्वापार रुजलेली सेल्समनशिप असते. वैदू रोग्याशी बोलताना म्हणाला, "तुला असा बरा करतो की, तुला छपरावरून टाकला तर चेंडूसारखा उडशील." गुन्हेगारी परंपरा असलेल्या फासेपारधी, कंजारभट या जमाती इतर समाजाशी फार कमी बोलतात, त्यांची अंतर्गत, गुन्हेगारीशी संबंधित अशा शब्दांची वेगळी भाषा असते, खुणा असतात. आपल्याशी बोलायला आलेल्या कुणाही बाहेरच्या माणसाशी ते अतिशय सावधपणे बोलतात. पारखून घेतल्याशिवाय ते नीट बोलत नाहीत. यांच्यांत प्रवेश मिळवणे ही अतिशय अवघड गोष्ट आहे.

अशी ही ग्रामीण भागातली भाषेची वेगवेगळी वळणे आणि घाट आहेत. ती शहरी भागातल्या पांढरपेशा तरुणाला समजणे अवघड जाते यात आश्चर्य नाही. पण ती वळणं जातिबद्ध असल्याने ग्रामीण एका भागातल्या जातीचे वळण दुसऱ्या जातीतल्या माणसासही माहीत नसणे सहज शक्य आहे.

लोकजीवनाच्या तळापर्यंत जाऊन आल्याशिवाय त्यातल्या समस्या समजणे, त्या सोडविण्यासाठी लोकांना उद्युक्त करणे ही कामे शक्य नाहीत. त्या तळापर्यंत जायला भाषा हे मोठे माध्यम आहे. लोकजीवनातल्या वेगवेगळ्या घाटांचा अभ्यास होऊन ग्रामीण भागात जाऊ इच्छिणाऱ्या कार्यकर्त्यास त्यांची माहिती आधीच उपलब्ध झाली, तर त्याला काम करणे आधीपेक्षा सोपे जाईल.

आज सरकारदरबारी, वर्तमानपत्रांत, साहित्यात रूढ असलेली भाषा नागरी आहे. ती अधिक संकल्पनात्मक आहे. ग्रामीण भाषाप्रतिमा दृष्य, दृष्टांतयुक्त आहे. शहरी संकल्पना ग्रामीण जनतेसमोर मांडताना कितीही सोप्या पण नागरी भाषेत भाषेत मांडल्या, तरी त्यांना समजत नाहीत. पण तीच संकल्पना वर सांगितलेल्या ग्रामीण भाषेच्या वैशिष्टचपूर्ण स्वरूपात मांडली, तर ते उदाहरण, दृष्टांत त्यांच्या डोक्यात पटकन बसू शकतो. त्यामागची संकल्पना त्यांच्या मनात काही काळानें हळूहळू उतरू शकते. या दृष्टीने गाडगे महाराजांची सांगण्याची पद्धत हे उत्तम उदाहरण आहे. शहादा विभागातल्या आदिवासींमध्ये काम करणारे अंबरसिंग महाराज हे अलिकडच्या काळातले उदाहरण आहे. बाबा आढाव हे भाषणातून उदाहरणे देताना ग्रामीण जीवनातली उदाहरणेच निवडतात आणि

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ती ग्रामीण शैलीतच सांगतात. उरलेला संकल्पनात्मक भाग सोप्या नागरी भाषेत सांगतात. त्यामुळे अगदी डोंगराळ भागातल्या खेड्यातही त्यांचे भाषण पकड घेते. शहरी भागातही ग्रामीण जीवनाच्या औत्सुक्यामुळे ते श्रवणीय ठरते. संपर्क साधू इच्छिणाऱ्या प्रत्येकास स्वतःची अशी शैली वा अनुभवसिद्ध पद्धती निर्माण करावी लागते. या संपर्क-अडचणीबाबत विचार करताना वरील प्रकारच्या व्यक्तींच्या प्रयत्नांचा अभ्यास करावा लागेल.

लोकमानसात नवी मूल्ये रुजवताना नवे शब्द त्यांना शिकवणे हे अपरिहार्य आहे, पण हे शिकवताना त्या शब्दांचा पूर्ण अर्थ अनेक प्रतिमांसह त्यांच्यासमोर उभा केला पाहिजे. आज अनेक शहरी शब्द ते वापरताना दिसतात. पण खोलवर पाहिले, तर त्याचा भलताच अर्थ ते समजलेले असतात. जाता जाता एक उदाहरण सांगतो. एका खेड्यातल्या स्त्रीने आपल्यावर ओढ्याकाठी अमुक माणसाने बलात्कार केल्याची तक्रार आणली. तो माणूस अंगाने किरकोळ व टी. बी. चा पेशंट होता. बाई धष्टपुष्ट असताना हा माणूस बलात्कार कसा करू शकेल अशी शंका निर्माण झाली. त्या माणसाने कबूल केले, की मी तिचा हात धरला. पण तिने हिसडा दिल्यावर तो सोडून दिला एवढेच घडले. बाईला सविस्तर विचारले तेव्हा ती बलात्कार शब्द वापरायची, पण वरील घटनेलाच दुजोरा दिला. तेव्हा कुठल्याही आगळिकीला, विनयभंगाला 'बलात्कार' असा शब्द सरसकट वापरतात. तेव्हा या तऱ्हेच्या वेगवेगळ्या शब्दांना कुठला वेगवेगळा अर्थ अभिप्रेत आहे हे त्या शब्दाचे आवश्यक तेवढे सविस्तर वर्णन व त्यातील कायद्याच्या दृष्टीने नेमका काय फरक आहे ते सांगावे लागते. तेव्हा भाषा सरधोपटपणे न शिकविता अशा रीतीने शिकवावी लागेल.

आज सरकारी कामकाजात जुन्या इंग्रजी संज्ञांना नवे अवघड मराठी शब्द योजिले जात आहेत. त्याचा अर्थ शहरी माणसांनासुद्धा सहजासहजी समजत नाही तिथे ग्रामीण भागातल्या लोकांची किती फ्या-फ्या उडत असेल त्याची कल्पनाच करावी. पूर्वीच्या काळी संस्कृत, नंतर इंग्रजी आणि आता संस्कृतप्रचुर मराठी शब्द अशी सरकारी भाषेत व लोकभाषेत सतत दरी राहत आली आहे. ही व्यवस्था राखणारांना ही दरी राहणे सोयीचेही वाटत आलेले आहे, पण समाजव्यवस्था बदलू पाहणाऱ्या कार्यकर्त्याला मात्र ही दरी दूर करण्याचे काम अंगावर घेणे प्राप्त झाले आहे.

वरील टिपणात ग्रामीण, खालच्या थरात जन्मलेल्या, वाढलेल्या कार्यकर्त्याविषयी उल्लेख केलेला आहे. इथे एवढे नमूद करावेसे वाटते की, ग्रामीण समाजाच्या अनेक विभागांत असे अनेक थर आहेत, की जिथे एकही अशी दरी बजवणारा कार्यकर्ता निर्माण झालेला नाही. ते इतके शोषित व मागास आहेत, की आपल्या समस्यांचा विचार होऊ शकतो, त्या दूर होऊ शकतात याची पुसट कल्पनाही त्यांना नाही. या थरांत आज बाहेरच्यांनी जाऊन काम करणे आवश्यक आहे. तर पाच-पंचवीस वर्षांनी त्या त्या समाजात आपले बोलके कार्यकर्ते उभे राहू शकतील, अशी पायरी येईल. या समाजात काम करणाऱ्या बाहेरच्या कार्यकर्त्यांना भाषाविषयक मदतीची नितांत गरज आहे.

---



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# समाज-निरीक्षकांच्या वाटेतील भाषाव्यवहाराचे खाचखळगे

रा. प. नेने

निसर्गविज्ञान व समाजविज्ञान हे शब्द ज्या आधुनिक अर्थाने वापरले जातात ती विद्या आत्मसात करण्याची पद्धत या देशात पाश्चात्त्य शिक्षणपद्धतीतून रुजली. निसर्गविज्ञान ही ज्ञानशाखा वृद्धिगत करण्याकरिता अधिक संबंध प्रयोगशाळा व उपकरणांशी येतो, तर समाजविज्ञान संपन्न करण्याकरिता प्रत्यक्ष समाजाशी अधिक घनिष्ट संबंध प्रस्थापित करावा लागतो. सामाजिक संबंधातील ज्या कोणत्या अंगाचा अभ्यास करावयाचा असेल,— मग ते आर्थिक असो, सामाजिक अथवा सांस्कृतिक असो किंवा मानसिक प्रक्रिया आकलन करून घेण्याची जिज्ञासा असो— तर समाजनिरीक्षकाला व संशोधकाला अभ्यासासाठी निवडलेल्या समाजगटामध्ये जाऊन दीर्घकाळ राहून अथवा अल्पावकाशात त्या समाजगटातील विविध व्यक्तींशी संभाषण करून व त्यांचे दैनंदिन जीवन सूक्ष्म दृष्टीने न्याहाळून विपुल माहिती मिळवावी लागते. यामुळेच क्षेत्रीय सर्वेक्षण अथवा समाज–पाहणी या तंत्राचा आणि भाषाव्यवहार यांचा संबंध निकटचा आहे. समाज जितका कमी एकसंध असेल अथवा विकलांग असेल आणि पाहणीचे भौगोलिक क्षेत्र जितके विस्तृत असेल, तितक्या प्रमाणात भाषाव्यवहार बदलत जाण्याचा संभव वाढतो आणि निरीक्षकाचे काम अधिक अवघड बनते.

वरील प्रस्तावना करण्याचा हेतू मी स्पष्ट करतो. सर्वेक्षणाचे तंत्र पाश्चात्त्य समाजात सुरू झाले तेव्हाच त्या समाजाचे जीवन पुष्कळशा प्रगल्भावस्थेला जाऊन पोहोचलेले होते. त्या समाजाच्या प्रगतीची आजची अवस्था, आणि आपल्या समाजाची अवस्था यांत फार मोठी तफावत आहे. त्यामुळे आपल्याकडे हे सूत्र वापरताना निर्माण होणाऱ्या अडचणींची पार्श्वभूमी लक्षात घेणे आवश्यक आहे. खडतर निसर्गाशी सातत्याने सामना केलेला असल्यामुळे, शिक्षणप्रसार झालेला असल्यामुळे व तुलनेने आर्थिक उन्नती झालेली असल्यामुळे तेथील समाजात जो आत्मविश्वास निर्माण झाला आहे, त्यामुळे त्यांच्या अभिव्यक्तीत काटेकोरपणा व प्रभावीपणा अधिक असतो. प्रश्नावली या साधनाच्या द्वारा अथवा अनौपचारिक संभाषणातून माहिती मिळविणे हे त्यामुळेच तुलनेने सोपे असते. आपल्याकडे खेडेगावात जाऊन एखाद्या कुटुंबप्रमुखाला, " गेल्या २५ –३० वर्षांत आपल्या गावात काही बदल झाला का ? झाला असल्यास, काय बदल झाला हे सांगू शकाल का ?" असा प्रश्न विचारला, तर "अवो बदल म्हंजी, बदलच की. मार्गीच्या महिन्यात झाडाला पान बी न्हाय् अन् श्रावनात हिरवी गार नव्हं का ? एक सारखं थोडी राहतंय् ? बदल हैच की." असे काही तरी अप्रस्तुत उत्तर, मिळालेच तर मिळते. कित्येकदा तर उत्तरच मिळत नाही. उत्तर देणारा नुसता बघतच राहतो. त्यानंतर निरीक्षकाने "बरं, तुमच्या गावात काही विकास झाला का गेल्या १०–१२ वर्षांत ?" असे विचारले तर, "यिकास म्हंजी यिकासाचं हाफिस म्हनता व्हय ? है की तालुक्याला." असे उत्तर मिळते. पंचायत समितीच्या कचेरीला यिकासाचे हाफिस असे नाव कित्येक ठिकाणी रूढ झाले आहे. म्हणजे ते एक विशिष्ट नाम झाले आहे. विकास शब्दाचा आशय नीटसा समजलेला असतो असे नाही. उत्तर सूचवून प्रतिक्रिया काय होते ते बघणे अशास्त्रीय आहे असे पाहणी करण्यापूर्वी ठरलेले असेल, तर या प्रश्नाला उत्तर मिळालेच नाही असे, किंवा अप्रस्तुत उत्तर मिळाले असे नोंदवावे लागेल. ज्याअर्थी उत्तर काही मिळत नाही, त्याअर्थी कोणत्याही विकासकार्याचा संस्कार उत्तर देणाऱ्याच्या मनावर झालेला नसावा असा निष्कर्ष काढावा तर तेही चुकीचे ठरेल. कारण उत्तर सुचवून पहायला हरकत नाही असे ठरवून निरीक्षकाने जर विचारले, "अहो ही बालवाडी, हा दवाखाना, ही शाळा, हा रस्ता, हे सांडपाणी जाण्याचे गटार किंवा ड्रेनेज, हे ग्रामपंचायतीचे ऑफिस हे सगळं नाही का झालं गेल्या काही वर्षांत ? मग काय वाटतं तुम्हाला, झाला की नाही विकास ?" तर उत्तर मिळते, "हा झाला, बारकी बारकी पोरं





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाचाया बागडाया लागली, गाणी म्हनत्यात, गोष्ट सांगत्यात, मोठी पोरं पेपर बी वाचत्यात. असं कुठे होतं का पहिलं ? हां आनि गराम पंचायतीचा ऑफिस खोलाया काळीचा सायब पन आला व्हता जिल्हाकडून, काळचा गाडीत बसून. आठवलं पघा. पन् सायब, हैं की माहीत समदं तुमासनी ! कायला पुसता उगीच आपल अडचानाला ?" तेवढ्यात तेथे एकादा सुशिक्षित मुलगा असेल, तर तो म्हणतो, "सायब परीक्सा घ्यायला आलेत नाना, शी आय डी खात्याने पाठवलं असल. हफिसर लोक काम करतात की न्हाय् ते बघायला." त्यावर उत्तर मिळते, "माजी कसली आलीया परीक्सा, सरपंचाला न्हाय तर मास्तरना इचारा की सायब, आता जरा बैलाला चारा द्यायला पायजे. येतो बरं का." ही परीक्षा नाही वगैरे काही निरीक्षकाने सांगावयाच्या आत, उत्तर देणारा निघून चालावयास लागतो. उरलेले प्रश्न त्या बैठकीत तरी निदान विचारता येत नाहीत. केवळ व्यवस्थित अभिव्यक्तीचे सामर्थ्य नसल्यामुळे संवाद लांबत जातो आणि एका बैठकीत मुलाखत पुरी करता येत नाही. एका बैठकीत पुरी करण्याचे तंत्र आपल्या समाजात अद्याप तरी फारच थोड्या वेळा – म्हणजे उदाहरणार्थ, एकाद्या विशिष्ट घटनेबद्दल विचारावयाचे असेल तर – उपयुक्त ठरेल असा एकूण अनुभव येतो.

काटेकोरपणाचा अभाव ग्रामीण भागातच नव्हे, तर नगरवासीयांच्यांत, फार काय त्यांतील सुशिक्षितांच्यांतही आढळतो. पुण्यातील साधारण ५० किंवा अधिक वय असलेल्या सुशिक्षितास जर विचारले, "पुणे सुधारायला साधारण केव्हापासून सुरुवात झाली ?" तर बऱ्याच जणांकडून लगेच उत्तर मिळते, "बर्वेसाहेब कमिशनर म्हणून आले आणि पुणे एकदम सुधारायला लागले." त्यावर जर विचारले, "काय केले बर्वेसाहेबांनी, की ज्याच्यामुळे पुणे सुधारावयास सुरुवात झाली असे वाटते ?" तर बराच वेळ थांबूनही उत्तर मिळत नाही. जरा वयस्कर मनुष्य असेल तर तो म्हणतो, "म्हणजे आमच्या स्मृतीचीच परीक्षा आहे म्हणा की. एक सांगतो तेवढे घ्या लिहून म्हणजे सगळं आलं त्याच्यात. He was the most incorruptible man in the country. तुमच्या नेहरू-बीहरूंचासुद्धा नंबर खाली लागेल याबाबतीत. अहो, British trained I. C. S. officer होता हो तो, Strictness tempered with reasonability, efficiency effective because of its flexibility. तो काय तुमचा आजचा ग्रेस मार्कवाला राखीव आय. ए. एस्. वीर नव्हता. हे पुढचे वाक्य घेऊ नका, पण सांगतो आपला तुम्हाला, नेने नाव आहे तुमचं असं म्हणालात म्हणून." या सर्व उत्तरात एका ब्राह्मण्यग्रस्त माणसाचे चांगले दर्शन घडते खरे; परंतु प्रश्नाकडे लक्ष देऊन उत्तरं देण्याची सवय नसल्यामुळे, बर्वेसाहेबांनी पुण्यात काय केले याचे उत्तर मिळतच नाही. नावावरून जात कळल्यामुळे, त्या जातीत जन्माला आलेल्याची जातिसंस्थेबाबत मते काहीही असोत; उत्तर देणाराला ती जोपर्यंत कळलेली नसतात, तोपर्यंत आपल्या जातवाल्याजवळ त्याला बऱ्याच गोष्टी, विशेषतः व्यथा अगर रुखरूख मोकळेपणाने व्यक्त करावीशी वाटते. असे कित्येकदा आढळून येते. परंतु हे नेहमीच घडते असे नाही.

उच्च वर्णीयांच्या 'शुद्ध' वाणीविषयी पारंपरिक दृष्ट्या कनिष्ट वर्णीयांच्यामध्ये आदरयुक्त कौतुकही असते. त्यामुळे शाळेतील शिक्षणाचा दर्जा कसा खालावला आहे या विषयावर जर बोलावयाचे असेल, तर एखादा मराठा अथवा धनगर समाजातील मनुष्य ब्राह्मण निरीक्षकाजवळ 'महार, घेड' हे शिक्षक झाल्यामुळे शिक्षणाचा 'बट्ट्या बोळ' कसा झाला आहे हे नकला व हातवारे करून मोठ्या विस्ताराने सांगत सुटतो. ज्यांच्याकडून माहिती घ्यावयाची आहे त्यांना निरीक्षकाबद्दल विश्वास वाटणे हे सर्वांत महत्त्वाचे असते.

मराठवाड्यात सुमारे ३ वर्षांपूर्वी विद्यापीठ नामांतर आंदोलनाच्या निमित्ताने दलितांची ससेहोलपट करण्याचा जो प्रयत्न झाला, त्या विषयावर पुणे विद्यापीठाच्या वतीने सध्या एक संशोधन-प्रकल्प चालू आहे. त्या अभ्यासाकरिता मी एका दंगलग्रस्त गावी गेलो असता गोंधळी समाजातील एका गृहस्थांकडून काही माहिती घेत होतो. त्यांनी बऱ्याच प्रश्नांची उत्तरे आडवळणाने का होईना, पण दिली. तरी पण ते मोकळेपणाने बोलत नाही आहेत, असे मला जाणवले. पूर्वीच्या अनुभवावरून हा कदा-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चित माझी जात व भाषा यांचा परिणाम असेल अशी मला शंका आली. म्हणून दुसऱ्या दिवशी मी न जाता माझ्याबरोबर काम करीत असलेल्या ब्राह्मणेतर सहाय्यकानी या गृहस्थांशी जाऊन बोलावे असे मी सुचविले. हे सहाय्यक आदल्या दिवशी माझ्याबरोबर होतेच; पण ते फक्त अधूनमधून बोलत होते. हे सहाय्यक दुसऱ्या दिवशी गेल्यावर गोंधळी त्यांना म्हणाले, 'या साहेब, ते तुमचे खोदून खोदून समद्या गोष्टींबद्दल बारीकसारीक माहिती विचारणारे साहेब नाही का आज आले ? अहो त्यांची भाषा लई न्यारी न्यारी लागते. तुम्ही कसं आपल्यावाणी बोलता. काय भानगड न्हाय ना यात ? मंग सांगतो," असे म्हणून– आदल्या दिवशी ज्याने आपल्या घरातील कोणी वारले तर उत्तरक्रिया परजातीचा कोणी करणार नाही म्हणून आपला शेजारी नेहमी आपला जातवालाच असावा असे सांगितले होते– इतर काही उदाहरणे देऊन गावातील जातिनिहाय राहण्याची व्यवस्था हीच कशी योग्य आहे ते सांगितले होते. त्याने वास्तविक प्रत्यक्ष जीवनात त्याचे दलिताशी संबंध कसे सलोख्याचे होते, त्यांच्या विहिरीचे पाणीसुद्धा तो कसा घेत होता, परंतु 'देवाचे पवित्र कार्य करणाऱ्या गोंधळ्याने महारांचे पाणी घेणे वंगाळ' आहे व ते त्याने सोडून न दिल्यास त्याला गोंधळ हा कार्यक्रम करण्यासाठी बोलावले जाणार नाही अशी धमकी गावातील मराठा समाजाच्या लोकांनी कशी दिली अशा स्वरूपाची व इतर काही अतिशय प्रस्तुत अशी माहिती सहाय्यकांना दिली. अर्थात यावरून उच्च वर्णीयाने कृत्रिमरीत्या ग्रामीण भाषा बोलण्याचा प्रयत्न केला, तर संज्ञापनव्यवहार व्यवस्थित होऊ शकेल असा मात्र याचा अर्थ होत नाही. उलट, आपली नक्कल करण्याचा प्रयत्न होतो आहे, यात अप्रत्यक्षपणे आपल्याला कमी लेखण्याची प्रवृत्ती निरीक्षकाच्या मनात आहे असे, उत्तर देणाराला वाटल्यास तो सहकार्य करण्यास मनापासून तयार होत नाही. सोप्या भाषेत व सौम्य पण सुस्पष्ट स्वरात बोलणे हेच अधिक श्रेयस्कर असते. कित्येकजण प्रश्नाचे उत्तर प्रत्यक्षपणे न देता पुराणांतील कथा सांगून अथवा संतवाङ्मयातील अवतरणे देऊन अथवा तऱ्हेतऱ्हेच्या म्हणी वापरून ऐसपैस पाल्हाळ करून बोलत असतात. मराठवाड्यात हा अनुभव विशेष प्रकर्षाने येतो. अशा वेळेस निरीक्षकाला जर या वाङ्मयाची किंवा लोकव्यवहारातल्या म्हणींशी पुरेसा परिचय नसेल, तर त्याला आपल्या प्रश्नाचे काय उत्तर मिळाले हे समजणार नाही.

कित्येकदा निरीक्षकाला अगदी साधा वाटणारा प्रश्न उत्तर देणाराला समजतच नाही असे आढळते आणि पुन्हा पुन्हा तो विचारीत राहील, तर उत्तर देणारा त्रस्त होतो. गोखले अर्थशास्त्र संस्थेच्या वतीने पाहणी करणाऱ्या एका अन्वेषकाला एकदा शेतकऱ्यांची अवजारे किती काळ टिकतात म्हणजे नवी अवजारे किती कालांतराने घ्यावी लागतात हे विचारायचे होते. थोडक्यात म्हणजे अवजारांच्या घसाऱ्याचे प्रमाण काढण्याकरिता ही माहिती आवश्यक होती. परंतु शेतकरी–कुटुंबाचा सरासरी वार्षिक खर्च किती होतो हे समजण्याकरिता या माहितीची आवश्यकता काय हे उत्तर देणाऱ्याला समजेना. अगदी सोप्या शब्दांत 'ही तुमची कुऱ्हाड किती दिवस टिकेल ?' असे विचारले, तरी "त्याचं काय सांगता येतं का ? जीव असेल तोवर टिकेल, एखाद्या वेळी घेतल्याच्या दुसऱ्या दिवशीपण दांडा तुटेल, नायतर यीस न्हाय तर पन्नास वर्सं बी जाईल. त्ये काय कोनाला सांगता येणार न्हाय. मारुतीच्या शेपटावानी तुमचे प्रश्न लय लांब. संपतच न्हाय कधी. आवरा लवकर," असे जरासे चिडून उत्तर मिळाले. याच गृहस्थाने दोनचार दिवसांनी रात्रीच्या वेळेस पारावर बसून इतरांच्याबरोबर व अन्वेषकांबरोबर अनौपचारिक गप्पागोष्टी करताना वरील प्रश्नाचे उत्तर सहजगत्या देऊनही टाकले. औपचारिकरित्या प्रश्नावली घेऊन प्रश्न विचारला असता जो समजला नाही तोच, दुष्काळ, कोण्या गावची कोणाची जमीन कशामुळे चोपण झाली आहे, सरकारचे रेडिओवरील शेतकऱ्यांना शेतीविषयक सूचना देणारे कार्यक्रम कित्येकदा अगदी पुस्तकी कसे असतात, यावर गप्पा चालल्या असताना प्रश्नाचे उत्तर केवळ एकाकडून मिळाले असे नाही, तर इतरांनी त्यावर थोडी टिकाटिप्पणी केली, त्यामुळे माहिती अधिक बरोबर आणि तपशिलवार मिळू शकली.

संज्ञापनव्यवहारात वागणुकीचाही समावेश होतो असे जर मानले, तर निरीक्षक व संशोधक







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यांच्यावर बरीच जबाबदारी येऊन पडते हे उघडच आहे. इतिहासाचार्य राजवाडे हे एका विधवा बाईकडे काही इतिहास-संशोधनाच्या दृष्टीने महत्त्वाचे कागदपत्र मिळतात याची चौकशी करण्याकरिता त्यांच्या नेहमीच्या अजागळ पोशाखात गेले असताना त्या बाईंना एक गरीब माणूस दक्षिणा मागावयास आला असेल असे वाटल्याने त्यांनी त्यांना घरात एक धार्मिक विधी चालू असल्यामुळे तिष्ठत ठेवले होते. थोडचा वेळाने राजवाडचानी आपला येण्याचा उद्देश सांगितल्यावर कागदपत्र लगेच दाखविता येणार नाहीत असे त्यांना उत्तर मिळाले. त्यावर संतापून बाईच्या घराण्यात अधिक विधवा होतील व त्या वाण्यांना ते कागदपत्र विकतील, त्या वेळेस आपण संशोधनाला घेऊ अशा आशयाचे उत्तर राजवाडचानी दिल्यामुळे त्यांना ते कागदपत्र मिळू शकले नाहीत. याच्या उलट, संतवाङ्मयाचे अभ्यासक पांगारकर यांना एका जमीनदाराने आपण फोडीत असलेली लाकडे फोडून होईतोपर्यंत उन्हात उभे करून ठेवले होते. तरीही न रागावता, पुढे या जमीनदाराने पांगारकरांना किती आर्या-अभंग येतात याची परीक्षा घेतल्यावर, त्यातही कमीपणा न मानता आपल्या पाठांतराचे दर्शन घडविल्यामुळे जमीनदाराकडून अनेक मौल्यवान कागदपत्र हस्तगत करता आले.

एका समाजगटातील लोक इतरांशी बोलताना, 'तू' असे म्हणत असले, तरी त्यांच्याशी इतरांनी बोलताना बोलणाराची जी 'तुम्ही' म्हणण्याची प्रथा असेल तीच पाळणे आवश्यक असते. अकारण जास्त अदबी दाखवून 'आपण' म्हणण्याचीही गरज नसते. घराचे दार अर्धवट उघडे असेल, तर पाश्चात्त्य पद्धतीने ठोठावण्याची गरज असते असे नाही. स्त्रियांशी संवाद करणे कठीण असते अशी बऱ्याच जणांची शहरांत राहून समजूत झालेली असते. परंतु ग्रामीण स्त्रिया बोलायला अतिशय उत्सुक असतात असा अनुभव येतो. त्यांचे निरीक्षकाच्या वागणुकीकडे विशेष लक्ष असते. दिलेल्या चटईवर अगर कांबळीवर साहेब चटकन बसतो आहे की नाही, लागल्यास उन्हात दगडावर बसूनही टिपणी करतो आहे का, दूध घरात नसेल तर कोरा चहाही प्रतिकूल चर्चा न करता स्वीकारला जातो आहे का यावर संभाषण सुरळीतपणे चालणे अवलंबून असते. स्त्रिया उत्तरे देताना सहसा चकवाचकवी करीत नाहीत. पुरुष मात्र अनेकदा अतिसावधगिरीने बोलत असतात. कुटुंबप्रमुख पुरुषाला न दुखविता स्त्रियांना बोलावयास उत्तेजन देण्याकरिता निरीक्षकाला पुष्कळच कौशल्य वापरावे लागते. त्यात यश आले तर किती तरी मोलाची माहिती मिळू शकते.

अलीकडल्या काळात काही ग्रामीण सुशिक्षित तरुण, विशेषतः दलित समाजातील तरुण इंग्रजी बोलण्यास उत्सुक असतात. त्यांना प्रथम तरी निदान इंग्रजीत उत्तरं देऊन मग मराठीतून संभाषण सुरू केलं नाही, तर ते त्यांना आवडत नाही. एकदा एका अमेरिकन विदुषींबरोबर थंडीच्या दिवशी एका खेडचातील घरी मी गेलो असता त्या बाईंनी मराठीत संभाषणाला सुरुवात केली, त्यावेळेस तेथे असलेला एक सुशिक्षित युवक म्हणाला, "It is monstrous cold no? Shall I close the doors of the window?" स्मित मोठचा कष्टाने दाबून बाईंनी इंग्रजीत उत्तर दिले, म्हणून पुढील संवाद होऊ शकला. अधूनमधून हा युवक त्याला येईल तशा इंग्रजीत बोलतच होता. तेव्हा बाई हसत हसत म्हणाल्या, "मला इंग्रजी नीट येत नाही. आपण मराठीतूनच बोलुया. चालेल?" युवक तसा हुषार असल्यामुळे त्याला इंग्रजी नीट येत नसल्याचे त्याला जाणवले आणि मग तो मराठीत बोलू लागला.

अलीकडल्या काळात संशोधकाला आपल्या स्वतःच्या विषयाव्यतिरिक्त अन्य काही तत्संबंधित विषयांचे ज्ञान असावे लागते हे सर्वमान्य झाले आहे. इतिहास-संशोधकाला भाषा, भाषेतील बदल इत्यादींचे ज्ञान असणे आवश्यक असते, तसे भाषाशास्त्रज्ञाला इतिहासाचे ज्ञान असणेही आवश्यक असते याचे एक चांगले उदाहरण प्रा. दामोदर कोसंबीनी दिले आहे. मराठी ग्रामनामांत गोमाशी हे नाव आढळते व त्यांच्या संशोधनक्षेत्राच्या टापूत ते आले. त्यांना त्या नावाबद्दल जिज्ञासा उत्पन्न झाली म्हणून त्यांनी एका भाषाशास्त्रज्ञास याची व्युत्पत्ती काय असावी असे विचारले. गावात बऱ्याच गोमाशा असतील म्हणून गोमाशी हे नाव पडले असावे असे त्यांना उत्तर






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मिळाले. प्रत्यक्ष गावी गेल्यानंतर गावकऱ्यांशी बोलताना 'गोम नावाचे एक ठिकाण गावात आहे' असे त्यांना उत्तर मिळाले. हे गोम नावाचे ठिकाण जाऊन तपासले असता तेथे एक लेणी आढळली. त्यात एक उत्कृष्ट मूर्ती कोरलेली होती. त्यावरून गौतमबुद्धाला गौतमर्षी असे ब्राह्मण लोक म्हणू लागले होते. त्याचाच हा अपभ्रंश आहे. 'गौतम'चा 'गोम' झाला आणि ऋषीचा 'ईशी' पुढे दोहोंचा संयोग होऊन गोमाशी हे नाव पडले असावे असा त्यांचा निष्कर्ष त्यांनी दिला आहे. बुद्धाचे नाव गौतमर्षी झाले होते हे जर माहीतच नसेल आणि प्रत्यक्ष जाग्यावर जाऊन संभाषण करून आपले ज्ञान जर पडताळून पाहण्याची तयारी नसेल, तर संशोधकाला अन्य कोणती व्युत्पत्ती सुचणारही नाही.

सारांश, पाश्चात्त्य देशांतून आलेली संशोधन-पद्धती जागरुकपणाने आवश्यक ते बदल करून स्वीकारली, तर त्यातून मौलिक संशोधन करणे निश्चितच शक्य होईल. मात्र त्यासाठी संशोधकाला आपला संज्ञापनव्यवहार आपल्या देशातल्या परि-स्थितीला अनुरूप असा करावा लागेल.

---

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# मर्यादित शब्दसंग्रह व त्याचे परिणाम

श्री. स. ह. देशपांडे

१. वारली नामक आदिवासी समाजात शैक्षणिक कार्य करणाऱ्या कोसबाडच्या श्रीमती ताराबाई मोडक यांनी एके ठिकाणी म्हटले आहे, की वारल्यांची भाषा सुमारे ३०० शब्दांची आहे. हे खरे नाही असे डॉ. अशोक केळकर यांनी मला कळविले होते. वारल्यांच्या बाबतीतली ही सांख्यिकीय माहिती कदाचित बरोबर नसेलही, प्रश्न सर्वसामान्य स्वरूपाचा आहे. अर्धशिक्षित, अशिक्षित, निरक्षर व जीवनाच्या अगदी प्राथमिक पातळीवर जगणाऱ्या लोकांची भाषा शब्दसंग्रहाच्या दृष्टीने तुटपुंजी असण्याची शक्यता आहे. भाषा व विचारसामर्थ्य यांचा अन्योन्यसंबंध भाषाशास्त्रज्ञ मान्य करतात असे दिसते. तसे असेल तर तुटपुंजे शब्दसामर्थ्य व तुटपुंजी विचारशक्ती असा संबंध लावता येईल. निदान आदिवासी-जीवनाच्या निरीक्षणावरून असे मत तयार होते, की त्यांची विचारशक्ती क्षीण असावी. यातूनही त्यांचे काही आर्थिक, सामाजिक प्रश्न निर्माण होत असावे. बालभाव, भोळेपणा, सरळपणा, निर्व्याजता (Innocence) इत्यादी भाववाचके आदिवासींच्या संदर्भात अनेकदा वापरली जातातच.

२. आर्थिक व्यवहाराची गुंतागुंत जेवढी कमी तेवढी भाषासमृद्धी कमी असाही संबंध असावा. वारली लोकांची पारंपरिक अर्थव्यवस्था गावपातळीवरच नव्हे, तर कौटुंबिक पातळीवरही बरीचशी स्वयंपूर्ण आहे. वारली समाजाचे दुसरे एक वैशिष्ट्य असे सांगतात, की तो जसा परक्यांशी कमी बोलतो तसा आपसातही कमी बोलतो. परस्परांशी भाषिक देवाणघेवाण कमी असते. ' गप्पा ' हा भाग त्याच्या जीवनात नाही. आर्थिक स्वयंपूर्णता, भाषान्यूनत्व परस्परविचार–विनिमयाचा अभाव या सर्वांचा कदाचित परस्परसंबंध असेल.

३. ग्रामीण भागातील लोकांची भाषा अनेकदा चित्रमयी, प्रतिमामयी अशी असते असा परिसंवादात अनेकदा उल्लेख झाला ( उदा. अवचट यांचा निबंध ). शब्दसंग्रहाची न्यूनता हेही या घटनेचे एक कारण असू शकेल ( या बाबतीत कवी आणि अशिक्षित यांमध्ये साम्य असावे. 'शब्दांच्या पलीकडचे ' सांगण्याचा दोघांचा हेतू असतो व म्हणून दोघेही प्रतिमांचा आश्रय करतात असे म्हणता येईल काय ? ).

### भाषा व अमूर्त विचार

४. मर्यादित भाषा व मर्यादित वर्णनसामर्थ्य यांमुळे विचारशक्ती मर्यादित राहत असावी असे वर म्हटले. याचे एक मुख्य उदाहरण म्हणजे अमूर्त ( Abstract ) पातळीवर विचार करण्याची असमर्थता हे सांगता येईल. श्री. नेने यांच्या निबंधात कुदळ (किंवा कुऱ्हाड) किती वर्षे टिकते,

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
अनुक्रमणिका

या प्रश्नाला समाधानकारक उत्तर ग्रामीण भागात बहुधा मिळत नसल्याचा उल्लेख आहे. याचाच अर्थ 'सरासरी' ( Average ) ही अमूर्त संकल्पना लोकांना वापरता येत नाही असा असावा. वर्थायमर या गेस्टाल्ट मानसशास्त्रज्ञाने पुढच्यासारखे एक उदाहरण दिले आहे : आदिम मानवांना आठ दुव्यांची साखळी ही 'साखळी' असते, चार दुवे म्हणजे 'अर्धी' साखळी हे त्यांना पटू शकते, पण 'एक-अष्टमांश' साखळी ही संकल्पना त्यांना समजत नाही–त्यांच्या दृष्टीने तो 'एक दुवा' असतो.

गणनशक्ती मर्यादित असल्यामुळेही अमूर्त विचार करण्याची शक्ती मर्यादित राहत असावी. (हा विषय मी वेगळ्या निबंधात मांडला आहे.)

## काही निष्कर्ष

५. भाषान्यूनत्व असणाऱ्यांशी व्यवहार करताना चित्रमय भाषेचा उपयोग करणे आवश्यक दिसते.

६. ग्रामीणांशी भाषिक व्यवहार करणारे कीर्तनकार, प्रवचनकार, लोकनेते इत्यादींच्या भाषणशैलीचा अभ्यास करणे या दृष्टीने उपयुक्त ठरेल. उदाहरण म्हणून नाना पाटील यांच्या भाषणातील एक उतारा पुढे देत आहे. ( पाचशे कोटी रुपये म्हणजे किती हे नाना पाटील कोल्हापूरच्या श्रोतृवृंदाला समजावून देत आहेत. )

"गडयांनो, आपल्या बैलगाडया घ्यायच्या. त्याला बैलं जुपायची हालमजोडीची बैलं. बैलगाडया मिरवत त्या क्रांतिवीर बिंदू नारायण चौकात आणायच्या. आपल्या ढवळ्या-पवळ्यांची पहिली बैलगाडी जेलाच्या भिंतीलगत उभी करायची. नंतर एका मागोमाग एक अशा गाडया हुब्या करायच्या. पाच, पंचवीस, पन्नास, शंभर, दीडशे– आपल्या लाल्यापाल्याची गाडी शेवटची. त्या गाडयातनी रानीछाप सुरती रुपयं भरायचं. अगदी शिगोशीग काठोकाठ माप. जराबी कम नाही की ज्यास्त नाही. त्या बिंदू-चौकापासनं पार टेंबलाईच्या माळापर्यंत सलग, उभी रांग लावायची. सुरती रुपयांनी खच्चून भरलेली, दीडशे गाडयांची ही अख्खी रांग– ह्ये पाचशेहे कोटी रुपये–" (एस्. एस्. भोसले, " क्रांतिसिंह नाना पाटील : श्रमिकांच्या राज्याचे स्वप्न " समाज प्रबोधन पत्रिका, जानेवारी-फेब्रुवारी १९८१ ( ९७ ), पृ. १८ )

७. बोलीभाषा अविकसित आहेत असे मान्य केले म्हणजे प्रमाण भाषेचे त्यांच्यावर 'आक्रमण' होणार हे गृहीत धरावेच लागेल. ( शिवाय, मराठी भाषा ज्या प्रमाणात अविकसित असेल, त्या प्रमाणात संस्कृत भाषेचे 'आक्रमण' खपवून घ्यावे लागेल.)

८. असे (बव्हंशी अपरिहार्य) आक्रमण होत असताना 'अवघड' पणाच्या नावाखाली विरोध होत असतो. अवघडपणाची संकल्पना तपासून पाहिली पाहिजे. अपरिचय, उच्चारकाठिन्य व दीर्घता यांमुळे शब्द 'अवघड' ठरतात असे दिसते. कित्येकदा या गोष्टी टाळता येत नाहीत. अशा वेळी नव्या शब्दांची योजना कृत्रिम रीत्या–नवे अक्षरसंयोग हेतुतः करून– का करू नये ? (एस्पेरेंटोचा दाखला आहेच.)

९. आदिम मन, संस्कृती, समाज, अर्थव्यवस्था यांच्यावर भाषेच्या अभ्यासातून काय प्रकाश पडतो व त्याचे परस्परसंबंध काय आहेत हे अभ्यासणे जरूर आहे.

---



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# वृत्तपत्रे व मराठी

श्री. गोविंद तळवलकर

वृत्तपत्रीय मराठी भाषेचा विचार करावयाचा तर प्रथमच एक वैशिष्टय लक्षात येईल, ते म्हणजे ती एकसाची नाही हे. एखाद्या ग्रंथाची भाषा एकसाची असू शकते. पण नाटकातील पात्रे ज्याप्रमाणे वेगवेगळी भाषा बोलतात, त्याप्रमाणे वृत्तपत्रांच्या भाषेचा पानागणिक साचा बदलतो आणि तो तसा बदलणे भाग असते. ग्रंथलेखन हे एका व्यक्तीने केलेले असते आणि त्याला एक विषय समजावून सांगावयाचा असतो. तसे वृत्तपत्राचे नाही. दैनिक काय किंवा साप्ताहिक वा पाक्षिक काय, ही एका व्यक्तीची करामत नव्हे. तो सामूहिक उद्योग आहे. संपादक, सहसंपादक, वार्ताहर, स्तंभलेखक अशा सर्वांच्या सहकार्यातून व प्रयत्नातून दैनिक तयार होते आणि त्यात अनेकविध विषय येतात. यामुळे वृत्तपत्रीय मराठी भाषा ही एकसाची असूच शकत नाही.

दैनिक आणि साप्ताहिक वा पाक्षिक यांच्या भाषेतही फरक पडणे अपरिहार्य आहे. दैनिकात बातम्यांना प्राधान्य असते, तर साप्ताहिक वा पाक्षिकात लेख, सदरे यांना असते. त्यामुळे साप्ताहिक व पाक्षिकात विश्लेषणात्मक लिखाण अधिक येते. इंग्लंडमध्ये संडे टाइम्स व ऑब्झर्व्हर ही दोन साप्ताहिक वृत्तपत्रे आहेत. तशी आपल्याकडे नाहीत. या दोन्ही साप्ताहिकांचे स्वतंत्र अस्तित्व आहे. त्यांत बातम्या येतात, पण त्या देण्याची शैलीही वेगळी आहे. बहुतेक बातम्यांची पार्श्वभूमी वर्णन केली असते आणि कित्येक वेळा संबंधित बातमीचे विश्लेषणही केले जाते. दैनिकात असे होत नाही व असे करण्यास सवडही नसते. दैनिकाची मदार ही मुख्यतः वृत्तसंस्थांकडून येणाऱ्या बातम्यांवर असते. या वृत्तसंस्थांची बातम्या लिहिण्याची स्वतंत्र धाटणी असते आणि तिच्यासह त्या वृत्तपत्रात प्रसिद्ध होतात. आपल्याकडील वृत्तसंस्थांपेक्षा पाश्चात्त्य देशांतील वृत्तसंस्थांची धाटणी वेगळी आढळेल. ऑब्झर्व्हर वा संडे टाइम्स ही साप्ताहिक वृत्तपत्रे आपल्या स्वतःच्या प्रतिनिधींवर विशेष विसंबून असतात आणि त्यामुळे त्यांना बऱ्याच प्रमाणात एका प्रकारची शैली वापरता येणे शक्य असते.

दैनिकाचे स्वरूप हे सामूहिक प्रयत्नांनी ठरत असल्याने व त्यात बातम्या, बातमीपत्रे व सदरे अशी विभागणी असल्याने पात्रबरहुकूम भाषेची सरणी बदलते. बातम्या ज्या शैलीत दिल्या जातात त्याच शैलीत वार्तापत्रे दिली जात नाहीत. वार्तापत्रे ही त्या त्या बातमीदाराच्या शैलीतच द्यावी लागतात. तीच स्थिती स्तंभलेखकांच्या सदरांची. संपादकीय लिखाणाची शैली आणखी वेगळी असते. एवढेच नव्हे, तर अग्रलेख व संपादकीय स्फुटे यांच्या भाषेच्या स्वरूपात फरक पडतो व तसा तो पडणे योग्य असते. स्फूट हे आकर्षक व थोड्या शब्दांत पुरे करावे लागते. त्यात माहिती, थोडी मस्करी व उपहास, काहीसे लालित्य यांची सरमिसळ करावयाची असते. अग्रलेखांची शैली विषयानुरूप बदलावी लागते. काही वेळा निव्वळ माहिती द्यावयाची असते, काही वेळा विरुद्ध मत खोडून काढावयाचे असते, तर काही वेळा उपहास करणेच श्रेयस्कर असते. तरीही स्फुटाप्रमाणे अग्रलेखाची भाषा ही हलकीफुलकी नसते.

वृत्तपत्रीय भाषेचे हे स्वरूप व मर्यादा लक्षात घेतल्यावर मराठीच्या बाबतीत काय अनुभव येतो याचा विचार करू. दैनिकाचा भर बातम्यांवर असतो आणि या मुख्यतः इंग्रजीतून येतात. जगभर इतक्या घडामोडी घडत असतात, की त्या सर्वांची माहिती आपल्या भाषेतून देणे सोपे जात नाही. विषयाचा प्रश्न बाजूला सोडून व्यक्तिनामांचा विचार केला, तरीही त्यांच्या उच्चारांबाबत वृत्तपत्रात काम करणाऱ्याची फार पंचाईत होते. इंग्लिश नावांबाबत फारशी अडचण येत नाही. तरीही रिगन की रेगन हा प्रश्न प्रथम पडला होता. बी. बी. सी.वर नाव ऐकले, तेव्हा रेगन हे पक्के केले हे स्वानुभवावरून सांगतो. व्यक्तिनामांच्या बाबतीत फ्रेंच, जर्मन, नार्वेजियन, पूर्वयुरोपीय देश, चिनी इत्यादी नावांबद्दल फार

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

घोटाळे होतात. हॅमरशील्ड यांचे नाव यूनोचे सेक्रेटरी-जनरल म्हणून प्रथम घेतले गेले, तेव्हा त्यांच्या नावाचा उच्चार स्पेलिंगप्रमाणे झाला. मी जेथे कामाला होतो, तेथील इंग्रजी पत्रात इंग्रज संपादक होता. त्यालाच मी उच्चार विचारला तेव्हा त्याने खरा उच्चार सांगितला. चिनी नेत्यांच्या नावाचे उच्चार चिनी लोक करतात तसे करण्याची प्रथा पडल्यामुळे गेल्या वीसतीस वर्षांची सवय बदलणे भाग झाले आहे. पेकिंग ऐवजी राजधानीचे नाव बेजिंग झाले आहे. पोलंडचा कामगारनेता वालेला आहे. पण त्याचा उच्चार हा नाही. तो वेगळाच आहे. या स्थितीत व्यक्तिनामांबाबतही मराठीकरण करताना अडचण येते.

राजकारण, अर्थशास्त्र, विज्ञान, तत्त्वज्ञान असे अनेक विषय आहेत, की ज्यांतील संकल्पना आपल्याकडे नाहीत वा नव्या आहेत. युरोकम्युनिझम म्हटल्यावर तुम्हाआम्हाला जे समजते, ते दोनच शब्दांत सांगता येत नाही. देतां या एका शब्दात जे अभिप्रेत आहे त्याची फोड करून सांगावे लागते. वृत्तपत्रांनी मराठी भाषा बिघडविली अशी जे टीका करतात, त्यांना या प्रकारच्या शब्दांचा अर्थ सांगता येणार नाही. ही तक्रार करणारे मुख्यतः भाषाशुद्धीवाले साहित्यिक असतात. राजकारण, अर्थकारण वगैरे त्यांच्या फारसे गावी नसते. पण साहित्यविषयक चर्चेचाही विचार केला तर इसाया, बर्लिन यांच्यासारख्यांनी टॉलस्टॉय वगैरेंबाबत जे लिहिले आहे, त्याचे सुबोध मराठी भाषांतर वृत्तपत्रांनी मराठी बिघडविली अशी ओरड करणारांपैकी एकालाही जमणार नाही.

जगात जे नवे ज्ञान येत आहे त्याची तोंडओळखसुद्धा ठेवणे सोपे नाही. यासंबंधीच्या बातम्यांचे भाषांतर म्हणून कठीण आहे. पण ते करणे आवश्यकच असते. शिवाय वृत्तपत्र म्हणजे संशोधन पत्रिका नव्हे. सामान्य वाचकाला कळेल अशा रीतीनेच वृत्तपत्रीय भाषा वापरली पाहिजे. प्रत्येक वृत्तपत्राचा काही विशिष्ट वाचकवर्ग असतो. त्याच्या पातळीला योग्य अशीही भाषेची धाटणी असावी लागते.

प्रारंभी मराठी वृत्तपत्रे ही साप्ताहिके होती. दैनिकांचा जमाना उशिरा सुरू झाला आणि त्यांचे विषय मोजके होते. ज्ञानप्रकाश रात्री नऊ वाजताच छापून तयार होत होता. आता असे करता येत नाही. घाई वाढली, बातम्यांचे प्रमाण वाढले, विषय वाढले. तथापि एवढे असूनही लोकांना विषय समजावून देण्याच्या धर्मात बदल झालेला नाही व होणार नाही. तो कितपत पाळला जातो हा वेगळा प्रश्न आहे. पण वृत्तपत्रांचे मुख्य उद्दिष्ट सर्व प्रकारची माहिती लोकांपुढे ठेवणे हा आहे. यात एक प्रकारची शिक्षकाची वृत्ती असू शकते. लोकांना विषय समजावा अशी तळमळ असेल, तर प्रतिशब्द हळूहळू बनतात. क्रिकेटच्या क्षेत्रात आपण चांगले शब्द बनविले आहेत; पण हॉकीच्या बाबतीत आपण पेनल्टी कॉर्नर वगैरे शब्द वापरतो. आर्थिक व राजकीय क्षेत्रांत लोकमान्य टिळकांनी अनेक अर्थवाही प्रतिशब्द आणले. न्यायमूर्ती रानडे यांची अर्थविषयक दोन मराठी भाषणे पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली होती. त्यांतील मराठी सुबोध आहे. कै. धनंजयराव गाडगीळ वा सध्या डॉ. वि. म. दांडेकर यांनी सुबोध अर्थशास्त्रीय लिखाण केले आहे. असे सर्व विषयांबाबत म्हणता येणार नाही. आपापल्या विषयाचा स्वतंत्रपणे विचार करून लोकांना तो समजावून देण्याची तळमळ असलेल्यांची संख्या वाढेल, त्या प्रमाणात वृत्तपत्रीय मराठी अधिक अर्थवाही व सुलभ होईल.

---



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**प्रास्ताविक**

विविध ज्ञानशाखांतील अद्ययावत् ज्ञान भारतीय भाषांत उपलब्ध होण्याची तीव्र गरज असूनही अनुवादकांच्या प्रशिक्षणाची व्यवस्था आपण केलेली नाही. ज्यांना दोन किंवा अधिक भाषा येतात, त्यांना त्यांतल्या एका भाषेतून दुसऱ्या भाषेत भाषांतरही करता येते अशी आपली भाबडी समजूत असते. अशा "हौशी" भाषांतरामुळे उगममजकुरातील आशयाचे कंगोरे नष्ट होतात, नेमकेपणाला मूठमाती मिळते आणि शैलीला आपल्या अंगाचा जास्तीत जास्त संकोच करावा लागतो. पण अशी अष्टावक्र भाषांतरेही आपण खपवून घेतो. भारतीय भाषांवर होणाऱ्या अन्यायाबद्दल ऊर बडवून घेणारांनाही अशा विपरीत भाषांतरामुळे त्या भाषेवर होणाऱ्या अत्याचाराची खंत वाटत नाही. उदाहरणादाखल वृत्तपत्रांत आलेल्या काही बातम्या व जाहिराती यांचा मी उल्लेख करीन (परिशिष्ट ३ पहा).

भाषांतर ही एक स्वतंत्र ज्ञानशाखा असून तिच्यात प्रशिक्षण आवश्यक असते या गोष्टीला निदान तत्त्वतः तरी मान्यता देण्याचे आवाहन युनेस्कोला १९७६ मध्ये करावे लागते यावरून अनुवादकांच्या प्रशिक्षणाची दशा इतर राष्ट्रांतही काय असावी याचा आपल्याला अंदाज करता येतो.

– १ –

आता या भागामध्ये आपण अनुवादकांच्या प्रशिक्षणाचा मुख्यतः सैद्धांतिक पातळीवरून विचार करू. अनुवादकांच्या प्रशिक्षणाचा भारताच्या संदर्भात विचार करताना निर्माण होणारा पहिला प्रश्न असा, की प्रशिक्षणात कोणत्या भाषांचा समावेश असावा ? अर्थात प्रशिक्षण कोण, कुणाचे व कशासाठी करणार आहे हे नक्की कळल्याशिवाय भाषा पक्केपणाने ठरवता येणार नाहीत हे खरे; परंतु भाषांची निवड

# अनुवादकांचे प्रशिक्षण

प्रभाकर नारायण परांजपे

काही अपवाद वगळता, भाषांतराचे परीक्षकही फारसे काटेकोर असल्याचे आढळत नाही. भाषांतर ही एक स्वतंत्र ज्ञानशाखा आहे आणि भारतासारख्या विकसनशील राष्ट्रात तिचे अध्ययन–अध्यापन कटाक्षाने व्हायला हवे याची जाणीव आपल्या शिक्षणतज्ज्ञांना तरी झालेली आहे की नाही, कोण जाणे.

अर्थात ही परिस्थिती फक्त भारतातच आहे असे नाही. युनेस्कोची १९ वी सर्वसाधारण सभा नैरोबी येथे १९७६ मध्ये भरली होती. त्या बैठकीत संमत करण्यात आलेल्या निवेदनात म्हटले आहे की, "भाषांतर ही एक स्वतंत्र ज्ञानशाखा आहे. निव्वळ भाषाशिक्षणापेक्षा भिन्न असलेल्या या ज्ञानशाखेमध्ये विशेष प्रशिक्षण आवश्यक असते ह्या गोष्टीस सभासद–राष्ट्रांनी तत्त्वतः मान्यता दिली पाहिजे."*
(बालसुब्रमणियन १९७९)

आपल्याला खाली दिलेल्या पाच गटांतून करावी लागेल :—

| | उगमभाषा | लक्ष्यभाषा |
|---|---|---|
| १) | संस्कृतमधून | भारतीय भाषांत |
| २) | इंग्रजीतर परकीय भाषांमधून | भारतीय भाषांत |
| ३) | इंग्रजीमधून | भारतीय भाषांत |
| ४) | इंग्रजीतर परकीय भाषांमधून | इंग्रजी भाषेत |
| ५) | भारतीय भाषांमधून | भारतीय भाषांत |

या गटांपैकी पहिल्या गटात उगमभाषा म्हणून संस्कृतचा समावेश केला आहे. कारण दिवसेंदिवस संस्कृत जाणणारांची संख्या कमी कमी होत असून संस्कृत संहितांची भारतीय भाषांमध्ये यथातथ्य भाषांतरे होण्याची निकड वाढू लागली आहे. शेवटच्या गटामध्ये भारतीय भाषा उगमभाषा व लक्ष्यभाषा या दोन्ही पदांवर आहेत; कारण या

* "Member states should recognise in principle that translation is an independent discipline requiring an education distinct from exclusively language teaching and this discipline requires special training."

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रकारची भाषांतरे होणे तुलनात्मक दृष्टीने सुलभ आणि राष्ट्रीय सामंजस्याच्या दृष्टीने आवश्यक आहे. आज मल्याळी किंवा तमिळ संहिता मराठीत थेटपणाने आल्याची उदाहरणे दुर्मिळ आहेत. बहुतेक वेळा त्या इंग्रजीच्या माध्यमातून मराठीत येतात. अनुवादकांच्या प्रशिक्षणात पाचव्या गटातील भाषांचा समावेश झाला, तर भारतीय भाषाभगिनीं-मध्ये मध्यस्थी करणाऱ्या इंग्रजीला रजा देता येईल.

इंग्रजीवर परकीय भाषांतून जेव्हा भारतीय भाषांच्यामध्ये भाषांतरे होतात, तेव्हाही बहुतेक प्रसंगी इंग्रजी भाषाच मध्यस्थी करते. हीही स्थिती फारशी स्पृहणीय नाही. इंग्रजीवर एकांगीपणाने विसंबून राहण्यामुळे आपला दृष्टिकोण एकाक्ष, पूर्व-ग्रहदूषित आणि मर्ढेकरानी म्हटल्याप्रमाणे, वाईट अर्थाने 'परपुष्ट' झाला आहे. म्हणून अनुवादकाच्या काही प्रशिक्षणकेंद्रांत तरी, दुसऱ्या गटातील भाषांचा समावेश असावा. परकीय भाषांमध्ये इंग्रजी व इंग्रजी-तर परकीय भाषा असा भेद मी मुद्दाम केला आहे. एक तर, इंग्रजी धड ना भारतीय भाषा, धड ना परकीय अशा त्रिशंकू अवस्थेत आहे. शिवाय इंग्रजां-च्या आगमनानंतर भारतीय भाषांत झालेली बहु-संख्य भाषांतरे इंग्रजीतून झाली आहेत, आजही होत आहेत. म्हणून इंग्रजी व इंग्रजीतर परकीय भाषां-तून भारतीय भाषांत होणाऱ्या भाषांतरांची मी दोन स्वतंत्र गटांत विभागणी केली आहे. यांपैकी दुसऱ्या गटात समाविष्ट होणारी भाषांतरे अगदी कमी आणि तिसऱ्या गटातील भाषांतरे सर्वांत जास्त हाही संख्यात्मक फरक त्यांच्यामध्ये दिसून येतो.

वर उल्लेखिलेल्या पाच गटांपैकी चार गटांमध्ये भारतीय भाषा लक्ष्यभाषेच्या स्थानावर आहेत. भारतात देण्यात येणाऱ्या प्रशिक्षणाचा उद्देश भार-तीय भाषा संपन्न व्हाव्यात हाच असला पाहिजे, हे लक्षात घेता वरील मांडणी योग्य ठरेल. या मांडणीचे दुसरे एक तात्त्विक कारण असे, की अनुवादक ज्या लक्ष्यभाषेत भाषांतर करीत असेल ती लक्ष्यभाषा त्याची 'स्वभाषा' असावी, हे भाषांतर-विद्येतील एक महत्त्वाचे तत्त्व आहे. आणि इंग्रजी (किंवा अन्य परकीय भाषा) 'स्वभाषा' असणारे कितीसे अनुवादक आपल्याकडे असणार? पण तरीही चौथ्या गटात इंग्रजीतर परकीय भाषा उगमभाषेच्या जागी आणि इंग्रजी लक्ष्यभाषेच्या जागी आहे. या 'गट-बाजी'ला भारताची विशिष्ट परिस्थितीच कारण आहे. भौतिक विज्ञान–विषयांतील भाषांतरे आजही आपल्याला इंग्रजीत करावी लागतात, कारण भौतिक विज्ञानांची माध्यमे म्हणून भारतीय भाषांचा विकास झालेला नाही. त्यामुळे वैज्ञानिक संस्थांमधून काम करणाऱ्या अनुवादकांना इंग्रजीतर परकीय भाषेतून इंग्रजीमध्ये भाषांतरे करण्याचे काम करावे लागते.

आत्तापर्यंतच्या विवेचनाचा अर्थ असा, की उपलब्ध शिक्षकवर्ग आणि प्रशिक्षार्थी विद्यार्थी यांच्या अनुषंगाने, भारतातील अनुवादकांच्या प्रशिक्षणा-मध्ये वर उल्लेखिलेल्या एका किंवा अधिक गटांतील भाषांचा समावेश करणे आवश्यक ठरेल.

– २ –

अनुवादकांच्या प्रशिक्षणात कोणत्या भाषांचा समावेश असावा याचा विचार केल्यानंतर त्यात कोणत्या विषयांचा समावेश असावा या प्रश्नाकडे आपण वळू. भाषांतरप्रक्रियेकडे थोड्या डोळसपणाने पाहिले, तर या प्रश्नाचे उत्तर शोधण्यास आपल्याला साहाय्य होईल.

भाषांतर करणे म्हणजे आशयाच्या अंगावरील एका भाषेचे कपडे काढून दुसऱ्या भाषेचे कपडे चढवणे नव्हे. तसे केल्यास आशय बेढब, विकृत किंवा भोंगळ ठरतो. लक्ष्यभाषेतील कपडे उगम-भाषेतील आशयाच्या मापाचे नसतात. त्यामुळे आशयालाच आपले अंग चोरून, फुगवून किंवा अष्टावक्र करून त्या कपड्यांत अशा रीतीने बसवावे लागते, की त्याची बदललेली अवस्था लक्षात आली तरी ती फारशी अटकणारी नाही. अर्थात आशयाला भाषाबाह्य असे अस्तित्व असते का असा प्रश्न निर्माण होईल. या प्रश्नाच्या तात्त्विक चर्चेत शिरण्याचे आपल्याला आत्ता कारण नाही. आपला मुद्दा असा आहे, की भाषांतर ही कपडे बदलण्या-सारखी वरवरची, पृष्ठभागावरच रेंगाळणारी प्रक्रिया नाही. नायडा हा भाषावैज्ञानिक व बायबल–भाषांतर प्रकल्पाचा संचालक, तिचे दिग्दर्शन पुढील आकृतीच्या साहाय्याने करतो :–

उगम–मजकूर लक्ष्य–मजकूर
↓ ↑
विश्लेषण → स्थानांतर → पुनःसंघटन



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

याचा अर्थ असा, की भाषांतर करताना आपण उगम-मजकुरावरून लक्ष्य मजकुराकडे थेट जात नाही. उगम-मजकुराचे आपण प्रथम विश्लेषण करतो, नंतर त्या आशय-घटकांचे लक्ष्य-भाषेच्या संदर्भात पुन:संघटन करतो आणि मग त्याला लक्ष्य-भाषेच्या शब्दशरीरात स्थानापन्न करतो.

या प्रक्रियेतल्या 'विश्लेषणा'चा, म्हणजे दुसऱ्या टप्प्याचा आपण जरा तपशीलवार परिचय करून घेतला पाहिजे. उगम-मजकुराचे विश्लेषण म्हणजे त्याच्या शब्द-शरीरापासून त्याच्या विस्तृत सांस्कृतिक संदर्भापर्यंतच्या प्रत्येक घटकाला वेगळे काढणे आणि समजावून घेणे. या घटकांचे लक्ष्य-भाषेच्या 'वातावरणा'त स्थानांतर करून मग त्यांचे पुन:संघटन करावयाचे आणि त्यानंतर, त्यांना योग्य असे शब्दशरीर शोधावयाचे. विश्लेषणाचा हा मुद्दा खालील आकृतीच्या साहाय्याने स्पष्ट करता येईल.




अशा रीतीने भाषाशरीराचे विश्लेषण व पुन:संघटन आणि आशयरूपाचे विश्लेषण व पुन:संघटन असे भाषांतर प्रक्रियेमध्ये दोन घटक असतात. अनुवादकाने हे घटक यशस्वीपणाने हाताळावयाचे असतील, तर त्यांच्याशी संबंध असलेल्या ज्ञानशाखांचा व कौशल्यांचा त्याच्या प्रशिक्षणात समावेश व्हायला हवा. शिवाय भाषांतर हा एक व्यवसाय आणि त्यामुळे सामाजिक व्यवहार असल्यामुळे व्यावसायिक व व्यावहारिक बाबींशीही अनुवादकाचा परिचय हवा. अशा बाबी म्हणजे संदर्भ-साहित्य वापरणे, नोंदींची कार्डे करून वेळ व श्रम यांची बचत करणे, लेखनस्वामित्व ( कॉपिराइट ) विषयक कायद्याची माहिती इत्यादी. म्हणून, अनुवादकांच्या प्रशिक्षणात ज्या विषयांचा समावेश केला जावयास हवा त्यांची मांडणी पुढीलप्रमाणे करता येईल.






या विषयांपैकी भाषाविज्ञानादी तात्त्विक विषय आणि व्यावसायिक व व्यावहारिक कौशल्ये व ज्ञान यांचा अनुवादकांच्या प्रशिक्षणात आवश्यक विषय म्हणून समावेश करावा लागेल. आशयाशी निगडित

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असलेल्या ज्ञानशाखेच्याबाबत मात्र निवडीला वाव देणे इष्ट व आवश्यक ठरेल. कारण या सगळ्या ज्ञानशाखांचे अनुवादकांना शिक्षण देणे अव्यवहार्य ठरेल. शिवाय, अनुवादकांतही काही प्रमाणात विशेषज्ञता ( स्पेशलायझेशन ) असणे जरुरीचे ठरेल. यापेक्षाही महत्त्वाचे कारण असे, की पदवी-पातळी-पर्यंतचे शिक्षण झालेला चौकस व जिज्ञासू अनुवादक आपल्या आवडीचे व आपल्या विषयाशी संबंधित असलेले इतर विषयही वाचन-मननाच्या साहाय्याने आत्मसात करील असे गृहीत धरावयास हरकत नाही.

– ३ –

अनुवादकांच्या प्रशिक्षणात कार्यानुभवाचाही आवर्जून समावेश व्हायला हवा. पत्रकारिता, वैद्यक, अभियांत्रिकी इत्यादींप्रमाणे भाषांतर (किंवा दुभाषेपण ) हा एक व्यवसाय आहे आणि व्यवसाय-शिक्षणात साधने उपलब्ध करून देण्याइतकीच महत्त्वाची गोष्ट म्हणजे ती साधने वापरण्याचा अनुभवही प्रशिक्षार्थींना देणे.

– ४ –

आतापर्यंत आपण विचार केला तो अनुवादकांच्या प्रशिक्षणात कोणत्या घटकांचा समावेश असावा याचा. हे प्रशिक्षण कोठे द्यावे, ते किती कालावधीचे असावे. त्यासाठी कोणत्या अध्यापन-पद्धती वापराव्यात, प्रशिक्षार्थींचे विद्यापीठीय शिक्षण झालेले असावे, प्रशिक्षार्थींची संख्या किती असावी, प्रशिक्षण देणाऱ्या शिक्षकांची निवड कोणत्या निकषांवर करावी इत्यादी इतर अनेक प्रश्न महत्त्वाचे आहेत. पण त्या सर्वांची उत्तरे देण्याचा प्रयत्न करणे या निबंधाच्या मर्यादेत शक्य नाही. हे सर्व प्रश्न व्यावहारिक असले, तरी त्यांची उत्तरे बदलत्या परिस्थितीनुसार बदलत जातील. उदाहरणार्थं, बी. ए. किंवा एम्. ए.च्या अभ्यासक्रमात एखाद्या भाषेच्या अभ्यासामध्ये भाषांतराचा समावेश असेल तर त्याच्या अध्यापनाची जी आखणी करावी लागेल, यापेक्षा वेगळी आखणी एक किंवा दोन वर्षाच्या भाषांतर / दुभाषेपण यामधील पदविका / पदवी अभ्यासक्रमात करावी लागेल. परिशिष्ट क्र. १ मध्ये भाषांतरविषयक वेगवेगळ्या अभ्यासक्रमांची माहिती दिली आहे. त्यावरून हे स्पष्ट होईल. अशा प्रकारचा एक अभ्यासक्रम तयार करून दाखविण्याचा एक प्रयत्न मी परिशिष्ट २ मध्ये केलेला आहे.

– ५ –

आतापर्यंतच्या आपल्या विवेचनाचा सारांश म्हणून अनुवादकांच्या प्रशिक्षणाचा खालील आराखडा विचारात घेता येईल :–

अनुवादकांचे प्रशिक्षण

↑

| कार्यानुभव |

↑

| भाषेशी संलग्न असलेल्या ज्ञानशाखा | आशयाशी संलग्न असलेल्या ज्ञानशाखा | व्यावसायिक कौशल्ये व ज्ञान |
|---|---|---|

↑

प्रशिक्षणाचा हेतू, कालावधी, विद्यार्थी संख्या, अध्यापनपद्धती इ. व्यावहारिक संदर्भ

शेवटी अनुवादकांच्या प्रशिक्षणाच्या पूर्वतयारीचा विचार थोडक्यात करायला हवा. प्रशिक्षणाच्या विविध गरजा कोणत्या आहेत हे शोधून काढून त्यानुसार अभ्यासक्रम तयार करणे, विविध क्षेत्रांतील भाषेच्या उपयोगाचे नमुने निवडून त्यांचे कठीणतेच्या प्रमाणानुसार संग्रह तयार करणे, संबंधित भाषांचे तौलनिक विश्लेषण करणे, पारिभाषिक संज्ञांचे व इतर कोश तयार करणे, वेगवेगळ्या शैलींची वैशिष्ट्ये शोधून त्यांचे वर्णन करणे, संबंधित भाषांच्या भौगोलिक, सामाजिक, व्यावसायिक अशा भिन्न भिन्न बोलींचे वर्णन देणे, संबंधित भाषेतील मजकुरात वापरल्या जाणाऱ्या संघटना-तत्त्वांचे ( rhetorical devices ) वर्णन देणे आणि संबंधित संस्कृतीचे कोश तयार करणे इत्यादी साऱ्या गोष्टींचा या पूर्वतयारीत समावेश होईल. त्याचप्रमाणे भाषांतराच्या मूल्यमापनासाठी काही वस्तुनिष्ठ तत्त्वे सापडतात का, याचा शोध घेणेही पूर्वतयारीतच समाविष्ट होईल.

× × ×



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

## Training of translators : A Bibliography


Babel Bibliography of Schools and Training for Translators. *Babel* 1975 : 106

Bakaya, R. M. 1974. " A syllabus for Teaching the Theory of Translation in Indian Universities." *JISTA* ( Journal of Indian Scientific Translators' Association ). Vol. 3, Nos. 1 and 2.

Bakaya, R. M. 1973–74. "The Place of English in Science Translation courses in India." *JSL* ( Journal of the School of Languages, Jawaharlal Nehru University ) Winter.

Balsubramanian, C. R. 1979. "Training of Science Translation." Paper presented at the ISTA Conference, New Delhi.

Citren, I. J. 1955. " Training Technical Translators." *Babel* P. 61

Coveney, J. 1971. " Schools of Modern Languages. The Bath University Postgraduate Diploma in Language Studies." *Babel* P. 21

Dhingra, K. S. 1979. " Training Scientific and Technical Translators, Problems and Perspectives." Paper presented at the ISTA Conference, New Delhi.

Gachechiladze, G. 1965. " Training Translators at the University" *Babel* P. 154

Gold, David L. 1975. " Planning a School for Translators and Interpreters." *Babel* P. 107.

Hendrickx, Paul 1972. " Language Teaching and Teaching Translation." *Babel* P. 14.

Hendrickx, Paul. 1975. " Should we Teach Translation ? " *Babel* P. 101

Limaye V. G. 1971. " Translator Training Program " Paper presented at ISTA Conference, New Delhi.

Metha, S. 1969. " Training of Translators in Scientific and Technical Translation for Research Libraries in India." *Babel* P. 7

Nida, Eugene and Taber. 1974. *The Theory and practice of Translation*. Leiden E. J. Brill.

(Mrs.) Nair J. S. 1979. " Training Courses for Translators." Paper presented at ISTA Conference, New Delhi.

Pande, M. P. 1979. Training Courses for Translators : Some Questions of Methodology."
Paper presented at ISTA Conference, New Delhi.

Spitzbardt, Harry. 1977–78. "The Complexity of the Problem of Translation and Interpretation." *JSL* Mansoon and Winter.

Suresh Kumar. 1979. " On Fundamentals of Training Courses for Translators."
Paper presented at ISTA Conference, New Delhi.

Talgeri, Pramod, 1973. " Curriculum Planning for Training Scientific Translators." *JSL* July.


× × ×



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

परिशिष्ट १

## अनुवादकांच्या प्रशिक्षणाचे आणि भाषांतराच्या अध्यापनाचे काही अभ्यासक्रम

* मॉरिस थोरेझ मॉस्को स्टेट पेडॅलॉजिकल इन्स्टिटयूट ऑफ फॉरिन लॅंग्वेजिज्.
  : एक वर्ष मुदतीचा पूर्णवेळ प्रगत अभ्यासक्रम.
* पॅरी विद्यापीठ : तीन वर्षांचा अभ्यासक्रम.
* जिनीव्हा : सहा वर्षांचा अभ्यासक्रम
  (बेल्जम् , हॉलंड, फ्रान्स, इंग्लंड, कॅनडा, जपान, जर्मनी इ. देशांतील प्रशिक्षणाच्या सोयींची माहिती नायर १९७९ व हेन्ड्रिका १९७५ मध्ये मिळेल. )
* भारतीय विज्ञान संस्थान ( Indian Institute of Science ), बंगलोर.
  : डिसेंबर १९६८. तंत्रविद्येच्या अभ्यासासंबंधीचे तीन आठवड्यांचे अभ्यासशिबीर.
* जवाहरलाल नेहरू विद्यापीठ, दिल्ली.
  : पदवीपूर्व पातळीवर भाषांतराच्या दोन प्रश्नपत्रिकांचा अभ्यास आवश्यक.
  : एम्. ए. साठी पुढील दोनपैकी एका गटाची निवड करावी लागते.
  १) भाषा व वाङ्मय २) भाषांतर व दुभाषेपण
* केंद्रीय इंग्रजी व परकीय भाषा संस्थान, हैदराबाद.
  : प्रगत पदविका व एम् ए. या दोन स्तरांवर अभ्यास. जर्मन विभागात एम्. ए. ( भाषांतर ) करता येते.
* दिल्ली विद्यापीठ
  : प्रमाणपत्र-पातळी तीन प्रश्नपत्रिका, एक वर्ष मुदत, इंग्रजी – हिंदी Trans.
* आग्रा विद्यापीठ
  : पदविका-पातळी, तीन प्रश्नपत्रिका, एम् ए. नंतर प्रवेश
* पुणे विद्यापीठ
  : इंग्रजी व हिंदी विभागात एम्. ए. पातळीवर एक ऐच्छिक प्रश्नपत्रिका
* शिवाजी विद्यापीठ
  : इंग्रजी विभागात दोन ऐच्छिक प्रश्नपत्रिकांचा एम्. ए. पातळीवर समावेश.

परिशिष्ट २

## भाषांतराचा एक नमुना-अभ्यासक्रम

**गृहीतकृत्ये**

१) हा अभ्यासक्रम करणारे विद्यार्थी इंग्रजी व मराठी किंवा कन्नड हे विषय घेऊन बी. ए. झालेले आहेत. आणि त्यांची स्वभाषा मराठी किंवा कन्नड आहे.

२) प्रस्तुतचा अभ्यासक्रम इंग्रजी विभागात, एम्. ए. साठी दोन वर्षांतील चार सत्रांमध्ये अभ्यासावयाच्या अभ्यासविषयां (courses) पैकी दोन ऐच्छिक अभ्यासविषयांचा आहे.

३) प्रस्तुत अभ्यासविषय सत्र २ व ३ मध्ये शिकविले जातील आणि त्यांच्यासाठी आठवड्यातून २+२ तासिका दिल्या जातील.

४) प्रस्तुत अभ्यासक्रम करणाऱ्या विद्यार्थ्यांनी दुय्यम विषय म्हणून भाषाविज्ञानाचा अभ्यास पदवी-पातळीवर केलेला आहे.

**प्रयोजने**

१) राष्ट्रे आणि संस्कृतींमधील दुवा म्हणून भाषांतर महत्त्वाचे आहे याची विद्यार्थ्यांना जाणीव देणे.

२) भारतासारख्या विकसनशील व बहुभाषी राष्ट्राच्या संदर्भात प्रगती व आधुनिकीकरणाचे साधन म्हणून भाषांतराला असलेले महत्त्व विद्यार्थ्यांच्या लक्षात आणून देणे.

३) भाषांतराची विविध अंगे आणि भाषांतराच्या अभ्यासातील विविध दृष्टिकोण यांचा विद्यार्थ्यांना परिचय करून देणे.

४) कथा, कादंबरी, नाटक इ. प्रकारांतील साहित्यकृतींचे इंग्रजीतून मराठीत किंवा कन्नडमध्ये भाषांतर करताना येणाऱ्या समस्यांची विद्यार्थ्यांना ओळख करून देऊन त्यांना भाषांतराचे मूल्यमापन करावयास शिकवणे.

५) वरील साहित्यप्रकारांतील काही उताऱ्यांचे भाषांतर करावयास विद्यार्थ्यांना शिकवणे.

६) परकीय भाषेचे अध्ययन, तौलनिक भाषाविज्ञान, मानववंश विज्ञान इ. ज्ञानशाखांत भाषांतराचा जो उपयोग होतो त्याची विद्यार्थ्यांना जाणीव देणे.

[ पृ. १०१ वर चालू ]

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

[ मागील पानावरून ]

## अभ्यासक्रमाचा मसुदा

**1. The need for Translations**

I) The translator as a link between nations and cultures.

II) Translation as an instrument of progress and modernisation in developing and multilingual countries such as India.

III) Simultaneous Interpretation and translation.

IV) Uses and Ab–uses of Translation in Language Teaching.

**2. The Nature of Translation.**

I) Definitions of Translation.

II) Linguistic Theories of Translation : Jakobson, Nida, Catford, Halliday.

III) Non-linguistic Theories of Translation : I. A. Richards, Steiner.

IV) Translation as a Science and an Art.

**3. The Context of Translation**

I) Translation and Contrastive Linguistics.

II) Translation and Bilingualism.

III) The Whorfian Hypothesis.

IV) Machine Translation.

**4. The Context in Translation**

I) The Notion of Translatability.

II) The Notion of Formal and Dynamic Equivalence.

III) The Concept of Adequacy in Translation.

IV) Linguistic and Cultural Problems in Translation.

**5. Practical Aspects of Translation**

I ) Translation and Language Registers

II ) Techniques of Translation.

III ) Parameters of Evaluating Translations.

IV ) The Tools of a Translator's Trade : dictionaries, reference works, etc.

[ पृ. १०२ वर चालू ]



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

[ मागील पानावरून ]

## Books Recommended for study.


Arrowsmith W. & Roger Shattuck ( eds. ) 1971 ( 1961 ). *The Craft and Context of Translation.* Austin University of Texas

Brower, Reuben (ed.) 1966 (2 nd ed. ) *On Translation.* New York: O. U. P.

Catford, J. C. 1965. *A Linguistic Theory of Translation.* London : O. U. P.

Dodson, C. J. *Language Teaching and the Bilingual Method.* London : Pitman

Finlay, Ian. 1971. *Translating.* London : MaKay ("Teach Yourself Series ")

Halliday, M. A. K. and Others. 1964. *The Linguistic Sciences and* Language Teaching. London : Longmans.

Holmes, J. S. 1970 ( 2 nd ed. ). *The Nature of Translation.* The Hague : Mouton.

Lefeverè, André. 1975. *Translating Poetry.* Amsterdam : Van Gorcum.

Newmark, Peter. 1976. " *The Theory and the Craft of Translation* " *Language Teaching and Linguistic Abstracts* 9. 1. 5–26

Nida, Eugene & Taber C. R. 1974. *The Theory and Practice of Translation.* Leiden : E. J. Brill.

Raffel, Burton. 1971. *The Forked Tongue.* The Hague : Mouton.

Savory. T. H. 1968 ( 1957 ). *The Art of Translation.* London : Cape.

Steiner, George. 1975. *After Babel.* London : O.U.P.

**Translations:–**

Raeside, Ian. 1966. *The Rough and the Smooth.* Bombay : Asia Publishing House.

Pendse, S. N. 1969. *Wild Bapu of Garanbi* (Tr. by Raeside ) New Delhi : Sahitya Akademy.

शेक्स्पियर. **राजा लियर.** ( भाषांतर – विंदा करंदीकर )

मार्जरी किनन रॉलिंग्ज्. **पाडस** (भाषांतर– राम पटवर्धन )

कॉनरॅड रिक्टर. **रान, घर, शिवार** ( भाषांतर- जी. ए. कुलकर्णी )

तेंडुलकर, विजय. ( भाषांतर ) **कळावे लोभ असावा** ( *Hasty Hearts* ), **वासनाचक्र** (*A Streetcar Named Desire*), **लिंकनचे शेवटचे दिवस** ( *The Last Days of Lincoln* ).

रेगे, सदानंद ( भाषांतर ) **बादशहा**, ( *Emperor Jones* ), **ज्यांचे प्राक्तन होते शापित** ( *Mourning Becomes Electra* ), **इडिपस** ( *Oedipus Rex* ).


( English– Kannada and Kannada – English to be added by the teachers concerned ).

---

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पश्चिम विभागीय भाषा केन्द्रास दहा वर्षे पूर्ण होत आहेत. या निमित्ताने आयोजित केलेल्या चर्चासत्रात विचार मांडण्याची संधी दिल्याबद्दल प्राचार्या विजया चिटणीस–माडगूळकर यांचा मी आभारी आहे.

प्रौढ साक्षरांसाठी करायच्या लेखनाची भाषा या संदर्भात इथं विचार करायचा आहे. पहिल्यांदाच हे मी सांगू इच्छितो, की या विषयावर अधिकारवाणीने प्रतिपादन करण्याइतका अधिकार मी प्राप्त करून घेतलेला नाही. याचा अर्थ मी जे मांडणार आहे यात काही सवलत मिळावी, असं दूरत्वानेसुद्धा सुचवायचे नाही. सुहृदयाच्या भावनेने विचार तपासून घेण्यास मला आनंदच वाटेल.

### भाषा

आपल्या मनातले विचार दुसऱ्याला सांगण्याच्या जिज्ञासेपोटी, गरजेपोटी मानवाने भाषा हे शोधून काढलेले एक साधन आहे. आशय व्यक्त करण्यासाठी इतर ललितकलांपेक्षा भाषा हे एक प्रभावी साधन आहे. इतक्या सहजतेने इतर ललित कलांद्वारे आशय व्यक्त करणे कठीण आहे. काही वेळा अशक्यही आहे. हा विचार आज सर्वांना मान्य होऊन राहिलेला आहे.

भाषेचा जन्म आणि तिच्यावर झालेले शतकानुशतकांचे संस्कार याने भाषा ही प्रगल्भतेकडे निघाली आहे. कालमानानुसार तिने बदलही स्वीकारलेले आहेत. काळाप्रमाणे बदलणारा आशय व्यक्त करण्यासाठी ती धडपडत आहे. म्हणून भाषा कालमानानुसार बदलणारी गतिमान संस्था आहे.

### प्रमाण भाषा

लिपी प्रतिभावंतांनी तयार केली. भाषेतून ग्रंथनिर्मिती होऊ लागली. ज्यांनी आपली बोली ग्रंथ निर्मितीसाठी वापरली, त्यांची बोली हीच प्रमाण भाषा म्हणून मानली जाऊ लागली. कामाची विभागणी केलेली समाजव्यवस्था सुरक्षित ठेवण्याचं कार्य धर्मसंस्था, राज्यसंस्था जाणीवपूर्वक करू लागल्या. सर्वांपर्यंत ज्ञान-विज्ञान भाषेच्या माध्यमाने पोचविणे हे धर्मसंस्था आणि राज्यसंस्था यांनी आपले कार्यक्षेत्र मानलं नाही. संस्कृतमधून ग्रंथरचना होत असे. संस्कृत ही विद्वानांची भाषा होती. बोलण्याची भाषा ग्रंथात वापरली जात नव्हती. निषिद्ध मानली जात होती. सर्वसामान्यांची भाषा ही ज्ञानभाषा नव्हती. अशी शतकानुशतकांची परंपरा होती. आपली जी परंपरा नाही, ते स्वीकारू नये असं सर्वसामान्यांच्याही मनांत कोरलं गेलं होतं.

### बुद्ध, ज्ञानेश्वर, महावीर आणि टागोर

बुद्ध, ज्ञानेश्वर आणि महावीरांसारख्या बंडखोरांना सर्वसामान्यांपर्यंत विचार पोचवायचे होते. ग्रंथाची जी प्रमाणभाषा मानली जात होती त्या भाषेविरुद्ध त्यांना प्रथम बंड करावं लागलं. सत्ता आणि धर्मसंस्था यांच्या विरुद्धही मग बंड करावं लागलं. जी भाषा सर्वसामान्यांना समजू शकते अशा भाषेतून विचार मांडले पाहिजेत हे त्यांनी आग्रहाने प्रतिपादन करून आपले विचार बुद्धाने पालीतून, ज्ञानेश्वरांनी प्राकृतातून, महावीराने अर्धमागधीतून सांगितले. प्रस्थापित भाषेविरोधी बंड करण्याचा प्रतिभावंतांना जन्मसिद्ध हक्क आहे. गुरुदेव टागोरांनीही आपल्या लेखनासाठी सर्वसामान्यांची बोली भाषा वापरली. त्यामुळे त्यांची बंगालीत झालेली अवहेलना सर्वांना ठाऊकच आहे. व्याकरणकारांच्या व्याकरणाप्रमाणे त्यांची भाषा चालत नव्हती. जशी भाषा बोलली जाते त्या बोलीतून टागोरांनी आपलं साहित्य लिहिलं. भाषा ही आधी जन्म घेते आणि नंतर तिचं व्याकरण केलं जातं. प्रमाण बंगालीत तयार केलेलं व्याकरण टागोरांच्या साहित्याला लावण्याचा प्रयत्न जेव्हा विद्वानांनी केला, तेव्हा त्यांच्या व्याकरणाप्रमाणे टागोरांची भाषा नव्हती. टागोरांना आपलं साहित्य सर्वांपर्यन्त पोचवायचं होतं. म्हणून सर्वांची भाषा ही टागोरांनी आपल्या लेखनासाठी वापरली.

ग्रामीण बोली ही मागासलेली आहे, ती ज्ञानभाषा होण्यास पात्र नाही असेही काही प्रतिपादन

# प्रौढ साक्षरांसाठी करायच्या लेखनाची भाषा

इरगोंडा पाटील

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

करतात. उलट, प्रमाणभाषेपेक्षा ग्रामीण बोली ही प्रभावी असते. बोलीतील शब्द हे चित्रच डोळ्यां-समोर उभे करतात. प्रमाण भाषेतील पंडित हे दुसऱ्या भाषेतील शब्द आमच्या भाषेत अनुवाद करण्याचे काम करतात. परंतु ग्रामीण माणूस हा नेहमी नवे शब्द निर्माण करीत असतो. भाषेचा निर्माता हा खेडूतच आहे. निसर्गाशी त्याचा निकटचा संबंध असल्याने याचं ज्ञान हे अनुभवातून येणारे असते. म्हणून त्याची बोली ही ज्ञानभाषा म्हणून स्वीकारली पाहिजे. असे केले जात नाही म्हणून हा समाज जाणीवपूर्वक पाठीमागे खेचला जातो आहे.

## आजची प्रमाण मराठी

आज मराठीत वापरली जाणारी प्रमाण मराठी ही बहुजनांची भाषा नाही. परंतु प्रमाण याचा अर्थ बरोबर असा अर्थ तयार करून सर्वांवरती ही भाषा पद्धतशीर लादली गेली आहे. मूठभर लोकांची भाषा प्रमाण मानून इतर सगळ्याचे मूल्यमापन करण्याचे अधिकार आपल्याकडे राखून ठेवणे भयावह आहे. ज्ञान तपासण्याची, प्रमाण भाषा ही काही कसोटी नाही. यामुळे मूठभर समाज सर्व समाजावर स्वतःचे प्रभुत्व गाजवण्यासाठी असं करीत आला आहे. मूठभर समाज स्वतःचा अंतर्गत वसाहतवाद लादतो आहे. जोपर्यंत ही भाषा समजणारा समाजच फक्त लिहीत आणि वाचीत होता तोवर ठीक होते. सर्वांपर्यंत विचार पोचवणे आवश्यक आहे. सर्वांचा ज्ञान ग्रहण करण्याचा अधिकार आहे असं आज मान्य केलेलं आहे. अशा वेळी मूठभर लोकांची भाषा सर्वांवरती लादणे अन्यायकारक आहे. प्रमाण भाषा हीच ज्ञानभाषा हे सूत्र आज कोणी स्वीकारणार नाही आणि कुणी स्वीकारलेच, तर आजचा समाज त्यांना स्वीकारणार नाही. सर्व तळागाळातला समाज एकत्र येऊन त्याच्या अभिसरणातून, सहभागाने प्रमाणभाषा निर्माण होऊ शकेल. त्यासाठी सर्व समाजाला सहभागी करून घेणे आवश्यक आहे.

## बोली

प्रौढ साक्षरांचा विचार करताना त्यांच्या लेखन, वाचनासाठी बोलीभाषेचा स्वीकार केला जावा या विचारसरणीशी आज फार मतभेद होऊ शकत नाहीत. बोली हे प्रमाणभाषेचं भ्रष्ट स्वरूप आहे, असेही आज मानलं जाणार नाही. बोलीभाषेचा उपयोग ज्ञान लवकरात लवकर पोचविण्यासाठी साधन म्हणून केला पाहिजे. इथंही मतभेद असण्याची गरज उरली नाही.

प्रमाण मराठीहून कितीतरी बोलींची रूपे ही इतकी भिन्न आहेत, की त्यांचा आणि आजच्या प्रमाणभाषेचा दुवा साधणे कठीण आहे. त्या बोलींना आपली लिपी देणे हे आजच्या प्रतिभावंतांचे पहिले आद्य कर्तव्य आहे. ही बोली अजून लिपिबद्ध झाली नाही कारण ती बोली बोलणारी माणसं ह्या समाजाने स्वीकारली नव्हती. कोणाही मानवतावादी माणसास हे वर्तन भूषणावह नाही. त्या बोलींना मान्यता न देता इतर भाषा लादून बहुसंख्य समाज ज्ञानापासून पारखा होत आला आहे.

असेही काही मानतात, की सुरवातीला बोली भाषेतून लिहावयास, वाचावयास शिकवावे, पुढे हळूहळू त्यांना प्रमाण भाषेकडे आणावे. खरं तर कशासाठी प्रमाण भाषेकड आणावयाचे आहे हे मला तरी कळलेले नाही. प्रमाण भाषा ही काही बहुसंख्यांची भाषा नाही. राजसत्ता आणि विद्यापीठांनी स्वीकारलेली भाषा आहे हे जर त्याचे कारण असेल, तर ते चूक आहे.

## ललित साहित्याची निर्मिती

प्रौढ साक्षरांसाठी ललित साहित्याची निर्मिती करताना बोलीचा स्वीकार हा अपरिहार्य आहे, कारण जगण्याच्या पद्धतीचा त्यांच्या भाषेतील संस्कारांशी महत्त्वाचा संबंध असतो. जी भाषा परिचित नाही तिच्यातील संस्कार कळू शकणार नाहीत. अशी भाषा सुरवातीच्या काळात वापरणं चुकीचं आहे. त्यामुळे तो साक्षरही दूर जाईल. त्याच्याजवळ ज्ञान न्यायचं असेल तर त्याला दूर घालवून कसं चालेल ? प्रमाण भाषा अवगत होईपर्यंत वेळ नाही. अगदी थोड्या काळात त्याला ज्ञान संपादन करावयाचे आहे. म्हणून प्रमाण भाषेचा अडथळा येऊ नये. आजची प्रमाण मराठीच लादू लागलो, तर काही काळाने बोलीवर परिणाम होऊन बोली नष्ट करण्यापर्यंत मजल जाईल. कारण बोलीमुळे मागासलेपणाचा शिक्का मिळू लागतो. हिंदी भाषेमुळे राजस्थानी बोली आज जवळजवळ नष्ट होत चालली आहे.





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जगण्याची भाषा वेगळी आणि शिकण्याची भाषा वेगळी हे जमू शकत नाही; निदान अनेक पिढ्यांच्या दारिद्र्याची, विषमतेची, आत्मविश्वासशून्यतेची जिथे परंपरा आहे तिथे अशक्य आहे. म्हणून आपणाला ज्या समाजासाठी भाषा वापरायची आहे, त्याची परिस्थिती समजून घेणे आवश्यक आहे. ती परिस्थिती समजून न घेता आपले विचार लादून कसे चालेल? जगण्याची कुवत वाढविण्यासाठी आणि त्याच्या वाढलेल्या कुवतीचा, समाजाचा दर्जा वाढविण्यासाठी आणि या समाजाकडे असलेल्या शक्तीचा वापर करून घेण्यासाठी त्यांना प्रवृत्त करणे, त्याच्याकडे जी अफाट शक्ती आहे– त्याची जाणीव जी नष्ट झाली आहे– त्याची त्यांना जाणीव करून देणे आवश्यक आहे. आज आपल्यापुढील हा तातडीचा प्रश्न आहे. तो सोडवताना सहानुभूतीनेच विचार केला पाहिजे.

प्रौढ साक्षरांसाठी ग्रामीण बोलीतून लेखन झाले पाहिजे, हा विचार म्हणून स्वीकारल्यावर प्रौढ साक्षरांसाठी ग्रामीण साहित्य निर्माण होऊ लागले आहे. काही अल्प प्रौढ साक्षरांसाठी ग्रामीण बोलीत शहरी लेखकांनी लिहिलेले साहित्य माझ्या वाचनात आले आहे. हे ग्रामीण बोलीचा बुरखा घातलेले साहित्य वाचल्यावर ही ग्रामीण बोली कुठे बोलली जाते, हे मला तरी समजलेले नाही. एकाच वाक्यात एक शब्द खानदेशी, दुसरा माणदेशी, तिसरा कोल्हापुरी. बोली भाषेच्या नावाखाली अशी काही पुणेरी भेळ तयार केली जाते आहे. ही शुद्ध फसवणूक आहे. बोली भाषा वापरण्याचे जे प्रमुख कारण आहे ते यातून सिद्ध होत नाही. कोल्हापुरी माणसाला खानदेशी बोली अपरिचित असते ही गोष्ट विसरून चालणार नाही. बोली भाषेतून जगलेले, परंतु शिक्षण खात्याने लादलेल्या प्रमाण भाषेतून शिक्षण घेतलेले असंख्य तरुण आज उदयाला आलेले आहेत. हे आपलं फार मोठं धन आहे. यांच्याकडून त्या त्या बोलीतून साहित्य निर्माण करून घेतले पाहिजे.

म्हणजे आदिवासींसाठी त्यांच्या बोलीतून लिहिणारा जर तो बोलीतून वाढला असेल, त्यानेच जर आपल्या समाजासाठी त्या बोलीतून लिहिले, तर प्रभावीपणे काम होऊ शकेल. कारण त्या बोलीची वैशिष्ट्ये, उच्चाराप्रमाणे होणारे अर्थ त्यांना कळू शकतील. इतरांनी हे काम हाती घेतल्यास त्या बोलीच्या लोकांनाही त्यांची बोली कळणार नाही. हा खोटेपणा केला जाऊ नये, पण दुर्दैवाने आज असेच केले जात आहे.

जगण्याची भाषा वेगळी आणि लिहिण्याची भाषा वेगळी, असं होऊ नये. जगण्याच्या भाषेत विचार व्यक्त करणे सोपं आहे. प्रौढ साक्षरांच्या दृष्टीने आवश्यक आहे. अभ्यास म्हणून दुसऱ्या भाषा अवगत करू नयेत, असे इथे सुचवायचे नाही. ही पुढची पायरी आहे. आपली अभिव्यक्ती कुणासाठी करीत आहोत, हा इथे महत्त्वाचा प्रश्न आहे. कोणती भाषा किती समृद्ध आहे ह्याचा विचार इथं करण्याची जरुरी नाही.

प्रौढ साक्षरांसाठी ललित साहित्याची निर्मिती करताना हा विचार महत्त्वाचा आहे. निरक्षरतेचे निर्मूलन नजिकच्या काळात करण्यासाठी याचा अवलंब केला पाहिजे. कारण सामाजिक प्रवाहामध्ये सर्वांना सामावून घेण्यासाठी त्यातूनच अभिसरण घडणार आहे. अफाट समाजाला प्रवाहाबाहेर ठेवून अभिसरण करता येत नाही.

## संदेश

प्रौढ साक्षरांसाठी लिहिताना संदेश काहीतरी दिलाच पाहिजे, असा काही विचार सगळ्यांनी केला आहे असं वाटतं. काही तरी सांगण्याच्या हेतूनेच भाषा जन्मास आली आहे हे खरं आहे; तरीसुद्धा प्रौढ साक्षरांसाठी करावयाच्या लेखनात प्रचारी आविर्भाव फार येतो आहे. सर्व कार्यक्रम कंटाळवाणा होतो आहे. निरक्षर माणसाकडेही असलेले ज्ञान सर्वांसाठी खुले करायचे असेल, तर यातून या साहित्यास खुले केले पाहिजे. प्रौढ साक्षरांसाठी ललित साहित्यनिर्मिती करताना संदेशापेक्षा अेखादा अनुभव साक्षात करणे महत्त्वाचे आहे. निष्कर्ष काढणे हे काम शास्त्रीय भाषेचे आहे, हे सगळेच मान्य करतील. शास्त्रीय भाषाही चिन्हे आणि आकडे यांवरच चालते. भाषेची रूपे, त्यांची वैशिष्टये यांचा विचार शास्त्रीय भाषेस अपेक्षित नसतो; म्हणून ललित साहित्याची भाषा आणि शास्त्रीय भाषा यांचा वेगवेगळा विचार केला पाहिजे. ललित लेखक हा जी भाषा वापरत असतो, त्या भाषेच्या त्या माणसाचा त्या शब्दाशी असलेला अर्थ व्यक्त करतो.









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

इतकेच नव्हे, तर शब्दाचे अर्थ तो स्थळकाळाने बदलतो. ह्या सर्व सूक्ष्म विचारांचा विचार ललित साहित्याचा विचार करताना व्हावा, तज्ञांनी याचा विचार बारकाईने करावा असे मला सुचवायचे आहे. आपले तज्ञ या दोन गोष्टींची फार गल्लत करीत आहेत असे दिसून आले आहे. प्रौढांपुढे विचार लादणे सुरू आहे, त्यापेक्षा विचार तपासून घेण्याची कुवत निर्माण करणे आवश्यक आहे, तशी सोय हवी.

भाषेत शब्द हे फार महत्त्वाचे असतात. शब्दाचा वापर हा बोलीतून नेमका आशय व्यक्त करणारा हवा. शब्दाचा विचार फार जाणीवपूर्वक व्हायला हवा. साहित्यात जोडाक्षरे आली तरी बिघडण्याचे काही कारण नाही. सरावाने बोली तोंडात बसलेलीच असते. फक्त लिपीची सवय झाली, म्हणजे संपले. त्याची बोली त्याच्याकडे आहेच, फक्त लिपीचा सराव करणे आवश्यक आहे. हे कष्टाने साध्य होऊ शकेल.

वाक्यामध्ये वापरलेल्या शब्दांची संख्या ही सहजतेने बोलत असताना जितके शब्द वापरले जातात तितकी हवी. त्याच्याहून अधिक शब्दांची संख्या असलेली वाक्ये वापरली गेली, तर थोडा अडथळा निर्माण होईल, त्याची दखल घ्यावी.

विषयांची मांडणी आणि विचारांचा भागही महत्त्वाचा आहे.

## शब्दांची देवाण-घेवाण

अेकमेकांचे विचार कळण्यासाठी प्रमाणभाषा हवी, ही गोष्ट कुणीच अमान्य करणार नाही. पण आज जी मराठीत प्रमाण मराठी आहे, ही सर्व मराठी समाजाचे नियंत्रण करायला अपात्र आहे. अफाट समाजास ज्ञानापासून दूर फेकणारी आहे. आज दळणवळणाची साधने वाढल्यामुळे समाज एका ठिकाणी येऊ लागला आहे. अेकमेकांचे शब्द तो आपल्या भाषेत वापरतो आहे. तरी त्यांचा वापर हा त्याच्या संवेदनेतूनच करतो. देशी अगर परदेशी शब्द भाषेत आले, तरी काही अवघडल्यासारखे होण्याचे कारण नाही. त्यामुळे भाषा भ्रष्ट न होता प्रभावी होते. अशा सर्व समाजाच्या तळागाळातून प्रक्रिया होऊन त्यातून जर एखादी प्रमाण भाषा तयार झाली, तर ती हवीच आहे; परंतु ही प्रक्रिया दीर्घकालीन आहे. भाषा ही निर्माण करता येत नाही, ती आपोआप तयार होत असते. प्रतिशब्द तयार करून कोश तयार होऊ शकेल. दैनंदिन जीवनात कोश वापरला जात नाही, हा अनुभव आहे.

## व्याकरण

ग्रामीण बोली ही अशुद्ध आहे असा विचार प्रमाण मराठीचे व्याकरण घेऊन तपासू लागलो तर वाढेल. प्रमाण मराठीचे व्याकरण बोलीसाठी लावन चालणार नाही. बोली भाषेचे स्वतंत्र व्याकरण तयार होऊ शकेल. शुद्ध आणि अशुद्ध हा वाद खोटा आहे. कुठल्या प्रदेशात माणूस जन्मास येतो त्यातून तो त्या प्रदेशातील भाषा आपोआप लहानपणापासून अवगत करतो. म्हणून त्या व्यक्तीचं मूल्यमापन करताना त्याची बोली विचारात घ्यायला हवी. असे आज केले जात नाही.

## वाचनीयता

कोणतेही साहित्य हे वाचनीय व्हायला हवं. ललित साहित्याचा तर हा हेतू असला पाहिजे. एखाद्या साहित्यात वाचनीयता आली म्हणजे शैक्षणिक किंमत कमी होते, असाही आग्रह धरला जातो. त्याची वाचनीयता कमी करण्याचा आग्रह धरला जातो. शास्त्रीय भाषेचं काम वेगळं आहे, कारण त्याला काही निष्कर्ष काढायचे असतात.

## निर्मिती

साक्षरता टिकण्यासाठी साहित्याची निर्मिती मोठ्या प्रमाणात व्हायला हवी. नाही तर साक्षरता काही काळाने नष्ट होऊ शकते सरावाची गरज आहे.

वर व्यक्त केलेले विचार ही अंतिम मते आहेत, असं नाही. कुठल्याही शास्त्राचा असा आग्रह असू शकत नाही. भाषा हे मानवाने शोधून काढलेले जे साधन आहे, त्याचा जगण्याशी संबंध असला पाहिजे. तो जर नसेल, तर एक भाषा मरते आणि दुसरी त्याच्यातूनच निर्माण होते. गरज, मागणी आणि पूर्ती ही कोणत्याही भाषेची त्रिसूत्रीच आहे. त्याच्यापासून दूर कोणत्याही भाषेला जाता येत नाही. गरज, मागणी आणि पूर्ती यांचा विचार ज्या भाषेला शक्य नाही ती भाषा जिवंत राहू शकणार नाही. याचा विचार करण्यानेच भाषेचा प्रवाह सतत वाहता ठेवता येतो. आजची प्रमाण मराठी नेमकी याच ठिकाणी आली आहे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विद्यापीठीय किंवा महाविद्यालयीन पातळीवर 'मराठी' हा विषय घेऊन पदवीपरीक्षेचा किंवा पदव्युत्तर परीक्षेचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या दिवसेंदिवस घटत चाललेली दिसते. या परिस्थितीमुळे, मराठी भाषेची या समाजाची गरजच कमी कमी होत चाललेली आहे की काय, अशी भीती काही वेळा व्यक्त होताना दिसते. या परिस्थितीच्या जोडीला आणखी एक-दोन गोष्टी जोडल्या जातात आणि मराठी भाषेच्या एकूण भवितव्याविषयीच चिंता व्यक्त करण्यात येते. या गोष्टी म्हणजे, सरकारी कारभारात मराठीचा वापर ज्या गतीने वाढत गेला पाहिजे, त्या गतीने तो वाढलेला नाही. दुसरी गोष्ट, आपल्या मुलांना इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घालण्याची उच्चमध्यमवर्गीयांमधली, मध्यमवर्गीयांमधली वाढती प्रवृत्ती. आणखी एक गोष्ट म्हणजे महाराष्ट्रात मराठी पुस्तकांपेक्षा व साप्ताहिकां—मासिकांपेक्षा इंग्रजी पुस्तकांचा व मासिकां-साप्ताहिकांचा वाढणारा खप. या व अशाच स्वरूपाच्या इतर काही गोष्टी एकत्र केल्या की, सहा-सात कोटी लोकसंख्येच्या या महाराष्ट्रात मराठीचे स्थान काय राहणार, असा प्रश्न स्वाभाविकपणेच निर्माण होतो. हा प्रश्न कमी गंभीर किंवा काल्पनिक आहे, असाही शेरा मारणे योग्य ठरणार नाही. मराठीचे स्थान डळमळीत होत असल्याचा संशय यावा, अशी जी परिस्थिती वर उल्लेखिलेली आहे तिच्या कारणांचा तपास केल्याशिवाय पुढे जाता येणार नाही. विद्यापीठीय पातळीवर मराठी भाषेचा अभ्यास करणाऱ्या युवकयुवतींची संख्या कमी होण्याचे प्रमुख कारण हे आहे, की मराठीच्या पदवीधरांना व्यवसायक्षेत्रांत नोकऱ्या फारशा मिळत नाहीत. मराठीचे विद्यापीठीय अभ्यासक्रमही गतानुगतिक, कालबाह्य, कंटाळवाणे आणि विद्यार्थ्यांच्या जीवनाशी व गरजांशी संबंध नसलेलेच बव्हंशी असतात, हेही आणखी एक कारण आहे. आपल्या मुलांना इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घालण्याकडे पालकांचा जो वाढता कल आहे, त्याची विल्हेवाट संस्कृतीच्या व प्रतिष्ठेच्या खोटया कल्पना या शब्दांनी लावता येणार नाही. या प्रवृत्तीमागे काही तरी भरीव कारण असले पाहिजे. आणि ते हे असले पाहिजे की, इंग्रजीवरील प्रभुत्व हे व्यवहारात, व्यवसायात आणि ज्ञानाच्या क्षेत्रातही अनेक दृष्टींनी उपयोगी पडते. इंग्रजी पुस्तके, मासिके-साप्ताहिके उच्चशिक्षित वाचकवर्गात जास्त खपतात याचे एक कारण असे देता येईल, की विषयांची विविधता, अत्याधुनिक मुद्रणतंत्रांचा अवलंब, विश्लेषणातील विश्वासार्हता आणि यांच्या जोडीला तुलनेने कमी असलेल्या किंमती या गुणावर इंग्रजी-हिंदी पुस्तकांनी आणि नियतकालिकांनी मराठीवर मात करायला वेगाने प्रारंभ केला आहे. अशा तऱ्हेने व्यावहारिक दृष्टया मराठीवर इंग्रजी भाषा लीलया आणि सकारण आक्रमण करीत असताना या परिस्थितीकडे भावनात्मक दृष्टिकोणातून बघून भागणार नाही. मराठी भाषेविषयीचा अस्मिताभाव ओसरला आहे आणि ज्ञानेश्वर-तुकारामांनी समृद्ध केलेली मराठी भाषा आजचा इंग्रजाळलेला समाज कमी लेखीत आहे असा म्हाताऱ्या आजीबाईसारखा कर्कश कांगावा न करता मराठी भाषा आणि मराठीचा अभ्यास अधिक आजचा, अधिक उपयुक्त आणि व्यावहारिकदृष्टया अधिक सक्षम कसा करावा याचा विचार केला पाहिजे. समग्र मराठी भाषा आजची आणि उद्याची आव्हाने कशी पेलू शकेल याचा विचार केला पाहिजे.

असा विचार केला पाहिजे याचे कारण, इंग्रजीचा प्रसार वाढत असला, तरी सहा-सात कोटी मराठी लोकसंख्येची संपूर्ण जीवनव्यवहारांची भाषा पूर्णपणे इंग्रजी होण्याची शक्यताच नाही. इंग्रजी ही ज्ञानाची किंवा व्यवसायाची किंवा व्यवहाराची भाषा असेल, पण ती केवळ काही टक्के जनतेची.

# व्यावहारिक मराठी : गरज आणि मागणी

ह. मो. मराठे

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

महाराष्ट्रातील निदान ऐंशी-पंचाऐंशी टक्के जनतेची भाषा मराठीच राहणार आहे. व्यवहाराची, व्यवसायाची आणि ज्ञानाचीही.

गेल्या पंचवीसतीस वर्षांच्या काळात शिक्षणाचा प्रसार वाढलेला आहे. या प्रसारामुळे महाराष्ट्राच्या ग्रामीण व निमनागरी भागात अेक अर्धशिक्षित असा समाज नव्यानेच तयार झाला आहे. पुढील काळात या अर्धशिक्षित समाजात अधिकाधिक भरच पडत राहणार आहे. ह्या अर्धशिक्षित समाजाची ज्ञानाची भूकही अर्धवट स्वरूपात का असेना, पण वाढली आहे आणि वाढतीच राहणार आहे. वर्तमानपत्रे, सिनेमा, रेडिओ या प्रचारमाध्यमांच्या वाढत्या प्रसारामुळे या अर्धशिक्षित समाजापर्यंत विविध प्रकारचे ज्ञान, माहिती आणि बातम्या पोचत आहेत. नव्याने तयार झालेल्या या अर्धशिक्षित समाजाला भारतीय आणि आंतरराष्ट्रीय राजकारण, विज्ञान आणि तांत्रिक प्रगती, अंतराळ आणि अंतराळ प्रवास, कौटुंबिक समस्या, देशाचे आर्थिक प्रश्न अशा अनेक जीवनस्पर्शी विषयांसंबंधी माहिती होणार आहे. ही माहिती मिळवण्यासाठी या अर्धशिक्षित समाजाला एकच भाषा उपलब्ध असणार आहे आणि ती म्हणजे मराठी. या अर्धशिक्षित समाजापर्यंत ज्ञान आणि विचार, संस्कृती आणि विज्ञान हे सर्व पोचविण्यासाठी तुम्हाआम्हाला एकच भाषा वापरावी लागणार आहे आणि ती म्हणजे मराठी.

स्वातंत्र्योत्तर काळात इंग्रजी भाषेसंबंधी जो दृष्टिकोण देशात, निदान महाराष्ट्रात स्वीकारण्यात आला, त्याचा परिणाम म्हणून आजच्या आणि उद्याच्या तरुण पिढीला इंग्रजी ही ज्ञानभाषा म्हणूनही आणि व्यवहारभाषा म्हणूनही फारशा चांगल्या स्वरूपात उपलब्ध नाही. या अर्धशिक्षित समाजाने व्यवहारभाषा म्हणून आणि मनोरंजनाची भाषा म्हणून काही एका मर्यादेपर्यंत हिंदी भाषेचा स्वीकार केलेला दिसत असला, तरी ज्ञानभाषा म्हणून निदान मराठी समाजाने तिचा कधीच स्वीकार केलेला नाही व केला जाण्याची शक्यताही नाही. ज्ञानभाषा आणि व्यवहारभाषा म्हणून संस्कृत तर विचारातही घेणे शक्य नाही. सारांश हाच, की दिवसेंदिवस वाढत जाणाऱ्या महाराष्ट्रीय अर्धशिक्षित समाजासाठी ज्ञानाची, संस्कृतीची, विचारांची आणि व्यवहाराचीही मराठी ही एकच भाषा उपलब्ध होणार आहे. मराठीच्या भवितव्याचा विचार करताना या अर्धशिक्षित समाजाच्या या गरजा भागविणारी मराठी आपण घडविणार की नाही याचा विचार आपण केला पाहिजे, असे मला वाटते.

केवळ अर्धशिक्षित समाजाच्या ज्ञानविषयक आणि व्यवहारविषयक गरजा भागविण्यासाठीच मराठी भाषा हवी आहे असे नाही, तर सुशिक्षित समाजाच्या ज्ञानविषयक आणि व्यवहारविषयक गरजा भागविण्यासाठीही मराठीचीच गरज आहे. गेल्या किंवा त्याच्या आधीच्या पिढीतील पदवीधर आणि आजच्या पिढीतील पदवीधर यांच्या इंग्रजी भाषेच्या ज्ञानात आणि इंग्रजीवरील प्रभुत्वात कमालीचा फरक आहे. विशेषतः ज्यांचे उच्च शिक्षणही ग्रामीण भागात झाले आहे किंवा मातृभाषेतून झाले आहे त्यांना ज्ञानभाषा म्हणूनही प्राधान्याने मराठीचाच अवलंब करावा लागत आहे, लागणार आहे. महाराष्ट्रातील सुशिक्षित समाजापैकी मोठ्या विभागाकडूनही या प्रकारे मराठीची मागणी होत राहणार आहे.

वेगवेगळ्या व्यवसायांतल्या लोकांनाही व्यावसायिक भाषा म्हणून यापुढील काळात मराठीचाच अवलंब करावा लागणार आहे. विधिमंडळात जनतेचे प्रतिनिधी म्हणून बसणाऱ्यांत इंग्रजी भाषेवर प्रभुत्व असणारे लोक हळूहळू कमीकमीच होत जाणार आहेत. जनतेच्या वतीने त्यांचा जो कारभार होणार तो मुख्यतः मराठीत होणार, विधिमंडळातील त्यांची भाषणेही मराठीतच होणार आहेत. या राजकारणव्यावसायिकांना इंग्रजीऐवजी मराठीचाच अवलंब करावा लागणार–अेक तांत्रिक भाषा म्हणून, राजव्यवहाराची व कायद्यांची भाषा म्हणून. वृत्तपत्रांसाठी लिहिणारी आणि वृत्तपत्रे संपादणारी जी मंडळी असतील, त्यांना अर्धशिक्षित समाजापर्यंत आपली वृत्तपत्रे व आपले लेखन पोचवायचे असेल, तर मराठीचाच वापर करावा लागणार. जी गोष्ट वृत्तपत्रकारांची तीच शिक्षक-प्राध्यापकांची, तीच गोष्ट महाराष्ट्रभर भटकणाऱ्या विविध तऱ्हेच्या विक्रेत्यांची, तीच गोष्ट व्यावसायिक व्यवस्थापकांची. बहुधा तीच गोष्ट न्यायालयात काम करणाऱ्या







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वकिलांची आणि न्यायाधीशांचीही. अशा वेगवेगळ्या व्यवसायांतील लोकांना मराठीचाच वापर अधिक प्रमाणात करावा लागणार. कारण ते ज्यांच्यासाठी आपले व्यवसाय करणार, तो अर्धशिक्षित समाज इंग्रजी भाषा नीट अवगत नसलेला. तसेच हे व्यावसायिक लोकही पुरेशी प्रभावी इंग्रजी अवगत नसलेले.

ज्ञानभाषा म्हणून, व्यवसायभाषा म्हणून आणि व्यवहारभाषा म्हणून मराठीची मागणी महाराष्ट्रातील कोटयवधी सुशिक्षित, अर्धशिक्षित आणि अल्पशिक्षित समाजाकडून वाढत्या प्रमाणात होत राहणार. त्यामुळेच, विद्यापीठांतून मराठीचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या घटली एवढ्याचमुळे महाराष्ट्रीय समाजातून उच्चाटन होत आहे असा निष्कर्ष काढणे वस्तुस्थितीशी विसंगत ठरते. खरे पाहता, मराठीचे तथाकथित उच्चाटन हे मराठीभाषेच्या अधिमान्यांसमोरचे किंवा अभ्यासकांसमोरचे आव्हान नसून, बदलत्या व वाढत्या मागणीचे भान ठेवून नवी मराठी कशी घडवायची व वापरायची हे खरे आव्हान आहे.

नवी मराठी घडवताना ज्या अनेक गोष्टींचा आपणाला फेरविचार करावा लागणार आहे, त्यांपैकी एक गोष्ट म्हणजे भाषाशुद्धी. आजही काही लोक भाषाशुद्धीचा आग्रह धरताना दिसतात, आणि कोण्या स्त्रीने 'मी वॉश घेऊन फ्रेश झाले' असे वाक्य उच्चारले, तर त्यावर तुटून पडतात. भाषाशुद्धीचा आग्रह विशिष्ट परिस्थितीत योग्य ठरला, कारण राष्ट्रीय अस्मितेची जागृती ही त्या काळाची गरज होती. राष्ट्रीय अस्मिता जागृत करण्यासाठी धरण्यात आलेल्या अनेक आग्रहांपैकी एक आग्रह भाषाशुद्धीचा होता. पण भाषाशुद्धीचा दुराग्रह समाजाच्या भाषिक व्यवहाराने साफ धुडकावून लावला आहे, ही वस्तुस्थिती मान्य केली पाहिजे. म्हणूनच दुकानासाठी विकान, किंवा मोटारीसाठी स्वयंप्रेशिका असले शब्द रूढ होऊ शकले नाहीत. पेनसाठी झरणी किंवा सायकलसाठी दुचाकी यांच्यासारखे सोपे शब्दही व्यवहारात स्थिर होऊ शकले नाहीत. व्यवहारात कोणते शब्द रूढ होतील याचे नियम भाषाशास्त्रज्ञही मांडू शकतील की नाही याची शंका वाटते. कारण झरणी किंवा दुचाकी हे शब्द रूढ झाले नाहीत; पण आकाशवाणी, मानवंदना, पंतप्रधान यांच्यासारखे शब्द मात्र रूढ झाले.

अर्धशिक्षित समाजाची भाषाही अर्धशुद्धच असणार, ती मिश्र किंवा संकरित असणार असेच गृहीत धरून भाषिक व्यवहार सुरू ठेवले पाहिजेत. व्यवहारात रुळत असलेले इंग्रजी किंवा हिंदी शब्द आपण आपलेसे करून घेतले पाहिजेत. त्या परभाषिक शब्दांना पर्याय शोधत बसण्याची आणि त्यामुळे भाषा अ-सहज करण्याची काहीच गरज नाही, हे निर्णायकरीत्या ठरवून टाकले पाहिजे. म्हणूनच, –

'पल्लवीचा कमीस-कुडता टेबलावर आहे',
'जनता पार्टीने कोणताही ठोस आर्थिक कार्यक्रम दिला नाही',
'नानल हॉस्पिटल कर्वेरोडवर असून तेथे काही आयुर्वेदस्पेशालिस्ट आहेत',
'वाहतूकपोलीस आणि टॅक्सीवाला यांच्यात जोरदार बोलाचाली झाली',
'चेअरमनसाहेबांची अपॉइंटमेंट मिळताच मी ताबडतोब स्कूटरवर त्यांच्या ऑफिसात गेलो',
'किर्लोस्कर कमिन्स फॅक्टरीत थर्ड जनरेशन कॉम्प्युटर आहे'

अशा प्रकारची संमिश्र भाषा हीच अर्धशिक्षित समाजाची खरी भाषा आहे असे समजून चालले पाहिजे. हा अर्धशिक्षित समाज भाषिक दृष्टचा केवळ मराठी भाषेच्याच संपर्कात येतो असे नाही, तर हिंदी आणि इंग्रजीच्याही तो संपर्कात येतो. म्हणूनच कोणतीही एक शुद्ध भाषा ही त्याची भाषाच नसते, तर त्याची भाषा मिश्रभाषाच असते.

ही मिश्रभाषा धेडगुजरी म्हणून हिणवली जाता कामा नये, तर ती मराठीच गणली गेली पाहिजे, मराठी म्हणूनच स्वीकारली गेली पाहिजे. भारतातल्या इतर प्रादेशिक भाषांच्याबाबतीत हेच घडत आहे किंवा घडले आहे, हे मला माहीत नाही; पण मराठीच्या बाबतीत तरी हे निश्चितच घडत आहे. अडाणी माणसांना कोठेही तुमची इंग्रजी-हिंदीमिश्रित मराठी समजणार असा आक्षेप घेण्यातही अर्थ नाही. कारण भाषेत हळूहळू रूढ होत जाणारे शब्द किंवा अभिव्यक्तिप्रकार सर्वांना सर्वकाळी समजतीलच असे


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाही. जंगलातल्या आदिवासी माणसाला कॉम्प्युटर हा शब्द समजणार नाही, हे कबूल; पण त्याला गणकयंत्र हा शब्द तरी कसा समजणार? कारण कॉम्प्युटर काय किंवा गणकयंत्र काय, तो जंगलातील आदिवासी माणसाचा अनुभवविषयच झालेला नसतो. अडाणी माणसाला 'कॉम्प्युटर' शब्द कसा कळणार असे भय वाटणाऱ्यांनी एकदा अक्षरओळखही नसलेल्या स्कूटर मेकॅनिकशी बोलावे. त्याच्या तोंडी क्लच वायर, टेल लँप, स्पीडोमीटर, पेट्रोलमधलं ऑईलचं परसेंटेज असले शब्द लीलया खेळत असतात.

प्रधान प्रादेशिक भाषेबरोबरच इतर भाषांच्या संपर्कात आल्याने एखाद्या समाजाच्या भाषेत इतर भाषांतील शब्द जसे अपरिहार्यपणे जाऊन बसतात, त्याचप्रमाणे नवेनवे तंत्रज्ञान समाजाच्या तळापर्यंत झिरपत जाते तेव्हा त्या तंत्रज्ञानाबरोबर येणारे पारिभाषिक शब्दही त्या भाषेत जाऊन बसतात. मराठी भाषेने केवळ बोलभाषेत हे शब्द आले तरी चालतील असे न मानता हे शब्द ग्रांथिक भाषेतही सामील करून घेतले पाहिजेत. नाही तर ग्रांथिक भाषा, भाषाशुद्धीच्या आग्रहातून आलेली तथाकथित शब्दभाषा आणि अशिक्षित बहुजनसमाजाची व्यवहारभाषा यांचा काही संबंधच राहणार नाही आणि त्यातून फक्त तयार होईल ती सरकारी मराठी!

आणखी एका गोष्टीबद्दलही फेरविचार करावा लागणार आहे. ती गोष्ट म्हणजे शालेय आणि महाविद्यालयीन पातळीवरील मराठीचा अभ्यासक्रम होय. मराठीचा महाविद्यालयीन अभ्यासक्रम म्हणजे कोणत्यातरी चार जुन्यापुराण्या पुस्तकांचा सांकेतिक स्वरूपाचा अभ्यास किंवा पोपटपंची असे स्वरूप आज आले आहे. ते बदलून, उद्याच्या समाजात वावरणाऱ्या नागरिकांना जो भाषिक व्यवहार करावा लागणार आहे, त्याच्या गरजा ओळखून नवा अभ्यासक्रम घडवावा लागेल. मराठीचा अभ्यास म्हणजे कथाकादंबऱ्यांचा वाङ्मयीन अभ्यास ही कल्पना पुष्कळशी टाकून देऊन, व्यवसायात व व्यवहारात मराठीचा अधिक प्रभावी, अधिक उचित वापर कसा करावा याचे शिक्षण तरुण मुलांना अधिक प्रमाणात द्यावे लागेल. बदलत्या काळानुरूप आलेले मराठी भाषा शिकविण्याचे एक आव्हान म्हणून या परिस्थितीचा स्वीकार करावा लागेल.

—



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# अध्यापन : भाषेचे आणि साहित्याचे

ना. गो. कालेलकर

– १ –

भाषेचे अध्यापन हा प्रयोग जरासा फसवा किंवा संदिग्ध आहे, कारण त्यावरून ज्या भाषेचे अध्यापन करायचे तिचे रूप कसे आहे किंवा असावे ते स्पष्ट होत नाही. भाषेचे स्वरूप आणि तिच्याशी संबंधित अशा इतर काही गोष्टी यांचा विचार करून तिच्या अध्यापनाचे स्वरूप आणि पद्धत निश्चित होते. ही पद्धत सर्व प्रकारच्या भाषांसाठी एकाच प्रकारची नाही; एवढेच नव्हे, तर परिस्थितीनुसार एकाच भाषेच्या संबंधात वेगवेगळी असू शकते. म्हणूनच अध्यापनाची भाषा कोणती यावर या विषयाचे विवेचन अवलंबून राहील.

अगदी स्थूलमानाने पाहिले, तरी अध्यापनाच्या भाषांचे तीन वर्ग पडतात; ते म्हणजे – ( १ ) परभाषा ( लिखित, अलिखित ) ( २ ) मृतभाषा (३) मातृभाषा हे होत.

यांपैकी परभाषा म्हणजे मातृभाषेशिवायची इतर कोणतीही प्रचलित जिवंत भाषा. उदाहरणार्थ मराठी भाषिकाच्या दृष्टीने गुजराती, बंगाली, तेलुगू, इंग्रजी, अरबी, बतबेटी, चिनी यांसारखी भाषा. या सर्वांना ही सामान्य संज्ञा असली, तरी अध्यापनाच्या दृष्टीने त्यांची एकच मोट बांधून चालणार नाही, कारण मराठीच्या दृष्टीने प्रत्येक परकी भाषेचे एक विशिष्ट वेगळेपण आहे. मराठी अभ्यासकाला गुजराती, बंगालीसारख्या भाषा अतिशय जवळच्या वाटतील. उच्चार, शब्दसंग्रह, व्याकरण, वाक्यरचना इत्यादी दृष्टींनी आपली मराठी भाषा आणि अशी भाषा यांत त्याला असंख्य साम्यस्थळे आढळतील, आणि त्यामुळेच त्याचे ही परभाषा शिकण्याचे काम म्हटले तर सोपे, म्हटले तर कठीण होऊन बसेल. सोपे एवढ्यासाठी की काही ठिकाणी केवळ अनुमानाने किंवा अंधानुकरणाने परभाषेचा योग्य प्रयोग तो करू शकेल, तर काही ठिकाणी अशा प्रकारे केलेल्या प्रयोगापेक्षा या परभाषेतला रूढ प्रयोग किंचित किंवा पूर्णपणे वेगळा आहे, असे त्याला दिसून येईल.

अशा प्रकारची जवळीक एकवंशीय किंवा एककुटुंबीय भाषांत विशेष आढळते आणि अशा दोन भाषांचा तुलनात्मक अभ्यास करण्यासाठी किंवा त्यांचे ऐतिहासिक वर्णन करताना तिचा उपयोग होतो.

पण काही परभाषा याहून अतिशय दूरच्या, अभ्यासकाच्या मातृभाषेशी मुळीच साम्य नसलेल्या आहेत असे आढळून येते. मराठी भाषिकाच्या दृष्टीने त्याच्या प्रादेशिक क्षेत्रालगतच्या तेलुगू, कन्नड यांसारख्या द्राविड भाषा अशा प्रकारच्या आहेत. तरीही उच्चाराच्या आणि व्याकरणाच्या दृष्टीने मराठी व या भाषा यांच्यांत पुष्कळ साम्यस्थळे दाखवून देता येतील. मात्र हे केवळ योगायोगाने घडलेले आहे, की दीर्घकालीन संपर्कामुळे देवाणघेवाण होऊन कार्यकारणभावामुळे घडलेले आहे, याचा स्वतंत्र अभ्यास करावा लागेल. शब्दसंग्रहाच्या दृष्टीने होणारी देवाणघेवाण अशा अभ्यासात जितकी स्पष्ट दिसते, तितकी ती रूपविचाराच्या किंवा व्याकरणाच्या बाबतीत दिसून येत नाही.

पण चिनीसारखी एकावयवी भाषा पाहायला लागलो, म्हणजे तर आर्यद्राविड हा भेद काहीच नाही असे वाटायला लागते. केवळ उच्चाराच्या दृष्टीने पाहिले तरीही आर्यद्राविड भाषांत फारसे वैशिष्ट्यपूर्ण नसलेले स्वरांचे अर्थनिर्णायक कंपनमान हे ती भाषा शिकण्यातला फार मोठा अडथळा आहे. शिवाय आपण ज्याला व्याकरण म्हणतो तशा प्रकारची वर्गव्यवस्था चिनी भाषेत नसल्यामुळे भाषेच्या घडणीचे एक नवे तत्त्वज्ञानच विद्यार्थ्याला आत्मसात करावे लागते. स्वतःच्या भाषिक सवयी नैसर्गिक, प्रमाणभूत आणि सर्वव्यापी मानण्याच्या अभ्यासकाच्या स्वाभाविक प्रवृत्तीला त्यामुळे जबरदस्त धक्का बसतो हे जरी खरे असले, तरीही विनिमय-

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

साधन हे भाषेचे आद्य तत्त्व न बदलताही तिच्या मूलभूत रूपात किती विविधता असू शकते याची जाणीव होऊन त्याची संकुचित वृत्ती नाहीशी होण्याला मदत होते.

जगात वन्य किंवा मागासलेल्या मानवसमूहांच्या अनेक अलिखित भाषा आहेत. भारताच्या डोंगराळ भागात आणि सीमाप्रदेशात अशा भाषांची संख्या लहान नाही. या भाषा शिकण्याचे आणि शिकवण्याचे विशिष्ट तंत्र आहे, आणि त्यासाठी ध्वनिविचार, ध्वनिलिपी, वर्णनात्मक भाषाशास्त्र यांचा पद्धतशीर परिचय असण्याची आवश्यकता असते. मानवजातीच्या सांस्कृतिक क्षेत्राभ्यासात प्रत्येक विशिष्ट मानवसमाजाच्या भाषेचे ज्ञान करून घेणे आवश्यक असते. कारण संस्कृतीच्या अभिव्यक्तीचे आणि समाजातील परस्परविनिमयाचे भाषा हे सर्वश्रेष्ठ साधन आहे.

या अभ्यासाचे स्वरूप वर्गातल्या भाषाध्यापनापेक्षा अगदी भिन्न असल्यामुळे त्याचा इथे केवळ उल्लेखच केला आहे.

मृतभाषांच्या अध्यापनात लक्षात ठेवायची गोष्ट म्हणजे या भाषा सामान्य लौकिक व्यवहारात वापरल्या जात नाहीत, ही होय. ज्यांच्या प्रचलित भाषांचे मूळ अशा भाषांत आहे अशा लोकांनाही त्या प्रयत्नपूर्वक शिकल्याशिवाय येत नाहीत. मराठीचे मूळ संस्कृत भाषा आहे, फ्रेंचचे लॅटीन भाषा आहे; पण केवळ मराठी येणाऱ्या महाराष्ट्रीयाला संस्कृत ऐकून किंवा वाचूनही मुळीच समजणार नाही, किंवा फ्रेंच भाषिकालाही लॅटीन तितकीच अगम्य राहील काही शास्त्रीपंडित किंवा ख्रिस्ती धर्मोपदेशक व्यावसायिक दृष्टीने संस्कृत किंवा लॅटिनचा विशिष्ट मर्यादित उपयोग करत असले, तरीही अशा भाषा सर्वसामान्य जनतेच्या दृष्टीने, म्हणजे वास्तविकपणे, मृतच आहेत.

खरे म्हणजे भाषेचे जे जे काही प्रचारातून गेले ( उच्चार म्हणा, शब्द म्हणा, वाक्यरचना म्हणा ), ते ते सर्व मृतच या अर्थाने भाषेची जुनी रूपे तेवढ्या प्रमाणात मृतच असतात. पेशवेकालीन बखर, शिवकालीन ऐतिहासिक पत्रव्यवहार, तुकाराम, रामदास, मुक्तेश्वर, एकनाथ, नामदेव, माहींभट्ट, नरेंद्र, भास्करभट्ट, ज्ञानेश्वर इ. लेखकांच्या साहित्यातला दुर्बोध, न समजणारा भाग, म्हणजे आजच्या तुलनेने त्याच्या प्रमाणात मृत झालेला भागच आहे. भाषेचे कोणतेही प्राचीन रूप अभ्यासाशिवाय पूर्णपणे न समजण्याचे कारण त्याचे प्रचारातून नाहीसे होणे, म्हणजे मृत होणे हेच असते. म्हणूनच ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथाचे व्याकरण समजून घ्यावे लागते, शब्दकोश द्यावा लागतो आणि भाषांतरही सांगावे लागते.

अशी भाषा शिकण्याचा मुख्य हेतू ती लिहिता किंवा बोलता येणे हा नसून ती वाचून समजणे हाच असतो, कारण या भाषेतून कोणती नवी निर्मिती किंवा व्यवहारही करायचा नसतो. जी प्रचलित भाषा आपल्याला बोलायची किंवा लिहायची नसते, आणि जी केवळ साहित्याच्या आस्वादासाठी किंवा त्यातल्या ज्ञानासाठी आणि माहितीसाठीच शिकायची असते, तीही पुष्कळदा अशाच प्रकारे शिकली जाते. थोडक्यात, भाषा शिकण्याचा हेतू हादेखील ती कशा प्रकारे शिकवता येईल ते दर्शवितो.

बऱ्याचशा मृतभाषा या सांस्कृतिक भाषा आहेत. वेदभाषा, संस्कृत, प्राकृत, पाली, हिब्रू , लॅटीन, प्राचीन अरबी इ. भाषा ही त्याची उदाहरणे आहेत. ज्ञानेश्वरीची भाषा, तुकारामाच्या अभंगांची भाषा, जुन्या महानुभावीय धर्मग्रंथांची भाषा इ. उदाहरणेही अशाच प्रकारची आहेत. जिव्हाळ्याच्या सांस्कृतिक संबंधामुळेच अशा जुन्या भाषांची छाप प्रचलित भाषांतर पडते आणि जुने शब्दही आठवणीत राहून आधुनिक बनतात. ज्या भाषांचा पूर्वेतिहास नष्ट झाला आहे, ज्यांना लिखित साहित्य नाही आणि ज्यांचे मौखिक परंपरेचे साहित्यही तुरळक प्रमाणातच आहे, त्यांची गोष्ट अगदी वेगळी असते.

तिसऱ्या वर्गातील भाषा ही विद्यार्थ्यांची मातृभाषा असते. तेव्हा प्रश्न असा येतो, की तिच्यात शिकवायचे ते काय ? केवळ बोलून व्यवहार करणे एवढेच जर भाषेचे क्षेत्र असते, तर हा प्रश्न बरोबर ठरला असता. पण आज बऱ्याच भाषांना एक स्वतंत्र लिखित रूप असते, उच्च सामाजिक पातळीवरील सर्वमान्य व्यवहारासाठी एक प्रमाण रूप असते. याउलट, बोलण्यातली भाषा पूर्णपणे एकरूप नसून तिची अनेक वेगवेगळी प्रादेशिक, स्थानिक, जातीय इ. प्रकारची रूपे असतात. ती प्रमाणरूपापेक्षा







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कधी थोडी तर कधी अतिशय ठळकपणे भिन्न असतात. उदाहरणार्थ खानदेशी, घाटी, कोकणी, वऱ्हाडी, कोळी इ. भाषाशिक्षणाचे काम बोलभाषा आणि प्रमाणभाषा यांच्यांत एक पूल बांधण्याचे असते. हा पूल दोन्ही टोके सांधण्यासाठी असतो आणि प्रमाणभाषा शिकल्यानंतरही तो उडवून द्यायचा नसतो. प्रमाणभाषा ही बोलभाषेची जागा घेण्यासाठी शिकली जात नाही, तर योग्य सर्वसामान्य संदर्भात वापरता येण्यासाठीच शिकायची असते. घरी आपल्या परिचित वातावरणात विद्यार्थी त्याची नेहमीची खरी मातृभाषा वापरायला स्वतंत्र असतो. तो त्याचा खऱ्या अर्थाने जन्मसिद्ध हक्क असतो.

बोलभाषा वापरणाऱ्या विद्यार्थ्यांच्या भाषिक सवयींचा, उच्चारांचा, शब्दसंग्रहाचा, काही अंशी वाक्यरचनेचाही अभ्यास करून त्यांच्या अनुरोधाने प्रमाणभाषा त्याला शिकवताना काय काळजी घेतली पाहिजे, काय पद्धत वापरली पाहिजे, ते ठरवावे लागेल. काही प्रमाणात, आणि काही विशिष्ट बोलींच्या बाबतीत अतिशय मोठ्या प्रमाणात, हे काम परभाषा शिकवताना घ्यायच्या सावधगिरीचे आहे. अशा प्रकारची सावधगिरी घेण्याची जाणीव आणि पद्धत आपल्या शिक्षणक्रमात नसल्यामुळे, म्हणजेच विद्यार्थ्यांच्या जन्मजात भाषिक सवयींचा मुळीच विचार न करता प्रमाणभाषा दडपून शिकवली जात असल्यामुळे ही सूचना विचित्र व नवलाईची वाटते. पण शिक्षण जर निकोप करायचे असेल, त्याच्याबद्दल, विशेषत: भाषाशिक्षणाबद्दल, जर आत्मविश्वास आणि आवड उत्पन्न करायची असेल तर विद्यार्थ्यांच्या बोलभाषेकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. यासाठी वास्तवाची जाणीव ठेवणारा जो सामाजिक दृष्टिकोण अपेक्षित आहे, तो कोणतेही सामाजिक शास्त्र शिकवतानाही अपेक्षित आहे.

भाषेच्या अभ्यासकाला मुख्यत: दोन गोष्टींची आवश्यकता असते; एक अध्यापनविषयक सामग्रीचा सूक्ष्म परिचय आणि दुसरी परिणामकारक अध्यापनासाठी वापरायची पद्धत.

जो विषय विद्यार्थ्याला शिकवायचा त्याचा अध्यापकाला सूक्ष्म आणि पूर्ण परिचय असला पाहिजे ही गोष्ट उघड आहे. तीच त्याची अध्यापनसामग्री. तिच्यावरचे अध्यापकाचे प्रभुत्व इतके असले पाहिजे, की त्या संबंधातली कोणतीही शंका विद्यार्थ्याकडून येताच त्याला तिचा खुलासा तिथल्यातिथे आणि अत्यंत समाधानकारकपणे करता आला पाहिजे. प्रत्येक भाषिक आपली भाषा योग्यपणे आणि बिनचूक वापरतो, पण अध्यापनाच्या दृष्टीने त्याला तिचा परिचय असतोच असे नाही. तसा तो फारच थोड्या लोकांना, या विषयाकडे खास लक्ष पुरवलेल्या व्यक्तींनाच किंवा अभ्यासकांनाच असतो. कारण विनिमयव्यवहाराला त्याची जरूर नसते. जर तसे नसते, तर प्रत्येक मराठी भाषिक मराठीचा, प्रत्येक माणूस आपल्या मातृभाषेचा, प्राध्यापकच बनला असता. एखादा माणूस मराठी भाषिक आहे याचा अर्थ, मराठी भाषिक समाजात विनिमयाला लागणारी सर्व आवश्यक सामग्री त्याच्याजवळ आहे आणि तिचा तो योग्य वेळी, योग्य प्रकारे उपयोग करू शकतो, एवढाच आहे. एखादा वर्णनात्मक भाषाशास्त्रज्ञ ही सामग्री त्याच्याकडून आपल्या तंत्राचा उपयोग करून मिळवू शकेल.

पण अध्यापन हे एक स्वतंत्र शास्त्र आहे आणि कलाही आहे, त्यामुळे ज्या प्रमाणात ते शास्त्र आहे त्या प्रमाणात त्याची पद्धत व नियम आहेत. आणि म्हणूनच हे शास्त्र कोणाही जिज्ञासूला परिश्रमपूर्वक शिकता येते. कलागुण, म्हणजे अध्यासविषय कंटाळवाणा होऊ न देता तो विद्यार्थ्याला शिकवणे, हे व्यक्तिविशिष्ट असतात आणि उत्तम शिक्षकाकडे जाऊन, योग्य निरीक्षण करून त्यांचे अनुकरणही करता येते.

भाषेच्या अध्यापनात तिच्या विविध घटकांची व अंगांची, त्याचप्रमाणे तिच्या विविध पातळ्यांची आणि त्या सर्वांच्या कार्याची माहिती असणे आवश्यक आहे. त्यासाठी भाषेचे ध्वनी, अर्थघटक आणि विनिमयघटक जाणून घेतले पाहिजेत.

प्रत्येक भाषेचे स्वरूप ती वापरत असणाऱ्या ध्वनींनी निश्चित होते. हे ध्वनी निश्चित प्रकारे उच्चारले जात असून त्यांची संख्या आणि कार्यानुसारी होणारी रूपेही निश्चित असतात. म्हणून कोणत्याही अध्यापकाला त्यांची निर्मिती व कार्य या दोन्ही पातळ्यांवरची माहिती असणे अपरिहार्य आहे. स्वतंत्र किंवा संदर्भविरहित ध्वनींचा विचार म्हणजे



अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'निर्मिती' आणि संदर्भनिष्ठ ध्वनींचा विचार म्हणजेच 'कार्य'. उदाहरणार्थ, मराठीत अ आ इ उ ए ओ ॲ ऑ हे आठ स्वर आहेत, पण ते कोणत्या संदर्भात कोणते स्वरूप धारण करतात हेच उच्चारदृष्टीने किंवा व्यावहारिक दृष्टीने महत्त्वाचे आहे. अ हा स्वर ऱ्हस्व, दीर्घ किंवा आघातशून्य असतो आणि हे त्याचे स्वरूप त्याच्या शब्दातील संदर्भावरून निश्चित होते. शास्त्रीय दृष्टी प्राप्त करून घेतली म्हणजे अशा प्रकारची परिस्थिती अभ्यासकाच्या आटोक्यात येऊ शकते.

ध्वनींचा नीट अभ्यास होण्यामागची अडचण लेखनाची आहे. लेखन हे परंपरागत, जुने रूप संभाळून असते. पुष्कळदा उच्चार व लेखन यांत फार अंतर असते. ज्या लिपीच्या आधारे लेखन होते ती लिपीही भाषेच्या परिवर्तित रूपाला शंभर टक्के सोईस्कर असते असे नाही. आपण जी लिपी वापरतो तिच्यातली चिन्हे म्हणजेच भाषेचे ध्वनी, अशी अनेक सुशिक्षितांचीही समजूत असते. परंतु परंपरा आणि वास्तव स्थिती यांच्यांतला फरक आणि विरोध अध्यापकाला नीट समजला आणि पटला, तरच तो चांगला अध्यापक होऊ शकेल, भाषा योग्य प्रकारे निर्दोष रूपात विद्यार्थ्याला शिकवू शकेल.

परंपरागत लेखन आले पाहिजे हे जरी खरे असले तरी, भाषेचा अभ्यास ती वापरत असलेल्या ध्वनिघटकांचा योग्य परिचय करून घेऊनच झाला पाहिजे. भाषा प्रथम नीट बोलता आली पाहिजे, तिचे लेखन नंतर.

यानंतरचे ज्ञान शब्द, त्यांचे वर्गीकरण आणि त्यांची वाक्यातील कार्याच्या संदर्भानुसार होणारी रूपे यांचे ध्वनिविचारात वेगवेगळ्या ध्वनींचे नीट उच्चार करता येण्यासाठी ते वेगवेगळ्या संदर्भांत ज्यांत सापडतात, असे शब्द घेऊन, त्यांच्या पद्धतशीर याद्या बनवून विद्यार्थ्यांकडून त्या उच्चारांची कवायत करून घ्यावी लागते. उच्चारावरील पकड पक्की होईपर्यंत ही कवायत चालूच ठेवावी लागते. उच्चाराबाबत जे खरे आहे ते शब्दांच्या रूपावलीबाबतही. स्मरणशक्तीने सवयीचे दास्यत्व पत्करेपर्यंत, म्हणजे योग्य उच्चार व योग्य रूप आठवून वापरण्याऐवजी सहजासहजी तोंडात येईल इतके आत्मसात होईपर्यंत, ही कवायत चालू ठेवणं अपरिहार्य आहे. आपल्या जवळच्या सामग्रीतून याद्या कशा प्रकारे केल्या तर विद्यार्थ्यांची तयारी कमीत कमी वेळात होऊ शकेल, हे पाहण्याचे काम जागरुक अध्यापकाचे आहे. क्रमिक पुस्तकांचा आंधळा उपयोग करण्यापेक्षा वेगवेगळ्या विद्यार्थ्यांच्या वेगवेगळ्या भाषा व बोली, म्हणजेच पूर्वीच्या भाषिक सवयी, लक्षात घेऊन आपल्याला त्यांच्यासाठी पाठ्यसामग्रीत काय सुधारणा करता येईल, हेही अध्यापकाने पाहिले पाहिजे. या दृष्टीने कोणतेही पाठ्यपुस्तक हे अंतिम स्वरूपाचे नसते.

ध्वनिविचाराबरोबरच लिपीचे अध्यापन होत असल्यामुळे, एवढेच नव्हे तर लिपीशिक्षण हे देवनागरी व तिच्यासारख्या लिपींच्या बाबतीत ध्वनिशिक्षणही असल्यामुळे लिपीचे शिक्षण चालू असतानाच शिकलेल्या अक्षरांच्या साह्याने जमेल तेवढे शब्दलेखन किंवा वाक्यलेखनही होऊ शकते. शब्दांचे अर्थ आणि योग्य उपयोग, आणि वाक्यरचनेचा व्याकरणाच्या दृष्टीने व आशयअभिव्यक्तीच्या दृष्टीने परिचय ही भाषाभ्यासाची खरी सुरुवात असते. शब्दातील रूपांचा एकमेकांशी काय संबंध असतो, ती वाक्यात कुठे व कोणत्या अर्थाने वापरावीत या गोष्टी हा भाषाशिक्षणाचा पाया आहे. या ठिकाणी वाक्यरचनेचे नियम न सांगता कोणत्या रचनेने, कोणत्या संदर्भात, कोणता अर्थ व्यक्त होतो हे दाखवणे हे महत्त्वाचे काम आहे. यासाठीच योग्य प्रकारे तयार केलेल्या पाठ्यसामग्रीची आवश्यकता असते.

कोणत्या वाक्यरचना व रूपे आली म्हणजे विद्यार्थी समाजात मुक्तपणे मिसळू शकेल यावर सर्व भाषाशिक्षण केंद्रित असावे लागते. शब्दसंग्रहाचे योग्य वर्गीकरण करून हे करता येते. शब्दसंग्रह दोन प्रकारचे आहेत; मूलभूत आणि सामाजिक-सांस्कृतिक संदर्भनिष्ठ. मूलभूत शब्दसंग्रह जगाच्या पाठीवर कुठेही, कोणत्याही भाषेत तोच असतो. त्याचा संबंध मानवजातीच्या सामान्य गरजांशी, सामान्य ज्ञानाशी असतो. दुसरा संग्रह समाजव्यवस्था, संस्कृती, व्यवसायक्षेत्र, जात, धर्म, इत्यादी विशिष्ट गोष्टींशी संबंधित असतो. नुसता खाण्याचा विषय घेतला तरी काय खायचे, केव्हा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

खायचे, केव्हा खायचे नाही, वगैरे बाबतींत ज्या सवयी किंवा रूढी असतात, त्या प्रत्येक समाजाच्या बाबतीत स्वतंत्र असतात. योगायोगानेच त्यात सारखेपणा सापडतो. कुटुंब, पोषाखपद्धती, विवाह, सण, जन्ममरण, शिक्षण इत्यादी अनेक बाबतींत प्रत्येक समाज वैशिष्टचपूर्ण असतो. अशा कोणत्याही समाजात, समजपूर्वक मोकळेपणाने वावरता येण्याइतके भाषाप्रभुत्व मिळवणे, अशा समाजाची साहित्यनिर्मिती समजण्याची पात्रता प्राप्त करून घेणे हे भाषेच्या अभ्यासाचे ध्येय असले पाहिजे.

सतत संपर्क, सतत वाचन, सतत उपयोग ही भाषा जिवंत ठेवण्याची प्रमुख साधने आहेत. हेतुनिष्ठ अभ्यासक या सर्वांचा योग्य उपयोग करून घेऊ शकतो, म्हणून भाषाशिक्षणाची गरज जाणवणे आणि हेतू स्पष्ट करणे यातूनच या अभ्यासाची सुरुवात झाली पाहिजे.

– २ –

लिहितावाचता येऊ लागले, वाचनाची आवड उत्पन्न झाली, केवळ वैज्ञानिक, माहितीवजा, शास्त्रीय किंवा चिंतनपर लेखनापलीकडे जाऊन रंजक, कलाप्रधान भाषिक निर्मितीत मन रमू लागले म्हणजे साहित्याचे आकर्षण माणसात निर्माण झाले आहे हे जाणवते. पण सर्वच माणसांत हे आकर्षण नसते आणि ज्यांच्यांत असते त्यांच्यांतही ते कमीअधिक प्रमाणात असते. शिवाय प्रत्येकाच्या आवडीनिवडीही वेगळया असतात. याबाबतीत साहित्याची तुलना संगीताशी करता येईल. संगीताचे तांत्रिक ज्ञान नसूनही त्याने मोहून जाणारे लक्षावधी लोक आहेत. इथेही संगीतात अजिबात रस नसणारे किंवा विशिष्ट संगीत कमीअधिक प्रमाणात आवडणारे किंवा त्याने वेडावून जाणारे लोक आढळतात.

कलेचे प्रेम मूलतः स्वाभाविक व व्यक्तिनिष्ठ असते. ते काही प्रमाणात वाढवता येईल किंवा त्याला वळण लावता येईल, पण कलास्वाद घेऊ न शकणाऱ्या माणसात त्याचे बीजारोपण करणे जवळजवळ अशक्य आहे. म्हणूनच 'अरसिकेषु कवित्वनिवदनं शिरसि मा लिख' असे संस्कृत कवीने म्हटले आहे.

शिक्षक साहित्याचा परिचय करून देऊ शकतो, साहित्याचे रसग्रहण कसे करावे हे सांगतो. अर्थात एखादी व्यक्ती शिक्षक किंवा प्राध्यापक असली, म्हणजे ती साहित्याची जाणकार असतेच असे नाही. विशिष्ट स्थानावर विशिष्ट काम केले पाहिजे एवढ्यासाठीच बरेचसे अध्यापक साहित्यशिक्षक बनतात.

साहित्याचे अध्यापन या विषयावर बोलण्यापूर्वी साहित्याची व्याख्या करणे आवश्यक आहे, साहित्य म्हणजे काय याची चर्चा केली पाहिजे. अनेक लेख, निबंध, प्रबंध लिहिले जाऊनही या विषयाची व्याख्या करणे शक्य झालेले नाही. अर्थात व्याख्या ही निश्चित, स्थिर स्वरूपाच्या विषयाची करता येईल. भाषाशास्त्राची करता येईल, रसायनशास्त्राची करता येईल; पण कलाविष्काराची नवनवी रूपे शोधून काढून सदैव उत्क्रांत होत जाणाऱ्या विषयाची कशी करता येईल ?

तरीही ही तात्त्विक अडचण बाजूला ठेवून अध्यापनाचा एक विषय म्हणून त्याची कामचलावू व्याख्या बनवायला हरकत नाही. हे करण्यासाठी भाषेच्या स्वरूपापासून आपल्याला सुरुवात केली पाहिजे.

सामान्यतः आपण ज्याला साहित्य म्हणून म्हणतो ते जीवनात, संवेदनाक्षम मानवाच्या अनुभवविश्वात आणि कल्पनाविश्वात प्रारंभापासूनच घडत असणार. काहींनी त्याची निःशब्द, अलिखित नोंदही केली असेल. पण भाषेचा योग्य विकास होईपर्यंत प्रथम त्याला शाब्दिकरूप आणि लेखनाचा शोध लागून त्याचा विकास होईपर्यंत त्याला अधिक टिकाऊ असे लिखित रूप माणसाला देता आले नाही. यामुळेच भाषेच्या प्रारंभानंतर अनेक शतकांनी, अनेक सहस्रकांनी साहित्य प्रकट झाले. म्हणजेच जीवनात साहित्य घडत होते तरी भाषेचा योग्य विकास होईपर्यंत, तिची अभिव्यक्तिक्षमता विशिष्ट पातळीला पोचेपर्यंत, ते व्यक्त होऊ शकले नाही. अजूनही आपल्याला पाहिजे तितक्या प्रभावीपणाने आशय व्यक्त करण्यासाठी भाषेवर नवनवे प्रयोग चालूच आहेत असे दिसते. भाषेच्या अभिव्यक्तिक्षमतेच्या दृष्टीने होणारा हा विकास समजावून घेण्यात साहित्याचे एक महत्त्वाचे अंग सामावलेले आहे.

दुसरे महत्त्वाचे अंग आशयाचे आहे. प्रारंभीच्या काळात साहित्यात काय यावे, काय येऊ नये, कसे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यावे, कसे येऊ नये याबद्दलही कटाक्ष ठेवला जात असे. आशयाचे अशा प्रकारे संकुचित झालेले क्षेत्र, कलावंताच्या बंडखोरीमुळे, आपल्याला तीव्रतेने जाणवले. ते व्यक्त करण्याच्या तळमळीमुळे, हळूहळू विस्तार पावत गेले. माणसाची शास्त्रविषयक जाणीव, सामाजिक जाणीव जसजशी वाढत गेली, तसतसा हा विस्तार होत गेला. कोणत्याही भाषेचे प्रारंभिक साहित्य व आजचे साहित्य यांची तुलना केली तर ही गोष्ट सहज लक्षात येईल.

साहित्य ही एक निर्मिती आहे. भाषेचा वैशिष्टच-पूर्ण उपयोग करून म्हणजे शैली वापरून विशिष्ट आशयाची केलेली कलात्मक अभिव्यक्ती हे तिचे खरे स्वरूप. अशा प्रकारे आशय व अभिव्यक्तीचे स्वरूप यांच्या गुणांवर तिचे कलात्मक स्थान अवलंबून राहील.

खरे तर भाषा ही मुळात साहित्यनिर्मितीसाठी अस्तित्वात आलेली नाही. समाजाचा, म्हणजे एकत्र राहणाऱ्या लोकसमूहाचा, व्यवहार नीट चालावा, सामाजिक संस्थांच्या कार्यात खंड पडू नये, आधीच्या पिढीचे ज्ञान नंतरच्या पिढीकडे सहजपणे जावे, सामाजिक जीवनाचा प्रवाह अविरतपणे चालू रहावा, यासाठी मानवाकडून स्वीकारले गेलेले ते विनिमय-साधन आहे. ते हळूहळू, माणसाच्या नकळत, अस्तित्वात आले, त्याच्या बौद्धिक विकासाबरोबर व्यापक होत गेले, त्याचे आशयक्षेत्र आणि त्याची अभिव्यक्तिक्षमता वाढत गेली आणि ते आजच्या स्वरूपाला आले. या विकासातला एक टप्पा साहित्य-निर्मितीचा होता. व्यवहारातली भाषा व्यक्तिव्यक्तीं-मधल्या क्षणिक व्यवहारासाठी आहे. ताबडतोब विरून जाणारी आहे. तर साहित्याच्या भाषेत एक चमत्कृती, रंजकता, प्रभावीपणा यांसारख्या गोष्टी असल्यामुळे त्याचा पुनरुच्चार होऊ शकतो. भाषेला नसलेले कालिक परिमाण कमीअधिक प्रमाणात त्याला लाभते. त्याला आयुष्य असते.

म्हणून साहित्याबद्दल बोलताना असे म्हणता येईल, की स्थळकाळाच्या मर्यादा ओलांडून सदैव सर्वत्र ताजी राहणारी निर्मिती किंवा भाषेच्या माध्यमातून व्यक्त केलेला वैशिष्टचपूर्ण आशय म्हणजेच साहित्य. पण काही साहित्य विशिष्ट काळापुरतेच प्रभावी राहू शकेल; उदाहरणार्थ उत्तम अग्रलेख किंवा समकालीन विषयावरची कादंबरी, नाटक, कथा इत्यादी. तर काही साहित्य विशिष्ट स्थल-मर्यादेत किंवा भाषिक मर्यादेत किंवा सामाजिक मर्यादेत तसे राहिले. उदाहरणार्थ, 'पण लक्षात कोण घेतो' सारखी कादंबरी. म्हणजे साहित्याचेसुद्धा विश्वसाहित्य, चिरंजीव साहित्य, अल्पजीवी साहित्य किंवा क्षणजीवी साहित्य हे भेद करणे आले. काही साहित्याचे भाषांतर करूनही त्यातला जोम टिकू शकतो, त्यामुळे अशा साहित्याला समाजनिरपेक्ष किंवा भाषानिरपेक्ष साहित्य म्हणता येईल. म्हणून साहित्याचे अध्यापन करताना त्याच्या मर्यादाही जाणवल्या पाहिजेत. पाठचपुस्तकात आले, छापून प्रचंड प्रमाणात विकले गेले, तरी अमुक एक लेखन साहित्य म्हणण्याच्या लायकीचे नाही हे कळले पाहिजे. चांगल्या साहित्यवाचनाची, जे वाचून आपण प्रभावित होतो तसे आणखी काही वाचायची आवड निर्माण करणे, एवढे काम जरी साहित्याचा परिचय करून देताना अध्यापकाने केले, तरी त्याने बरीच मजल गाठली असे म्हणता येईल.

शाळेच्या पाठचपुस्तकांतले धडे किंवा उच्च अभ्यासक्रमांतली पुस्तके ज्याप्रकारे शिकवली जातात ते पाहता साहित्याबद्दलची जिज्ञासा किंवा आवड उत्पन्न होणे कठीण. परीक्षेची तयारी असे त्याचे थोडक्यात स्वरूप असते. पूर्वीच्या प्रश्नपत्रिका, मार्गदर्शिकेतले प्रश्न इत्यादी सोडवून ही तयारी केली जाते. केवळ विद्यार्थीच नव्हे, तर अनेक प्राध्यापकही या मार्गाने जातात. संस्कृत, फ्रेंच यांसारख्या विषयात तर पाठचपुस्तकांचे भाषांतर शिकण्यातच अर्धाअधिक वेळ जातो. अगदी सर्वोच्च स्तरापर्यंतही आपण भाषा शिकतो आहो हीच भावना कायम असते. जुने मराठी साहित्यही याला अपवाद नाही.

साहित्य कसे शिकवावे याबद्दल काही लेखन झालेले आहे. वस्तुतः विद्यार्थी व शिक्षक यांनी एकत्रितपणे आस्वाद घेण्याचा साहित्य हा विषय आहे. त्याचे साचेबंद अध्यापन करणे ही कल्पनाच चुकीची आहे. साहित्यापासून मिळणारा आनंद व्यक्तिनिष्ठ व स्वभावनिष्ठ असतो. यासाठी केवळ साहित्य म्हणजे काय, आपण जे साहित्य वाचणार आहो त्याचे, ते निर्माण करणाऱ्या लेखकाचे, ते निर्माण झाले त्या काळाचे, ते ज्या प्रवाहात किंवा परंपरेत निर्माण झाले त्याचे ज्ञान करून घेऊन ते वाचायला प्रारंभ करणे, हेच बहुतेक साहित्याच्या बाबतीत मार्गदर्शक ठरू शकेल.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# अमराठी भारतीयांसाठी मराठी भाषा

कल्याण काळे

**काही प्रतिक्रिया**

१) "आप कहाँसे आये हैं ? हमारी मराठी तो बहुत कठिन भाषा है । इतने कम दिनों मे आप सीख नही सकेंगे । चलो, हम चाय पीके आते हैं ।"

२) "वा ! वा ! तुम्ही मराठी शिकता का ? छान ! छान ! I am Mr. Parkhe. I am a L. D. C. in this office, What is your name please ?"

३) तुम्ही 'रामानी', 'सीतेनी' असं काय लिहिता ? ते चूक आहे. 'रामाने', 'सीतेने' असं लिहा ना ! ते व्याकरणशुद्ध आहे.

४) तुम्ही मराठी शिकता खरं, पण तुम्हाला मराठी येत नाहीय. आमच्याच गावातली गुजराती, कानडी, सिंधी, तेलगूभाषिक माणसं अस्खलित मराठी बोलतात.

५) तुम्ही मराठी शिकवता काय ? 'हा हात आहे', 'हा पाय आहे' हे शिकविताना आपण rust होत आहोत, असं नाही तुम्हाला वाटत ?

६) W. R. L. C. मध्ये काय Research असणारयं ! प्राथमिक शिक्षकाप्रमाणे 'हा हात आहे', 'हा पाय आहे' असं शिकविण्यात Research ला वाव कसा असेल ?

७) तुम्ही कुणाला मराठी शिकविता ? मला वाटलं foreigners ना शिकवता. foreigners ना मराठी शिकवण्यातच खरं कौशल्य !

८) "तुम्ही साहित्य शिकवता म्हणजे दुय्यम दर्जाचंच साहित्य शिकवता. उत्कृष्ट साहित्य शिकवायला तुमच्याकडे अवसरच नाही"

अशा काही प्रतिक्रिया आमच्या केंद्रातील अध्ययन-अध्यापनाला उद्देशून व्यक्त झालेल्या. त्या व्यक्त करणारांमध्ये भाषेच्या अध्यापनाचा मुळीच विचार न केलेले सामान्य लोक आहेत, तसेच भाषाशास्त्राचा संबंध असलेले प्राध्यापकही आहेत. भाषाध्यापना-संबंधी सर्वसाधारण समाजात जी उदासीनता आणि अज्ञान दिसून येतात त्यांच्यावर यातून प्रकाश पडतो.

आपली भाषा शिकायला आलेल्या व्यक्तीला, मोडकी-तोडकी भाषा ऐकून नाउमेद न करता योग्य तो प्रतिसाद देऊन उत्तेजन देणे हे आपलं कर्तव्य आहे, याची जाणीव फारच थोड्यांना असते. आपल्याच भाषेत लेखी भाषा वेगळी, बोली भाषा वेगळी हे माहीत नसतानाच व्याकरणशुद्ध काय आणि अशुद्ध काय याचा शिक्का मारण्याची घाई अनेकजण करतात. महाराष्ट्रात वर्षानुवर्षे स्थायिक होऊन राहिलेल्या परभाषिकांच्या भाषानैपुण्याची तुलना केवळ आठ-दहा महिन्यांसाठी येऊन राहिलेल्या प्रशिक्षणार्थ्यांशी करून त्यांच्यावर आपण अन्याय करतो आहोत, याचीही जाणीव कित्येकांना असत नाही.

तसेच 'मराठी भाषा शिकवणं म्हणजे काय "हा हात आहे, हा पाय आहे" अशी जुजबी वाक्यंच फक्त शिकवणं असून हे काम फारच सोपं आहे. त्यात काहीच परिश्रम नाहीत. त्यामुळे हे काम कमी शिकलेल्या साध्या प्राथमिक शिक्षकालासुद्धा शक्य असताना एवढे मोठे पगार देऊन खास माणसं नेमायची काय गरज आहे ?' अशी शंका अनेकांच्या मनात असते. 'भाषा शिकवण्यात आपल्याला येत असलेली भाषा तर शिकवायची असते. त्यात कसलं research असणार ?' अशी भाषाध्यापकाबद्दल एक तुच्छतावृत्ती काही मंडळींच्या चेहऱ्यावर पहायला मिळते.

याहूनही चीड आणणारी गोष्ट म्हणजे आपल्या समाजाची एक प्रकारची गुलामी मनोवृत्ती. कोणी विद्यार्थी जर्मन, फ्रेंच यांसारख्या परकीय भाषा शिकतो आहे म्हटलं की, त्याचं केवढं कौतुक होतं ! पण, तोच कोणी भारतीय भाषा शिकतो आहे असं म्हटलं, तर तिकडे दुर्लक्ष केलं जातं. मराठी शिकायला येणाऱ्या अमेरिकनांना तुमच्या कुटुंबात रहायला बोलवा असं आवाहन करताच मोठमोठे

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बंगलेवाले अहमहमिकेने पुढे येतात. पण आमच्या केंद्रातल्या भारतीय प्रशिक्षणार्थ्यांना एक दिवस जेवायला बोलवा असं आवाहन करून तसे निमंत्रक मिळवायला काय आटापीटा पडतो हे आंतरभारतीच्या कार्यकर्त्यांना विचारा ! तीच गोष्ट शिकवणाऱ्यांच्या बाबतीतही. अमुक गृहस्थ किंवा अमुक बाई परदेशी विद्यार्थ्यांना मराठी शिकवतात म्हटल्याबरोबर बघणाऱ्यांच्या दृष्टीत आदर ओसंडू लागतो आणि कोणी गृहस्थ भारतीय लोकांना मराठी शिकवतो म्हणून सांगितलं की, त्यांच्यावर प्राथमिक शिक्षकाचा दर्जा लादला जातो. वास्तविक पाहता परदेशीयांना काय किंवा भारतीयांना काय, भाषा शिकवणं म्हणजे तांत्रिक कौशल्याचाच भाग असतो. तंत्रात थोडाफार फरक होईल, पण त्यात अमुक तंत्र श्रेष्ठ आणि अमुक तंत्र कनिष्ठ असं कसं मानता येईल ?

त्याचप्रमाणे भाषेच्या अध्यापनाचा उद्देश आणि साहित्याच्या अध्यापनाचा उद्देश यांत मूलभूत फरक असल्यामुळे दोघांचे विषयही भिन्न असणारच. भाषेच्या अध्यापनात साहित्याचा वापर दुय्यम साधनभूत असा होत असल्यामुळे साहित्याच्या मूल्यमापनात्मक कसोट्या तिथे विचारात घेतल्या जात नाहीत; तर साहित्यकृतीच्या भाषेचा सोपेपणा अथवा कठिणपणा यांचा विचार करावा लागतो. ज्यावेळी मूल्यमापनात्मक कसोट्या लावून साहित्याचा अभ्यास होतो, त्यावेळी ते भाषाध्यापन राहिलेले नसते, ते साहित्याचे अध्यापन सुरू झालेले असते. तेव्हा भाषाध्यापनाच्या कक्षेत श्रेष्ठ साहित्य, कनिष्ठ साहित्य असा विचार आणायची गरज नसते. फक्त भाषाध्यापनाला कोणतं साहित्य उपयुक्त होईल याचा विचार करावा लागतो.

भाषेचं अध्यापन हे स्वतंत्र क्षेत्र आहे. भाषा शिकवण्याचं तंत्र वेगळं, भाषेचं साहित्य शिकवण्याचं तंत्र वेगळं. साहित्य शिकवणाराला भाषा शिकवण्याचं तंत्र प्रयत्नपूर्वक आत्मसात करावं लागतं. ते जर माहीत नसेल, तर साहित्याचा शिक्षक भाषाशिक्षक म्हणून यशस्वी होण्याची शक्यता कमीच.

भाषा शिकवणं म्हणजे भाषेबद्दल माहिती सांगणं नव्हे. लक्ष्यभाषा बोलणाऱ्या समाजाची सांस्कृतिक वैशिष्ट्ये, श्रेष्ठता, त्याचा राजकीय इतिहास इ. माहिती ही भाषेबद्दलची माहिती झाली, प्रत्यक्ष भाषा नव्हे. भाषेचा इतिहास सांगणं म्हणजेसुद्धा भाषेबद्दल बोलणं झालं, प्रत्यक्ष भाषा शिकवणं नव्हे. इतकंच काय, भाषेचे व्याकरण स्वतंत्रपणे शिकवणं म्हणजेसुद्धा भाषेबद्दल ज्ञान वाढवणे, प्रत्यक्ष भाषा शिकवणं नव्हे. भाषा शिकवणं म्हणजे विद्यार्थ्याला ती वापरायला शिकवणं. भाषेचं अध्यापन म्हणजे भाषिक कौशल्याचं अध्यापन. ही कौशल्यं प्रत्यक्ष अनुभवातून, सरावातून अंगी बाणतात. पोहण्याबद्दलचे नियम वाचून जसं पोहायला येत नाही, तसं भाषेचं व्याकरण शिकून भाषा येत नाही.

पण बऱ्याच वेळा असं दिसून येतं की, चांगल्या अनुभवी भाषाशिक्षकालासुद्धा हा विवेक सुचत नाही. भाषा शिकवण्यापेक्षा भाषेबद्दलच माहिती आपण देत आहोत हे त्याच्या लक्षातही येत नाही. तेव्हा भाषेच्या अध्यापनात नेहमी ही सावधगिरी बाळगली पाहिजे. वेदान्तामध्ये साधकाला नेहमी सत् काय, असत् काय याचा विवेक करावा लागतो. तसा भाषाशिक्षकाला भाषा काय, भाषेबद्दलची माहिती काय यांचा विवेक नेहमी करावा लागतो. एखाद्या असावध क्षणी आपण भाषेसंबंधी तर माहिती सांगत नाही ना, याची वारंवार तपासणी करावी लागते. भाषेसंबंधीची माहितीही सांगणं आवश्यक असेल, तर सांगायलाच हवी. फक्त दोहोंची गल्लत होऊ नये, एवढाच याचा अर्थ आहे.

भाषेसंबंधी ज्ञान देण्यापेक्षा प्रत्यक्ष भाषाकौशल्यच शिकवायचं असल्याने शिक्षकाला स्वतःची विद्वत्ता, व्यासंग यांचं प्रदर्शन करायला वाव नसतो. येथे शिक्षकाच्या बोलण्यापेक्षा विद्यार्थ्यांच्या बोलण्याला जास्त प्राधान्य असतं. स्वतः पडद्याआड राहून नटांना कृती करायला लावणाऱ्या दिग्दर्शकाची भूमिका त्याला घ्यावी लागते.

हे करताना त्याला काही पथ्यं पाळावी लागतात. प्रशिक्षणार्थ्यांना मराठी शिकवताना सुरुवातीच्या काळात हिंदी-इंग्रजीचा माध्यम म्हणून उपयोग करावा लागतो. पण तो अतिशय सावधपणे करावा लागतो. आपला मुख्य उद्देश त्यांना मराठी शिकवणं हा आहे, त्यांच्याशी हिंदीत वा इंग्रजीत बोलणे हा नाही. पण भाषाशिक्षकांना हे भान बऱ्याच वेळा राहत नाही. विद्यार्थ्यांना समजणाऱ्या भाषेत बोलून





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्यांचा विश्वास संपादित करणे इ. गोष्टी आवश्यक असल्या, तरी त्या भाषाशिक्षणबाह्य आहेत. त्या गोष्टींना उत्तेजन वर्गाच्या बाहेरच. वर्गात तरी निदान भाषाशिक्षणाची शिस्त पाळली पाहिजे. जास्तीत जास्त लक्ष्यभाषा त्यांना ऐकवणं महत्त्वाचं असतं.

भाषाशिक्षणातील दुसरी एक शिस्त पाळणं महत्त्वाचं असतं. भाषा शिकणारे आपल्या समोर आहेत, त्यांना ही भाषा एकदम नवीन आहे, त्यांना आपण जेवढं शिकवलं आहे तेवढंच येतंय हे लक्षात घेऊन तेवढ्या रचनांचाच प्रामुख्याने उपयोग करायला हवा. तसेच त्यांना आकलन होईल अशाच वेगाने बोलायला हवं. आपल्या नैसर्गिक वेगाने या वर्गात बोलता येत नाही. आपल्या शब्दप्रयोगांवर, वाक्यरचनांवर कायमचं बंधन ठेवायला हवं. त्याचबरोबर शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना गुंतवून ठेवणंही महत्त्वाचं असतं. त्यांना कंटाळवाणं होऊ नये म्हणून दक्षता घ्यावी लागते.

भाषेचे व्याकरण स्वतंत्रपणे शिकवणे म्हणजे भाषेचं अध्यापन नव्हे हे वर सांगितलेच आहे. पण याचा अर्थ भाषाध्यापनात व्याकरणाला अजिबात स्थान नाही असा नव्हे. पारंपरिक पद्धतीचं व्याकरण सदोष आणि अपूर्ण असेल, तर ते वर्ज्यच मानायला हवं. पण भाषेचं व्याकरण म्हणजे भाषेचं यथार्थ वर्णन असा अर्थ असेल, तर मात्र भाषाध्यापनात त्याची गरज भासणारच. वास्तविक पाहता मराठीत व्याकरणाची फार मोठी परंपरा असून दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्यापासून ते दामले, सबनीस, मंगरूळकर इ. विद्वानांनी ती समृद्ध केली आहे. व्यक्तिपरत्वे यात सरस-निरस ठरवायला अवकाश असला, तरी या सर्वांच्या प्रयत्नातून मराठीचं जे व्याकरणशास्त्र तयार झालेलं आहे, त्यात या यथार्थ वर्णनाची बूज राखली गेली आहे असं दिसत नाही. आमच्या व्याकरणकारांनी भाषा कशी आहे यापेक्षा कशी असावी याचाच प्रामुख्याने विचार केलेला दिसतो. व्याकरणकारांनी भाषेचं वर्णन करावं ही अपेक्षा असताना भाषेत अमुक रूपं का आली? कशी आली? इ. च्या अनावश्यक चर्चा उपस्थित करून इतिहास आणि व्युत्पत्ती यांचं लोढणं व्याकरणाच्या गळ्यात बांधून दिलं आहे. त्यामुळे भाषेच्या विशिष्ट कालसापेक्ष स्वरूपाचं वर्णन न देता भाषेसंबंधीच्या गैरलागू ज्ञानानेच ही व्याकरणांची पुस्तकं भरलेली असतात.

वर्णनात्मक व्याकरण म्हणजे भाषेच्या पूर्वकालीन अवस्थेचा विचार न करता विशिष्ट काळात ती भाषा जशी बोलली जात असेल, तसं तिचं वर्णन करणं होय. हे आमच्या व्याकरणकारांना पूर्णपणे साध्य झालेलं नाही. कारण भाषेचा विचार करताना आपल्यावर तिच्यातील रूपांचं समर्थन करण्याची जबाबदारी आहे, तिच्यातील रूपसिद्धीची ऐतिहासिक पार्श्वभूमी देण्याची जबाबदारी आहे, अशा भ्रमाने अनावश्यक अशा चर्चा व्याकरणावर लादण्याची परंपरा मराठीत निर्माण झाली आहे. भाषा जशी आहे तशी स्वीकारून वस्तुनिष्ठ पद्धतीने तिचं वर्णन करणं आमच्या व्याकरणकारांना अजून साध्य झालेलं नाही.

पण भाषा शिकवण्यासाठी तिचा ज्यांनी ज्यांनी विचार केला, त्यांना मात्र बऱ्याच अंशी ही वस्तुनिष्ठ दृष्टी साध्य झाल्याचं दिसतं. कारण भाषेच्या इतिहासातील अवस्थांची माहिती देऊन अथवा तिच्या रूपांची तर्कनिष्ठ भलावणी करून भाषाध्यापनात काडीचाही उपयोग होत नाही हे त्यांच्या लक्षात आलेलं आहे. आणि म्हणून भाषा प्रत्यक्षात जशी वापरली जाते, तसं त्या स्वरूपात तिचं यथार्थ वर्णन विद्यार्थ्यांच्या समोर प्रस्तुत करणं त्यांना प्रशस्त वाटलं. म्हणून फेअरबँक, देवघर, लँबर्ट, साऊथवर्थ-कव्डी, मॅक्झीन वन्त्सेंन, विजया चिटणीस, कालेलकर इ. भाषाशिक्षकांनी आपल्या अभ्यासक्रमातून जे व्याकरण आपल्यासमोर ठेवलं आहे, ते असं वस्तुनिष्ठ वर्णनात्मक व्याकरणच होय. अर्थात प्रत्यक्षातील वर्णनात्मक व्याकरणाची पुस्तकं या अभ्यासक्रमाच्या पुस्तकांहून वेगळी असतात, हे सांगायला नको. अभ्यासक्रमाच्या पुस्तकांचा आधार भाषेचं वर्णनात्मक व्याकरण हाच असतो.

पण केवळ वर्णनात्मक व्याकरण भाषाशिक्षणात उपयोगी पडत नाही. भाषाशिक्षणातील व्याकरण हे त्याहून वेगळंच असतं. पारंपरिक व्याकरणात भाषा अशी असावी, भाषा तशी नसावी असा आदर्शात्मक विचार असतो. म्हणून आपण त्यावर टीका केली होती. पण या व्याकरणात आदर्शात्मक दृष्टिकोण अपरिहार्य असतो. आपल्याला ती भाषा शिकवायची असल्याने शक्यतो विद्यार्थ्यांचा बुद्धिभेद होऊ नये, त्यांच्या मनात गोंधळ होऊ नये याची काळजी घ्यावी लागते. म्हणून भाषेचे एक विशिष्ट

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

रूपच त्यांच्यासमोर आदर्श म्हणून ठेवणं आवश्यक असतं. व्यवहाराच्या भाषेत प्रत्येक पातळीवर मातृभाषा म्हणून बोलणाऱ्यामध्येही विरोध आढळतात. उदाहरणार्थ ...

उच्चार : राजा–राजा, विषय–विशय, त्याचे–त्याचे
लिंग : तार (पुं.– स्त्री.), ढेकर (स्त्री.– पु.), हरीण (पु.– नपु.)
सामान्यरूप : लाडूचे, लाडवाचे.
वचन : बैल – बैलं - बैंल; मुलगा – मुलगे – मुलं इ.
वाक्यरचना : तुम्ही आलात – तुम्ही आला, तुम्ही गेला नाहीत– तुम्ही गेला नाही.
प्रत्यय : त्याने, त्यानी, त्यानं इ.

अशी दोन-दोन तीन-तीन रूपं देण्यापेक्षा सुरुवातीच्या काळात तरी एकच रूप विद्यार्थ्याला योग्य म्हणून सांगणं आवश्यक असतं. म्हणजे थोडचाफार प्रमाणात शैक्षणिक व्याकरण हे आदर्शवादी व्याकरण असतं.

आपल्याला भाषा शिकवायची असल्याने विद्यार्थ्याला नवीन नवीन वाक्यं तयार करता येतील अशाच पद्धतीने शिकवावं लागतं. शैक्षणिक व्याकरणात या निर्मितीक्षमतेवर भर द्यायचा असतो. वर्णनात्मक व्याकरणात भाषेचं यथार्थ वर्णन दिलं, की काम भागेल. पण शैक्षणिक व्याकरणात तेवढ्यावर भागणार नाही. वर्णनात्मक व्याकरणकार मराठी नामांची तीन लिंगं असतात एवढं म्हणून थांबू शकेल, पण शैक्षणिक व्याकरणात दर्शक विशेषणं, परिवर्तनशील विशेषणं, क्रियापदं, रूपं इ. च्या साहाय्याने ही लिंगं कशी ओळखायची याचं मार्गदर्शन करणं आवश्यक असतं. मराठी सामान्यरूपांची दामल्यांनी आ, ई, अ, एकारान्त असे चार गट करून त्यांचे पोटविभाग पाडले आहेत हे वर्णन वर्णनात्मक व्याकरणाच्या चौकटीत बसणारं आहे, पण शैक्षणिक व्याकरणाच्या नाही. कारण शिकणाऱ्याच्या दृष्टीने त्यांचा उपयोग शून्य असतो. त्यापेक्षा नामांच्या अन्त्याक्षरानुसार भिन्न भिन्न सामान्यरूपं कशी होतात, हे दाखवणं हे भाषा शिकणाऱ्याच्या दृष्टीने उपयुक्त आहे. पारंपरिक व्याकरण भूतकाळात सकर्मक कर्तरि वाक्यं कर्मणि आणि अकर्मक कर्तरि वाक्यं भावे होतात असं वर्णन असतं. तर वर्णनात्मक व्याकरणात सकर्मक क्रियापदांच्या कर्त्यांना ने प्रत्यय लागून क्रियापदं कर्माप्रमाणे चालतात अशी परिभाषा पुरते. पण शैक्षणिक व्याकरणात सकर्मक क्रिय पदं ओळखायची कशी याचं मार्गदर्शन अभिप्रेत असतं. अशा तऱ्हेने शैक्षणिक व्याकरण वर्णनात्मक व्याकरणाहूनही भिन्न असतं. ते आदर्शवादी, वर्णनात्मक आणि निर्मितिक्षम असतं. भाषाशिक्षणात याच व्याकरणाचा उपयोग करावा लागतो.

भाषा शिकवताना शिकणाऱ्याच्या मातृभाषेचाही विचार करायला हवा. मातृभाषेच्या सवयी लवकर मोडत नाहीत आणि लक्ष्यभाषेहून त्या जर वेगळ्या असतील, तर लक्ष्यभाषा शिकताना त्यांचा फार अडथळा होतो. म्हणून लक्ष्यभाषा आणि शिकणाऱ्याची मातृभाषा यांचे व्यतिरेकी अभ्यास करून अशा अडचणीच्या जागा हेरणं आवश्यक असतं. आणि मातृभाषेचा अडथळा येऊ नये म्हणून लक्ष्यभाषेतील पाठ्यसामग्रीची रचना करावी लागते. मराठीत 'च' हा जो ध्वनी आहे, तो इतर अनेक भाषांत नाही. तेव्हा त्या भाषा बोलणारे लोक आपल्या सवयीनुसार 'लोणच्यं, च्यादर, तुमच्या' असे उच्चार करतात. तेव्हा 'च' चा उच्चार शिकवून त्याची सवय निर्माण करण्यासाठी स्वतंत्र पाठ्यसामग्री निर्माण करावी लागते. आसामी भाषा बोलणाऱ्यांना 'त' आणि 'ट' यांच्यामधले दंतमूलीय स्पर्शवर्ण उच्चारायची सवय असल्याने त्यांना 'त' चे उच्चार 'ट' सारखे वाटतात. तेव्हा त्यांना 'त' शिकवण्यासाठी वेगळी सामग्री तयार करावी लागते. मराठीचा नपुंसकलिंगी शब्दातील अन्त्य 'अ' चा उच्चार बहुतेकांना जमत नाही. तसंच मराठीतील लिंगव्यवस्था, सामान्य रूपव्यवस्था इ. अनेकांना नव्या वाटतात. त्यांची वेगळी पाठ्यसामग्री तयार करायला हवी.

पण बहुतेक प्रशिक्षणार्थी मराठी शिकताना हिंदीच्या संरचनांशी तिची गल्लत करताना आढळतात. याचं कारण असं दिसतं, की सध्याच्या शिक्षणपद्धतीमुळे आणि हिंदीच्या राजकीय–सामाजिक माहात्म्यामुळे सर्वजणांना हिंदी येत असतं. किंबहुना, मातृभाषा सोडल्यास हिंदीचाच त्यांना प्रथम परिचय झालेला असतो. त्यामुळे कोणतीही नवीन भारतीय भाषा शिकायची पाळी आली, तर ते हिंदीशी तुलना करत करत ती शिकतात. जर्मन, फ्रेंच वगैरे भाषा शिकताना आपण जसे नकळत इंग्रजीशी तुलना करत

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शिकतो तसाच हा प्रकार. तेव्हा बहुतेक प्रशिक्षणार्थी हिंदीच्या माध्यमातून मराठी शिकताना आढळतात. फक्त उच्चाराच्या बाबतीत मात्र त्यांच्या मातृभाषेचा प्रभाव कायम असतो.

कित्येक वेळा दोन भाषांतील विरोधापेक्षा, त्यांमध्ये असणारं साम्य हे भाषाभ्यासात अडथळा आणतं. हिंदीभाषिक मराठी शिकताना त्यांना जवळ जवळ ७०–८० टक्के शब्द सारखेच आढळायला लागतात. तेव्हा सुरवातीला त्यांना अतिशय आनंद वाटतो. पण त्यामुळे त्यांच्या प्रयत्नात एकदा ढिलाई यायला सुरुवात झाली की, अभ्यासक्रमाच्या शेवटपर्यंत त्यांना सुधारता येत नाही. त्यामानाने दूरच्या भाषा बोलणारे लोक सुरुवातीपासून सावध असल्याने चांगली प्रगती दाखवू शकतात. ओडियाभाषी लोक आमच्याकडे बऱ्याच वेळा हिंदीभाषिकांपेक्षा चांगले गुण मिळवू शकतात याचं कारण हेच होय.

कित्येक वेळा दिसणारं साम्य वरवरचं असतं. त्यामुळेही घोटाळे होतात. उदा : 'चेष्टा कर', 'समाधानं कर', सफाई कर', 'मान्यता अस' हे वाक्प्रचार हिंदी-मराठीत सारखेच दिसत असले, तरी त्यांचे अर्थ एकदम भिन्न आहेत.

आमच्याकडे सर्व प्रकारचे शिक्षक व शिक्षणार्थी येतात. त्यांत काही भाषा-विषय शिकवणारे असतात, काही शास्त्र-विषय शिकवणारे असतात. काही पी. टी. शिक्षकसुद्धा असतात. आपली अशी कल्पना असते, की भाषा-विषय शिकवणारे शिक्षक लवकर भाषा शिकतील. पण कित्येकदा असं होत नाही. शास्त्रविषयाचे शिक्षकसुद्धा अधिक चांगल्या तऱ्हेने भाषा शिकल्याचे आढळते. तेव्हा भाषा शिकणं हा प्रश्न त्या त्या शिक्षकांच्या सर्वसाधारण बुद्धिमत्ता, भाषा शिकण्याकडे असलेला कल, आणि त्यामागचा हेतू यांच्या कमी-अधिक तीव्रतेवर अवलंबून असतो.

दररोज साडेपाच तास याप्रमाणे जवळजवळ दहा महिने शिकवायचं असल्याने भाषेचा विविध अंगांनी अभ्यास होतो. भाषा संरचनात्मक पद्धतीने शिकवावी की प्रसंगांतून शिकवावी याबद्दल भाषाध्यापन क्षेत्रात वाद चालतात. आमच्याकडे मात्र आम्ही या दीर्घ कालखंडामुळे या दोन्ही प्रकारांचा समन्वय करू शकतो. प्राथमिक अभ्यासक्रमात संरचनांना अग्रक्रम देऊन प्रसंगांना दुय्यम स्थान देतो, तर माध्यमिक अभ्यासक्रमात प्रसंगांना मुख्य स्थान देऊन संरचनांना दुय्यम स्थान देतो. याचबरोबर "आशयप्रधान अध्यापन" म्हणून जो एक प्रकार हल्ली लोकप्रिय होत आहे, त्याचाही वापर आमच्या माध्यमिक अभ्यासक्रमात केला जातो. उदा : "पुणे हे विद्येचं माहेरघर म्हणून ओळखलं जातं" यातला आशय कायम ठेवून "पुणे हे विद्येचं माहेरघर म्हणून ओळखण्यात येतं" – "पुण्याला विद्येचे माहेरघर म्हणतात." पर्याय लगेच शिकविल्याने भाषा-व्यवहारातील लवचिकता विद्यार्थ्यांना समजते. याच अभ्यासक्रमात समाजजीवन आणि संस्कृती यांचा भाषेवर जो प्रभाव पडतो तो प्रसंगाच्या द्वारे शिकवण्यात येतो. तसेच भाषा प्रत्यक्षात कशी वापरली जाते ते शिकवण्यावर लक्ष केंद्रित करण्यात येतं. मराठी भाषेचं सामर्थ्य केवळ वाक्यरचनेपेक्षा तिच्या असणाऱ्या वाक्प्रचारांवर अवलंबून आहे ही गोष्ट याच वेळी त्यांच्या निदर्शनास आणून द्यावी लागते. प्रगत अभ्यासक्रमात मराठीच्या साहित्याचा परिचय करून दिला जातो. तसेच भाषा शिकवावी कशी याचेही प्रशिक्षण दिलं जातं. त्यामुळे भाषेचे बारकावे त्यांच्या अधिक लक्षात यायला मदत होते.

शिक्षणव्यवसायाबद्दल बोलताना असं म्हटलं जातं की, वर्गात आलेला प्रत्येक विद्यार्थी हा शिक्षकाच्या समोर समस्या होऊन बसलेला असतो, त्या प्रत्येकाचं आव्हान पतकरून त्यानं शिकवलं पाहिजे. यातील सत्य भाषाध्यापनाच्या वर्गात जेवढं प्रत्ययाला येतं, तेवढं दुसऱ्या कोणत्याही वर्गात येत नसेल. समोर बसलेले भारताच्या विविध राज्यांतून आलेले शिक्षक, त्यांना त्यांच्या सामाजिक जीवनात मिळणारी मान्यता, त्यामुळे इथे होणारे अपेक्षाभंग, त्यांचे स्वतःचे अहंगंड, सांस्कृतिक श्रेष्ठ कनिष्ठत्वाचे गंड, त्यांचं अन्य विषयांतील चातुर्य इ. अनेक गोष्टी संभाळून भाषाशिक्षणाकडे प्रवृत्त करून त्यांना शिकवण्याची कसरत भाषाशिक्षकाला करावी लागते. त्यामुळे हे एक आव्हान पतकरूनच तो शिकवत असतो. दुसरं एक आव्हान या क्षेत्रात असतं, ते म्हणजे आपल्याच भाषेचं. आपण जितकं खोलात जाऊ, तितकं आपल्या भाषेचं वैभव डोळ्यात भरायला लागतं आणि ते शब्दांत पकडताना जी दमछाक होते ती त्रासदायक असली, तरी तितकीच आनंददायक असते. हा एक चाळा मनाला लागला की आपण rust होत आहोत वगैरेचं भानच मनाला शिवत नाही.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# व्यावहारिक मराठीचे परभाषिकांना अध्यापन

विजया चिटणीस–माडगूळकर

कोणाही परक्या भाषेच्या माणसाला आपली भाषा शिकवायला सुरुवात करण्यापूर्वी प्रामुख्याने खालील चार गोष्टींचा विचार करावा लागतो.

१) ती भाषा ज्याला शिकवायची त्याचा ह्या भाषाशिक्षणामागचा उद्देश.

२) ती भाषा शिकण्यासाठी त्याच्या हाताशी असलेला वेळ.

३) ती भाषा शिकणाऱ्याचे वय.

४) ती भाषा शिकणाराची भाषिक पार्श्वभूमी.

ह्या चार गोष्टींखेरीज तो भाषा शिकणारा परदेशी आहे की, परप्रांतातला आहे हाही मुद्दा महत्त्वाचा असतो. परंतु ह्या ठिकाणी भारतीय परभाषिक असाच विषय असल्यामुळे परदेशी विद्यार्थ्यांचा इथे विचार केलेला नाही. शिवाय आपण भारतीय अमराठी लोकांना शिकवायच्या मराठीचा विचार करू तेव्हा त्यातल्या बऱ्याचशा गोष्टी सर्वसाधारणपणे परदेशी भाषिकांनाही लागू पडतील अशाच आहेत. शिक्षकाला पाठ्यसामग्री तयार करताना मात्र ह्या सर्व गोष्टी लक्षात घ्याव्याच लागतात.

वर दिलेल्या चार मुद्यांपैकी वयाचा मुद्दा थोडासा बाजूला ठेवू, कारण आमच्या केंद्रात शिकायला येणारा परभाषिक बहुधा प्रौढच असतो, त्या अनुभवावर आधारित असाच हा लेख आहे. पण एखाद्या शाळेत अमराठी मुलांना मराठी भाषा प्रादेशिक भाषेच्या स्वरूपात का होईना, पण शिकवावी लागते. अशा मुलांसाठी कोणत्या प्रकारची पाठ्यसामग्री तयार करायची, कोणती मराठी भाषा त्यांना द्यायची हीही एक विचारात घेण्यासारखी महत्त्वाची गोष्ट आहे.

परभाषिक भारतीयांना शिकवायच्या मराठी भाषेचा विचार करताना आपल्याला कोणतीही भाषा शिकवण्यामागचे ध्येय आणि शिकवण्याचे कार्य ह्या गोष्टींचा विचार करावा लागतोच. ह्या गोष्टी आपल्याला तक्त्याच्या स्वरूपात पुढीलप्रमाणे मांडता येतील :–




परंतु इथे एक गोष्ट गृहीत धरलेली आहे की, भाषाशिक्षण कोणत्याही हेतूने करायचे असो, त्याची सुरुवात ही प्रथम बोलण्यापासूनच करावी लागते. म्हणजे मुळातच, भाषा ही प्रथम बोलली जाते, मग ती लिहिली जाते. ह्या तत्त्वावर कोणतीही भाषा शिकणाराला ती प्रथम बोलता आलीच पाहिजे असे समजून आम्ही प्रथम भाषेच्या मौखिक कौशल्यावर जास्त भर देतो,

बोलण्यासाठी शिकवायची ती कोणती भाषा निवडायची ? असा प्रश्न आला, तर त्याचे आमच्या दृष्टीने सरळ सरळ उत्तर म्हणजे सर्वमान्य अशी प्रमाण मानली गेलेली बोलभाषा होय. ह्या ठिकाणी शिकणारा हा प्रौढ आहे, म्हणजे साधारणपणे १८ वर्षे वयाच्या पलीकडला आहे हे गृहीत धरले आहे. म्हणजे त्याची स्वतःची मातृभाषा त्याला परिपक्व स्वरूपात येते आहे असे निश्चित ठरलेले आहे. त्याचे अनुभवविश्वही विस्तृत आहे. आता तो एका नवीन समाजाची भाषा शिकणार आहे, तेव्हा त्या समाजात, तो कोणत्याही क्षेत्रात, विभागात गेला, तरी त्याचे बोलणे इतरांना कळावे आणि त्यालाही इतरांचे बोलणे सर्वसाधारणपणे समजायला अडचण पडू नये म्हणून त्याला शिकवायला निवडायची मराठी ही प्रमाणभाषाच असेल.

बोलायला शिकवायचे म्हणजे त्या भाषेचा रूपविचार आणि वाक्‌विचार





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रथम समजून द्यावा लागतो. भाषेच्या वर्णनात्मक अभ्यासाने बोलल्या जाणाऱ्या भाषेचेही पृथःकरण करून भाषेचा रूपविचार आणि वाक्यविचार निश्चित अभ्यासता येतो. अशा अभ्यासामुळे ती बोलभाषा सामान्य नियमांच्या, म्हणजेच व्याकरणाच्या चौकटीत बसवता येते आणि अशा प्रकारे मिळालेल्या तिच्या रूपावर आधारलेली अशी पाठ्यसामग्री तयार करता येते. ही पाठ्यसामग्री थोडीशी कृत्रिमतेचा आधार घेऊन शिकवावी लागते, तिचे मूलभूत तत्त्व सोप्याकडून कठिणाकडे आहे. म्हणजे उदाहरणार्थ, प्रथम फक्त सोपी प्रश्नोत्तरे, बोलभाषेवरच आधारलेले असे कृत्रिम संवाद इत्यादी लिहावे लागतात. मग ते तोंडी घटवून घ्यावे लागतात. होय, हे सर्व साचे भाषाशिक्षणाच्या प्राथमिक अवस्थेत चक्क घटवून घ्यावे लागतात ! म्हणून अशी भाषा, तुम्ही-आम्ही वापरीत असलेल्या रोजच्या व्यवहारातली असली, तरी तिची पाठ्यसामग्री तयार करताना तिची मांडणी अशी असते, की तिला कृत्रिमपणाचा थोडा वास येणे अपरिहार्य असते. उदाहरणार्थ, आम्ही तयार केलेल्या पाठ्यसामग्रीतील ही काही वाक्ये पहा :

| (क) | (ख) |
|---|---|
| हे काय आहे ? | हा हात आहे का ? |
| हा हात आहे ? | हो, हा हात आहे. |
| हे काय आहे ? | ही वही आहे का ? |
| ही वही आहे ? | हो, ही वही आहे. |
| हे काय आहे ? | हे पुस्तक आहे का ? |
| हे पुस्तक आहे ? | हो, हे पुस्तक आहे. |

(नाही, हे पुस्तक नाही. ही फाईल आहे.)

आता हीच वाक्ये तालमींनी घटवून घेऊन त्यांतल्या रूपविचाराची आणि वाक्यविचाराची संकल्पना स्पष्ट झाली, की विद्यार्थी पुढे सहजपणे 'काय हो, ही शाळा आहे का ? ', ' छे छे, हे कॉलेज आहे', अशी जास्त स्वाभाविक वाटणारी वाक्ये तयार करू लागतो.

अशा प्रकारे भाषा बोलायला यावी म्हणून एका साच्याप्रमाणे अनेक वाक्ये सहजपणे निर्माण करता यावीत, ती व्यवहारात स्वाभाविकपणे वापरता यावीत असाच ह्या बोलण्याच्या पायरीला मुख्य हेतू असतो. शक्य तो स्वाभाविक वाटेल अशा वातावरणातले, शक्य तो स्वाभाविक वाटतील असे संवाद इथे रचावे लागतात. हा पुढील संवाद पहा :

रूपा, तू म्हैसूरला गेली होतीस का ?
हो, मी म्हैसूरला गेले होते.
तू म्हैसूरहून माझ्यासाठी काय आणलंस ?
मी म्हैसूरहून तुझ्यासाठी साडी आणली.

ह्यात थोड्याशा कृत्रिम वाटेल अशा संवादरूपांनी अधोरेखित प्रत्यय शिकवण्याचा हेतू असतो.

ह्या ठिकाणी भाषा कशी शिकवतो ह्या प्रश्नाला महत्त्व नसल्यामुळे ती शिकवताना वापरात येणाऱ्या पद्धतींचा उल्लेख केलेला नाही. इथे फक्त कोणती भाषा शिकवायची असा प्रश्न असल्यामुळे त्याचाच विचार केलेला आहे. वर दिलेल्या नमुन्यावरून लक्षात येईल, की लहान मूल जसं मोठ्या माणसांच्या भाषेच्या अनुकरणांनी स्वतःची भाषा शिकून घेऊन समाजात वावरायला तयार होतं, त्याचप्रमाणे इथं हे प्रौढ 'मूल' शिक्षकांच्या भाषेच्या अनुकरणातून, ध्वनी, शब्द, वाक्य इत्यादींच्या तालमीतून भाषा हळूहळू आत्मसात करतं, त्या भाषेतली तत्त्वं आत्मसात करून घेतं आणि त्या भाषिक समाजात वावरायला बरचसं तयार होतं. हे करताना लहान मुलाची पाटी कोरी असते, पण प्रौढ 'मुलाची' तशी नसते. त्याला स्वतःला त्याच्या लहानपणी शिकलेली एक भाषा आधीच येत असते. त्यामुळे आता ही नवी भाषा शिकताना पूर्वीच्या भाषिक सवयींचे त्याला वारंवार अडथळे येत असतात. कधी स्वतःच्या आणि शिकायच्या अशा दोन भाषांतल्या साधर्म्याचा त्याला उपयोग होतो. कधी त्या साधर्म्यामुळे त्याची फसगत होते, तर कधी फार मोठा विरोध असेल, तर त्याला बिचकायला होते. म्हणून पाठ्यसामग्री तयार करताना आम्ही दरवर्षीच्या अनुभवावरून, सर्वसाधारणपणे आमच्या भाषेतल्या, परभाषिकांना येणाऱ्या अडचणी लक्षात आल्यामुळे, खाचाखोचा लक्षात घेतो आणि त्यावर भाषेचे धडे तयार करतो.

म्हणून मी सुरवातीला म्हटल्याप्रमाणे, भाषाशिक्षणातल्या ह्या पहिल्या अवस्थेत आम्ही जरी प्रमाणभाषा विनिमयाचे साधन म्हणून निवडली, तरी थोड्या कृत्रिम स्वरूपात म्हणजे परिणाम-

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कारकपणे शिकवता येईल अशा प्रकारे, तिची धड्यांमध्ये मांडणी करतो. ह्या ठिकाणी मी आणखी एक नमुना देते आणि भाषा बोलायला शिकवायची मराठी कशी असते ह्याचे विवेचन थांबवते :

**मोहनचा गणेश-उत्सव**

शुक्रवारी गणेशचतुर्थी होती. त्या दिवशी मोहन सकाळी लौकर उठला आणि आंघोळ करून बाजारात गेला. बाजारात गणपतीच्या मूर्तींची पुष्कळ दुकानं होती. बहुतेक मूर्ती सुंदर आणि आकर्षक होत्या. मोहनने एक छोटीशी मूर्ती विकत घेतली. नंतर तो फुलांच्या दुकानात गेला. तिथे त्याने एक हार विकत घेतला. मिठाईच्या दुकानात जाऊन त्यानी पेढे विकत घेतले. आणि तो घरी आला.

इथे आम्हाला विद्यार्थ्यांना सकर्मक क्रियापदांचा भूतकाळ शिकवायचा आहे. त्यातल्या वाक्यांची आणि त्या धर्तीवर तयार केलेल्या वाक्यांची वर्गात तसेच ध्वनिशाळेत वेगवेगळ्या प्रकारे – संवाद, कथन इ. – तालीम घेतली जाते आणि त्या नियमांना धरून एखाद्या नवीन प्रसंगात त्याचा उपयोगही घटवून घेतला जातो ____ अशा प्रकारे अधोरेखित केलेली रूपे पूर्वीच शिकवलेली आहेत.

भाषा शिकायला येणाऱ्या काही लोकांचा उद्देश ती फक्त बोलायला यावी एवढाच असतो. उदाहरणार्थ, एखाद्या प्रांतातून बदली होऊन वर्ष-दोन वर्षांकरता दुसऱ्या प्रांतात जाऊन रहायची वेळ आली, तर पुष्कळदा त्या समाजात चांगल्या तऱ्हेने मिसळून राहता यावे ह्या उद्देशाने भाषा फक्त बोलायला शिकण्यासाठी येणारी मंडळी असतात. ह्यांत परदेशी लोकांचा प्रामुख्याने समावेश असतो. कारण आपल्याकडे अजून, भाषा ही शास्त्रोक्त पद्धतीने जास्त लौकर आणि जास्त चांगली शिकता येते ही कल्पना फारशी रुजलेली नाही. तसेच परप्रांतीयांना भाषा शिकवण्यासाठी खास अभ्यास लागतो हीही कल्पना नसल्यामुळे आपण अशा प्रकारच्या अभ्यासकांना फारसे आकृष्ट करू शकत नाही.

असे केवळ भाषा बोलायला शिकणारे लोक सोडले, तरी काही वेळा विषयनिष्ठपणे भाषा शिकायला येणारेही लोक असतात, आणि त्यात त्यांच्या व्यवसायाशी निगडित अशी भाषा शिकण्याची त्यांची इच्छा असते. उदाहरणार्थ एखादा डॉक्टर, बँकेचा अधिकारी, प्रशासकीय अधिकारी इत्यादी व्यावसायिक मंडळी. ह्यांना शिकवायची मराठीही मग व्यवसायनिष्ठ अशी होते. त्यातले काही खास शब्द, संज्ञा, विशेष प्रकारच्या वाक्यरचना ह्यांचा त्यात समावेश असतो. असे जरी असले, तरी प्रथम शिकणाऱ्याला, वर म्हटल्याप्रमाणे ती भाषा समाजात कशी बोलली जाते हे शिकून घ्यावेच लागते. म्हणजे बँकेच्या अधिकाऱ्यालासुद्धा ‘ हे काय आहे ? हा हात आहे,’ हे प्रश्न तयार करण्याचे मूलतत्त्व समजून घ्यावेच लागते. पण त्याचे धडे तयार करताना त्याला कोणत्या लोकांशी व्यवहार करायचा आहे, त्याच्याकडे येणारे लोक त्याच्याशी कोणकोणत्या विषयांवर बोलू शकतील आणि हा अधिकारी त्यांच्याशी काय बोलेल हे लक्षात घेऊन तसे खास विषयनिष्ठ धडे तयार करावे लागतात. त्यातच व्यावसायिक मराठीचा उपयोग करावा लागतो. ह्याची कल्पना पुढे दिलेल्या लहानशा उताऱ्यावरून येईल.

धोंडिबा – रामराम साहेब.

मॅनेजर – रामराम, काय धोंडिबा, आज बँकेत काय काम काढलंत ?

धोंडिबा : साहेब, थोडं कर्ज हवं आहे.

मॅनेजर : वा ! काही नवीन योजना ? कशासाठी हवं आहे कर्ज ?

धोंडिबा : साहेब माझ्या शेतातली विहीर तुम्ही पाहिलीच आहे.

मॅनेजर : हो, तिचं काय ?

धोंडिबा : ती यंदा पार आटली आहे. गेल्यावर्षी मोठा दुष्काळ पडला त्यामुळे ह्या वर्षी विहिरीचा अगदी तळ दिसतो आहे. ती विहीर यंदा आणखी थोडी खोल करायचा माझा विचार आहे आणि मग विहिरीवर पंप बसवण्याची इच्छा आहे.

मॅनेजर : वा, वा ! छानच कल्पना आहे. तुमच्या या कामासाठी बँक तुम्हाला अवश्य कर्ज देईल. आमचे क्षेत्राधिकारी शिर्केसाहेब तुमच्याबरोबर येतील, त्यांना तुम्ही तुमचं शेत, विहीर ह्या सर्व गोष्टी दाखवा, ते विचारतील





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ती सर्व माहिती त्यांना द्या. हे बघा, शिर्के-
साहेब इकडे आलेच...

थोडक्यात म्हणजे भाषा शिकवण्याच्या पहिल्या पायरीत सर्वत्र व्यावहारिक आणि व्यावसायिक मराठीचा उपयोग करावा लागतो. सर्वसाधारण अभ्यासक्रमात, तो भाषिक समाज आपल्या दैनंदिन जीवनात बोलतो कसा, भाषेचा विषयनिष्ठ उपयोग कसा करायचा ह्याचाच फक्त परिचय करून दिला जातो. अजून त्या समाजाचे भाषिक व्यवहार सांस्कृतिक जीवनाच्या वेगवेगळ्या क्षेत्रांत कसे चालतात, ह्याची कल्पना विद्यार्थ्याला दिलेली नसते. त्या समाजाचे सांस्कृतिक जीवन भाषेत कसे उमटते, त्याचा परिचय देण्याचे काम दैनंदिन जीवनातल्या मराठीच्या परिचयानंतर आम्ही आमच्या अभ्यासक्रमात करतो.

हा परिचय अर्थातच सर्वसामान्य समाजाचाच करून दिला जातो. पण एखाद्या अभ्यासकाला एखाद्या विशिष्ट जातीचा, जमातीचा सांस्कृतिक परिचय करून द्यायचा झाला, तर पुन्हा तो विषयनिष्ठ ठरून त्याचा शिक्षकालाही खास अभ्यास करून पाठ्यसामग्रीची योजना करावी लागेल. परंतु इथे सर्वसाधारणपणे मराठी समाजाच्या जेवणाच्या पद्धती, लग्नपद्धती, सण-उत्सव, त्या समाजाच्या सांस्कृतिक आवडी-निवडी म्हणजे नृत्य, नाटके सिनेमा इत्यादींची माहिती, त्या समाजाचे ऐतिहासिक, भौगोलिक जीवन ह्यांचा परिचय विद्यार्थ्याला भाषेद्वारा करून दिला जातो. समाजात घडलेल्या सांस्कृतिक-सामाजिक चळवळींचा इतिहास समजावून दिला जातो. महाराष्ट्रातल्या एखाद्या खेड्याचा –जुने खेडे आणि नवे बदललेले खेडे– परिचय करून दिला जातो. अगदी सणांच्या संदर्भातले उदाहरण सांगायचे झाले, तरी वर जो भाषा बोलायला शिकवण्यासाठी 'मोहनचा गणेश-उत्सव' ह्या धड्यातला उतारा घेतला आहे, त्याच सणाचा उपयोग महाराष्ट्रातील सांस्कृतिक घडामोडी सांगण्यासाठी भाषाशिक्षणाच्या ह्या दुसऱ्या अवस्थेत केला जातो. विद्यार्थी ह्या सणाच्या दिवशी एखाद्या मराठी माणसाच्या घरी गेला, तर त्याने तिथे कसे वागायचे, कसे बोलायचे ह्याचीही माहिती त्याला पुरवली जाते. अशा सणाबरोबरच बैलपोळ्यासारख्या सणाचीही त्याला ओळख करून दिली जाते. आपले नव्याने आत्मसात केलेल्या भाषेचे ज्ञान त्याला सांस्कृतिक संदर्भात वापरता यावे म्हणून ह्याच काळात वर्गाच्या चार भिंतींतून बाहेर पडून त्याला १५ दिवस मराठी लोकांमध्ये मुक्तपणे मिसळता यावे म्हणून पर्यावरणाची सोय केली जाते. दर रविवारची वर्तमानपत्रे विकत घेऊन त्यांच्या वाचनातूनही मराठी समाजाच्या सांस्कृतिक जीवनाचा परिचय करून दिला जातो.

ह्या ठिकाणी मराठीचा कसा वापर होतो ह्याची पुढील उताऱ्यावरून कल्पना येईल.

**बारसं**

विजूताई बाळाची मोठी आत्या. म्हणून बाळाचं नाव ठेवण्याचा मान तिचा. मी विजूताईला हळूच विचारलं, 'बाळाचं नाव काय ठेवणारं?' ती म्हणाली, 'मी आता नाही सांगणार. ऐनवेळी सांगेन...' बारशाची सर्व तयारी झाली... बरोबर चार वाजता बाळाला पाळण्यात घातलं. विजूताई त्याच्या कानात काही तरी पुटपुटली...

भाषाशिक्षणाच्या ह्याच अवस्थेत दोन भिन्न भाषिक समाजांची देवाण-घेवाण सुरू होऊ शकते. विद्यार्थ्याने भाषा आत्मसात केल्यामुळे तो आणि शिक्षक हे एक-दुसऱ्याचा समाज, एकमेकांच्या चालीरीती समजून घेऊ शकतात. भाषाभिन्नतेच्या मुळाशी दडलेला भारतीय समाज कुठे भिन्न आहे, कुठे एक आहे, ह्याच्या रेषा स्पष्ट होतात आणि सांस्कृतिक दृष्टया आपण फारसे भिन्न नाही किंबहुना, जवळ जवळ एकच आहोत ही कल्पना, भाषाभेद स्पष्ट झाल्यामुळे समजायला मदत होते. खरोखरच ह्या ठिकाणी मराठीचा व्यावहारिक उपयोग फार विचारपूर्वक करावा लागतो. कारण ह्याच ठिकाणी आम्ही मराठी समाजाची भाषा आणि तिचे साहित्य ह्यांच्यातला पूल बांधण्याचे काम करत असतो.

परभाषिकांना साहित्य शिकवताना 'साहित्याची निवड' कशी करायची इथपासून अनेक गोष्टींचा विचार करावा लागतो. साहित्य हे त्या त्या समाजाच्या सामाजिक जीवनाचे प्रतिबिंब आहे असे आपण म्हणतो आणि म्हणून त्याची ओळख पर-

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भाषिकांना करून देणे आवश्यक तर असतेच. इथे आपण पुन्हा थोडे मागे जाऊन 'हेतुनिष्ठ भाषा-शिक्षणा'कडे वळू. काही परभाषिकांना केवळ लिखित भाषेचा म्हणजेच साहित्याचा अभ्यास काही विशिष्ट हेतूने करायचा असतो. असे परभाषिक बहुतेक संशोधक, विद्यापीठातले अभ्यासक असतात. अशा काही संशोधकांना 'तुकाराम' किंवा 'ज्ञानेश्वरी' चा खास अभ्यास करायचा असतो. काही मंडळींना लो. टिळक, म. ज्योतिबा फुले अशा लोकांचा अभ्यास करायचा असतो. इथे लिखित भाषेचा अभ्यासच प्रामुख्याने करायचा असला, तरी भाषेची मूलभूत तत्त्वे समजून घेऊनच पुढचा मार्ग आक्रमावा लागतो. ह्या साहित्याचा अभ्यास करताना भाषांतरपद्धती, कठीण शब्दांचा सोपा अर्थ इत्यादी मार्ग अवलंबावे लागतात. अशा प्रकारच्या साहित्यात येणारे सामाजिक, सांस्कृतिक, ऐतिहासिकसंदर्भ शिक्षक आणि विद्यार्थ्याला येत असलेल्या समान भाषेतून समजावून दिले तरी चालतात.

साहित्य केवळ वाचता यावे, भाषेचा केवळ वाचनातून परिचय व्हावा म्हणून अभ्यास करणारेही परभाषिक असतात. त्यांना लिपी शिकवणे, वाचनाच्या सर्व खुब्यांची माहिती करून देणे, त्याचे वाचन-कौशल्य वाढवणे इत्यादी गोष्टींवर भर द्यावा लागतो. परंतु हा एक स्वतंत्र अभ्यासाचा विषय असल्यामुळे त्याचा इथे विचार केलेला नाही.

पण हा हेतुनिष्ठ भाग सोडला, तर मुख्य प्रश्न असा आहे की, जर परभाषिकाला आजच्या साहित्याचा अभ्यास करावयाचा असेल तर त्यासाठी कोणते साहित्य निवडायचे? त्या साहित्यात उमटलेले भाषेचे प्रतिबिंब कसे असावे? कारण त्याने ती भाषा किती उत्तम प्रकारे आत्मसात केली असली, तरी अखेर तो परभाषिक असतो. म्हणून अगदी सूक्ष्मतरल भावनांचे वर्णन, मनोविश्लेषणात्मक साहित्यातल्या गुंतागुंतीच्या भाषेमुळे, विषयामुळे, कदाचित निरुपयोगी ठरण्याची शक्यता असते.

म्हणून साहित्यातील मराठी शिकवताना विद्यार्थ्याला मराठी साहित्यातल्या सर्व प्रवाहांची ओळख करून द्यायची आणि मग त्यातल्या त्यात प्रमुख आघाडीच्या उत्तम साहित्यिकाची, त्यातल्या त्यात गुंतागुंतीचा विषय किंवा शैलीप्रधान नसलेली साहित्यकृती निवडायची हेच धोरण सांभाळावे लागते. साहित्याच्या अभ्यासाच्या निमित्ताने परभाषिकाला बोलभाषा आणि लेखनातील भाषा, सर्वसाधारण समाजाच्या भाषिक प्रवृत्ती आणि एखाद्या साहित्यिकाची व्यक्तिगत शैली, त्याच्या लेखनातील शैली हे भेद समजून घेऊन त्याचा एकंदर भाषा-शिक्षणात उपयोग करून घ्यायला मदत होते. साहित्यातल्या मराठी भाषेची निवड करताना किती प्रकारची काळजी घ्यावी लागते याचे एक छोटेसे उदाहरण पुढे दिले आहे.

**कावळ्यांची शाळा :**

काटदरे... लग्नातलं कपडे— हे आजच ह्निी बोहारणीला देऊन टाकले आणि पितळेचे घंघाळ घेतलं... पोटाला तर तुम्हाला सांगतो एवढा हा एवढा.

मंगेश... आ?

काटदरे... भोसका, कोटाला ओ देवून टाकला कोट...

**तो मी नव्हेच :**

सुनंदा : आक्का,

सुमती : असं काय करतेस बाबी? रडायला काय झालं,

सुनंदा : १५ हजार रुपये हुंडा देवून मला नाही लग्न करायचं. त्यापेक्षा मी जन्मभर कुवार राहीन.

गंगूताई : हे पहा, इतकं काही निराश होण्याचं कारण नाही. आपण त्यातून काहीतरी वाट काढू...

सुनंदा : कशी वाट काढणार? आम्ही काही जमीन-दार किंवा इनामदार नव्हेत, पंधरा हजार रुपये हुंडा द्यायला.

भाषेच्या दृष्टीने या दोन्ही उताऱ्यांत अतिशय सोपी, सहजसुंदर वाक्ये आहेत. पण एक उतारा विनोदाची झालर असल्यामुळे परभाषिकाला आकलनाला कदाचित कठिण वाटण्याची शक्यता असते. (एकदा एका गटाला आम्ही 'असा मी, असा मी'. शिकविण्याचा प्रयत्न केला होता, पण तो संपूर्ण फसला) विनोदी वाङ्मय कोऱ्या चेहऱ्याने ऐकणारे विद्यार्थी समोर असले, की एका शिक्षकाला काय त्रास होतो ते अनुभवायला परभाषिकांना भाषा शिकविणारे शिक्षक झाले म्हणजे कळते.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वर जो दुसरा उतारा दिला आहे त्यातला हुंडा हा विषय सर्व भारतीयांच्या जिव्हाळ्याचा, म्हणून तो परभाषिकाला चटकन समजतो आणि आवडतोही. परभाषिकांना शिकवायच्या साहित्याची निवड करताना का काळजी घ्यावी लागते याची या उदाहरणावरून कल्पना येईल. साहित्याची भाषा शिकवायची म्हणजे तिची परभाषिकांना योग्य ठरेल अशी शैली, या साहित्यातले अंतःप्रवाह यांचा विचार करावा लागतोच.

एखाद्या परभाषिकाला मराठी भाषा उत्तम प्रकारे येते असे आपण केव्हा म्हणतो याचे उत्तर त्याला भाषेतला विनोद कळला म्हणजे, त्याला साहित्यातून भाषेत जाऊन बसलेले वाक्प्रचार (उदा. जेथे जातो तेथे तू माझा सांगाती, प्रयत्ने वाळूचे कण रगडिता इत्यादी) समजले म्हणजे किंवा त्या भाषेतल्या म्हणी (उदा. अग, अग म्हशी मला कुठं नेशी) समजल्या म्हणजे भाषा आली असे देण्यात येते. खरोखरच परभाषिकाची इतकी तयारी झाली, तर मात्र त्याला कोणतेही साहित्य शिकवण्यात अडचण येणार नाही. किंबहुना, त्याचे भाषाशिक्षण परिपूर्ण होऊन तो त्या भाषिक समाजाचाच घटक मानला जाईल.

म्हणूनच अमराठी भाषिकांना कोणत्याही टप्प्याला कोणत्याही उद्दिष्टाने, कोणत्याही पद्धतीने भाषा शिकवायची असो, तिची निवड करताना तिचे त्या त्या उद्दिष्टांना साध्य करणारे व्यवहारिक स्वरूपच निवडावे लागते. ते स्वरूप निश्चित करता आले नाही, तर भाषाशिक्षण योग्य प्रमाणात सफल होणार नाही. म्हणून या ठिकाणी मराठीचे ज्या अनेक अंगांनी व्यावहारिक आणि व्यावसायिक स्वरूप लक्षात घेण्याचा प्रयत्न चालू आहे त्यात अमराठी भाषिकांना शिकवायच्या मराठीच्या विचारालाही अत्यंत महत्त्वाचं स्थान आहे, हे विसरून चालणार नाही. हे स्थान लक्षात घेऊन आपण अमराठी भाषिकांसाठी पाठ्यसामग्री तयार केली, तरच दिवसेंदिवस मराठी शिकण्याकडे लोकांचा कल वाढेल आणि भारतातल्या एका अत्यंत समृद्ध अशा या भाषेचा इतरांना अधिकाधिक परिचय होईल यात शंकाच नाही.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शिक्षण हे समाजपरिवर्तनाचे एक प्रभावी शास्त्र आहे आणि ते समाज परिवर्तनाच्या प्रक्रियेचे एक अविभाज्य अंग आहे. इंग्रजी विद्येने या देशात विषमताच पोसली. ज्यांनी इंग्रजी भाषेचे अध्ययन केले तो आंग्लशिक्षितांचा वर्ग सर्वसामान्य तळागाळाच्या समाजापासून दूर तर राहिलाच, पण इंग्रजी ही ज्ञानभाषा आहे अशी घोषणा करीत, इंग्रजी भाषेतील संपन्न साहित्यावर केवळ स्तुतिसुमने उधळीत राहिला. आपणास जे जे ठावे, ते ते मराठीत लिहावे, शहाणे करून सोडावे सकळ जन, असा नवा मंत्र आंग्लशिक्षितांनी कधी आचरणात आणलाच नाही. त्यामुळे ज्ञान बंदिस्त झाले. वरचे स्तर इंग्रजी विद्याविभूषित झाले, म्हणजे त्यांनी मिळविलेले ज्ञान झिरपत झिरपत तळागाळापर्यंत येईल, ही ब्रिटिश नीती चुकीची होती. म्हणून तर या देशातील साठ टक्के लोकसंख्या निरक्षर आहे आणि पन्नास टक्के लोकसंख्या दारिद्र्यरेषेच्या खाली जगते आहे.

उच्चशिक्षणाच्या सोयी निर्माण करण्याच्या उद्देशाने ब्रिटिश कालात विद्यापीठे उदयाला आली. ही विद्यापीठे म्हणजे परीक्षा घेणाऱ्या कंपन्या आहेत, हमालखाते आहेत असे जे लो. टिळक म्हणत असत, ते आजही खरे वाटते. आजही विद्यापीठे केवळ 'पदवीदान' करतात त्यांनी 'ज्ञानदान' करण्यासाठी पाऊल उचललेले नाही. विद्यापीठाच्या चार भितींत 'आहेरे' वर्गातील विद्यार्थ्यांना पदव्या मिळवून द्यायच्या आणि इंग्रजी पुस्तकांचे वाचन व कधी कधी मनन–चिंतन करीत कालहरण करणारे विद्वान शिक्षक आपापल्या क्षुद्र जगात पैसा, प्रतिष्ठा व सत्ता कशी उपभोगता येईल त्याचा विचार करीत. विद्यापीठ हे संस्कृतीची जडणघडण करणारे एक प्रभावी केन्द्र आहे ही कल्पना त्यांच्या मनाला कधी शिवली नाही. आपण जगतो त्या जगाबाहेर प्रचंड जनसमूहाला अज्ञान, दारिद्र्य, रोगराई, विषमता उपभोगण्याचे स्वातंत्र्य तेवढे लाभले आहे याची या विद्वान समाजाला कधी जाणीवच झाली नाही. या विद्यापीठ-संस्कृतीने आपले असे विचारविश्व, भावविश्व उभे केले आणि ज्यांना इंग्रजी विद्येचा स्पर्श झाला नाही, ज्यांना इंग्रजी भाषा अवगत नव्हती त्यांना सतत तुच्छ लेखले. ज्या इंग्रजी भाषेचा गर्व त्यांनी वाहिला, त्यांनी इंग्रजी भाषेत मौलिक ग्रंथांची भर घातली नाही आणि आम्ही मराठीत लिहीत नाही, मराठीत वाचीत नाही, मराठीत बोलत नाही याचा नित्य अभिमान मिरवला. तथाकथित बुद्धिमंतांच्या संकुचित जगात विचारविनिमयाची, संवादाची भाषा इंग्रजीच राहिली. नवे विचार, नवे तंत्रज्ञान सामान्य जनमानसात रुजेल तरी कसे ?

पारंपरिक विद्यापीठे अध्यापन व संशोधन हीच तेवढी आपली कार्ये आहेत असे मानीत आली. विद्यापीठ अनुदान मंडळाने नव्या धोरणानुसार 'ज्ञानविस्तार' हे तेवढेच महत्त्वाचे कार्य आहे असे अलिकडे घोषित केले. बदलत्या कालमानानुसार आता विद्यापीठाने शिक्षणपद्धतीत आमूलाग्र बदल केलेच पाहिजेत. तरच विद्यापीठे खऱ्या अर्थाने शिक्षण देण्याचे कार्य करतील आणि आपल्या आवतीभोवतीच्या परिसरात वा आपल्या कार्यक्षेत्रातील जनतेचा सर्वांगीण विकास घडवून आणण्याच्या प्रक्रियेला गती देतील.

---

# निरंतर शिक्षण आणि व्यावहारिक मराठी

भा ल चं द्र फ ड के

---

निरंतर शिक्षणयोजना ज्ञानविस्तार-कार्यक्रमाचा एक महत्त्वाचा भाग आहे. पुणे विद्यापीठाच्या पहिल्या कुलगुरूंचे, डॉ. बाबासाहेब जयकरांचे एक स्वप्न होते. आपले विद्यापीठ पारंपरिक चाकोरी सोडून झोपडीत, शेतात, कारखान्यात राहणाऱ्या सामान्य माणसांपर्यंत पोचले पाहिजे. म्हणून त्यांनी मराठी भाषा हे शिक्षणाचे माध्यम बनले पाहिजे व मराठीचे अध्ययन सर्व विद्याशाखांतून व्हावे आणि मराठी भाषेचा सर्वांगीण विकास व्हावा असा सतत आग्रह धरला. तसे पाहिले तर




अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

राज्य बदलणे सोपे असते, कारण लोकशाही युगात मतपेटी हा आधार असतो; पण माणूस बदलणे ही अवघड प्रक्रिया आहे. त्यासाठी ' जाणीवजागृती ' होणे अपरिहार्य आहे आणि लोकभाषेतूनच जाणीवजागृती शक्य होईल. निरंतर शिक्षण-योजनेखालील अभ्यासक्रम प्राधान्याने जाणीव-जागृती करू पाहतात. ज्यांच्यापर्यंत आधुनिक विद्या, नवे तंत्र आणि तंत्रज्ञान, विज्ञान पोचले नाही. त्यांना मराठीतूनच ज्ञान दिले पाहिजे.

पुणे विद्यापीठाची निरंतर शिक्षणयोजना आपल्या अधिकारक्षेत्रातील जिल्ह्यांत जवळ जवळ १२५ अभ्यासक्रम राबवीत आहे. प्रतिवर्षी या अभ्यासक्रमांची संख्या वाढतेच आहे. कोणताही अभ्यासक्रम आखताना निरंतर शिक्षणकेन्द्र तेथील जनतेच्या गरजा, त्यांचे विचार जाणून घेते आणि त्यातून छोटे छोटे अभ्यासगट तयार होतात. प्रत्येक अभ्यासक्रम यशस्वी करण्यासाठी तज्ज्ञांचे, सामाजिक जाणिवेने भारलेल्या कार्यकर्त्यांचे साहाय्य घेतले जाते. व्यक्तिमत्त्वविकास करू शकतील, सामाजिक प्रबोधन करू शकतील, अर्थोत्पादना-साठी नवी तांत्रिक कौशल्ये आत्मसात करता येतील अशा उपयुक्त अभ्यासक्रमांचा त्यात समावेश आहे. हे अभ्यासक्रम अल्पमुदतीचे आहेत. आपापला व्यव-साय संभाळून हे अभ्यासक्रम पुरे करता येतात. अभ्यासक्रम पूर्ण केल्याबद्दल विद्यापीठ प्रशस्ति-पत्रही देते. कोणताही अभ्यासक्रम संपल्यावर त्या अभ्यासक्रमाविषयी विद्यार्थ्यांचे मनोगत, सूचना जाणून घेऊन व त्यानुसार अभ्यासक्रमात आव-श्यक ते इष्ट बदल घडवून अभ्यासक्रम विकसित करण्याची तरतूद केन्द्र करते. या अभ्यासक्रमासाठी फारच नगण्य अशी फी घेतली जाते. आणि अल्पशा आर्थिक साहाय्यावर उपयुक्त अभ्यासक्रम राबवले जातात.

या अभ्यासक्रमासाठी ज्या तज्ज्ञांना पाचारण केले जाते, त्यांची महत्त्वाची अडचण म्हणजे आपले विचार सामान्य जनांना समजतील अशा मराठी भाषेत कसे मांडावेत ही होय. व्यावहारिक मराठीची गरज वाटते ती अशी. मेणबत्ती, खडू, साबण, पावडर, भांडी घासायची पावडर, शाई इत्यादी वस्तू तयार करून त्या विकाव्यात कशा ? हे सांगणारा अभ्यासक्रम राबवला तेव्हा तज्ज्ञाला या वस्तू तयार करण्याची प्रक्रिया सोप्या भाषेत समजावून देता येईना. त्यातील रसायने, ती मिसळण्याचे प्रमाण त्याला मराठीतून सांगणे जड गेले. अर्धे-अधिक तो इंग्रजी शब्दच वापरीत होता. मग या केन्द्राने मराठी भाषातज्ज्ञाकडून त्याचे सोप्या भाषेत छोटे टिपण केले व त्याच्या आधारे तो हळूहळू अवघड प्रक्रिया सोपी करू शकला. एका मांग बायकांच्या वस्तीत वाखाच्या दोऱ्यापासून शोभेच्या वस्तू बनविण्याचे शिक्षण देण्याचे योजले, तेव्हा तज्ज्ञासमोर भाषेचीच अडचण उभी राहिली. म्हणून विविध अभ्यासक्रम तयार केल्याबरोबर त्या त्या अभ्यासक्रमात आशय, त्यात आवश्यक असलेले पारिभाषिक शब्द मराठीतून सिद्ध करण्याची अवघड कामगिरी केन्द्राला करावी लागते.

महाराष्ट्र राज्याची भाषा मराठी; पण अद्याप शासकीय व्यवहार, न्यायालयीन कामकाज, दैनंदिन व्यवहार, शालेय वा विद्यापीठीय शिक्षण मराठीतून संपूर्णपणे होत नाही. इंग्रजी भाषेचे अधि-राज्य आहेच. विविध उद्योगधंद्यांत, कारखान्यांत शासकीय वा खाजगी कार्यालयांत अन्यभाषी व्यक्ती काम करतात; त्यांना व्यवहार करण्यापुरती भाषण, वाचन, लेखन, श्रवण इत्यादी कौशल्ये आत्मसात करता येतील असे छोटे अभ्यासक्रम तज्ज्ञांकडून तयार करून ते राबविण्याचा कार्यक्रम केन्द्राने हाती घेतला आहे. तसेच विद्यापीठाची जेथे जेथे प्रौढशिक्षण केन्द्रे चालतात, तेथे तेथे त्यांना प्रेरक वाटतील अशा शब्दांची निवड करून त्यांचा शब्दसंग्रह वाढवि-ण्याचा, आपला विचार सोप्या वाक्यातून मांडण्यास शिकविण्याचा कार्यक्रम हाती घेतला आहे. पूनम हॉटेलमध्ये अेक प्रौढशिक्षण केन्द्र चालते. तेथे आसपासच्या इतर हॉटेलमध्ये काम करणारे वेटर्स आपापले काम संपवून रात्री ११ वाजता जमतात. त्यांना आपल्या व्यवसायात गिऱ्हाइकांशी मराठीत प्राधान्याने संभाषण करावे लागते. त्यादृष्टीने येथील अभ्यासक्रमाचा आशय ठरविला व येथे उपयुक्त ठरणाऱ्या शब्दसंग्रहाची, वाक्यरचनेची तालीम देता आली. वेगवेगळ्या अभ्यासक्रमांत वेग-वेगळे पाठ तयार केले पाहिजेत. शिक्षणपद्धतीची योजना केली पाहिजे. त्यांना रस वाटेल असे साहित्य



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

निर्माण केले पाहिजे. हे आव्हान तज्ज्ञ स्वीकारीत नाहीत. मोलकरणींना प्रशिक्षित करण्यासाठी त्यांना ओळखीची वाटेल अशा बोलीचा उपयोग करण्यावाचून उपायच नव्हता. प्रमाण मराठीत अध्यापन केले असते, तर अभ्यासक्रम निरर्थक ठरला असता.

समाजाच्या गरजा भिन्न भिन्न असतात; पण त्या जाणून घेण्यासाठी आधुनिक विद्वान समाजाभिमुख होत नाहीत. सामाजिक जाणीव कशी वाढेल याचा विचारही विद्वान चार भिंतींतच शुष्कपणे करणार. समाजमन जाणायचे, तर समाजात वावरले पाहिजे, त्याच्याशी संवाद साधला पाहिजे. व्यावहारिक मराठीचे रूप तरच आकलन करता येईल. एअर कंडिशण्ड खोल्यांत बसून वा मराठीच्या अध्यापनाबाबत तोच तो शुष्क काथ्याकूट करून आता भागणार नाही. आता क्रांतीची गरज आहे. मराठी भाषेला केवळ सिंहासन नको आहे, तिला समाजाच्या आशा-आकांक्षांचे, सुख-दुःखांचे, चिंतन-मननाचे वाहन म्हणून प्रतिष्ठा लाभली पाहिजे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# व्यावहारिक इंग्रजी : परिचय व बोध

तिलोत्तमा दासवाणी

ज्ञान हे किती सुगम आहे हा शिक्षण-शास्त्रातील एक महत्त्वाचा वा निर्णयात्मक मुद्दा आहे. अभ्यासक्रमाची आखणी, शिक्षकांचे शिक्षण आणि साधनांची पुरवणी या सर्वांच्या मागे ज्ञान सुगम करणे हाच हेतू आहे. भाषा म्हणजे ज्ञान प्रस्थापित करण्याचे एक साधन आहे ह्याकडे हल्लीच योग्य लक्ष दिले जात आहे. भाषा, आकृती व गणितशास्त्र ह्या तीन चिन्हव्यापारांतून विद्यार्थी विषयाचा आशय ग्रहण करू शकतात. कुठल्याही शैक्षणिक कार्यक्रमाची कार्यक्षमता विद्यार्थ्यांना हे तीन चिन्हव्यापार कितपत अवगत आहेत, त्यांतून विषय किती स्पष्ट होत आहे आणि ह्या तीन चिन्हपद्धती शैक्षणिक कार्यक्रमाशी किती एकजीव झाल्या आहेत यावरच अवलंबून असते. त्यातूनच या शतकात ज्ञानाची झपाट्याने झालेली वाढ – ज्याला स्फोटच म्हणता येईल – आणि शिक्षणपद्धतीचा फैलाव ह्यांच्या संदर्भातच आपल्याला व्यावहारिक भाषाशिक्षणाचा विचार करायचा आहे. तर ज्ञान सुगम करण्याचे हे आव्हान, किंबहुना ही जबाबदारी केवळ इंग्रजीची नाही. हे काम प्रत्येक देशात जी भाषा ज्या स्तरावर माध्यम म्हणून वापरली जाते तिच्यासमोर आहे. मग ती भाषा मुख्य असो, वा दुय्यम. अर्थात मुख्य भाषेचा कार्यक्रम दुय्यम भाषेपेक्षा थोडा वेगळा असणारच.

व्यावहारिक किंवा उद्देशात्मक इंग्रजी शिक्षणक्रम गेल्या काही वर्षांत जशी गरज उद्भवली, तसे निर्माण केले गेले. त्यांची उदाहरणे घेऊन आपल्याला व्यावहारिक भाषाशिक्षणातील काही प्रश्नांची चर्चा करता येईल.

गेल्या काही वर्षांत इंग्रजी शिक्षणपद्धतीत दोन नवीन दृष्टिकोण पुढे आलेले दिसतात. काही विद्यार्थ्यांना त्यांच्या उच्च शिक्षणासाठी दुसरी भाषा आत्मसात करण्यात काय समस्या उभ्या राहतात ? आणि दुसरे म्हणजे भाषेचे औपचारिक शिक्षण दिल्यावर भाषा संवादासाठी विद्यार्थ्यास परिणामतः आपोआपच येईल का ? निवेदन-व्यवहार व भाषा-संरचना यांचा घनिष्ट संबंध आहे का ? इंग्रजी भाषा शिकवता शिकवता विशिष्ट उद्देशाच्या रोखाने भाषा-शिक्षणाची गरज वाटली आणि मग अर्थनिवेदनक्षमता (Communicative competence) आपोआपच औपचारिक भाषाशिक्षणानंतर विद्यार्थ्यास प्राप्त होईल याविषयी आशंका उत्पन्न झाली. हे सुसंबद्ध आहे. कारण जेव्हा इंग्रजी केवळ विषय म्हणून शिकवले जाते, तेव्हा त्या शिक्षणाची सफलता परीक्षेतील यश ह्यासारख्या बाह्य निकषाने मोजली जाते. जेव्हा विशिष्ट उद्देशाने इंग्रजी शिकवण्यात येते, तेव्हा इंग्रजीच्या परीक्षेचे महत्त्व उरत नाही आणि आंतरिक मूल्यमापन वापरले जाते. योजलेले उद्देश कितपत साध्य झाले, हे निर्णयात्मक ठरते आणि परिणामतः अर्थनिवेदनक्षमता हाच आंतरिक मूल्यमापनातील निकष ठरतो.

इथे थोडे थांबून व्यावहारिक इंग्रजीचे पोटभेद पाहुया. हे पोटभेद इतर भाषांचे शिक्षणक्रम आखण्यातही मार्गदर्शक ठरतील. व्यावहारिक इंग्रजी– ज्याला ESP म्हटले जाते– त्याचे दोन मुख्य भाग आहेत. एक भाषा उच्चशिक्षणातील विशेष अभ्यासात वापरली जाते व दुसरी भाषा विशिष्ट उद्योगात वापरली जाते. या दोन भाषांगांत (discourse) काही मूलभूत फरक आहेत. उद्योगक्षेत्रातील भाषा क्रियाभिमुख आहे आणि अभ्यासक्षेत्रातील भाषा विवेचनात्मक आहे ( आकृती १ पहा ).

अर्थनिवेदनक्षमता दोन्ही क्षेत्रांत जरी आवश्यक असली, तरी अभ्यासक्षेत्रात ती केवळ परीक्षेच्या






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कसोटीला उतरावी लागते; उद्योगक्षेत्रात ती प्रत्यक्ष व्यवहाराच्या कसोटीला उतरावी लागते. आपल्या अनुभवांवरून आपल्याला आढळेल, की अनेकदा चांगल्या रीतीने परीक्षा उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांतही अर्थनिवेदनक्षमता तयार झालेली नसते. मात्र जर आज विद्यार्थ्यांच्या नव्या पिढीत शास्त्र किंवा औद्योगिक कलाशास्त्रांत अर्थनिवेदनक्षमता निर्माण झाली नाही व ते केवळ पोपटपंची करत राहिले, तर त्यांची व देशाची प्रगती व भरभराट होणार तर नाहीच, पण एक तऱ्हेची विचित्र मानसिक स्थिती – विफलतेची व निरुत्साहाची – सगळ्या शिक्षणक्षेत्रात फैलावेल. अशा मनःस्थितीची सुरवात झालेली स्पष्ट दिसत आहे. या स्थितीला जबाबदार असलेली वडील-पिढी मात्र डोळ्यांवर कातडे ओढून इंग्रजीचे गुण गात आहे. कारण ऐतिहासिक काळात इंग्रजांनी आधुनिक शास्त्र व तंत्रविज्ञान हिंदुस्थानात आणले आणि ते इंग्रजी भाषेच्या माध्यमातूनच आले. तेव्हा शास्त्रीय विचाराचे गुह्य केवळ इंग्रजी भाषेतच लपलेले आहे असे त्यांना वाटते. स्वतः इंग्रज, ज्यांचे साम्राज्य आता इंग्रजी भाषाशिक्षणापुरतेच उरले आहे, त्यांच्यांत या विषयावर दुफळी माजली आहे. व्यावहारिक भाषाशिक्षण झाले पाहिजे हे खरे; पण काही म्हणतात ही समस्या केवळ माहीत असलेली भाषाशिक्षणाची तत्त्वे आचरणात (operational) आणण्याची आहे. भाषाशैक्षणिक ज्ञानात काही कमतरता वा उणीव नाही. उलट काही म्हणतात, की त्या संदर्भात भाषाशास्त्र आणि भाषाशिक्षणतज्ञ तितकेच अनभिज्ञ आहेत, त्यांना शास्त्रीय आणि तांत्रिक निवेदनाविषयी इतके कमी माहीत आहे, की अवस्था चार आंधळे व हत्तीची आहे. अजून तर या विषयावरचे संशोधन व्हायचे आहे. म्हणजे समस्या आहे ती तत्त्वे कृतीत आणण्याची नसून तत्त्व स्थापित करण्याची (theoretical) आहे.

व्यावहारिक इंग्रजी शिक्षणाची समस्या केवळ आचरणिक असे म्हणणाऱ्यांची भूमिका अशी आहे, की बीजभूत भाषा (core language) व सामान्य भाषा सोडली, तर भाषांची व्यवहार व विषयानुसार क्षेत्रे आखता येतील. शास्त्रीय व तांत्रिक इंग्लीश ही त्यांची उदाहरणे आहेत. या क्षेत्रीय भाषा किंवा Registers शिकवायची असल्यास शिक्षकाला प्रथम त्या भाषेच्या नमुन्यात वारंवार योजलेल्या शब्दांची व रचनांची गणना करावी लागेल. नंतर त्याच्यावर योग्य ती भर देणारे भाषा शिकवायचे साहित्य तयार करावे लागेल. संरचना–Structural–पद्धतीचा अभ्यासक्रम खास ह्याच धर्तीवर तयार करण्याची पद्धत आहे. तेव्हा व्यावहारिक इंग्रजी शिकवायचे म्हणजे अस्तित्वात असलेल्या एक रीतीने थोड्या संकुचित भाषेच्या नमुन्याचे विश्लेषण करायचे. शिकवण्याची पद्धतीही व धडे तयार करण्याचीही पद्धती आहे तीच वापरायची. फक्त referential content – संदर्भासाठी निवडलेला आशय – वेगळा.

Structural approach – संरचना पद्धतीवर बरेच आक्षेप घेता येतील व १९६० सालापासून यावर मी इतरत्र लिहिले आहे. पण आजच्या विषयाच्या संदर्भात थोडक्यात एवढे म्हणता येईल, की या पद्धतीत गणना करताना जे descriptive model (वर्णनात्मक नमुना) वापरले जाईल त्याप्रमाणे भाषिक अंश (Linguistic elements) कोणते हे ठरवले जाईल. Taxonomic model मध्ये deep structure वर भर दिला जाणार नाही व तसेच वाक्यांमधील जे संबंध असतात त्यांकडेही दुर्लक्ष होईल. त्याहूनही महत्त्वाचा आक्षेप असा आहे, की विश्लेषण – analysis– करताना अर्थातच संदर्भ वेगळाच राहतो व त्या अंशाचे सबंध भाषांगामध्ये काय स्थान आहे ह्याचेही भान राहत नाही. उदाहरणार्थ, शास्त्रीय इंग्रजीत कर्मणि प्रयोग अधिक वापरात येतो. हे जरी लक्षात आले, तरी ह्या कर्मणि प्रयोगातून वेगळ्या प्रकारची विधाने केली जात आहेत, ह्याचा कुठेही आजतागायत उल्लेख नाही. तेव्हा नुसते क्षेत्रीय भाषेचे विश्लेषण (रजिस्टर analysis) करून भाषांगाचे (discourse) लहान लहान भाग भाषिक अंशांत केले म्हणजे भाषिक व्यवस्थेचे– language system चे – प्रकट दर्शन घडविले असे होत नाही. भाषेचे वर्णन केवळ संख्यात्मक होत नाही, ते गुणात्मकही पाहिजे. दृष्टीला पडते तीच भाषा नसून त्याच्या खाली खूप खोल पाळेमुळे गेलेली आहेत. तेव्हा केवळ usage चे निरीक्षण केले,



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नंतर प्रचलित भाषेचे– usage चे– निरीक्षण केले, धड्यात शिकवले, वर्गात घोकून घेतले म्हणजे मुलांना भाषा आली हे खरे नव्हे. जसे नुसते स्नानसंध्या करून देव भेटत नाही, तसेच भाषेचे आहे. जर विद्यार्थ्याला भाषा उमजायला हवी असेल व त्याच्यात काही परिवर्तन घडवायचे असेल, त्याची नौका usage च्या ऐलतीरावरून use च्या पैलतीरावर जायची असेल तर संरचना-पद्धती अपुरी पडते हा आपल्या सर्वांचा अनुभव आहे.

जर संरचनापद्धती अपुरी आहे, तर अर्थ-निवेदनात्मक दृष्टिकोण ( communicative approach ) काय म्हणतो हे थोडक्यात पाहुया. त्याप्रमाणे व्यावहारिक भाषाशिक्षण मुख्यत्वाने आपल्या विद्यार्थ्यात एक विशिष्ट क्षमता निर्माण करू पाहते. कोणत्या कल्पना वा धारणा, तसेच कोणत्या प्रक्रिया निवेदनाच्या क्रियांतून स्पष्ट केल्या जात आहेत हे समजण्याची क्षमता. ही क्षमता निर्माण करण्यापूर्वी त्या भाषांगाचा ( discourse ) एक संपूर्ण साचा ( comprehensive model ) बनवला पाहिजे. अशा साच्याचे उदाहरण देणे फार कठिण आहे, कारण हे काम अलिकडेच सुरू झाले आहे. आजकाल शिक्षणक्षेत्रात ह्याविषयी बरेच लिहिले जाते. तात्पुरती, बिचकत केलेली, भाषेच्या काही अंगांचीच वर्णने अस्तित्वात येऊ घातली आहेत. पण अजून स्वच्छ, रेखीव चित्र समोर उभे करता येत नाही.

ह्याला बऱ्याच अंशी भाषाशास्त्राची सद्यःस्थिती कारणीभूत आहे. जोपर्यंत भाषाशास्त्र एक तऱ्हेच्या आदर्शवादी पीठिकेवरून भाषेकडे पाहत होते, तोपर्यंत स्पष्टरेखित भाषांश ( well defined linguistic units ) व भाषेचे गुण स्पष्ट मांडता येत होते व संदर्भ ( context ) व भेद ( variation ) दृष्टिआड करता येत होते. पण जेव्हा आदर्शवाद बाजूला ठेऊन भाषा समाजात संवाद साधण्यासाठी वापरली जाते, तसेच सामाजिक स्तराकडे भाषा कशी बदलते इकडे भाषाशास्त्रज्ञ आपले अवधान वळवतात, तेव्हा त्यांचे संकल्पनांनी रचलेले जग (conceptionl universe) डगमगू लागते व त्याची रेखीव मांडणी ढासळते. सध्या भाषाशास्त्रज्ञ तत्त्वज्ञानाकडेही आकर्षित झाले आहेत. वाचिक क्रियांबद्दलचे ( speech acts ) तर्क व वाक्य ह्यांचा काय संबंध आहे, ह्याचा ते विचार करू लागले आहेत. वाक्य, उक्तिप्रयोजन ( illocutionary acts ), अभिप्राय ( locution ), आविष्कार ( perlocution ) ह्यांची चर्चा सगळीकडे होऊ लागली आहे. त्याबरोबरच Language/parole, competence / performance, sentence/utterance, semantic/pragmatic मधील तीक्ष्ण भेद आता स्पष्ट होऊ घातले आहेत. त्याबरोबरच समाजशास्त्राचा प्रभावही भाषाशास्त्रावर पडल्याने सामाजिक आशय, सामाजिक दृष्टिकोण, भाषेतील भेद ह्यांचेही महत्त्व वाढले आहे व अशा रीतीने जी विधाने ठामपणे केली जात होती, ती आता करताना भाषाशास्त्रज्ञ चाचरू लागले आहेत. थोडक्यात, प्रत्येक शास्त्रात असा काळ येतोच, की जेव्हा certainty– खात्री– सोडून शास्त्रज्ञ speculation– तर्क– लढवतात. तात्त्विक बैठक बदलताना असे थोडेसे होणारच. पण शिक्षकांनी – ज्यांना बाळकोबा सांगकामे म्हटले गेले – काय करायचे ? सभ्यपणे भाषाशास्त्राचे रूप पालटतेय म्हणून तिकडे पाठ फिरवायची का ? चाळीशी उलटल्यावर माझ्यासारखी बाई म्हणेल तसे त्यांनी म्हणायचे का, की दर फॅशनच्या मागे धापा टाकीत पळणे जमायचे नाही. शिक्षकांनाही एकाच्याच ओंजळीने पाणी पिणे जमणार नाही. कुठलीही एक भाषाशास्त्रीय प्रणाली – Linguistic Theory – एकमेव सत्याची हमी देऊ शकत नाही. तर सर्वांचा यथोचित उपयोग करून घेतला पाहिजे. शैक्षणिक तत्त्वप्रणाली आपली ठरवून मग वेगळे वेगळे भाषाशास्त्रज्ञ जे काही मर्मदर्शन (insights) घडवत असतील त्याचा आपल्या कार्यात उपयोग करून घ्यायचा. चिटणीसबाईंच्या पेपरात हेच सुचवायचे आहे. मात्र त्यात communicative approach विषयी फार विस्तार नसल्याने परत एकदा त्याच्याकडे वळुया.

सर्वसाधारणपणे Standard Generative Theory प्रमाणे भाषाव्यवहारामागे काही सुप्त संज्ञात्मक प्रक्रिया ( underlying cognitive



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

processes ) आहेत. आणि त्यांचे वर्णन बीजगणिती rules नी करता येईल. भाषिक वर्णन व भाषिक ज्ञान यांचे असे एक समीकरण ठरले आणि Generative चा रोख व्याकरणातील formal वस्तूवर तसाच मानसिक Construct निर्माण करण्याकडे आहे. Sociolinguists म्हणतात, की हे समीकरण चुकीचे आहे. जे एक भाषिक आपल्या भाषेविषयी जाणतो त्या ज्ञानाचे Generative Grammar मध्ये रूपांतर होत नाही. तेव्हा भाषेचे वर्णन व भाषेचे ज्ञान हे एका समीकरणात बसत नाही. अशाच काही शंकांमुळे भाषाशास्त्रज्ञ या उक्तिप्रयोजन, भाषाकार्य, speech functions, presuppositions, text grammar, discourse analysis इत्यादींकडे वळले आहेत. भाषाशास्त्रज्ञ अजून त्याचे केवळ वर्णनही करू शकत नाहीत; मग शिक्षकवर्ग विशिष्ट भाषांगांतील अर्थनिवेदनक्षमता विद्यार्थ्यांत कशी निर्माण करू शकेल ? हे साकडे सोडवायला आपल्याला शेवटी मानसशास्त्राकडे वळावे लागेल. विशिष्ट भाषांच्या अर्थनिवेदनात्मक पद्धती ( communication system ) च्या मागे एक cognitive deep structure उभे आहे असे प्रतिपादन करावे लागेल आणि या cognitive deep structure चे निरनिराळ्या भाषांत वैयक्तिक रूपांतर होत असते. तसेच हे रूपांतर केवळ भाषेत होते असेच नव्हे, तर गणित, फॉर्म्युला, ग्राफ, आकृत्या इ. मार्गांनीही होत असते. तर शास्त्रीय निवेदनपद्धतीप्रमाणे discourse हा भाषिक तसाच अभाषिक चिन्हांत प्रगट होत असतो. पण इथे सुजाण शिक्षक लगेच आक्षेप घेईल, की शास्त्रीय निवेदनपद्धती शास्त्राच्या अभ्यासात आली. आम्ही पडलो भाषाशिक्षक. आम्ही केवळ भाषा ही शास्त्राचे साधन –Tool– म्हणून शिकवणार. ह्याच विचारपद्धतीमुळे भाषाशिक्षण निर्जीव झाले आहे. जर English for Science शिकवायचे असेल, तर शिक्षकाला Methodology of Science अवगत हवी. मग भाषाशिक्षणपद्धती व विषयशिक्षणपद्धतीचा मेळ बसेल व ह्या ज्ञानाच्या दोन अंगांचे संश्लेषण ( synthesis ) झाले, की विद्यार्थी भाषा-वर्णनापासून क्रियाशील भाषेकडे (from usage– प्रघात– to use– प्रत्यक्ष वापर ) जाऊ शकेल. तसेच शास्त्रीय पद्धती– methodology– विविध शास्त्रीय विषयांचीही एकच असते. मग तिचे वर्णन भाषेत करा किंवा इतर चिन्हव्यापारांनी. तर जेव्हा व्यावहारिक भाषा विद्यार्थी शिकतात, तेव्हा प्रथम भाषेतून शास्त्राची अर्थनिवेदनात्मक पद्धती त्यांना अवगत आहे असे धरून चालायला हरकत आहे का ? इथेच मातृभाषाशिक्षणाचा विचार केला पाहिजे. जर प्राथमिक भाषाशिक्षण यथोचित झाले असेल, तर वर विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर होकारात्मक असेल; नाही तर नकारात्मक. तर आपण केवळ भाषाशिक्षणापुरतेच बोलू शकत नाही. विद्यार्थ्यांचे शिक्षण योग्य मार्गाने झाले असेल, तर त्याच्याकडे अर्थनिवेदनक्षमता एका स्तरावरची असेल. कारण अर्थनिवेदनक्षमतेमागे एक आकलनात्मक सखोल संरचना आहे. जर आपल्या भाषेतून शास्त्र शिकताना विद्यार्थ्याचे ज्ञान वाढले असेल, तर मग त्याला इंग्रजी किंवा इतर भाषेचे साधारण ज्ञान असेल तर त्या भाषेतून त्याला शास्त्रीय भाषांग ( scientific discourse ) पुढे उच्चस्तरावर शिकवणे फारसे कठीण नाही. The assumption being that his mind has already undergone the basic transformations in developing scientific ways of thinking which contain cognitive tacts.

आणि जर हे रूपांतर घडलेले नसले, तर कसे घडवून आणता येईल ? भाषेपुरतेच थोडक्यातच सुचवायचे म्हटले, तर शिक्षकांना भाषा सोडून इतर चिन्हपद्धतीचा अवलंब करावा लागेल आणि मग त्या विद्यार्थ्याला प्रथम उमजेल. त्याची प्रथम भाषा व इंग्रजी वा इतर शिक्षणाची भाषा ह्यांत ह्या चिन्हपद्धतीने जी मूलभूत धारणा ( concepts ) व कार्याचे ठरीव अनुक्रम (procedures) व्यक्त केले आहेत ते शब्द-अनुक्रम, संरचना, Form इत्यादींद्वारा भाषेत व्यक्त होतात; मग ती भाषा मातृभाषा असो, वा इतर भाषा. परंतु ही केवळ पहिली पायरी झाली. भाषेची cognitive growth मात्र शक्यतर स्वभाषेतच व्हावी आणि

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ती होण्याकरता शास्त्रीय पद्धतीची स्पष्ट कल्पना शिक्षकाला हवी आणि भाषेबरोबरच ह्या विचारपद्धतीचे विद्यार्थ्याला शिक्षण देता येईल. भाषाशिक्षणात आता रूप, लिंग इ. बहिर्दर्शी व्याकरणावर भर न राहून तो आता अर्थनिवेदनात्मक कार्यावर असेल. म्हणजे विद्यार्थी प्रमाणभाषा वापरणार नाहीत का? वापरतील. कारण त्यांनी विशिष्ट भाषांगाच्या खोल संरचना योग्य नेमस्त अभ्यासाने आत्मसात केल्या असतील. हा अभ्यास विशिष्ट भाषा-नियमांचा नसून सर्वसाधारण strategy किंवा धोरणांचा असेल. भाषेचा व्यवहार सहज खऱ्याखुऱ्या जगात ex-tempore कसा होतो, त्याचा वर्गातल्या pattern practice वगैरे एकंदर यांत्रिक शिक्षणपद्धतीशी तितका महत्त्वाचा संबंध नाही. वर्गातले तुटपुंजे ज्ञान संपूर्ण संदर्भात तोकडे पडते हा आपला अनुभव आहेच. ज्ञानवृद्धी ही ठिगळे लावून केलेल्या गोधडीसारखी नाही. भाषांतर, व्याकरण, सरंचना पद्धती त्याला जोडली अर्थनिवेदनात्मक पद्धती. तेव्हा शिक्षकानं विद्यार्थ्याला आणखी काही नियम शिकवायचे नसून विद्यार्थ्याने आपल्या ज्ञानाजर्नाच्या संपूर्ण आखणीत ( scheme ) आपल्या हेतुप्रमाणे जो मथितार्थ हवा, तो प्रत्यक्ष व्यवहारांतून उमजून घ्यायचा आहे. भर active interpretation (सक्रिय अन्वयार्था) वर आहे.

हे जरा नीटनेटके, क्रमाक्रमाने, व्यवस्थित वाटत नाही. संरचनात्मक अभ्यासक्रम कसा रेखीव असतो. त्यात उजळणीही होते. पण नेटकेपणासाठी आपण कशाचा बळी देतो? जे शिकवले त्याचे अर्थनिवेदनात्मक मूल्य काय? उदाहरणार्थ इंग्रजीत tags मोठे घोळून शिकवले जातात. त्याचा व्यवहारात कितपत खरा उपयोग होणार? मग वाचायला शिकताना विशिष्ट specific unit वर भर दिल्याने मुले एकंदर अर्थाकडे लक्ष न देता प्रत्येक शब्दार्थाकडे बारीक लक्ष देतात. उलट, एखादा सराईत वाचक सबंध भाषांगावर एक नजर टाकून मग जर त्याच्या अपेक्षा पुऱ्या होतील असे वाटले, तर वाचायला सुरवात करतो, वाचता वाचता पुढच्या अपेक्षा, अंदाज (predictions) ठरवतो. वाचता वाचताच एक आकलनीय नकाशा – cognitive map – ठरवतो. जे कामाचे आहे ते लक्षात धरतो व बाकीचे सोडून देतो. त्या भाषांगाचे अर्थनिवेदनात्मक पद्धतीचे ज्ञान त्याला या कामात मार्गदर्शन करते. अर्थात अशा सराईत वाचकाला शाळेतील Comprehension Test दिल्यास तो नापासच होईल. फालतू बारकावे तो लक्षात ठेवत नाही. वर्ड्स्वर्थने किती daffodils पाहिले हे न वर्ड्स्वर्थला ठाऊक न सराईत वाचकाला. पण त्याची interpretative strategy म्हणजेच communicative competance ला पूरक आहे (आकृती तीनच्या आधाराने याचीच विस्तारपूर्वक चर्चा करता येईल).

शिक्षणशास्त्रातील प्रत्येक विषयाचा मुख्य हेतू विशिष्ट cognitive processes स्थापन करणे हा ठरला, तर भाषाशास्त्रज्ञ शिक्षकांना कितपत मार्गदर्शन करू शकेल? शास्त्रीय विषयाचे अध्ययन करताना विद्यार्थ्यांना जे भूलभूत उक्तिप्रचार आढळतात ते असेः– रिपोर्ट करणे, वर्णन करणे, वर्गीकरण करणे व सामान्य विधान करणे. त्यांना विवेचक भाषांगांचा (expository discourse) अभ्यास करावा लागेल आणि त्याचबरोबर विधानात्मक अर्थाचा ( propositional meaning ), जो अर्थ कुठल्याही भाषेचा गाभा असतो. मग तात्त्विक व वर्णनात्मक भाषाशास्त्रापुढे मुख्य काय काय आहे? त्यानी एक मॉडेल करून द्यायचे. ते स्पष्टीकरण कसे होते हे दाखवील आणि स्पष्टीकरणाच्या क्रियेचा ( interpretation ) गतिशील व ex-tempore स्वभाव ग्रहण करील व स्थावर ज्ञान व भाषानियमाचे ज्ञान अर्थनिवेदनात्मक क्रियेत (communicative activity) कसे परिवर्तित होते हेही दाखवील. सध्या हे मॉडेल कसे दिसेल हे सांगणे कठीण आहे. खरे सांगायचे तर ह्या दिशेने केलेले सफल प्रयत्न टर्नरसारख्या ethnomethodologists नी व काही वाङ्मयीन टीकाकारांनीच केलेले आढळतात. तर शिक्षकांनी आपणच हातपाय हलवले पाहिजेत व भाषांगातील भाषेच्या प्रयोगामागील cognitive process समजून घेऊन विद्यार्थ्यांच्यात निर्माण केले पाहिजेत. जर शास्त्र systems चा अभ्यास करते, तर शिक्षकाला system चे चार विशेष गुणधर्म माहीत हवेत. ते म्हणजे system ना structure व proper-



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ties असतात व त्या क्रमवार कार्य करतात व त्यांच्यांत रूपांतर होऊ शकते. शास्त्र व तांत्रिक विषय ह्यांच्या अभ्यासाचा मूळ विषय systemsच आहे. मग हा करताना विद्यार्थ्यांना कोणत्या संकल्पनात्मक प्रक्रिया ( conceptional procedures ) लागतील ? पृथक्करण, एकीकरण व संबंध जोडणे तसेच वर्णन करणे व विवेचन करणे ( आकृती दोन मध्ये Popper वर आधारित शास्त्राने तयार केलेली data bank व objective academic knowledgeचा साचा दाखवला आहे ) आता गरजापूर्तीचे धोरण वापरून याच धर्तीवर शिक्षकांनी अभ्यासक्रम आखावेत. सारांशाने,

व्यावहारिक शिक्षणाचा हेतू काय असावा ? :– विशिष्ट communication problems सोडविणे.

व्यावहारिक शिक्षणाचे साध्य:– शास्त्रीय शिक्षणाचे हेतू व भाषाशिक्षणाचे साधन यांचा मेळ बसवणे.

व्यावहारिक शिक्षणात भाषाशास्त्राची मदत – भाषेची थियरी– जी मनाचीही थियरी असेल. व्यावहारिक भाषाशिक्षणात अश्वत्थासारखी TGची उलटी झाडे नकोत. कारण अर्थ व Text झाडावर लटकत नाहीत. इथे Winograd व Schank ह्यांची मदत घेता येईल. तसेच discourse analysisचीही. अर्थ व Text ह्यांचे पृथक्करण करून लिहिताना व वाचताना काय encoding व decoding processes होतात ह्याचे एक मॉडेल तयार होऊ शकते ( आकृती ३ क आणि ख पहा ).

व्यावहारिक अभ्यासक्रमांची policy काय असावी :– ज्या विद्यार्थ्यांच्या गरजा– conceptual, rhetorical व semiotic– आकृती 'क' मध्ये दाखविल्या आहेत त्यांचा अंदाज घेऊन त्यांचा क्रम लावणे आणि अभ्यासक्रमाचे साध्य ठरवणे.

एक महत्त्वाची सूचना अशी, की व्यावहारिक शिक्षणाची फॅशन आली म्हणून सामान्य भाषाशिक्षण हा सर्वांचा पाया आहे, हे विसरू नये. तर मागणी असली तर कानडीभाषिक लोकांना किर्लोस्कर पंप वापरता येईल इतकी मराठी भाषा चटकन शिकवावी. पण बहुतेक भाषा शिकवताना विद्यार्थी इतके विशिष्ट साध्य समोर ठेवत नाहीत. तेव्हा सामान्य भाषाशिक्षण महत्त्वाचे आहे.

× × ×

( परिशिष्टे पुढील पानावर सुरू )



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

परिशिष्ट ( १ ) वाक्यप्रबंधांचे वर्गीकरण

( Typology of Discourse )

| Time past ⇄ Present | Time ⟶ Future |
|---|---|
| Narrative Discourse | Procedural discourse |
| event oriented<br>location oriented<br>Sequence temporal | Subjectmatter oriented<br>manner oriented<br>Sequence temporal |
| Expository discourse | Hortatory discourse |
| Subjectmatter oriented<br>manner oriented<br>sequence causal | event oriented<br>location oriented<br>sequence causal |

( based on T. Daswani, 1975 )

Note 1 : Time space and number are the basic co-ordinate of the semantics of any language.

Note 2 : The diagonal relationships are more relevant than horizonatal or vertial ones.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

(२) वस्तुनिष्ठ विद्वत्सुलभ ज्ञानाचा ढोबळ साचा
(A crude mobel of objective Academic knowledge)

| | |
|---|---|
| 0 **Systems**<br>Mechanical<br>Physical<br>Biological<br>Social | **Synthesis**<br>through established principles, basic principles, secondary notions and primary notions |
| 1 **Structures**<br>Holons*<br>Parts<br>Sub-parts<br>Inter faces | **Analysis**<br>Using primary notions and basic principles |
| 2 **Properties**<br>Functions<br>Measurables<br>Ascriptions<br>Characteristics | **Attribution**<br>of Secondary notions |
| 3 **Operations**<br>Processes<br>Phases<br>Participants<br>Circumstances | **Description**<br>Using primary and secondary notions and basic principles |
| 4 **Transformations**<br>'Final' state<br>Causal mechanism<br>Consequences<br>Predictions | **Explanation**<br>the establishment of new principles from basic principles |
| * Wholes that of higher levels function as parts | |
| **Evidence Seen As Addresses In A Discipline's Data Bank** | **Conceptual Procedures Undercying Evidence Systematised By a Discipline** |

(based on Jones and Roe, 1975)

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

३) मजकुराचे विद्वत्सुलभ अर्थप्रस्तावन व अर्थग्रहण करण्याच्या प्रक्रियेचा साचा.

(An Information Processing Model Of The Encoding And Decoding Of Academic Knowledge Of Texts)

(क) मजकुरातील चलघटक (Text Variables)

| | | | | |
|---|---|---|---|---|
| Textual Substance | Semiotic Product<br>अक्षरे, खुणा, आकडे इ. | | | |
| Semiotic Encoding | भाषा<br>Grammatical | आकृती<br>Iconic | गणित फार्म्युला<br>Mathamatical | Realisation of Rhetorical Strategy |
| Rhetorical Strategy | Information Management<br>कुठले तर्क व परिभाषा वापरली व काय पुरावा वापरला | Exposition<br>भाषा, आकृती, गणित ह्या तिन्हीचा उपयोग कसा केला आहे. प्रत्येक स्तरावर व ठिकाणी | | |
| Message Content | Evidence<br>विषयाच्या डेटाबॅंकेतून पद्धतीची निवड चर्चेसाठी त्याच्या संदर्भात पद्धतीच्या संरचना, कृतिक्रम, गुण-विशेष, रूपांतर व लेखकांची त्यावर टीका | Conceptual Procedures<br>पद्धतीचे विश्लेषण, एकीकरण, गुणधर्म, वर्णन, विवरण व मापन<br>Theory Bank<br>विषयाच्या प्राथमिक व दुय्यम दर्जाच्या धारणा, मूलभूत व मानलेली तत्त्वे | | |



निवेदीय हेतू
(शिकविणे / चर्चा करणे)

(आधारित)

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

### (ख) मानसिक चलघटक (Mind Variables)

| | | | |
|---|---|---|---|
| Short-Term Memory Reception | | | |
| Textual Singnals चे electro–chemical signals मध्ये रूपांतर. ह्यात विशेष गुणधर्मांचा विचार. ह्यात सर्वसाधारण गुण काढून टाकले जातात. | | | Perception attention |
| Linguistic Decoding | आकृती समजणे | गणित समजणे | |
| वारंवार चक्री निरीक्षणाने गुणावली (Feature arrays) च्या सूचना व कमीतकमी अपुऱ्या पुराव्यावरून text चा हेतू, जागा, मूल्य व वाढत्या माहितीची संरचना ठरवणे | | | Semiotic interpretation |
| Pattern Recognition | Pattern Synthesis Procedures | | |
| नवीन बदलत्या परिस्थितीत ओळखीच्या रचना ओळखणे, आठवण करणे, समन्वय साधणे, संयोग करणे, गाळून घेणे इ. क्रिया. | समस्या सोडवणे, असलेले ज्ञान वापरून तर्कशास्त्रीय व गणितातील उदाहरणे सोडवणे. | | |
| Contextual Knowledge Store | Formally Learned Cognitive Strategies | | |
| प्रत्येक 'System' चे 'multiple addresses', cognitive network on order & association axes. | Operations for performing on cognitive network | | Longterm memory |
| | General Cognitive Strategies | | |
| | समस्या सोडवणे अनुभवजन्य अनुमानाचे नियम | | |

Degree of Motivation
(Store knowledge / interpret for actions)



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# व्यावहारिक हिन्दी

क्रान्ति प्रकाश मिश्र

स्वतंत्रता संग्राम के दिनों में राष्ट्रपिता महात्मा गांधी ने हिन्दी के प्रति देशवासियों के मन मे एक देश-भक्तिपूर्ण उत्साह जगा दिया था। स्वतंत्रता प्राप्ति के बाद राज्यों की अपनी अपनी भाषाए सरकारी काम काज, शिक्षा तथा जनसम्पर्क माध्यम और वाणिज्य के क्षेत्रों में उभर कर आ रही है। वे अपने क्षेत्रों में उत्तरोत्तर विकास कर रही है। अब व्यावहारिक आवश्यकताओं को पूरा करने के लिए एक साधन के रूप में हिन्दी सीखने की बात सोची जाने लगी है। अब तो लोग हिन्दी इस लिए सीखना चाहते हैं कि वे केन्द्र सरकार के कार्यालयों में नौकरी कर सके। सार्वजनिक क्षेत्र के प्रतिष्ठानों से उनका सामाजिक व्यवहार सुचारू रूप से चल सकें। वे तकनीकी भाषणों में, राजनीतिक तथा सामाजिक सभाओं में अधिकाधिक श्रोता समूहों को संबोधित करने की क्षमता अर्जित कर सकें। ये प्रेरणाएँ सहज स्वाभाविक हैं और आवश्यकतानुरूप हैं।

हिन्दी के व्यावहारिक प्रयोग के अंतर्गत बोलने या बातचीत करने तथा लिखने की बात आती है लेकिन भाषा का प्राथमिक उद्देश्य 'बातचीत' है। हिन्दी भाषी क्षेत्रो में, बातचीत में प्रयुक्त व्यावहारिक हिन्दी की दो शैलियाँ हैं। १) बोलचाल की वह हिन्दी जिस में उर्दू की भरमार है, २) वह बोलचाल की हिन्दी जिस में उर्दू के शब्द न के बराबर हो तथा जिस में संस्कृत शब्दों का प्रयोग अधिक हो। इस प्रकार की दोनो शैलियाँ हिन्दी के लिखित रूप में भी स्पष्ट मिलती हैं। श्री प्रेमचंद व प्रसाद इन के ज्वलंत उदाहरण हैं।

हिन्दी के व्यावहारिक स्वरूप पर चर्चा करने के पहले एक स्वाभाविक प्रश्न उठता है कि किस हिन्दी के व्यावहारिक रूप की चर्चा की जाए? इस प्रकार का प्रश्न पढे लिखे लोग भी पूछते है और विदेशों के भाषावेत्ता भी। जो लोग इस प्रकार का प्रश्न पूछते हैं, उनके मन में दो या दो से अधिक भाषाएँ बोलने वालों की आम बोलचाल की हिन्दी को लेकर चलने वाले विवाद कहीं न कहीं विद्यमान होते हैं। भारत के बडे औद्योगिक नगरों में रहने वाले अपना काम चलाने के लिए या आपसी बातचीत के लिए जिस हिन्दी का प्रयोग करते रहते हैं उसमें विभिन्न प्रांतों से आए हुये शब्द होते हैं और अनिश्चित व्याकरण की चौखटे भी। भाषा शास्त्रों में इसे 'पिजिन' कहते है। बम्बइया हिन्दी इसका प्रत्यक्ष प्रमाण है। कुछ लोग इसे विकसित होती हुई 'क्रियोल' कहते हैं। इनका कहना है कि किसी दिन यही भाषा अखिल भारतीय हिन्दी का रूप ग्रहण कर लेगी। इनका मत है कि समाचार पत्रों, पत्रिकाओं तथा साहित्येतर लेखन में जो मानक हिन्दी प्रयुक्त हो रही है वह दुरूह और दुर्बोध होती है। इस प्रकार बोली जानेवाली तथा लिखित भाषा में अन्तर स्पष्ट है। आधुनिक भाषा-विज्ञान बोलचाल की भाषा को अधिक महत्त्व देता प्रतीत होता है तथा वह लिखित भाषा को नीची निगाह से देखता है। 'ब्लूमफील्ड' यह कहते है कि लेखन भाषा नहीं है, वह तो दृश्यमान चिन्हों के माध्यम से भाषा को अंकित कर लेने का उपाय मात्र है। यह सच है कि बोली जानेवाली किसी भी भाषा को लिखित रूप दिया जा सकता है। पर लिखित भाषा की सभी उपलब्धियाँ बोलचाल की भाषा नही बन सकती।

व्यावहारिक हिन्दी पर विस्तृत चर्चा के लिए हमें इसे दो भागों में बाँटना होगा १) बोलचाल की हिन्दी २) लिखित हिन्दी। बोलचाल की हिन्दी में १) कोई विद्वत्तापूर्ण प्रवचन हो सकता है, २) सामाजिक व्यवहार, ३) औपचारिक बैठक तथा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

४) अनौपचारिक मिलना जुलना हो सकता है। लिखित हिन्दी के क्षेत्र में जो स्थितियाँ हो सकती हैं वे हैं पत्रकारिता की हिन्दी, विज्ञान या वाणिज्य की, तथा प्रशासन की हिन्दी।

हिन्दी को उक्त स्थितियों को दो दृष्टियों से देखना उचित होगा। १) मूल हिन्दी भाषियों की दृष्टि से तथा २) हिन्दीतर भाषियों की दृष्टि से। मूल हिन्दी भाषियों को दृष्टि से देखने पर यह पता चलता है कि गाँवों, उपनगरों, नगरों तथा राजधानियों के निरंतर सम्पर्क के कारण किसी परिनिष्ठित भाषा और बोलियों के बीच जो आदान-प्रदान होता है उस का फल सिर्फ यही नहीं होता कि बहुत कुछ अनजाने ही कोड परिवर्तन (code switching) हो जाता है वल्कि वाक्य विन्यास नियम भी कभी कभी टूट जाते हैं। जिसके फलस्वरूप भाषा के मिश्रित रूपों का जन्म होता है। बोलचाल की हिन्दी भी इसका कोई अपवाद नहीं है; परन्तु औपचारिक शिक्षा तथा लिखित रूपों के प्रभाव से हिन्दी के प्रादेशिक भेद क्रमशः लुप्त हो रहे हैं और वे अपेक्षाकृत स्थिर, सर्वस्वीकृत प्रयुक्तियों (registers) में ढल रहे हैं। प्रदेशों की उपबोलियों में निस्संदेह उच्चारण, व्याकरण तथा शब्दों के भेद हैं और उनका पता तुरंत चल जाता है। इसके साथ ही एक एकान्वित हिन्दी भाषी समाज भी है जिस में शुरू शुरू में भाषायी संपर्क के द्वारा कुछ हद तक एक मिश्रित भाषा का रूप सामने आया था, जिसे हिन्दुस्तानी नाम दिया गया था। इसमें उर्दू शब्दों की अधिकता थी तथा लिखित भाषा के रूप में भी इसका उपयोग जिला स्तर के कार्यालयों/अदालतों में किया जाता है। इस समय भी अदालतों में वही शब्दावली आज भी बोलचाल तथा लिखित हिन्दी में प्रयुक्त हो रही है यद्यपि उसके लिए कुछ नए शब्द गढे भी गये हैं या प्रचलन पूर्व शब्दावली का ही हो रहा है।

स्वतंत्रता प्राप्ति के बाद विभिन्न भाषा-समाज के व्यक्तियों और वर्गों के परस्पर राजनीतिक, आर्थिक तथा सामाजिक व्यवहार से एक सम-प्रकृति शब्दावली का प्रयोग किया जाने लगा है। यह शब्द भंडार परंपरागत भाषास्रोतों से उद्भूत हुआ था। ज्ञान के विभिन्न क्षेत्रों में अब ऐसी प्रयुक्तियों का विकास हो गया है, जिस में संस्कृत शब्दों का बाहुल्य है। विशेषकर हिन्दी साहित्य में गद्य लिखने वालों के कारण ऐसा हुआ है। परन्तु पत्र-कारिता तथा विज्ञान के क्षेत्र में भी कभी कभी ऐसा प्रयत्न किया जाता है कि औपचारिक बातचीत तथा विद्वत्तापूर्ण वक्तव्यों में भी हिन्दुस्तानी (उर्दू, अरबी, फारसी) शब्द और ढाँचे मिलाकर भाषा को सरल बनाया जाए परन्तु इस सरलीकरण के पीछे कुछ पूर्वाग्रह भी हैं। जो हिन्दुस्तानी उर्दू, पंजाबी, सिंधी तथा कश्मीरी भाषा के लिए सरल प्रतीत होगा वही मलयालम, कन्नड, असमिया तथा बँगला भाषा के लिए कठिन होगा। मेरे विचार से भाषा को सरल बनाने के लिए उसे हिन्दुस्तानी शब्दों से बोझिल न बनाया जाए साथ ही संस्कृत के ऐसे शब्दों का भी प्रयोग न किया जाए जिससे भाषा कृत्रिम लगे और उसका प्रवाह एकतासा प्रतीत हो। अँग्रेज़ी के जो शब्द सहज रूप में आ गए हैं, उन्हें बदलने की कोई आवश्यकता नहीं। राशन कार्ड, पोस्ट कार्ड, बस, ड्राइवर, कन्डक्टर, पुलिस कन्ट्रोल, कमेटी, जज, कलक्टर, एस. पी. आदि शब्दों को बदलने की ज़रूरत नहीं। उक्त प्रकार के सरलीकरण की प्रवृत्ति वाणिज्य और प्रशासन दोनों क्षेत्रों में दिखाई दे रही है।

जिस प्रकार अँग्रेज़ीने बोली के स्तर से उठकर विश्व की सम्पर्क भाषा का स्थान प्राप्त किया तथा विभिन्न स्थानों पर अपनी अपनी मानक अँग्रेज़ी बनी। उसी प्रकार हिन्दी भी एक बोली के स्तर से उठकर भाषा के रूप में विकसित हुई और आज वह सम्पर्कभाषा के रूप में निरंतर विकास करती जा रही है। एक दिन ऐसा आ सकता है जब हिन्दी भाषियों की मानक हिन्दी के अतिरिक्त उसके मानक, मराठी हिन्दी, बँगला हिन्दी, तमिल हिन्दी आदि होंगे। यही नहीं मानक मारिशसी हिन्दी, मानक फिजीय हिन्दी आदि रूप भी अस्तित्व में आ जाएँगे। यह एक सम्भावना है जिस की ओर मैंने संकेत किया। निश्चित रूप से इस बारे में कुछ भी नही कहा जा सकता।

जब हम 'कौन सी हिन्दी' के प्रश्न पर हिन्दीतर भाषियों की दृष्टि से बात करते हैं तो उनकी कल्पना में वही मानक हिन्दी होगी जिस का उल्लेख

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ऊपर किया जा चुका है। जिसका शब्द भंडार बढ़ता चला जा रहा है और क्षेत्र भी। प्रशासन में प्रयुक्त होनेवाली हिन्दी के पारिभाषिक व तकनीकी शब्द तथा प्रयुक्तियाँ अनुवादों के माध्यम से बने हैं अथवा मानक हिन्दी या संस्कृत के व्याकरणिक स्रोतो सें उनका नव निर्माण हुआ है। जन सामान्य का लक्ष्य तो यह होता है कि वह औपचारिक अथवा अनौपचारिक दोनों स्तरोंपर तकनीकी, व्यावसायिक और सामाजिक क्षेत्र में, एक विस्तृत भू-भाग में अपनी बात कह सकें और दूसरे की समझ सके और अपने नौकरी या पेशे में काम चलाऊ योग्यता प्राप्त कर सकें।

अखिल भारतीय सम्पर्क भाषा के रूप में हिन्दी बोलचाल और कामकाज के साधारण प्रयोजनों के लिए दुसरी भाषा के रूप मे प्रयुक्त हो रही है। हिन्दीतर भाषी इसे केंद्र सरकार में काम करने के लिए, वाणिज्य और उद्योग में कारगर ढंग से अपना कामकाज चलाने के लिए तथा साहित्यिक, सांस्कृतिक एवम् तकनीकी मामलों में अन्तर-राज्यीय वार्ता के लिए सीखते व पढ़ते हैं। उच्च वर्ग के पढे लिखे लोग तथा तक्नीशियन सम्प्रेषण के लिए अँग्रेज़ी का प्रयोग करते हैं। हिन्दी अपने संक्रान्ति काल से गुजर रही है। उसका शब्द भंडार और अनन्तिम प्रयुक्तियाँ मानो ऐसे बिंदु हैं जहाँ से चलकर प्रयोग की प्रक्रिया द्वारा समन्वय की स्थापना होगी और स्थिरता आएगी। संक्रान्ति की विशेषता है न्यूनाधिक द्विभाषिकता।

आज सरकारी काम काज में जो हिन्दी प्रयुक्त होती है, उसमें नित्य नये तकनीकी व पारिभाषिक शब्द जुडते चले जा रहे हैं। इस पर हम बाद में चर्चा करेंगे। वास्तव में जीवन के विभिन्न क्षेत्रों व संदर्भों में व्यावहारिक हिंदी में अपनी एक विशिष्ट शब्दावली होती है। हम किसी विशेष संदर्भ या अवसर पर उसका प्रयोग करते है। उदा. अदालत कचहरी में जाने पर मुकदमा दायर करने की तैयारी से लेकर अंत में फैसला हुक्म सुनने तक प्रक्रिया में हमें जिस शब्दावली का प्रयोग करना पडता है उस में से कुछ इस प्रकार हैं:- दीवानी / फौजदारी अदालत, सम्मन तामील होना, दफा, मुकदमा, पेशी, पेशकार, मुसिफ, जज, इजलास, बहस, मुहर्रिर, वकील, वकालतनामा, हलफनामा, बैनामा, रेहननामा, बयान, हलफिया/ तहरीरी, वरासत, वसीयत, सकूनत, जिरह, जामिन, थाना, हवालात, कार्रवाई, मुचलका, सुलहनामा, पैरवी, मुखबिर, मुल्जिम, गवाह इत्यादि। यद्यपि उत्तर प्रदेश सरकार की राजभाषा हिन्दी है तथापि वहाँ की अदालतों में जिस भाषा का प्रयोग किया जाता है उस में पहले से प्रयुक्त उर्दू/अरबी/फारसी के तकनीकी व पारिभाषिक शब्दों का ही प्रयोग आज भी किया जाता है।

एक किसान के नाते उसे इन शब्दों से परिचित होना आवश्यक है:- काश्त, खुदकाश्त, पट्टा, स्याहा, खसरा, खतौनी, शिकमी, मौरूसी, इंदराज, दारिबल, धारिज, फसल, रबी, खरीफ, लगान, लेखापाल, कानूनगी, मौजा परगना, परगनाधीश, तहसीलदार, रकवा, पैमाइश, जरीव, मट्ठा, बोधा, विस्वा, विस्वासी आदि। इसी प्रकार को ले हमे पता चलेगा कि भाषा का, शब्दोंका रूप चला जाता है। पूजाके संदर्भ में पानी 'जल' हो जाता है, चावल 'अक्षत' हो जाते है, पानी से भरा हुआ लोटा 'कलश' कहलाता है तथा हवन/यज्ञ में प्रयुक्त लकड़ियाँ 'समिधा' कही जाती हैं। दैनिक व्यवहार में प्रयुक्त अभिवादन के शब्द व आशीर्वाद के रूप जाति, मर्यादा तथा आयु के संदर्भ में बदलते हैं। मियाँ जी से आदाबअर्ज / सलाम कहना ही उचित होगा। पंडित जी से यदि यही अभिवादन किया जाए तो सम्भवत: उनका कोपभाजन बनना पडेगा। उन्हे प्रणाम या 'पालागन' या पैरछूना कहने पर आशीर्वाद अलग अलग मिलेंगे। ब्राह्मण के लिए चिरंजीव/आयुष्मान, क्षत्रिय के लिए 'जयहो', वैश्य के लिए 'बढ़ती हो' तथा अन्यों के लिए प्रसन्न रहो या खुश रहो आदि। ब्राह्मणों को छोड़कर अन्य वर्णों में 'रामराम' या 'जैराम' अशिक्षित और अर्ध शिक्षित लोगों में प्रचलित है। सभी शिक्षित लोगों मे नमस्ते या नमस्कार का ही प्रचलन है। अब हम सरकारी काम काज में प्रयुक्त हो रही हिन्दी पर चर्चा करेंगे। कार्यालयों में हिन्दी लिखते समय मस्तिष्क में पहले मौजूद अँग्रेजी शब्दावली व वाक्यांश रहते हैं। अतः अँग्रेजी के स्थान पर जब हिन्दी लिखते या बोलते

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हैं तो अँग्रेज़ी प्रयुक्तियों के अनुरूप हिन्दी प्रयुक्तियों का परिवर्तन, संशोधन और अंगीकरण के द्वारा निर्धारण किया जाता है। जैसे सुपरवाइज़र – पर्यवेक्षक, इन्सपेक्टर – निरीक्षक, ओवरसियर – ओवरसियर आदि। इसमें विशिष्ट शाब्दिक अन्विति के प्रयोग भी देखने को मिलते हैं। लिखित सामान्य हिन्दी में अक्सर एक ही वाक्य में संस्कृत और ऊर्दू अथवा संस्कृत और अँग्रेज़ी शब्दों का साथ साथ प्रयोग किया जाना अटपटा लगता है, और इस प्रकार के प्रयोग प्रायः कहीं ढूंढने पर भी नहीं मिलते जब कि मराठी में यह परंपरा स्पष्ट दिखाई देती है। जैसे – अहवाल वाचन/पाठन, मोफत वाचनालय, निम गोरा आदि। सरकारी काम काज की हिन्दी में अब इस प्रकार के प्रयोग आने लगें हैं, जो अटपटे भी नहीं लगते जैसे :–

१. **मसौदा अनुमोदन** के लिए **पेश** है।
२. **एवजी** मिलने पर छुट्टी दी जा सकती है।
३. इन **दस्तावेज़ों** की **प्रमाणी कृत प्रतियाँ** मंत्री महोदय की जानकारी के लिए प्रस्तुत की जाएँ।

सरकारी काम काज में प्रयुक्त भाषा की अपनी एक शैली होती है। वह बोलचाल की सामान्य भाषा से कुछ भिन्न होती है। यहाँपर कर्तृवाच्य के स्थानपर कर्मवाच्य का ही अधिक प्रयोग होता है जैसेः– निर्णयार्थ रखा जाए, छुट्टी मंजूर की जाए, मुझे यह कहने का निदेश हुआ है, मुझे निवेदन करने के लिये कहा गया है, पता चला है, समझा जाता है, मसौदा अनुमोदन के लिए/अवलोक के लिए प्रस्तुत है। देख लिया, धन्यवाद, बात करें, चर्चा करें, मैं ऊपर 'क' से सहमत हूँ। कुछ सामान्य शब्द जब सरकारी काम में प्रयुक्त होते हैं तो वे अपना रूप बदल देते हैं जैसे सामान्य रूप से 'फ्रेश' के लिए ताज़ा/ताजे/ताजी लिखेंगे लेकिन कार्यालय में एफ. आर. ( फ्रेश रिसीट ) के लिए 'नई आवती' कहते हैं। 'फ्रेश' शब्द के लिए कार्यालय में 'नई' ही प्रयुक्त होगा। इसी प्रकार कार्यालय के बाहर 'तार' (टेलीग्राम) दो प्रकार के होंगे– १. सामान्य २. एक्सप्रेस। लेकिन कार्यालय के अंदर इनके प्रकार होंगे– १. शब्द बद्ध तार, २. बीजांक और कूट भाषा तार। इस प्रकार के अनेक उदाहरण दिए जा सकते है जब स्थिति या संदर्भ बदलने पर शब्द का अपना रूप/अर्थ बदल जाता है। भाषा तो विषय के अनुरूप सरल या दुरूह होती है। भाषा का मौलिक रूप नही बदलता। विज्ञान, अभियांत्रिकी तथा मानविकी क्षेत्र को ले, लिखित भाषा में विषय के अनुरूप नई प्रयुक्तियाँ जुडती जाएँगी। नई तकनीकी व पारिमाणिक शब्दावली जुड़ती जाएगी पर भाषा का मूल रूप नहीं बदलेगा। विषय की पहचान प्रयुक्तियों तथा पारिमाणिक शब्दावली से होगी जिसका परिचय विषय के अध्ययन के दौरान होता जाएगा। उनसे पहले से परिचित होना आवश्यक नहीं है। हाँ, यदि हम उनसे परिचित होने के बाद विषय का अध्ययन करें तो विषय को समझने में आसानी ज़रूर होगी न कि भाषा समझने में। विभिन्न विषयों से सम्बन्धित शब्दावली (पारिमाणिक-तकनीकी) पर शोध कार्य हो सकता है। उनके शब्दकोश/विश्वकोश बन सकते हैं पर उनकी व्यावहारिक उपयोगितापर प्रश्नचिन्ह अवश्य लग जाता है। मेरे विचार में विषय अथवा संदर्भ बदलने में भाषा में जो बदलाव दृष्टिगोचर होता है वह भाषा का बदलाव न होकर प्रयुक्तियों तथा पारिमाणिक शब्दों का बदलाव ही होता है। इस प्रकार के विषयों तथा संदर्भों की कोई सीमा नहीं हो सकती क्योंकि मानव ज्ञान की विकास प्रक्रिया निरंतर चलती रहेगी। हाँ, कानून विधि जैसे विषय की भाषा अवश्य अलग प्रकार की भाषा लगती है। इसका कारण यही है कि कानून आयातित है। अतः उनके अनुवाद की भाषा भी दो अर्थी व अटपटी है। यदि कानून मौलिक हो, अपने देश में बने, किसी विदेशी कानून का अनुवाद मात्र न हो तो उनकी भाषा भी सामान्य भाषा होगी। उसमे अपनी पारिमाणिक/तकनीकी शब्दावली तथा प्रयुक्तियाँ तो होंगी ही।

अन्त में मैं कहना चाहूँगा कि विभिन्न संदर्भों और विषयों में प्रयुक्त भाषा की संरचना वही रहती है। उसका मौलिक ढाँचा नही बदलता अगर कुछ बदलता है तो वे हैं पारिभाषिक तकनीकी शब्द और प्रयुक्तियाँ।



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भारतात बहुतेक शिक्षणतज्ज्ञ मातृभाषा हे उच्च माध्यमिक शिक्षणाचेही माध्यम असावे या मताचे आहेत. विद्यार्थी परकीय भाषेपेक्षा मातृभाषा अधिक सहजतेने आणि सफाईने वापरू शकतो. म्हणून विषय समजून घेणं आणि स्वतःचे विचार स्वतंत्रपणे मांडणं या गोष्टी तो मातृभाषेतून अधिक चांगल्या रीतीने करू शकतो असं गृहीत धरण्यात येतं. अर्थात हे प्रभुत्व येण्यासाठी त्याचं मातृभाषेचं ज्ञान, अधिक डोळसपणानं वाढवलं जाणं आवश्यक आहे. जर ज्ञान मिळवण्याचं भाषा हे एक प्रमुख साधन असेल, तर प्रत्येक विषयाच्या गरजेनुसार बदलणारं भाषेचं रूप त्याला अवगत असणं आवश्यक आहे. यासाठी विद्यार्थ्यांची स्वतःचे विचार व्यक्त करण्याची कुवत वाढवणं, त्याची आकलन-शक्ती वाढवणं आणि भाषा लवचिकपणे वापरण्याचं

# मातृभाषेसाठी दुवा : पाठ्यक्रम

**राज्यश्री सुब्बय्या**

कौशल्य वाढवणं याकडे लक्ष देणं आवश्यक आहे.

पण आपण सध्याच्या शालेय शिक्षणाचं परीक्षण केलं, तर भाषाशिक्षणाची साहित्याच्या शिक्षणाशी गल्लत केलेली आढळते. मातृभाषेचे ज्ञानसुद्धा शिकवून वाढवावं लागतं. याची गरज शिक्षकांना वाटत नाही. विद्यार्थी ती मातृभाषाच असल्यामुळे कोणत्याही शिक्षणाशिवाय किंवा प्रयत्नाशिवाय ती भाषा उत्तम तऱ्हेने वापरू शकतो असं गृहीत धरण्यात येतं. शालेय शिक्षणात सर्व प्रयत्न केवळ विषयात प्रावीण्य मिळवण्यावर केंद्रित केले जातात, भाषेवर प्रभुत्व मिळविण्यासाठी काहीही केले जात नाही असे म्हटले, तर अतिशयोक्ती होणार नाही. एखाद्या हुशार इंजिनियरनं आपल्या यंत्राविषयी किंवा प्लॅन-विषयी माहिती देताना कितीही मोडकी-तोडकी भाषा वापरली, तरी कोणी फारसा आक्षेप घेत नाही. पण हे अगदी चूक आहे. शाळेपासूनच विषयाच्या अध्यापनाबरोबर भाषा लवचिकपणे वापरण्याचं सामर्थ्य वाढवणं अत्यंत आवश्यक आहे. साहित्य शिकवणं आणि भाषा शिकवणं या दोन अगदी भिन्न गोष्टी आहेत हे स्पष्ट झाल्याशिवाय हे शक्य होणार नाही. साहित्य हे जरी भाषेचं महत्त्वाचं अंग असलं, तरी भाषेचा वापर फक्त साहित्यापुरताच मर्यादित नाही हे एकदा स्पष्ट झालं म्हणजे विविध विषयांचं ज्ञान, व्याख्याने व पुस्तके यांचे आकलन करण्याचे सामर्थ्य वाढवणे, स्वतःचे विचार व्यक्त करण्याचं सामर्थ्य वाढवणे म्हणजेच भाषेवरील प्रभुत्व वाढवणे आहे हे स्पष्ट होईल.

भाषेच्या प्राथमिक कौशल्यांचा विषयाच्या आकलनाशी आणि स्वतःचे विचार व्यक्त करण्याशी फार संबंध आहे. शिक्षणातील अपयश हे नेहमी भाषेतील अपयश असते या वेन्क्सिनच्या मताची आपल्याला यामुळे सत्यता पटते. अध्ययनाच्या प्रक्रियेत आणि जे ज्ञान विद्यार्थ्याने मिळवले आहे, त्याच्या मूल्यमापनाच्या प्रक्रियेत भाषेचे शिक्षणाचे माध्यम म्हणून महत्त्व आहे. ( शिक्षणात काही मिळवता येणे हे भाषेशिवाय शक्य आहे असा विचारसुद्धा संभवत नाही. ) त्यामुळे भाषेवरील प्रभुत्व वाढवणे हे शिक्षणाचं पायाभूत आणि अंतिम उद्दिष्ट असले पाहिजे.

शालेय शिक्षणात विद्यार्थ्यांची आकलनशक्ती वाढवण्याकडे पुरेसं लक्ष दिलं जात नाही. तसंच वेगवेगळ्या शास्त्रीय विषयांच्या बदलत्या गरजांनुसार अभिव्यक्तिसामर्थ्य वाढवण्याचा विचारच केला जात नाही. साहित्याचं अध्यापन म्हणजे भाषेचं अध्यापन आहे या कल्पनेमुळे भाषेची पाठ्यपुस्तकं केवळ नव्या-जुन्या वाङ्मयातल्या उताऱ्यांनी भरलेली आपल्याला दिसतात. एखाद्या विषयातल्या बारीक-सारीक संकल्पना स्पष्टपणे व्यक्त करू शकणाऱ्या गद्याचा समावेश अशा पाठ्यपुस्तकांमधून क्वचितच आढळतो. यामुळे शालेय शिक्षण संपल्यावर विद्यार्थ्यांजवळ असलेलं मातृभाषेचं ज्ञान आणि महाविद्यालयीन शिक्षण घेण्यासाठी जरूर ती भाषेची तयारी (मातृभाषेतून) यांच्यामध्ये मोठी तफावत पडते. ही दरी खरोखरच आढळते काय याची पाहणी करण्यासाठी भारतीय भाषासंस्थान म्हैसूर या संस्थेने पाहणी केली. या पाहणीनुसार ही तफावत आढळली आणि या स्थितीवर काही उपाययोजना तातडीनं करणं



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आवश्यक आहे असंही लक्षात आलं म्हणून या संस्थेनं हा दुवा साधणारा शंभर तासांचा एक पाठ्यक्रम (ब्रिज कोर्स) प्रथम कानडीसाठी बनविला. त्यानुक्षार सामग्री तयार करण्यात आली. हा पाठ्यक्रम आणि ही सामग्री भाषाशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञ आणि तज्ज्ञ भाषाशिक्षक यांच्या सल्ल्यानुसार महाविद्यालयपूर्व अभ्यासासाठी तयार करण्यात आली. नंतर अशाच तऱ्हेने पाठ्यक्रमसामग्री मल्याळी, तेलगू, आणि हिंदी भाषांसाठीही तयार करण्यात आली.

## उद्दिष्टे

हा अभ्यासक्रम पुरा केल्यानंतर विद्यार्थ्यांना महाविद्यालयातील व्याख्याने कशी ऐकावीत, कशी समजून घ्यावीत, त्यांतील मुद्दे कसे टिपून घ्यावेत, समजलेला भाग स्वतःच्या शब्दांत कसा मांडावा, संदर्भाची पुस्तके वाचून त्यांचा सारांश कसा लिहावा, इंग्रजीतील संदर्भग्रंथ वाचून मातृभाषेत त्याचा गोषवारा कसा लिहावा, नमुन्यादाखल दिलेल्या निबंधावरून स्वतंत्र निबंध कसे लिहावेत इ. गोष्टी चांगल्या रीतीने करता याव्यात अशी अपेक्षा आहे.

खालील गोष्टींमध्ये नैपुण्य अपेक्षित आहे.

१) ऐकलेल्या मजकुराचे आकलन :
मातृभाषेतील व्याख्यान ऐकून विषय बारकाईने समजून घेणे व विचारलेल्या प्रश्नांची तोंडी किंवा लेखी उत्तरे देणे.

२) ऐकत असताना मुद्दे टिपून घेणे :
मातृभाषेतील व्याख्यान ऐकत असताना एकाच वेळी ते समजून घेऊन त्यातील मुद्दे टिपून घेणे – त्यांच्या आधाराने शिकवलेल्या भागाचा सारांश लिहिता येणे आणि प्रश्नांची उत्तरे देता येणे.

३) वाचनातून आकलन :
ठराविक वेळात एखादा उतारा वाचणे, वाचताना त्यातील मुद्दे टिपून घेणे, या मुद्द्यांच्या साहाय्याने प्रश्नांची उत्तरे देणे आणि विचारलेल्या प्रश्नांची नेमकी उत्तरे उताऱ्यातून शोधून काढणे.

४) नमुन्याप्रमाणे स्वतंत्र लेखन :
दिलेल्या मुद्द्यांच्या आधाराने ठराविक वेळात एखादा उतारा लिहून काढणे अथवा दिलेल्या विषयावर नमुन्याप्रमाणे ठराविक वेळात एखादा उतारा लिहिणे. तसेच दिलेल्या उताऱ्यातील गाळलेल्या जागी म्हणी, वाक्प्रचार किंवा शब्द यांचा अचूक वापर करणे किंवा त्यांच्या जागी समानार्थी म्हणी, वाक्प्रचार आणि शब्दांचा उपयोग करणे.

५) भाषांतरित सारांशलेखन :
दिलेल्या इंग्रजी उताऱ्याचे वाचन व आकलन करून ठराविक वेळात त्याचे मातृभाषेत भाषांतर करणे आणि त्याचा एकतृतीयांश लांबीचा गोषवारा लिहिणे.

## विद्यार्थ्यासाठी सामग्री

ह्या उद्दिष्टांच्या पूर्तीसाठी विद्यार्थ्यासाठी जी सामग्री तयार करण्यात आली तिचा परिचय आता करून घ्यायचा आहे. तिच्या मदतीने विद्यार्थ्यानं ही पाच नैपुण्यं अंगी आणायची आहेत.

विद्यार्थ्यासाठी तयार केलेल्या पुस्तकात विविध विषयांमधील शंभर उतारे निवडले आहेत. तामिळ पुस्तकामध्ये वरील ५ नैपुण्ये व विषय यांच्या अनुसार उताऱ्यांची विभागणी केली आहे ती खालील तक्त्यात दिली आहे.

हे उतारे महाविद्यालयीन पाठ्यपुस्तके, संदर्भग्रंथ, साप्ताहिके आणि मासिके यांतून निवडलेले होते. काही उतारे मुद्दाम या अभ्यासक्रमासाठी महाविद्यालयीन पाठ्यपुस्तके लिहिणाऱ्या अनुभवी अध्यापकांकडून लिहून घेण्यात आले. जरी वरील सर्व विषयांचा यात समावेश असला, तरी विद्यार्थ्याला सर्वसामान्यपणे ते समजावेत आणि तो विषय त्याला पूर्वी माहीत नसेल तरी त्याला तो समजेल अशी काळजी घेण्यात आली होती. त्याची मांडणी भाषा, आशय आणि लांबी यानुसार चढत्या क्रमाने करण्यात आली. वरील नैपुण्याचा विचार करून उताऱ्याची गटवार विभागणी करण्यात आली.

## मूल्यमापन

सतत मूल्यमापन हा या अभ्यासक्रमाचा अंगभूत घटक आहे. वस्तुतः सूचना कुठे संपल्या आणि मूल्यमापन कुठे सुरू झाले हे ठरवणे फार कठीण आहे, प्रत्येक नैपुण्याचा आवाका आणि त्याच्या मर्यादा लक्षात घेऊन विविध प्रश्न तयार केले गेले.

थोडक्यात उत्तरे द्या, वर्णनात्मक प्रश्न, व्याकरणावरील प्रश्न असे प्रश्नांचे स्वरूप आहे. हे उतारे व ही प्रश्नावली यांच्या साहाय्याने विद्या-


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

र्थ्यांच्या गटाला पाहणीसाठी निवडलं. महाविद्यालयात प्रवेश घेण्यापूर्वी विद्यार्थ्याजवळ या नैपुण्यांबाबत असलेली क्षमता एका पूर्वपरीक्षेतून पडताळून पाहण्यात आली. या पूर्वपरीक्षेचा साचाच अंतिम परीक्षेसाठी वापरण्यात आला. पूर्वपरीक्षेच्या उतार्‍यांची निवड करताना प्रत्येक नैपुण्यासाठी येणार्‍या सामान्य अडचणी डोळ्यांपुढे ठेवूनच निवड करण्यात आली. तसेच निरनिराळे विषय घेणार्‍या विद्यार्थ्यांची आवड आणि गरज यांचाही विचार केला होता.

अंतिम परीक्षेच्या निकालामुळे शैक्षणिक मानसशास्त्रज्ञ आणि भाषाशास्त्रज्ञ यांच्यापुढे विचार करायला लावणारे आव्हान उभे राहिले. खालील मुद्दे यातून निष्पन्न झाले.

१) शाळा सोडताना विद्यार्थ्याजवळ असलेले भाषिक ज्ञान आणि महाविद्यालयात प्रवेश करताना आवश्यक असणारे भाषिक ज्ञान यांमध्ये फार मोठी दरी आहे.
२) भाषिक नैपुण्यांचा निकष लावून या दरीतील चढउतारांचा आलेख दाखवता येतो.
३) या नैपुण्यांचा महत्त्वानुसार क्रम लावता येतो.
४) योग्य त्या गोष्टीवर थोडाफार भर देऊन अध्यापनात जर शास्त्रीय दृष्टी ठेवली, तर फारसा खर्च न करताही अधिक परिणामकारकतेने आपल्याला भाषाशिक्षणाची ही प्रगती साधता येईल.

## हा अभ्यासक्रम कसा हाताळावा ?

या अभ्यासक्रमासाठी विद्यार्थ्यांची निवड करताना विविध थरांतले व विविध भागांतले विद्यार्थी घेतले जातील याची काळजी घेतली होती त्याची पूर्वपरीक्षा त्यांचे मातृभाषेतील ज्ञान वर सांगितलेल्या नैपुण्यांनुसार किती आहे हे अजमावण्यासाठी घेतली होती.

महाविद्यालयीन अध्यापकांना ही पूर्वपरीक्षा घेण्यापूर्वी प्रशिक्षण देण्यात आले होते. पूर्वपरीक्षा झाल्यानंतर ज्यांनी स्वेच्छेने हा अभ्यासक्रम शिकवण्याची तयारी दाखविली, त्यांनाही प्रशिक्षण देण्यात आले. या प्रशिक्षणात प्रत्येक नैपुण्यात समाविष्ट असलेल्या काही पाठांचे प्रात्यक्षिक व त्यावर चर्चा करण्यात आली.

हा अभ्यासक्रम अगदी मर्यादित काळात घेता येतो. प्रत्येक दिवशी चार तास याप्रमाणे चोवीस दिवसांत हा अभ्यासक्रम शिकवता येतो. विद्यार्थ्यांच्या उत्तरपत्रिका तपासून, त्यांतल्या चुका दाखवून, त्यासाठी सूचना देऊन ताबडतोब विद्यार्थ्यांना देण्यात येतात. शिक्षकाकडून दररोज त्यांच्या निरीक्षणावर आणि येणार्‍या अडचणींवर आधारित अशी माहिती मागवण्यात येते, या माहितीच्या आधारे या अभ्यासक्रमात आवश्यक ते बदल करता येतात. अंतिम परीक्षा अभ्यासक्रमाच्या शेवटी घेण्यात येऊन विद्यार्थ्याने विशेष कोणते ज्ञान मिळवले याची इतर विद्यार्थ्यांशी तुलना करण्यात येते. ज्यांनी हा अभ्यासक्रम शिकवला अशा शिक्षकांचे एक चर्चासत्र शेवटी घेण्यात येते. त्यांच्या अनुभवांचा आणि सूचनांचा विचार करून या अभ्यासक्रमात काही बदल करण्यात आले.

वरील चर्चेवरून हे उघड आहे, की हा अभ्यासक्रम ठरवताना वेगवेगळ्या महाविद्यालयांमध्ये अथवा लहान लहान गट करून त्यांना शिकवण्याचे उद्दिष्ट डोळ्यांसमोर होते. अध्यापनावर भर देऊन हा अभ्यासक्रम तयार करण्यात आला होता, अनेक शिक्षणखात्यांनी यात लक्ष न घातल्याने काही पर्याय शोधण्याची आवश्यकता निर्माण झाली.

याला एक पर्याय असाही असू शकतो, की हा संपूर्ण पाठ्यक्रम इतर कुणाच्या मदतीशिवाय विद्यार्थ्याला पुरा करता येईल अशा काही सूचना पुस्तकरूपाने देता याव्या. प्रत्येक नैपुण्यासाठी स्वतंत्रपणे लहान सहान पुस्तकांद्वारे हा अभ्यासक्रम प्रसिद्ध करावा.

या अभ्यासक्रमाच्या प्रयोगातून असंही निष्पन्न झालं, की विद्यार्थी आणि विद्यार्थिनी, निरनिराळ्या आर्थिक, सामाजिक थरांतून येणारे विद्यार्थी, आई–वडिलांच्या शिक्षणाची पार्श्वभूमी असलेले आणि नसलेले विद्यार्थी यांच्या भाषिक ज्ञानामध्ये नैपुण्यानुसार ठळकपणे नजरेत येणारा फरक आढळतो. यामुळे प्रत्येक नैपुण्यासाठी स्वतंत्र पुस्तके तयार केल्यास ती विद्यार्थ्यांना उपयुक्त ठरतील, स्वतःला कोणत्या पुस्तकाची आवश्यकता आहे ते ठरवून ते त्या त्या पुस्तकाची निवड करतील. आकाशवाणी आणि दूरदर्शन यांच्याद्वारे या अभ्यासक्रमात योग्य ते बदल करून हा अभ्यासक्रम परिणामकारक रीतीने प्रसारित करता येईल.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# व्यावहारिक मराठीचा शालेय पाया : इयत्ता १ ते ७

रा. सो. सराफ

'व्यावहारिक मराठी : गरज, मागणी व पूर्ती' या विषयावर भारतीय भाषा संस्थान, म्हैसूरच्या पश्चिम विभागीय भाषाकेंद्रातर्फे आयोजित केलेल्या या चर्चासत्रात 'व्यावहारिक मराठीचा शालेय पाया : इयत्ता १ ते ८' हा माझा शोधनिबंध विचारार्थ आपल्यापुढे ठेवत आहे.

या विषयाची साकल्याने मांडणी करण्यापूर्वी काही गोष्टी प्रथम स्पष्ट केल्या पाहिजेत असे वाटते. हा विषय जरी इयत्ता १ ते ८ यांसाठी असला, तरी महाराष्ट्रातील शैक्षणिक आकृतिबंधाचा विचार करता इयत्ता १ ते ७ चाच विचार करणे उचित ठरेल. या दृष्टीने माझ्या या विषयाची व्याप्ती मी इयत्ता १ ते ७ च्या प्राथमिक शिक्षणापुरती मर्यादित करीत आहे.

एक गैरसमज होण्याची शक्यता वाटते आणि म्हणूनच त्यासंबंधी काही संदिग्ध असू नये या विचाराने हे मी स्पष्ट करू इच्छितो, की व्यावहारिक मराठी म्हणजे अमराठी माध्यमांतील शाळांमधून शिकवली जाणारी 'प्रादेशिक भाषा' येथे अभिप्रेत नाही. परभाषी विद्यार्थ्यांना जेव्हा एखाद्या प्रदेशाची भाषा म्हणून शिकवली जाते, तेव्हा ती व्यवहारापुरती बोलता, लिहिता, वाचता यावी या दृष्टीने शिकवली जाते. अशा वेळी तिला 'प्रादेशिक भाषा' असे संबोधतात आणि या आपल्या राज्यामध्ये मराठीदेखील प्रादेशिक भाषा म्हणून शिकवली जाते, आणि नकळत काही लोक या भाषाशिक्षणाला 'व्यावहारिक मराठी' असे संबोधतानाही आढळतात. तो अर्थ येथे अभिप्रेत नाही. मग नेमके अभिप्रेत काय आहे? माझ्या दृष्टीने व्यावहारिक मराठी म्हणजे विविध व्यवसायांत, सार्वजनिक क्षेत्रात, सांस्कृतिक कार्यक्रमांत आणि प्रसंगोपात्त सर्व ठिकाणी मराठीचा सर्वार्थाने प्रभावी वापर करता आला पाहिजे. मराठीतून देवाण–घेवाण झाली पाहिजे आणि हा जर व्यावहारिक मराठीच्या अध्ययन–अध्यापनाचा अर्थ असेल, तर ज्या क्षमता आणि जी कौशल्ये विद्यार्थ्यांनी आत्मसात करावीत असे वाटते त्यांचा विचार प्रचलित अभ्यासक्रमात साक्षेपाने केला आहे आणि नव्या येऊ घातलेल्या अभ्यासक्रमातही त्याचेच प्रतिबिंब पडलेले जाणवते. याचे विवेचन पुढे ओघाने येईलच.

'व्यावहारिक मराठी : गरज, मागणी व पूर्ती' हे या चर्चासत्राचे नावच काही विशिष्ट समज मनात निर्माण करणारे असल्यामुळे त्यासंबंधीसुद्धा आपली भूमिका प्रथमच स्पष्ट करणे योग्य ठरेल. या नावातील 'गरज, मागणी, पूर्ती' या शब्दत्रयीमुळे कोणता अर्थ ध्वनित होतो? कोणती गोष्ट सूचित होते? हेच सूचित होते की, आज व्यावहारिक मराठीची गरज आहे आणि गरज आहे म्हणजे नेमके काय आहे? तर ही व्यावहारिक मराठीच शिकवण्याची गरज आहे. 'मागणी' या शब्दावर काही मल्लिनाथी केली पाहिजे असे वाटत नाही, अर्थ उघड आहे. अशा शिक्षणाची गरज आहे अशी काहींची मागणी आहे, आणि त्यानंतर येणारा 'पूर्ती' हा शब्द पुरेसा बोलका आहेच. पण या सत्राच्या नावाचा नीट विचार केला, त्यातील सूचितार्थ लक्षात घेतला, आणि आज प्रत्यक्षात प्राथमिक स्तरावर मातृभाषा मराठीचे जे अध्ययन-अध्यापन केले जाते ते पाहिले, तर यात थोडी विसंगती आहे काय, असाही प्रश्न मनात उभा राहतो. या प्रश्नाच्या पोटात इतर अनेक प्रश्नही दडलेले दिसतात. वस्तुस्थिती आणि आजच्या चर्चासत्रातील या माझ्या निबंधाचा विषय हे जेव्हा मी पडताळून पाहिले, तेव्हा याबाबतीतसुद्धा अकारण



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

काही गैरसमज निर्माण होऊ नयेत अशी वास्तव भूमिका घेण्याची आवश्यकता आहे असे मला वाटते.

काहींच्या मनात जो एक समज आहे, की शाळा-कॉलेजमधून मराठीचा जो अभ्यास केला जातो तो केवळ वाङ्मयीन दृष्टिकोणातून, आणि या अशा समजातूनच आजच्या विषयाची चर्चा इथे व्हावी असे योजिले असावे. या विषयाची त्या दृष्टिकोणातून योजना केली असेल, तर शालेय पातळीवर ते कितपत सयुक्तिक आहे हे पाहणे मला आवश्यक वाटले आणि मुद्दाम इयत्ता १ ते ७ च्या मातृभाषा मराठीचा शासनमान्य अभ्यासक्रम पडताळून पाहिला. या अभ्यासक्रमात इयत्ता १ ते ७ पर्यंत मातृभाषेच्या अध्ययन–अध्यापनाचा जो विचार केला आहे त्यात कोठेही वाङ्मयीन उद्दिष्टे डोळ्यांसमोर ठेवलेली आढळत नाहीत, हे मला आधीच निदर्शनास आणावेसे वाटते.

इयत्ता १ ते ७ च्या मातृभाषेच्या अभ्यासक्रमात जी उद्दिष्टे दिली आहेत, ती मुद्दाम जशीच्या तशी मी आपल्यापुढे ठेवत आहे :–

"प्राथमिक पातळीवर मातृभाषा शिकवण्याचे हेतू स्थूलमानाने खाली दर्शविलेली कौशल्ये व क्षमता विकसित करणारे असावेत.

१. अर्थ समजून घेऊन ऐकायला शिकणे.
२. आपले विचार, कल्पना, भाव इ. शुद्ध, स्पष्ट व योग्य रीतीने वाचेने व्यक्त करता येणे.
३. शुद्ध उच्चार, योग्य स्वराघात आणि योग्य अभिव्यक्ती यांचा मेळ साधून अस्खलित व प्रगटपणे वाचता येणे.
४. अर्थ समजून घेऊन मूकवाचन करण्याची सवय लागणे.
५. तर्कशुद्ध, परिणामकारक व शुद्ध भाषेत आपले विचार मांडता येणे.
६. सुवाच्च अक्षरांत लिहिता येणे.
७. ही उद्दिष्टे साध्य होण्यासाठी खालील गोष्टींची जरुरी आहे :
   अ) विद्यार्थ्यांना शब्दांचा अर्थ समजून त्यांचा उपयोग करता यावा आणि त्यांचा शब्दसंग्रह टप्प्या-टप्प्याने वाढता रहावा.
   आ) मातृभाषेच्या रचनेचे स्वरूप विद्यार्थ्यांना पुरेसे अवगत व्हावे आणि त्याच्या आधारावर त्यांना भाषेचा वरच्या दर्जाचा पुढील अभ्यास करता यावा आणि इतर भाषांचा अभ्यास करण्यासही त्याची मदत व्हावी.
   इ) चांगली पुस्तके वाचण्याची आवड उत्पन्न व्हावी."

प्राथमिक स्तरावर मातृभाषा मराठीच्या अभ्यासक्रमाला काय अपेक्षित आहे, कोणती उद्दिष्टे साध्य व्हावीत अशी अपेक्षा आहे, हे वर स्पष्ट केले आहे. त्याचबरोबर इयत्ता १ ते ७ च्या शासनमान्य सुधारित अभ्यासक्रमात असेही म्हटले आहे, की "पाठ्यक्रमातील इतर विषयांचा अभ्यास मातृभाषेच्या माध्यमातून, करीत असतानाच विद्यार्थी मातृभाषेचाही अभ्यास करीत असतात हे लक्षात असू द्यावे. म्हणून इतर विषयांचे अध्यापन मातृभाषेच्या अभ्यासास विरोधक न होता पोषक होईल अशी काळजी घ्यावी."

याचप्रमाणे या अभ्यासक्रमातील आणखी एक अवतरण इथे देऊन त्याकडे मी आपले लक्ष अगत्याने वेधू इच्छितो. हे अवतरण असे : "समाजाकडून अपेक्षित असलेले, दैनंदिन उपयोगासाठी आवश्यक असे भाषाकौशल्य, चांगले हस्ताक्षर, चांगले वाचन या मूळ बाबींवर समितीने कटाक्षाने भर दिला आहे. तद्वतच बिनचूक व स्पष्ट भाषण, आदरशील प्रतिपादन, सुलभ व भारदस्त चर्चा यांबाबत शिक्षण देण्याच्या दृष्टीने भाषा-विषयाच्या निरनिराळ्या उपांगांमध्ये मौखिक काम व संभाषण यांवर विशेष भर देण्यात आला आहे."

या दोन्ही अवतरणांकडे बारकाईने लक्ष दिले असता शालेय पातळीवर आज केले जाणारे अध्ययन-अध्यापन हे केवळ वाङ्मयीन दृष्टिकोणातून केले जात आहे असे दिसत नाही. मराठी माध्यमातील अन्य विषयांची पाठ्यपुस्तकेदेखील जेव्हा भाषेचीच पाठ्यपुस्तके बनावीत अशी अभ्यासक्रम तयार करणाऱ्या समितीची अपेक्षा आहे तर मराठी भाषा ही नकळत अनेक विषय हाताळत असल्यामुळे व्यावहारिक मराठीचीच जागा घेताना दिसते असे म्हणावेसे वाटते. याशिवाय 'समाजाकडून अपेक्षित


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असलेले, दैनंदिन जीवनासाठी आवश्यक असलेले असे भाषाकौशल्य विद्यार्थ्यांनी आत्मसात करावे आणि त्या दृष्टीतून अध्ययन-अध्यापन व्हावे ' असे अभ्यासक्रमात सूचित केले आहे हे लक्षात घेता मराठीचे अध्ययन-अध्यापन हे व्यावहारिक दृष्टीने केले जावे असे स्पष्ट दिग्दर्शन अभ्यासक्रमात करण्यात आलेले आहे.

प्रचलित अभ्यासक्रमाला व्यावहारिक मराठी जशी अपेक्षित आहे तशीच आता नव्याने येऊ घातलेल्या अभ्यासक्रमाचा कानोसा घेता त्या अभ्यासक्रमातही अशीच अपेक्षा आहे असे दिसते. येऊ घातलेल्या अभ्यासक्रमात सुरुवातीलाच असे स्पष्ट केले आहे, की "मातृभाषेतून शिक्षणाचा पाया घातला जातो. विद्यार्थी ज्या परिसरात राहतो त्या परिसराची बोलभाषा हीच त्याची मातृभाषा असते. म्हणून बोलभाषा व प्रमाणभाषा यांचा मेळ घालून विद्यार्थ्यांची भाषाक्षमता वाढवणे आवश्यक आहे." या अवतरणावरूनही असे दिसून येईल, की मराठी भाषेचा नवा अभ्यासक्रमही व्यावहारिक मराठीच्या जवळ जाणारा आहे.

या नव्या अभ्यासक्रमात भाषेचे काही उपक्रम सुचवताना एके ठिकाणी असे म्हटले आहे, की दैनंदिन व्यवहारातील प्रसंगांचे नाटचीकरण करून घेणे, उदा. दुकान, बाजार, पोष्ट ऑफिस, पाणवठा, एस. टी. स्टँड इत्यादी. हे केवळ नमुन्यादाखल आपल्या निदर्शनास आणले आहे. यावरून हे स्पष्ट होईल, की प्रचलित अभ्यासक्रम काय किंवा येऊ घातलेला नवा अभ्यासक्रम काय, यांचा कानोसा घेता असे दिसते, की प्राथमिक स्तरावर म्हणजे इयत्ता १ ते ७ च्या शालेय शिक्षणात विद्यार्थ्यांना व्यावहारिक मराठी शिकवली जाते किंवा शिकवली जावी अशी अभ्यासक्रमाची निदान अपेक्षा दिसते.

प्रचलित अभ्यासक्रमात सामुदायिक जीवनाच्या अभ्यासाचा समावेश केला आहे. त्यातही नकळत भाषेच्या व्यावहारिक शिक्षणाकडे आवर्जून लक्ष देण्यात आलेले दिसते. उदा.–(१) पृष्ठ २३ वर असे म्हटले आहे की, वक्त्याचे भाषण लक्षपूर्वक ऐकणे. एवढेच नव्हे तर असेही दिग्दर्शन करण्यात आले आहे : (२) वक्त्याचे भाषण चालू असताना बोलण्याचा प्रसंग आला तर वक्त्याला व जवळच्या श्रोत्यांना अडथळा न होईल अशा हलक्या आवाजात बोलणे.

त्यानंतर बोलण्याची शैली कशी असावी हेसुद्धा पान २४ वर स्पष्ट केले आहे, ते असे : (१) स्पष्ट व मोकळा आवाज, (२) आदराची भाषा, (३) निर्मळ भाषा, (४) स्थिर वेग, (५) नम्रतापूर्वक प्रश्न विचारणे व उत्तर देणे, (६) दुसऱ्यांच्या संभाषणांत अडथळा न आणणे, (७) स्वतःची बोलण्याची पाळी येईपर्यंत थांबणे.

यावरून असे दिसून येते की, या सगळ्या भाषेसंबंधीच्या व्यावहारिक सूचनाच दिल्या आहेत. ती बोलावी कशी आणि बोलताना वागावे कसे हेसुद्धा सांगितले आहे. विशेषतः संभाषणाच्या वेळी लहानांनी वडीलधाऱ्या माणसाशी कसे बोलावे, कोणते शिष्टाचार पाळावेत या आणि अन्य अनेक गोष्टींचे मार्गदर्शन अभ्यासक्रमात करण्यात आलेले आहे.

शालेय पातळीवर विचार करता व्यावहारिक मराठीचा नव्याने काही पाया घातला पाहिजे याची गरज दिसत नाही. पण उच्च माध्यमिक पातळीवर व्यावसायिक मराठीचा पाया घातला पाहिजे असे मात्र जाणवते. दैनंदिन व्यवहारामध्ये जेवढी भाषा यायला हवी तिचा विचार शालेय अभ्यासक्रमात करण्यात आलेला आहे. व्यावसायिक मराठीचा पाया घालायचा म्हणजेच वेगवेगळ्या व्यवसायांसाठी मराठीतून भाषिक व्यवहार कसे केले जावेत याचे ज्ञान देण्याची आवश्यकता निश्चित आहे. पण हा पाया नेमका कोठे घालायला हवा याचा विचार या चर्चासत्रात केला जावा. माझ्या दृष्टीने प्राथमिक स्तरावर याचा पाया घालण्याची आवश्यकता नसून तिथे व्यवसायाभिमुख शिक्षण सुरू होते तिथे तो घातला जावा, एवढे मी येथे सूचित करू इच्छितो. त्याचबरोबर हेही सूचित करू इच्छितो, की अशा भाषाभ्यासासाठी व्यवहारोपयोगी परिभाषेचा नेटका अभ्यास केला जावा.

या विषयाच्या अनुरोधाने या शोध-निबंधात जी वस्तुस्थिती पडताळून पाहण्यात आली त्यावरून असे दिसून येते, की व्यावहारिक मराठीची जाण प्रचलित अभ्यासक्रमात आढळते. तसेच या अभ्यासक्रमावर आधारित तयार होणाऱ्या पाठ्यपुस्तकांतही

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्याचे प्रतिबिंब पडणे अगदी स्वाभाविक आहे. पण भाषाशिक्षणाची अभ्यासक्रमाने मनाशी बाळगलेली उद्दिष्टे पूर्णपणे सफल व्हायची झाली, तर याची जाण अध्यापकांच्या अध्यापनात दिसायला हवी. शिक्षकांनी ज्या गोष्टींचे भान मनाशी ठेवून अध्यापन करायला हवे, तसे केले तरच अभ्यासक्रमातील उद्दिष्टे साध्य होऊ शकतील आणि अध्ययन-अध्यापनाचे एक प्रभावी साधन म्हणून भाषेच्या पाठ्यपुस्तकांचा नीट उपयोग केला गेला असे होईल. या दृष्टीने प्राथमिक स्तरावर शिक्षकांच्या प्रशिक्षणाची अत्यंत गरज आहे असे वाटते. प्राथमिक शिक्षणाचा स्तर उंचावण्याच्या दृष्टीने ज्या ' राज्य शिक्षण-शास्त्र संस्थे'चा जन्म झाला आहे, तिने हे कार्य अधिक नेटाने व विस्तृत प्रमाणावर करायला हवे आणि ही जाणही निर्माण करायला हवी. विशेषतः शिक्षण-क्षेत्रातील असे हे उपक्रम केवळ शहरापुरतेच मर्यादित न ठेवता त्यांचे लोण जिल्हा पातळीवरून तालुका पातळीवर व तालुका पातळीवरून अगदी डोंगरकपारीतल्या खेड्यापाड्यांपर्यन्त ते कसे पोचेल हे पाहिले पाहिजे. त्या दृष्टीने कितीतरी योजना तयार करता येतील आणि कार्यान्वित आणता येतील. या योजनांचाही येथे काही विचार केला गेला तर तो उपकारक ठरेल. आणि म्हणून त्या दिशेनेही विचार व्हावा, चर्चा व्हावी.

जाताजाता आणखी एका महत्त्वाच्या मुद्द्याला स्पर्श करुन त्या दृष्टीने काय पावले टाकता येतील याचाही विचार केला जावा म्हणून बोलू इच्छितो. महाराष्ट्र हे राज्यच इतके विस्तृत आहे की त्यामुळे खानदेशातील माणूस जी भाषा बोलतो, तिचा सूर आणि कोकणातील माणूस जी भाषा बोलतो तिचा सूर यांत तफावत पडणे साहजिक आहे. प्रमाण-भाषेची क्षमता आणि कौशल्ये चांगल्या रीतीने आत्मसात करायची, तर मुलांच्या आणि शिक्षकांच्या हाती केवळ छापील पाठ्यपुस्तके देऊन भागणार नाही. या पुस्तकांच्या जोडीला शैक्षणिक साधनांचेही संच उपलब्ध करून दिले पाहिजेत आणि शक्यतर ध्वनिमुद्रित फितींचाही भाषेच्या अध्ययन-अध्यापनात उपयोग करण्याच्या दृष्टीने पावले टाकली पाहिजेत. ही शैक्षणिक साधने शिक्षणाच्या वेग-वेगळ्या स्तरांवर कसकशी असावीत, त्यांचा उपयोग कसा करावा या दिशेनेही जर काही चर्चा झाली, तर तीदेखील अतिशय उपयुक्त ठरेल.

आणखी एका गोष्टीचा उल्लेख करून व त्यावर चर्चा व्हावी असे सूचित करून मी आपली रजा घेऊ इच्छितो. भाषाशिक्षणाची कोणतीही उद्दिष्टे अपे-क्षित प्रमाणात सफल व्हायची, तर हे सर्व शिक्षण खऱ्या अर्थाने आनंदमय झाले पाहिजे आणि त्या दृष्टीने क्रीडनात्मक शिक्षणपद्धतीचा अधिकाधिक वापर कसा करता येईल हेही पाहायला हवे. नव्या अभ्यासक्रमात दैनंदिन व्यवहारोपयोगी भाषा विद्यार्थ्यांना आत्मसात करता यावी म्हणून काही उपक्रम सुचवले आहेत. त्याचा उल्लेख मी यापूर्वी केला आहेच. भातुकलीच्या खेळासारखे हे खेळ प्राथ-मिक पातळीवर अतिशय उपयोगी पडतील. पण व्यावसायिक मराठीचा पाया घालताना त्यांचीच कास धरावी, की नव्या काही पद्धतींचा अवलंब करावा? तसेच भाषा ही एक सवय आहे आणि सवयीनेच ती आत्मसात करता येते. हे भाषाशिक्ष-तील मर्म लक्षात घेऊन तिची सवय होण्याच्या दृष्टीने आणि बोलण्याचा, लिहिण्याचा अधिकाधिक सराव होण्याच्या दृष्टीने आपल्याला काय काय करता येईल, याचा शोध घेणे उपकारक ठरेल. या चर्चा-सत्रात मला माझे विचार व्यक्त करण्याची संधी दिल्याबद्दल संयोजकांचे मनःपूर्वक आभार.

---

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# व्यावहारिक मराठी : ८ वी ते १२ वी

वसंत दावतर

व्यावहारिक मराठीची सुरुवात घरापासूनच होते. मराठी घरातील माणसांचे घरातील सर्व घरगुती भाषिक व्यवहार ज्या मराठीतून होतात ती व्यावहारिक मराठी होय, असे स्थूलमानाने आणि प्राथमिक स्वरूपातील मराठी भाषिक व्यवहारापुरते म्हणता येईल. घरामधून ही मराठी व्यवहार-प्रक्रियेत दारापर्यंत जाते. या प्रक्रियेला आणखी पाय फुटले, की ही मराठी रस्त्यारस्त्यांवर, बाजारात, दुकानांमध्ये, शाळांतून, कार्यालयांमधून, कारखान्यांतून, मेळाव्यांमधून, संमेलनांतून, जत्रांमधून, निरनिराळ्या खाजगी व सार्वजनिक आस्थापनांमधून माहिती, ज्ञान, सूचना, आज्ञा इत्यादी देण्यासाठी, संवाद, संभाषणे, आणि इतर भाषिक देवघेवी करण्यासाठी, निवेदने, मागण्या इत्यादी सादर करण्यासाठी वापरली जाते. या प्रक्रियेत ती वाढते, व्यापक होते. अशी ती समृद्ध होत असताना संस्कारित, रूपांतरित, संक्रमित झालेली असते, भाषेद्वारा साध्य करावयाच्या जीवनव्यवहारासाठी ती सक्षम होत असते. माणसामाणसांमधील व्यावहारिक देवघेवीची ती भाषिक अभिव्यक्ती असते. साहजिकच व्यावहारिक मराठी ही या व्यवहार-क्षेत्रांमध्ये प्रचलित असणारी आणि उपयोगी पडणारी बोलभाषा असते. बोलभाषा म्हणून तिची संरचना, शब्दसंपत्ती आणि शब्दविकार, या गोष्टी लेखन-व्यवहारामधील मराठी भाषेच्या संरचनेहून, शब्दसंपत्तीहून शब्दविकारांहून काही बाबतीत व काही प्रमाणात वेगळ्या असतात.

हे सगळे भाषिक विशेष मराठी ही ज्यांची मातृभाषा असते, त्यांना सहज आत्मसात होत असतात, त्यांना ते औपचारिक अध्ययन-अध्यापनाच्या प्रक्रियेमधून शिकावे लागत नाहीत, असे सामान्यतः दिसते. मराठी ही ज्यांची मातृभाषा नाही, त्यांना मात्र हा भाषिक व्यवहार मराठीमधून करण्यासाठी हे भाषिक विशेष अध्ययन–अध्यापन आणि ज्यांची मातृभाषा मराठी आहे अशा व्यक्तींच्या व समूहांच्या सहवासात राहून मराठी आत्मसात करणे, या प्रक्रियांमधून आत्मसात करावे लागतात. पण बोलव्यवहारात व्यावहारिक मराठीची काही क्षेत्रे अशीही असतात, की संबंधित क्षेत्रानुसार नेहमीच्या भाषिक व्यवहारात न येणारी अशी शब्दसंपत्ती, काही शिष्टाचाराची म्हणून वेगळी भाषिक अभिव्यक्तीची रीती आणि शैली स्वीकारावी लागते. यामधून काही वाक्यरचनाही वेगळी होते. डॉक्टर व रोगी यांचे एकमेकांशी संबंधित बोलणे, तसेच वकील-अशील यांची परस्परांमध्ये होणारी निवेदने, निरनिराळ्या व्यावसायिक आणि उद्योगधंद्याच्या क्षेत्रांतील पसंती-नापसंती व करारमदार यांसंबंधी संबंधितांची बोलणी या व्यवहारांमध्ये काही वेगळे शब्द, वाक्प्रचार इत्यादी येतात. आपली मातृभाषा मराठी असली, तरी तेवढ्याने हे सर्व आपोआप येत नसतात. मराठी मातृभाषिकालाही ते शिकावे लागतात. हे त्याचे शिक्षण औपचारिक यंत्रणेमधून होत असते, असे नाही. यासंबंधीचे व्यावहारिक शिक्षण अनौपचारिक पद्धतीने होत असते. मात्र, तसे ते होत असताना ज्यांच्या परस्पर-व्यवहारामधून हे होत असते, त्यांच्यापैकी एका बाजूच्या व्यक्तींनी ते आधीच अनौपचारिक पद्धतीने किंवा औपचारिक शिक्षणाच्या द्वारा मुख्यतः घेतलेले असते. जोपर्यंत हा व्यवहार स्थूल आणि प्राथमिक स्वरूपाचा असतो, तोपर्यंत अनुभवातून होणारे शैक्षणिक संस्कार त्यासाठी पुरे पडतात. यापलीकडे मात्र औपचारिक पद्धतीने काही माहिती, ज्ञान व संकेत, यांचे आकलन करून घ्यावे लागते. अशा वेळी बोलभाषेबरोबर लेखनभाषेचे साहाय्य घेणे उपकारक ठरत असते.




मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लिखित साहित्यसामग्रीचाही उपयोग या कामी होत असतो.

याशिवाय आणखी काही व्यवहाराची क्षेत्रे अशी आहेत की, ज्या ठिकाणी लेखनभाषाच वापरावी लागते. उदाहरणार्थ, बोलण्यांमधून पक्का झालेला व्यवहार लेखनबद्ध करावा लागतो, जाहिराती, अर्ज, अहवाल, इतिवृत्ते इत्यादी लेखनबद्ध करावी लागतात. करार-मदार तसेच, आकाशवाणी, दूरदर्शन यांच्यासारख्या दृश्य-श्राव्य माध्यमांतून प्रसारित निवेदने, कार्यक्रम, संभाषणे, इत्यादींच्या लेखनप्रती कराव्या लागतात, संदर्भानुसार काही ठिकाणी बोलभाषा व लेखनभाषा यांचा सरमिसळ उपयोग करावा लागतो, भाषिक निवेदनांचे काही संकेत पाळावे लागतात. ही सारी क्षेत्रे व्यावहारिक मराठीचीच असतात.

समाजात या जीवनव्यवहारांमध्ये वावरणाऱ्या व्यक्तीला या स्वरूपाच्या भाषिक व्यवहाराची आपली तयारी कुणातरी ज्ञानी, माहितगार, अनुभवी व्यक्तीच्या मार्गदर्शनाने आणि/ किंवा त्याच्या हाताखाली काम करून आत्मसात करावी लागते. हा रूढ मार्ग बहुशः पतकरला जातो. पण अशा संधीमधून तयारी करून घेणे मर्यादित स्वरूपातच शक्य असते. कारण यासाठी शिकावू उमेदवार घेणे ही गोष्ट काम देणाऱ्या आस्थापनांच्या गरजेवर अवलंबून असते. उमेदवाराची निवड या आस्थापनांच्या सोयीनुसार होऊ शकते. ही गरज आणि सोय एका बाजूला, आणि हे शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्यांची संख्या दुसऱ्या बाजूला, यांचा सुसंवादी मेळ बसण्याची शक्यता बहुधा नसते. शिवाय, हे शिक्षण देऊ इच्छिणाऱ्या आस्थापनांनाही अनेकदा आधीच शिक्षित-प्रशिक्षित माणसांचीही गरज असते. अशी माणसे नेहमीच शिकावू उमेदवारांमधून हवी तशी आणि हवी तितकी मिळतीलच असे नाही. तशी ती मिळण्याची शक्यता मान्य केली, तरी त्यासाठी आवश्यक कालावधी, या आस्थापनांची या कामासाठी अवश्य असणाऱ्या आर्थिक व व्यवस्थापकीय तरतुदींची मर्यादा, आणि औपचारिक सार्वत्रिक शिक्षण घेतल्यानंतर लगेच व्यवसाय-नोकरी करण्याची आवश्यकता असणाऱ्या व्यक्तींची आजच्या मराठी समाजातील संख्या, यांचा विचार करता अशी शिक्षित व प्रशिक्षित माणसे तयार करण्यासाठी स्वतंत्र यंत्रणा असणे आणि औपचारिक सार्वत्रिक शिक्षणामध्येही या तरतुदी असणे उपयुक्त व हितावह ठरेल. अशा यंत्रणा व तरतुदी आज महाराष्ट्रात नाहीत. तांत्रिक-यांत्रिक क्षेत्रांत अशा यंत्रणा व तरतुदी आहेत. पण भाषिक क्षेत्रांत किंवा यांत्रिक-तांत्रिक क्षेत्रांतही विशेष भाषिक तयारी करून घेण्याच्या तरतुदी नाहीत. क्वचित एखाद-दुसऱ्या क्षेत्रात असे फुटकळ किंवा तुरळक प्रयत्न होत असलेले दिसले, तरी ते विखुरलेले, अपुरे आणि सार्वत्रिकपणे सर्वांच्या आवाक्यातील नाहीत. पुरेशी उपयुक्त साहित्यनिर्मिती आणि पूरक किंवा उपयोजित पाठमाला, वाचनमाला यांचा अभाव आहे. मराठीचे बरेच मोठे प्रत्यक्ष आणि संभाव्य असे व्यवहारक्षेत्र पाहिले, तर तेथे उपयुक्त साहित्य व भाषिक मार्गदर्शनाच्या तरतुदी नाहीत. याचे एक ठळक कारण असे दिसते की, अशा बऱ्याच क्षेत्रांत मराठीची गरज पडेल अशी परिस्थिती नाही. हे एक दुष्टचक्र आहे. साहित्य-सामग्री, भाषिक मार्गदर्शक, तांत्रिक उपकरणे, उपयुक्त शिक्षित-प्रशिक्षित माणसे, या गोष्टी नाहीत म्हणून मराठीचा व्यवहार अनेक व्यावहारिक क्षेत्रांत नाही, आणि मराठीतून हे व्यवहार होत नाहीत म्हणून साहित्यसामग्री इत्यादी उपलब्ध नाही. पण मर्यादित गरजा कार्यक्षमतेने पुऱ्या करता येणे आणि भावी काळातील मराठीचा विस्तार-विकास, यांचा विचार करता हे सारे मराठीत उपलब्ध होणे आवश्यक आहे. पण जोपर्यंत या प्रकारच्या मराठीच्या मागणीचा पूर नाही, तोपर्यंत खाजगी क्षेत्रात स्वतंत्रपणे हे सारे निर्माण होणे, त्यासाठी यंत्रणा संस्था राबणे शक्य नाही. त्यासाठी उत्साह व तातडी, निकड वाटणे दुरापास्त आहे. त्यामुळे हे सारे या भाषेची व समाजाची कदर करणाऱ्या सरकारने उपलब्ध करून देणे हाच पर्याय उरतो. त्यासाठी संपूर्ण सरकारी आर्थिक मदतीच्या औपचारिक व आवर्तनी अंदाजपत्रकीय तरतुदींच्या पाठबळावर एखादी स्वायत्तसंस्था किंवा महामंडळ निर्माण करणे आवश्यक ठरते.

औपचारिक सार्वत्रिक शिक्षणयंत्रणेच्या बाहेर हे शिक्षण घेणे अशा संस्थेमधून किंवा महामंडळ






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संचालित अनेक संस्थांमधून शक्य होईल. पण शिक्षण घेणाऱ्याला हे अधिक खर्चिक आणि व्यवसायपूर्व अधिक काळ शिक्षणप्रक्रियेत घालविणारे ठरणार आहे. आजच्या बहुसंख्य मराठी लोकांना या दोन्ही गोष्टी परवडणाऱ्या नाहीत. म्हणून व्यावहारिक मराठीचे प्राथमिक मूलभूत शिक्षण-प्रशिक्षण मिळण्याची तरतूद औपचारिक सार्वत्रिक शिक्षण-व्यवस्थेतच करणे आणि पुढील प्रगतीसाठी, प्रगत ज्ञानासाठी या निबंधात आधी सांगितलेल्या संस्थेचा किंवा महामंडळ संचालित संस्थांचा उपयोग होईल, अशी व्यवस्था ही उपयुक्त, लाभदायक व व्यवहारी गोष्ट ठरेल. शिवाय, औपचारिक सार्वत्रिक शिक्षण-व्यवस्थेबाहेरील ज्या संस्थेचा किंवा महामंडळ संचालित संस्थांचा उल्लेख या निबंधात आधी केला आहे, त्यांचा उपयोग औपचारिक सार्वत्रिक शिक्षण-व्यवस्थेतील मराठीच्या अभ्यासक्रमांसाठी साहित्य-सामग्री निर्माण करणे, त्यासाठी संशोधन करणे आणि या स्वरूपाच्या अभ्यासक्रमांबाबतही सतत संशोधन व पुनर्रचनेसाठी अभ्यास, सर्वेक्षण इ. करीत राहणे, या कामी मुख्यतः करून घेता येईल. औपचारिक सार्वत्रिक शिक्षणव्यवस्थेतच व्यावहारिक मराठीच्या शिक्षण-प्रशिक्षणाची तरतूद व सोय केल्यामुळे बहुसंख्य शिकावू मराठी माणसांना व्यवसायाचे अधिक मार्ग लवकर आणि व्यवसाय करण्यासाठी आवश्यक पूर्वतयारीने मोकळे होतील; इतकेच नव्हे, तर ज्या संस्थेचा किंवा महामंडळ संचालित संस्थांचा व्यावहारिक मराठीच्या जोपासनेसाठी आवश्यक म्हणून आधी या निबंधात पाठपुरावा केला आहे, त्या संस्थेला अथवा संस्थांनाही स्वीकृत कार्यात करावयाच्या निरनिराळ्या क्षेत्रांतील प्रत्यक्ष कामासाठी प्राथमिक मूलभूत तयारीचे शिक्षित-प्रशिक्षित मदतनीस मिळत राहण्याची सोयही होईल.

आता, व्यावहारिक मराठीच्या शिक्षणाचा व प्रशिक्षणाचा विचार करताना काही बीजभूत गोष्टींची समज-उमज बाळगली पाहिजे. प्रत्येक माणसाला वाचता व लिहिता येणे आधुनिक जीवनव्यवहारात आवश्यक मानले गेले आहे. नोकरी-धंद्यात, व्यवसायात, नित्याच्या जीवनव्यवहारात विशिष्ट प्रकारचे मराठी आत्मसात असणे ही गोष्ट त्या त्या क्षेत्रातील आपल्या यशस्वी वाटचालीसाठी आवश्यकच आहे. व्यावसायिक विषयाचे तांत्रिक ज्ञान जितके आवश्यक आहे, तितकेच, त्याबरोबरीने त्यासंबंधी भाषिक ज्ञान आणि त्याचे उपयोजनकौशल्य आवश्यक आहे. त्याशिवाय तो तो व्यवहार सर्वार्थाने परिपूर्ण व यशस्वी होणे शक्य नसते. आपली कार्यक्षमता व प्रगती या भाषिक या भाषिक समर्थतेवर अवलंबून असते.

अगदी सहज लक्षात येणारी गोष्ट अशी की, स्वच्छ, स्पष्ट, बिनचूक, नेटके, बोलता-लिहिता येणे; व्यवस्थित, पद्धतशीर, मुद्देसूद पत्र लिहिता येणे; आपल्या भूमिकेची, मतांची, अभिप्रायांची आणि दुसऱ्याने विचारलेल्या प्रश्नांच्या, समस्यांच्या उत्तरांची सरळ, सुस्पष्ट अशी मांडणी करता येणे; आक्षेपांना तशीच सरळ स्पष्ट उत्तरे देता येणे आणि या सगळ्या व्यवहारांत आवश्यक त्या गोष्टींची यथार्थ स्पष्टीकरणे देता येणे; आपण जे ऐकतो, पाहतो, त्यांचे अचूक, संक्षिप्त वृत्तान्त देता येणे; निवेदने सादर करता येणे, आपली भूमिका व दृष्टिकोण वाजवी रीतीने मांडता येणे, या क्षमतेद्वारा आपण आपले जीवन सुरळीतपणे जगू शकतो आणि आपणास योग्य असे काम मिळवण्यास व करण्यास आपण पात्र ठरत असतो. या जाणिवेने कुणाही व्यक्तीने भाषिक तयारीस लागणे क्रमप्राप्त असते.

यांपैकी कोणत्याही जीवनव्यवहारासाठी आपणास काही विचार करणे, काही चिंतन करणे हे आवश्यकच असते. किंबहुना, जीवनप्रक्रियेत तसे ते प्रत्येक क्षणी होतच असते. मग हे प्रकट जाणिवेने, सबोधतेने होवो, अथवा सहज प्रेरणेने, अनुभवाच्या व संस्कारांच्या मानसिक तयारीने तात्काळ, अबोधतेने होवो. हे विचार करणे आपण जवळ जवळ सर्वच बाबतीत शब्दांद्वारा किंवा शब्दांमधून करीत असतो, असा तज्ज्ञांचा अभिप्राय आहे. याचे आधार मी माझ्या दुसऱ्या एका निबंधात दिले आहेत. तेव्हा, व्यावहारिक जीवनक्षेत्रात शब्दघटित भाषेच्या मूलभूत, अपरिहार्य व उपयुक्त स्थानाकडे आपणास दुर्लक्ष करून चालणार नाही.




अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपण करीत असतो तो हा विचार आपण आपला आपल्याशीच करतो, असे नाही. आपणाहून वेगळ्या असणाऱ्या अशा कोणत्या तरी गोष्टीच्या संदर्भात तो आपण करीत असतो, इतरांशी होणाऱ्या आपल्या व्यवहारांमधून आपण तो करीत असतो. हा एक सामाजिक देवघेवीचा प्रकार असतो. किंबहुना, कोणत्याही सामाजिक देवघेवीच्या मुळाशी तो असतो. अर्थातच शब्द हे या मुळाच्या अवस्थेत असतात. या मूलभूत अवस्थेच्या म्हणजेच शब्दांच्या वेगवेगळ्या आविष्कारांबद्दल अनास्था बाळगून चालणार नाही, हे ओघानेच आले.

मराठी भाषेच्या आविष्काराची ही जी क्षेत्रे आहेत किंवा असतील, ती नजरेसमोर ठेवून जो अभ्यासक्रम तयार करावयाचा असेल, तो औपचारिक किंवा तात्त्विक, सैद्धान्तिक माहिती देणारा, ज्ञान करून देणाराच असून उपयोगी नाही. तसे पाहिले, तर कोणत्याही क्षेत्रातील किंवा विषयातील माहिती व ज्ञान ही केवळ माहिती व ज्ञान म्हणून, प्रत्यक्षात उपयोजनाशिवाय अमूर्त व शुद्ध विचाराची क्षेत्रे वगळता आणि बौद्धिक शिस्त म्हणून त्यांचे महत्त्व मानूनही प्रत्यक्ष उपयोजनाची संधी नसेल, तर व्यावहारिकदृष्ट्या निरुपयोगीच भासणारी असतात. व्यावहारिक क्षेत्रांत ही गोष्ट अधिक ठळकपणे व स्पष्टतेने लक्षात घ्यावी लागते. भाषाही याला अपवाद नाही. माहिती असणे किंवा ज्ञान असणे, ही गोष्ट अशा क्षेत्रांत साध्य ठरत नाही. माहितीचे व ज्ञानाचे उपयोजन करता येणे, त्यासंबंधी अभ्यास, सराव असणे, त्याकरिता उपयुक्त साहित्य निर्माण करणे, त्याचा उपयोग करून घेणे, याला महत्त्व आहे. समाजात वेगवेगळ्या व्यावहारिक जीवन प्रसंगांमध्ये सहभागी होताना, त्या त्या व्यवहाराच्या भाषिक गरजा आत्मसात असणे, त्या व्यवहारांमध्ये सहभागी होण्यासाठी आवश्यक भाषिक तयारी असणे, या गोष्टींचे शिक्षण येथे प्रस्तुत ठरते.

आपणास जे वाटते, ते यथार्थतेने इतरांस सांगता येणे, इतर व्यक्तींबरोबर वावरताना त्यांच्या भाषिक अभिव्यक्तींना यथार्थ भाषिक प्रतिसाद देता येणे; प्रसंगानुरूप भाषेचे निरनिराळे उपचार पाळता येणे, निरनिराळ्या वृत्ती आणि मानसिक अवस्था सुस्पष्टतेने व्यक्त करता येणे, आकलन आणि प्रतिसाद यांचे व्यावहारिक पातळीवर सुसंवाद साधता येणे, या गोष्टींना या अभ्यासक्रमांमध्ये विशेष महत्त्व असणे प्राप्त आहे. प्रत्यक्ष व्यवहारात भाषिक देवघेवीने यशस्वी किंवा सफल झाल्याचे समाधान देणारे शिक्षण या ठिकाणी अभिप्रेत असते. असे शिक्षण आपण मिळवीत आहोत असा विश्वास वाटणे, खात्री पटणे आवश्यक असते. यामुळेच व्यवहारतः हे शिक्षण-प्रशिक्षण घेण्याकडे, त्यासंबंधी अभ्यास करण्याकडे वळण्याची प्रेरणा मिळू शकते ही गोष्ट लक्षात ठेवूनच या अभ्यासक्रमांची आखणी केली पाहिजे. लेखनव्यवहाराचे जे शिक्षण या प्रकारच्या अभ्यासक्रमांतून मिळेल ते बोलण्यातून आपण माहिती, ज्ञान, भावना, कल्पना इत्यादींची जी देवघेव करीत असतो, ती लेखनव्यवहाराने यथार्थपणे मांडण्याची तयारी करून घेणारे असले पाहिजे.

येथे आणखी एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे. ती अशी : प्राथमिक, माध्यमिक आणि उच्च माध्यमिक, तसेच महाविद्यालयीन-विद्यापीठीय औपचारिक शिक्षणातील अभ्यासक्रमांत भाषा हा अभ्यासाचा एक विषय असतो. यांपैकी एखाद-दुसऱ्या टप्प्यात भाषेच्या अभ्यासाचा जो आराखडा आणि त्यानुसार अभ्यासक्रम निश्चित केलेला असतो, मुक्रर केलेला असतो, तो व्यावहारिक भाषेचाच असतो किंवा मराठीचा तो तसा आहे, असे कुणी मानीत असतील, ती फार मोठी गफलत ठरेल. भाषेचा सर्वतोपरी परिणामकारक व्यवहार करण्यासाठी किंवा होण्यासाठी ज्या मानसिक, बौद्धिक शक्ती संस्कारित, विकसित, होणे आवश्यक असते आणि जे भाषाविषयक ज्ञान व्यक्तीला हवे असते व जी भाषाविषयक समज तिला असणे अपेक्षित असते, त्या अनुरोधाने भाषेचा अभ्यासक्रम व भाषेचे शिक्षण या गोष्टी मूलतः भाषा या विषयाच्या औपचारिक अभ्यासाच्या व्यवस्थेत नजरेसमोर असाव्यात. भाषेच्या अभ्यासाचे हे स्वरूप शैक्षणिक किंवा विद्याक्षेत्रीय असते. त्यातून काही व्यावहारिक फलित प्राप्त झाले किंवा ते प्राप्त होण्याची क्षमता आली, तर ती त्या अभ्यासातील आनुषंगिक बाब ठरते; मूलतः प्राधान्यपर अशी त्या शिक्षणाची ती सिद्धी होय, असे मानता येत नाही. हे लक्षात

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

न घेता या अभ्यासाची आखणी व हा अभ्यासक्रमही मुक्रर केलेला असेल, तर त्यामुळे भाषाशिक्षणाच्या मूलभूत स्वरूपाची चुकीची कल्पना प्रसृत करण्यास ते कारणीभूत ठरेल. आजच्या मराठीभाषिक समाजात आणि शिक्षणक्षेत्रातही अशी गफलतीची विचारसरणी फैलावण्यास अनुकूल वातावरण आणि परिस्थिती आहे. याची जाणीव बाळगूनच कुणीही झाले तरी भाषेच्या अभ्यासाविषयी बोलावे–लिहावे, योजना आखाव्या, मांडणी करावी व अभ्यासक्रम मुक्रर करावे, हे योग्य व उचित होय. भाषेचा व्यावहारिक स्वरूपाचा अभ्यास हा साक्षात विशिष्ट व्यावहारिक प्रयोजनपूर्तीचा असतो, असला पाहिजे. येथे भाषा हे, व्यावहारिक उद्दिष्ट साध्य करून देणारे एक साधन असते; असे साधन की ज्याचा उपयोग विशिष्ट व्यावहारिक फल साक्षात मिळविण्यासाठी करावयाचा असतो; किंवा असा तो उपयोग होत असतो. हा भाषेचा उपयोग उपयोजनी स्वरूपाचा असतो; तो सैद्धान्तिक स्वरूपाचा नसतो; तो ज्ञानात्मक किंवा साध्य स्वरूपाचा नसतो; सैद्धान्तिक किंवा साध्यस्वरूपी भाषाभ्यासाचा उपयोगही व्यावहारिक मराठीच्या शिक्षणात होत असतो, हे खरे असले, तरी तो स्वरूपतःच वेगळा अभ्यासप्रकार असतो. तेव्हा, व्यावहारिक मराठीचा अभ्यास आणि अभ्यासक्रम हे मूलतःच भाषेच्या शैक्षणिक किंवा विद्याक्षेत्रीय अभ्यासाहून आणि अभ्यासक्रमाहून भिन्न स्वरूपाचे, वेगळ्या उद्दिष्टांचे आहेत, हे उमजूनच विचार केला पाहिजे व प्रत्यक्ष पावले टाकली पाहिजेत. याबाबत परस्परगल्लत केली असता भाषेच्या अभ्यासाच्या निकोप प्रवृत्तीला ते बाधक ठरेल. म्हणून तशी गल्लत न करता व्यावहारिक मराठीच्या अभ्यासाची वेगळी मांडणी केली पाहिजे.

याबाबत माझ्या नियुक्त विषयाची मर्यादा ८ वी ते १२ वी या इयत्तांमधील व्यावहारिक मराठीचे शिक्षण ही आहे. याबाबत काही एका प्रकारचा आराखडा मांडताना, घरगुती, प्राथमिक स्वरूपाची चौकशी, व्यावहारिक प्रश्नोत्तरे, देवाण-घेवाणीचे प्राथमिक भाषाव्यवहार, स्वागत, निरोप, या प्रसंगीचे भाषिक संकेत, इत्यादी गोष्टींसाठी लागणारी काही भाषिक तयारी ८ वीच्या आधीच्या शिक्षणातून व परिस्थितिजन्य आनुभविक संस्कारांमधून शिकणाऱ्याला आधीच झाली आहे, हे गृहीत धरले आहे. तसेच, प्रकल्पाचे सर्वेक्षण घटनेचे रहस्य अथवा मूळ शोधणे, घटनेची सर्वांगीण चौकशी करणे, कार्यकारण संबंध लावणे / शोधणे, जाहिरातींचे संकल्पन करणे, त्या तयार करणे (भाषिक संहिता तयार करणे), पुस्तकांची भाषांतरे करणे, चित्रपट, नाटके, नभोनाटये, संगीतिका, श्रुतिका, नृत्यनाटिकेची संहिता, दूरदर्शन-नाटय, दूरदर्शन व आकाशवाणी या माध्यमांद्वारे प्रसारित होणाऱ्या कार्यक्रमांचे संहितालेखन, इतर विविध माध्यमांद्वारे प्रकाशित व प्रसारित होणारी निवेदने इत्यादी, स्तंभलेखन किंवा सदरलेखन यांसाठी भाषिक वळणे व भाषाव्यवहार, पत्रकारितेच्या इतर अंगांशी निगडित भाषिक क्षमतेची तयारी, संशोधनक्षेत्रीय भाषेचे शिक्षण, इत्यादी विषय हे महाविद्यालयीन, विद्यापीठीय पातळीवरील व्यावहारिक मराठीच्या अभ्यासक्रमांसाठी राखून ठेवलेले असावेत, ही धारणा बाळगली आहे. या मर्यादेत ८ वी ते १२ वी या इयत्तांमधील अभ्यासक्रमांत समाविष्ट करण्यासाठी एक स्थूल रूपरेषात्मक आराखडा मांडीत आहे. या मांडणीसाठी पूर्वाधाराला मराठी परंपरा सापडली नाही. त्यामुळे हा आराखडा बराचसा अमूर्त आणि व्यावहारिक सूचना-मार्गदर्शनाबाबत मूक वाटण्याची शक्यता आहे. या त्रुटींची भरपाई अधिक लोकांनी एकत्र येऊन केलेल्या विचारामधून करून घेता येईल, अशी अपेक्षा आहे. केवळ साचाच नव्हे, व्यवहार नव्हे, तर या क्षेत्रातील विविध विषयांच्या अभ्यासाला उपयोगी पडेल असे लक्षणीय साहित्यही मुबलक किंवा वाजवी प्रमाणात उपलब्ध नसल्यामुळे या आराखड्याचे उपयोजनी स्वरूप मांडून दाखविता आलेले नाही. हा आराखडा मांडताना या विषयामधले हे एक मुक्त चिंतन, प्रकट चिंतन आहे. त्याला आकार येणे पुढील चर्चात्मक अभिसरण व अनुभव यांवर अवलंबून राहील. या भूमिकेमधून ८ वी ते १२ वी या इयत्तांसाठी अभ्यासक्रमाचा हा संकल्पित आराखडा मांडीत आहे.

### इयत्ता ८ वी

व्यावहारिक मराठीची बरीचशी प्राथमिक पूर्वतयारी ८ व्या इयत्तेत पूर्ण झाली पाहिजे, या दृष्टीने







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

या इयत्तेमधील व्यावहारिक मराठीचा अभ्यासक्रम आखला पाहिजे. हा अभ्यासक्रम आखताना विद्यार्थ्याला बोल आणि लेखनमराठीचा सर्वसामान्य व्यवहार अवगत आहे आणि औपचारिक मराठीचे सर्वसामान्य ज्ञान त्याला आहे, हे धरून चाललेले असावे. या पार्श्वभूमीवर पुढील प्रकारची त्याची भाषिक तयारी होईल, असा अभ्यासक्रम आखणे उचित ठरेल, असे म्हणावेसे वाटते :

१) संभाषणकौशल्यात गती व प्रगती. २) बाजारहाट करताना आवश्यक त्या भाषिक देवघेवीची तयारी. ३) दुकाने, कार्यालये इत्यादी ठिकाणी जाऊन विशिष्ट माहिती मिळविण्याची भाषिक क्षमता. ४) विशिष्ट ठिकाणी जाण्यासाठी नीटनेटकी मार्गदर्शनपर माहिती मिळविण्याठी व देण्यासाठी आवश्यक ती भाषिक तयारी. ५) व्यावहारिक बाबींसंबंधी छोटे छोटे परिच्छेद लिहिण्याची क्षमता व सराव. ६) लहानलहान वाक्यांची भाषांतरे करण्याची तयारी व सराव ( इंग्रजीतून मराठी, हिंदीमधून मराठी ) ७) घरगुती, कौटुंबिक स्वरूपाचा सर्व पत्रव्यवहार करता येणे, यासाठी संकेत आणि भाषाशैली यांची माहिती व सराव.

## इयत्ता ९ वी

व्यावहारिक मराठीचा जिथे अवलंब करावा, अशा काही क्षेत्रांत व अंगांत बोलभाषेचा उपयोग करणे अपरिहार्य असते. भाषा या विषयाच्या अध्ययन–अध्यापनात लक्ष्य असते ती सामान्यतः प्रमाण लेखनभाषा. जगातल्या सर्वच भाषातज्ज्ञांनी प्रमाण बोलभाषा व प्रमाण लेखनभाषा या दोहांत काही बाबींत भेद असतो व तो तसा असणे अपरिहार्य आहे, असे सांगून ठेवले आहे. हा भेद व्यावहारिक भाषेचे शिक्षण घेणाऱ्या किंवा व्यावहारिक भाषेचा उपयोग करणाऱ्या व्यक्तीला माहीत असणे आवश्यक मानले पाहिजे. तेव्हा या भेदाचे स्पष्टीकरण होईल असा भाग या शिक्षणाच्या अभ्यासक्रमात असणे आवश्यक आहे. बोलभाषा कोठे वापरावी आणि लेखनभाषा कोठे वापरावी यासंबंधीचे मार्गदर्शन अभ्यासामधून झाले पाहिजे. या दृष्टीने अभ्यासाचे काही घटक : १) प्रमाण मराठी बोलभाषा व प्रमाण मराठी लेखन भाषा यांच्यामधील भेदांची स्थाने. २) बोलभाषा मराठीचे व्याकरण इ. बोलभाषा मराठीतील खास शब्द व शब्दप्रयोग आणि वाक्यघटना. इतर अभ्यासाचे घटक : १) संभाषणात्मक मराठीचा वापर व सराव. २) विशिष्ट विषयावरील संभाषण चालू ठेवण्याची तयारी. ३) विशिष्ट विषयासंबंधी तोंडी निवेदन. ४) संवादांद्वारा विषय विशद करणे. ५) पत्रव्यवहार (खाजगी, संस्थात्मक, प्रशासनात्मक, निवेदनात्मक, चौकशीचा वगैरे) ६) आवक-जावक नोंदी. ७) विशिष्ट बाबींसंबंधी माहिती मागविणारी निवेदने आणि अशा मागणी-निवेदनांना उत्तरे देणारी निवेदने. ८) मागणी-पत्रे. ९) खेळांची परिभाषा. १०) खेळांसंबंधी घटनांची निवेदने.

## इयत्ता १० वी

क) सभांची व समारंभांची सूचनापत्रके, निमंत्रण पत्रिका.

का) सभा-संमेलनादींच्या कार्यक्रमपत्रिका.

कि) प्रवासाची माहितीपत्रे.

की) स्पर्धांची माहितीपत्रे, घोषणा, निवेदने.

कु) संदेश, निरोप, तारा, शुभेच्छा इत्यादी.

कू) सारांश करणे, विस्तार करणे.

के) स्पर्धापरीक्षांची भाषिक तयारी.

कै) अर्ज करणे, जाहिरातींना उत्तरे लिहिणे.

को) विशिष्ट विषयावर क्रमवार मुद्दे मांडणे, माहिती देणे.

कौ) जाहिराती, घोषणा, छोटी निवेदने, पत्रके, भित्तिपत्रके इत्यादींची भाषांतरे.

## इयत्ता ११ वी

च) सभांची व्याख्यानांची, परिसंवादांची, इत्यादी टिपणे घेणे.

चा) विशिष्ट विषयावर माहितीपर निवेदने तयार करणे.

चि) पर्यटकांना, प्रवाशांना, मार्गदर्शक माहितीची निवेदने तयार करणे, अशा माहितीची संकलने करणे.

ची) स्थलांची व प्रासंगिक घटनांची नोंदपर संकलने करणे.

चु) अभ्यास-शाखेनुसार विषयांची परिभाषा व माहितीच्या संदर्भनोंदी.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत





द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चू) मुद्रणप्रत तयार करण्यासंबंधी माहिती.

चे) प्रशासकीय मराठीची माहिती.

चै) विशिष्ट विषयावरील चर्चेची नोंद

## इयत्ता १२ वी

त) सभा-समारंभांची प्रास्ताविके तयार करणे, आभारासाठी संदर्भनोंदी करणे.

ता) वक्ते, लेखक इत्यादिकांचे स्थूल परिचय लिहिणे.

ति) सभा-संमेलने-समारंभ-व्याख्याने, बैठका इत्यादींची इतिवृत्ते, अहवाल तयार करणे.

ती) मसुदे तयार करणे.

तु) व्याख्याने, लेख इत्यादींसाठी टिपणे तयार करून देणे.

तू) साहित्यादींची रसग्रहणे, परीक्षणे

ते) अभ्यासशाखेनुसार विषयांतील मजकुराची इंग्रजी, फ्रेंच इत्यादी भाषांमधून भाषांतरे करणे.

तै) प्राथमिक लेखांची भाषांतरे करणे.

तो) पत्रकारिता व मुद्रितशोधन यांचा तपशीलवार परिचय, शीर्षके, उपशीर्षके तयार करणे.

तौ) मजकूर व सदरे यांच्या मांडणीसाठी मार्गदर्शनात्मक लेखन.

या अभ्यासक्रमाच्या अंमलबजावणीसाठी काही प्राथमिक पूर्वतयारी करणे प्राप्त आहे. विषयक्षेत्रे निश्चित करणे, या क्षेत्रांतील मराठीचे स्वरूप काय, यासंबंधी संशोधन करणे व मार्गदर्शक साहित्य तयार करणे, प्रमाण मराठी बोलीच्या सर्वांगीण स्वरूपाचे संशोधन करणे व त्यानुसार माहितीचे तक्ते करणे, प्रमाणबोलमराठीचे व्याकरण लिहिणे, विषयवार व्यावहारिक मराठी प्रसारण-संदेश-निवेदन इत्यादींसाठी शब्द, शब्दप्रयोग, वाक्यप्रयोग इत्यादींचे 'कोश' तयार करणे, यासाठी या व्यवहारांची पाहणी व व जिथे व्यवहार नसेल तेथे संकल्पनाशोधन करून नवे साहित्य निर्माण करणे.

विषयवार वाचनमाला ( रीडर्स ) तयार करणे. यासाठी नमुना म्हणून किंवा मार्गदर्शक म्हणून ऑक्स्फर्ड युनिव्हर्सिटी प्रेसने तयार केलेली ' इंग्लिश स्टडीज सिरीज ' उपयोगी पडेल.

विषयवार नवे साहित्य माहितगार प्रतिभावंत लेखकांकडून लिहून घेणे.

प्रात्यक्षिकांच्या मार्गदर्शनपुस्तिका तयार करणे. त्यासाठी बहुतेक विषयांत नवे लेखन करून घेणे.

या अभ्यासक्रमाच्या अंमलबजावणीबाबत दोन गोष्टी लक्षात ठेवून तरतुदी झाल्या पाहिजेत.

१. औपचारिक मराठीचा अभ्यास आणि व्यावहारिक मराठीचा अभ्यास असे दोन स्वतंत्र विभाग किंवा गट मराठीच्या अभ्यासाबाबत प्रत्येक इयत्तेत राहिले पाहिजेत; आणि २. व्यावहारिक मराठीचा अभ्यास यथासांग पार पाडण्यासाठी अनुकूल अशी मर्यादित विद्यार्थिसंख्या वर्गात ठेवण्याची व्यवस्था झाली पाहिजे. या दोन्ही बाबींमुळे मराठी भाषेच्या शिक्षणावर करावयाचा खर्च वाढणार, हे निर्विवाद आहे. पण असा खर्च वाढविण्याची तयारी ठेवल्याशिवाय एकूण मराठीचे शिक्षण व्यवस्थित व परिणामकारक होण्याची शक्यता दिसत नाही. संख्येचा प्रश्न अधिक गुंतागुंतीचा आहे. तो सोडविणे तात्काळ शक्य नसेल, तर वेळापत्रकात मराठीला अधिक वेळ देऊन हा मार्ग सुकर करता येईल.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

निव्वळ शैक्षणिक दृष्टिकोणातून विचार केला, तर संपूर्ण शिक्षणाचे माध्यम मातृभाषा हेच असावे हे मूलभूत तत्त्व मान्य केलेच पाहिजे. परंतु भारतासारख्या बहुभाषी देशात उच्च शिक्षणालाच नव्हे तर प्राथमिक शिक्षणालाही हे तत्त्व जसेच्या तसे लागू करणे शक्य नाही. राज्यघटनेने फक्त १६ प्रमुख भाषा मान्य केल्या असल्या, तरी प्रत्यक्षात शेकडो भाषा बोलणारे लहानमोठे जनसमूह या देशात आहेत. या सर्व भाषिक गटांसाठी त्यांच्या मातृभाषांच्या माध्यमातून शिक्षणाची व्यवस्था करणे शक्य नसते. म्हणून प्रत्येक पातळीवर लोकांची गरज व व्यावहारिक शक्यता यांची सांगड घालूनच माध्यमाचा विचार करणे क्रमप्राप्त असते. त्यामुळेच मग मातृभाषेऐवजी प्रादेशिक भाषांचा वापर अनिवार्य ठरतो. परंतु विशिष्ट ऐतिहासिक परिस्थितीमुळे माध्यमिक अवस्थेपर्यंत प्रादेशिक भाषांचे माध्यम सर्वत्र लागू झाले असले, तरी उच्च शिक्षणाच्या पातळीवर ते अद्याप सार्वत्रिक झालेले नाही व नजीकच्या भविष्यकाळात तसे होण्याची शक्यता दिसत नाही-

तसेच या माध्यमाच्या प्रश्नाबाबत आणखी एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. ती ही, की हा प्रश्न वरवर पाहता निव्वळ शैक्षणिक भासला व सर्व विद्यापीठे त्यासंबंधी निर्णय घेण्याला स्वायत्त व स्वतंत्र आहेत असे वारंवार म्हटले जात असले, तरी प्रत्यक्षात मात्र तो राजकारणाशी निगडित झालेला आहे.

उच्च शिक्षणाच्या माध्यमाबाबत आज मुख्य संघर्ष प्रादेशिक भाषा विरूद्ध इंग्रजी असा आहे. वस्तुतः भारतीय राज्यघटनेने मान्य केलेल्या तत्त्वाप्रमाणे अंतिम दृष्टया हिंदी हीच केंद्रशासनाची एकमेव भाषा राहणार असून ती सर्व बाबतीत इंग्रजीची जागा घेईल असे ठरले होते. तेव्हा या माध्यमाच्या प्रश्नाला प्रादेशिक भाषा की हिंदी असे स्वरूप आले असते, तर ते अधिक स्वाभाविक झाले असते. परंतु अनेकविध कारणांमुळे आजच्या राज्यकर्त्यांना शासकीय पातळीवर इंग्रजीचे उच्चाटन करून हिंदीचा वापर करण्यात सार्वत्रिक यश आलेले नाही, इतकेच नव्हे तर इंग्रजीचे वर्चस्व पूर्वीपेक्षाही वाढलेले असून त्याचे परिणाम सर्व क्षेत्रांप्रमाणे शिक्षणक्षेत्रावरही झालेले आहेत. इतके की आज माध्यमिक शिक्षणातच नव्हे, तर प्राथमिक व पूर्वप्राथमिक शिक्षणातही इंग्रजी माध्यमाच्या कॉन्व्हेन्ट व तत्सम बऱ्यावाईट शाळांची मोठ्या शहरांतच नव्हे तर लहान गावीही भरभराट होत आहे. यामुळे शैक्षणिक समस्या तर निर्माण झालेल्या आहेतच; पण या महागड्या शिक्षणाचा लाभ गरीबांना घेणे शक्य नसल्यामुळे त्यातून मोठी सामाजिक विषमता पोसली जात आहे व समाजातील असंतोषातही भर पडत आहे.

इंग्रजीचे उच्चाटन व केंद्राच्या पातळीवर हिंदीची प्रतिष्ठापना करण्याबाबतचा ठाम निर्णय घेऊन राज्यघटना अंमलात आली. त्याच वेळी तो अंमलात आणला गेला असता, तर एकूण सर्वच चित्र निराळे झाले असते. तो निर्णय अंमलात आणताना काही अडचणी अर्थातच आल्या असत्या. परंतु काही दिवस अत्यावश्यक तेवढा इंग्रजीचा उपयोग करून त्या अडचणींवर मात करता आली असती. तसेच काही ठिकाणी विशेषतः दक्षिणेकडे व कदाचित बंगाल, पूर्वांचल विभागात त्या निर्णयाला विरोधही झाला असता. परंतु त्यावेळी राजाजींसारखे नेतेसुद्धा हिंदीचे कट्टर पुरस्कर्ते असल्यामुळे ते वादळ अल्पावधीतच शांत होऊन हा प्रश्न निकालात निघाला असता; परंतु आपल्या नेहरू, पटेल प्रभृती नेत्यांनी त्यावेळी हिंदीबरोबरच बराच काळ इंग्रजीचे महत्त्व कायम ठेवण्याबाबत तडजोड केली. त्यानंतर मग इंग्रजीची पकड अधिक घट्ट होत गेली व हिंदीविरोधाची धारही तीव्र होत गेली. त्यामुळेच मग "कोणाच्याही इच्छेविरुद्ध हिंदी लादणार नाही" ही घोषणा पुढे आली. आणि हिंदी–विरोधकांना नाराज करू नये म्हणून पूर्वीचे पंतप्रधान पं. नेहरू

---

# महाविद्यालयीन अध्यापन आणि मराठी माध्यम

प्र. वा. उर्ध्वरेषे






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व लालबहादूर शास्त्री यांनी व नंतर श्रीमती इंदिरा गांधी यांनीच हे आश्वासन दिले आहे असे नाही; मध्यंतरी दोन-अडीच वर्षे सत्तेवर येऊन गेलेले हिंदीचे कट्टर पुरस्कर्ते असलेले जनता पक्षाचे पंत-प्रधान श्री. मोरारजी देसाई व त्यांचे त्यावेळचे सहकारी श्री. चरणसिंग, श्री. अटल बिहारी वाजपेयी प्रभृतींनीही हिंदीचा प्रश्न तडीस लावण्याऐवजी दक्षिणेचा अनुनय करण्यासाठी आवर्जून तसेच आश्वा-सन देण्याचे धोरण अंगिकारले. त्यामुळे आता हिंदी-बाबत जोराचा आग्रह धरणे कोणत्याच राजकीय पक्षाला वा संघटनेला शक्य राहिलेले नाही.

आपल्या राज्यघटनाकारांनी फक्त भाषेच्या प्रश्नाबाबतच आधी तडजोड केली असे नाही, तर भाषावार प्रांतरचनेचे सर्वमान्य तत्त्वही त्यांनी केवळ राजकीय हेतूने पार गुंडाळून ठेवले होते. परंतु त्या प्रश्नावर लोकक्षोभाचे डोंब उसळल्यामुळे राज्य-कर्त्यांना आंध्र, महाराष्ट्र, गुजरात, पंजाब वगैरे पूर्वी नाकारलेली एकभाषिक राज्ये निर्माण करणे भाग पडले. तसे पाहिले तर या एकभाषिक राज्यांमुळे जे उत्साहाचे वातावरण निर्माण झाले, त्यावेळी राज्यपातळीवर प्रादेशिक भाषांचा वापर सार्वत्रिक करण्याची व तेवढ्या प्रमाणात तरी इंग्रजीची मगर-मिठी सैल करण्याची पुनः एक उत्तम संधी प्राप्त झाली होती. परंतु त्याही बाबतीत फार ढिलाई व दिरंगाई होत गेली व मग इंग्रजीच्या उच्चाटना-बाबत लोकांच्या भावनांची तीव्रताही कमी होत गेली. त्यामुळे प्रादेशिक भाषा या राज्यशासनाच्या भाषा व्हाव्यात असे कायदे होऊनही प्रत्यक्षात त्याबाबत फारशी प्रगती झालेली नाही. नुकत्याच पार पडलेल्या राजभाषावर्षात या प्रादेशिक भाषांचा वापर सार्वत्रिक करण्यावर पुनः भर देण्यात आलेला असला व त्यासाठी अनेक चर्चासत्रे व परि-संवाद झाले असले, तरी त्या प्रक्रियेला वेग आलेला नाही व येण्याची फारशी शक्यताही दिसत नाही.

अशा प्रकारची ही गुंतागुंतीची भाषिक समस्या सोडविण्यासाठी आपल्या राज्यकर्त्यांनी शोधून काढ-लेल्या त्रिभाषासूत्राबाबतची परिस्थिती अशीच असमाधानकारक आहे.

या त्रिभाषा सूत्रातील मातृभाषा (किंवा प्रादेशिक भाषा) व इंग्रजी ही व्यवस्था समग्र भारताला समान आहे. त्याबाबत मतभेद नाहीत. परंतु तिसऱ्या भाषेचा प्रश्न मात्र वादग्रस्तच नव्हे, तर संघर्षमय आहे. अ-हिंदीभाषी राज्यांमध्ये हिंदी ही तिसरी भाषा असावी हे महाराष्ट्र, गुजरात, पंजाब ( व बहुधा ओरिसा) अशा उत्तरेतील काही राज्यांना मान्य असून त्यांनी माध्यमिक शिक्षणाला ते धोरण तत्परतेने लागू केले आहे. परंतु दक्षिणेतील राज्ये, बंगाल व पूर्वा-चल विभागातील नागालँड प्रभृतींचा हिंदीला तीव्र विरोध असून त्यांनी त्रिभाषासूत्र अमलात आणण्याला सातत्याने नकार दिला आहे. त्याबाबतीत त्यांचे मन वळविण्यात केंद्र सरकारला यश आलेले नाही व सक्ती न करण्याला तर सर्वच पक्षाचे नेते वचनबद्ध असल्यामुळे यापुढेही त्या राज्यांना ते सूत्र लागू होण्याचा संभव फार कमी, किंबहुना अशक्यच आहे.

या बाबतीतील हिंदी-भाषी राज्यांतील परिस्थिती निराळी, पण "त्रि-भाषा" या दृष्टीने विपरीतच आहे. अ-हिंदी भाषिकांवर पडणाऱ्या तीन भाषांच्या बोजाशी समतोल साधावा म्हणून हिंदी-भाषिकांच्या माध्यमिक शिक्षणक्रमात हिंदी (प्रादेशिक भाषा) व इंग्रजी यांच्या जोडीला कोणत्या तरी एका अ-हिंदी भारतीय भाषेचा ( मराठी, गुजराती, बंगाली, तामीळ, तेलगु इत्यादी ) समावेश असावा अशी त्रिभाषासूत्रातील व्यवस्था आहे. परंतु हिंदी भाषि-कांना प्रत्यक्ष व्यवहारात या तिसऱ्या भाषेची गरज वा उपयोग नसल्यामुळे त्या सूत्राची फारशी अमल-बजावणी होत नाही. काही ठिकाणी या त्रिभाषा-सूत्राचा सोईस्कर अर्थ लावून उर्दू किंवा संस्कृत या भाषा शिकविल्या जातात आणि त्या भाषांचा अभ्यासक्रम, अध्यापन व परीक्षा हे सर्वच प्रकार इतके जुजबी व नाममात्र असतात, की ती त्रिभाषा-सूत्राची अंमलबजावणी की विडंबन असा प्रश्न पडतो.

याखेरीज हिंदी-भाषी राज्यांमध्ये आणखी अशी गुंतागुंत आहे, की तिसरी भाषा तर राहोच पण हिंदी हीच केंद्रशासनाची भाषा होणार या विश्वासाने बऱ्याच ठिकाणी इंग्रजीकडेही दुर्लक्ष झाले व तेथे ते द्विभाषासूत्रही न होता एकभाषासूत्रच राहिले आहे. प्रजासत्ताक राज्याच्या स्थापने-नंतरच्या दहा-पंधरा वर्षांत या राज्यांत अशा प्रकारे इंग्रजीचे अवमूल्यन होत गेले, परंतु नंतर मात्र केंद्रशासनाच्या कारभारात, विज्ञान व तंत्रविषयक


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शिक्षणात व उद्योगधंदे व व्यापाराच्या क्षेत्रात इंग्रजीचे महत्त्व कमी होण्याऐवजी वाढत आहे हे त्यांच्या ध्यानात आले. त्यामुळे आता या हिंदी-भाषी राज्यांमध्येही इंग्रजीला व इंग्रजी माध्यमाला मोठी प्रतिष्ठा प्राप्त झाली असून तेथेही कॉन्व्हेंट्स व कॉन्व्हेंटसम इंग्रजी माध्यमाच्या शाळांची मागणी वाढत्या प्रमाणावर आहे व त्या मागणीच्या पूर्तीसाठी तशा शाळा अगदी पूर्व-प्राथमिक अवस्थेपासून जागोजागी निघू लागल्या आहेत. माध्यमिक शिक्षणाच्या क्षेत्रातही या राज्यांत अनेक ठिकाणी व उच्च शिक्षणात बहुतेक ठिकाणी विज्ञानाचे पदवी-परीक्षेपर्यंतचे माध्यम हिंदी करण्यात आले होते. ते आता पुनः इंग्रजी करण्यात आलेले आहे व तंत्र-विषयक, वैद्यक वगैरे शाखांत (आणि विज्ञानाच्याही स्नातकोत्तर अभ्यासक्रमात ) तर याही राज्यांमध्ये इंग्रजी माध्यम पूर्वी होते तसेच आजही कायम आहे.

या त्रिभाषासूत्राच्या व त्याच्याशी निगडित करण्यात आलेल्या राष्ट्रीय एकात्मतेच्या कल्पनेतून भारतीय भाषासंस्थानच्या विभागीय केंद्राच्या-मार्फत विशेषत: माध्यमिक शिक्षकांना निरनिराळ्या भाषा शिकविण्याची व त्यांच्यामार्फत त्या भाषांचा प्रसार सर्वत्र करण्याची महत्त्वाकांक्षी योजना गेली दहा वर्षे राबविण्यात येत आहे. परंतु त्या योजनेमुळे अनेक लोकांना भारतीय भाषा शिकण्याची सोय झाली हे त्या योजनेचे चांगले फलित असले, तरी त्रिभाषासूत्राचा सार्वत्रिक अंमल व्हावा हे उद्दिष्ट त्यामुळे अजिबात साध्य झालेले नाही व होण्याची शक्यताही नाही हे अगदी स्पष्ट आहे.

एकूण भाषिक परिस्थितीचा या पार्श्वभूमीवर महाराष्ट्राचा विचार केला तर असे दिसते की, येथे हिंदीविरोधाचे वातावरण अस्तित्वात नाही. एवढेच नव्हे तर हिंदीसहित त्रिभाषासूत्र प्रामाणिकपणे अंमलात आणले गेलेले आहे. परंतु इंग्रजीच्या उच्चाटनाला मात्र आज येथेही परिस्थिती अनुकूल नाही, व त्यामुळेच शासनव्यवहारातील मराठीच्या वापराबाबतची गती फार मंद आहे. या भाषाविषयक परिस्थितीचे प्रतिबिंब अर्थातच शिक्षणक्षेत्रातही पडलेले आहे व एकभाषिक राज्याच्या निर्मितीच्या वेळी होते ते वातावरण आता बदलले असून त्या संदर्भात शिक्षणाच्या माध्यमाबाबत फेरविचार करणे क्रमप्राप्त झाले आहे.

या बाबतीत आज वस्तुस्थिती अशी आहे, की पश्चिम महाराष्ट्र, विदर्भ व मराठवाडा हे तीन विभाग पूर्वी निरनिराळ्या 'द्वि' किंवा 'त्रि-भाषिक' राज्यांमध्ये होते, त्यामुळे ऐतिहासिक दृष्टचा तेथील भाषिक परिस्थिती भिन्न होती. परंतु आज मात्र या तिन्ही विभागातील उच्च शिक्षणाबाबत अशी स्थिती आहे, की कला, वाणिज्य, गृहविज्ञान व शिक्षणशास्त्र या शाखांचे पदवीपरीक्षांपर्यंतचे माध्यम सामान्यत: सर्वत्र मराठी असून काही ठिकाणी हिंदी व इंग्रजीचे माध्यम उपलब्ध आहे, तसेच बहुतेक ठिकाणी या शाखांमधील स्नातकोत्तर अभ्यासक्रमात इंग्रजीचा प्रभाव अधिक असला, तरी तेथेही बऱ्याच ठिकाणी मराठी माध्यमाचा वापर होतो. परंतु विज्ञान, तंत्र-विज्ञान, वैद्यक, कायदा (व बिझिनेस मॅनेजमेंट) वगैरे शाखांमध्ये मात्र इंग्रजी माध्यमाचा वापर सार्वत्रिक असून ते बदलण्याची मागणीही आता फारशी ऐकू येईनाशी झाली आहे. मुंबई, पुणे, नागपूर, मराठवाडा व शिवाजी या पाचही विद्यापीठांत हीच परिस्थिती आहे. एस्. एन्. डी. टी. महिला विद्यापीठात मराठी व गुजराती माध्यम प्रारंभापासून असले, तरी तेथेही ते विज्ञान व तंत्रविज्ञानाचे माध्यम नाही. याखेरीज कृषी विद्यापीठे, आय. आय. टी.सारख्या संस्था व गोखले इन्स्टिटयूट- टाटा इन्स्टिटयूटसारख्या संशोधनसंस्था, बिझिनेस मॅनेजमेंट वगैरे अनेक नवे अभ्यासक्रम, या क्षेत्रांत तर संपूर्णपणे इंग्रजी माध्यमाचाच पगडा असून तेथे प्रादेशिक भाषांच्या माध्यमांची मागणी उत्पन्न होण्याचीही शक्यता आज दिसत नाही.

या संदर्भात दोन मोठ्या पण फसलेल्या प्रयोगांचा उल्लेख करणे आवश्यक आहे.

यांपैकी पहिला प्रयोग नागपूर विद्यापीठात झाला होता. स्वातंत्र्यप्राप्तीच्या वेळी द्वैभाषिक मध्य-प्रदेशात असलेल्या या विद्यापीठात इंग्रजीऐवजी मराठी व हिंदी माध्यम सुरू करण्याचा जोराचा प्रयत्न झाला व त्याला दृश्य स्वरूपही आले होते. तेथे कला, वाणिज्य व शिक्षणशास्त्र या शाखांच्या जोडीला विज्ञानशाखेतही मराठी व हिंदी माध्यमाचा वापर प्रत्यक्ष सुरू झाला होता. व पदवीपरीक्षे-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पर्यंत त्या माध्यमातून परीक्षा घेण्यात येऊ लागल्या होत्या. त्यासाठी मराठी व हिंदी क्रमिक पुस्तकांच्या प्रकाशनाचा एक मोठा प्रकल्प डॉ. रघुवीर यांच्या नेतृत्वाखाली उभारण्यात आला होता. त्या योजनेमुळे तेथे इंग्रजी माध्यम हा अपवाद होता व मराठी किंवा हिंदी मातृभाषा नसलेल्या विद्यार्थ्यांनाच तो उपलब्ध होता. परंतु अनेक इंग्रजीवादी बड्या मंडळींनी, विशेषतः वकील मंडळींनी व विज्ञानाच्या प्राध्यापकांनी मिळून विरोधी प्रचाराची जंगी मोहीम उभारली व अल्पावधीतच ती योजना हाणून पाडली. त्यामुळे विज्ञानशाखेत ती गाडी पुनः इंग्रजीच्या रुळावर आली व ती पकड इतकी भक्कम झाली की, विज्ञानशाखेत कधी काळी मराठी-हिंदी माध्यमातून अध्यापन व परीक्षा होत होत्या याची आता कोणाला आठवणही राहिलेली नाही.

मराठवाडा विभाग पूर्वीच्या निझाम राज्यात असताना तेथे उस्मानिया विद्यापीठाने इंग्रजीऐवजी उर्दू माध्यमाचा प्रयोग केला होता व उर्दू ही मातृभाषा नसलेल्या मराठी भाषिकांनाही तो लागू होता. त्यामुळे तो विभाग महाराष्ट्रात आल्यानंतर उर्दूकडून इंग्रजीकडे वळण्याऐवजी मराठीकडे वळणे अधिक सुलभ झाले असते, पण तेथेही फक्त कला-वाणिज्य शाखांपुरते मराठी माध्यम झाले व विज्ञान –तंत्रविज्ञान, कायदा वगैरे शाखांमध्ये इंग्रजी माध्यमच सुरू झाले व तीच परिस्थिती आजही कायम आहे. या संदर्भातील दुसरा प्रयोग– किंवा प्रकल्प – म्हणजे विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळाचा. प्रादेशिक भाषांचे माध्यम सर्वत्र सुरू व्हावे असे केंद्रशासनाचे व विद्यापीठ अनुदान मंडळाचे अधिकृत धोरण असल्याकारणाने केंद्रसरकारने कोटयवधी रुपयांची अनुदाने देऊन अनेक राज्यांत अशी विद्यापीठपातळीवरील ग्रंथनिर्मितीमंडळे काढली व त्याच योजनेचा भाग म्हणून सहा विद्यापीठांचे एक महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मितीमंडळ अस्तित्वात आले. हे मंडळ आजही अस्तित्वात आहे व त्याने दोनतीनशे ग्रंथ प्रकाशितही केले आहेत. परंतु इंग्रजीऐवजी सर्वत्र प्रादेशिक भाषांचे माध्यम सुरू करण्याचे मूळ उद्दिष्ट साध्य झालेले नसल्यामुळे या पुस्तकांपैकी बहुतेकांचे गठ्ठे तसेच पडून आहेत व आता अनुदानातही कपात झाल्यामुळे मंडळाजवळ बरीचशी हस्तलिखिते तयार असली, तरी त्यांच्या प्रकाशनाची गती मंदावली आहे. अशा प्रकारे या प्रकल्पाचा प्रयोगही अयशस्वी ठरला आहे.

या सर्व विवेचनाचे सार असे, की प्रादेशिक भाषांचे माध्यम सार्वत्रिक करण्याबाबत २०–२५ वर्षांपूर्वी जे उत्साहाचे व आशेचे वातावरण होते, ते आज राहिलेले नाही व या कालावधीत इंग्रजीची पकड अधिक भक्कम झाल्यामुळे आता पुनः कालचक्र उलटे फिरवून मागे जाणेही शक्य नाही. तेव्हा ही वस्तुस्थिती कितीही कटू वाटली, तरी ती मान्य करूनच या प्रश्नाबाबत फेरविचार केला पाहिजे. यासंबंधी काही सूचना पुढे देत आहे.

१) उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात कला (समाजशास्त्र धरून), वाणिज्य, शिक्षणशास्त्र, गृहविज्ञान अशा काही शाखांमध्ये मराठी माध्यमाने मूळ धरले आहे, या वास्तवाचे स्वागत करून स्नातकोत्तर पातळीपर्यंत हे अध्ययन–अध्यापन अधिक चांगले करण्यावर भर दिला पाहिजे. तसेच या विद्याशाखांमधील क्रमिक पुस्तकांच्या जोडीला इतरही चांगले ग्रंथ व नियतकालिके यांच्या निर्मितीला प्रोत्साहन देऊन मराठी भाषेची ती दालने समृद्ध करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. मात्र या शाखांमध्ये प्रादेशिक माध्यमातून शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांनाही सर्वसामान्य व्यवहारासाठी, राष्ट्रीय व आंतर-राज्य पातळीवरील वैचारिक देवघेवीसाठी व संशोधनासाठी इंग्रजीतील ग्रंथसंपदा व नियतकालिकांचा उपयोग करणे आवश्यक असते. म्हणून ते ज्ञान ग्रहण करण्याच्या दृष्टीने आवश्यक असलेले त्या भाषेचे (इंग्रजीचे) ज्ञान देण्याची चांगली व्यवस्था सर्व विद्यापीठांतून व महाविद्यालयांतून उपलब्ध असली पाहिजे.

तसेच या विषयातील संशोधनासाठी प्रादेशिक भाषेचा आग्रह न धरता त्याचे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवरील महत्त्व ध्यानात घेऊन इंग्रजी भाषेतून अभिव्यक्ती करण्याला प्रोत्साहन देण्यात आले पाहिजे व त्यासाठी संबंधितांना चांगले इंग्रजीचे ज्ञान देण्याची विशेष व्यवस्था केली पाहिजे.

यासाठी स्नातकोत्तर पातळीवरील सर्व विषयांच्या (प्रादेशिक भाषा व साहित्यासहित) विद्यार्थ्यांना त्यांच्या गरजेनुसार इंग्रजी भाषेच्या खास अभ्यासक्रमांची आखणी करून निदान इंग्रजी

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भाषेच्या ग्रहणक्षमतेची ( comprehensionची) चाचणी घेणारी एखादी प्रश्नपत्रिका आवश्यक करण्याचाही विचार झाला पाहिजे.

याच संदर्भात इंग्रजी व इतर भाषांच्या **साहित्याच्या** अभ्यासाबाबत असा एक विचार मांडावासा वाटतो, की परभाषांतील साहित्याचे **रसग्रहण व त्याबद्दलच्या विचारांची अभिव्यक्ती यासाठी** त्या त्या भाषांचे माध्यमच वापरण्यात यावे ( उदा. इंग्रजी साहित्यासाठी इंग्रजी) असा आग्रह आज असतो तो सोडून देऊन तेथे **प्रादेशिक भाषांच्या माध्यमाचा** वापर करण्याला मुभा देण्यात आली पाहिजे. तसे झाले तर इंग्रजी व इतर भाषांतील साहित्याचा अभ्यास अधिक प्रमाणावर व अधिक चांगला होईल, प्रादेशिक भाषांचे साहित्य समृद्ध होईल व अनुवादित साहित्याच्या निर्मितीलाही गती येईल.

२) विज्ञान, तंत्र-विज्ञान, वैद्यक, कृषी वगैरे शाखांमध्ये आता उच्च शिक्षणाच्या पातळीवर इंग्रजी माध्यमाकडून प्रादेशिक भाषांच्या माध्यमाकडे जाणे जवळजवळ अशक्यप्राय आहे, या वास्तवाला प्रांजलपणे सामोरे जाण्याची आपण तयारी केली पाहिजे व त्या दृष्टीने त्या शाखांचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना आवश्यक तेवढे इंग्रजीचे उत्तम ज्ञान देण्याची व्यवस्था केली पाहिजे. परंतु त्यासाठी माध्यमिक व प्राथमिक आणि पूर्व–प्राथमिक शिक्षणाच्या पातळीवर इंग्रजी माध्यमाच्या शाळांचा विस्तार होत असून त्यांना विशेष प्रतिष्ठा व लोकप्रियता मिळत आहे ही गोष्ट मात्र शैक्षणिक व सामाजिक अशा दोन्ही दृष्टिकोणांतून अनिष्ट आहे हे ओळखून त्या प्रवृत्तीला कटाक्षाने आळा घातला पाहिजे.

त्याचप्रमाणे शाळेत इंग्रजी माध्यम नसले, तर पुढे आपल्या मुलांना ते जड जाईल व ती मागे पडतील ही पालकांच्या मनातील भीती दूर करण्यासाठी इंग्रजीच्या खास अभ्यासक्रमांची ऐच्छिक व्यवस्था शालेय पातळीवरच करण्यात आली पाहिजे.

३) तसेच केंद्रशासनाचा व्यवहार, उच्च व सर्वोच्च न्यायालयांचे कामकाज, औद्योगिक व व्यापारी संस्थांचे व बँका वगैरेंचे व्यवहार, यांसारख्या क्षेत्रांतील इंग्रजीचे वर्चस्व आणि आंतरराष्ट्रीय भाषा म्हणून तिचे जागतिक पातळीवर वाढत असलेले महत्त्व अशा अनेक कारणांनी सर्व सुशिक्षितांना चांगले इंग्रजीचे ज्ञान आवश्यक आहे. परंतु कोटचवधी लोकांना सक्तीने इंग्रजी शिकविण्याच्या आग्रहापायी त्या शिक्षणाचा दर्जा कमालीचा खाली आला आहे. ( याही क्षेत्रात इंग्रजीसाठी सबंध देशभर राष्ट्रीय, विभागीय व राज्य पातळीवरील संस्थांचे जाळे विणून व हजारो शिक्षकांसाठी व प्राध्यापकांसाठी प्रशिक्षणाचे अभ्यासक्रम चालवूनही इंग्रजीचे अध्ययन-अध्यापन सुधारलेले नाही. हा पराभव मान्य करून त्या प्रकल्पांचीही पुनर्रचना करणे जरूरीचे आहे.) तेव्हा हिंदी भाषिकांना अ–हिंदी भाषा किंवा अ–हिंदीभाषिकांना हिंदी शिकविण्याची ज्याप्रमाणे सक्ती नसावी पण उत्तम व्यवस्था जरूर असावी, त्याचप्रमाणे इंग्रजीच्या सक्तीचा आग्रह सोडून द्यावा म्हणजे ज्यांना गरज व इच्छा आहे त्यांना इंग्रजीचे चांगले व सकस ज्ञान देण्यासाठी आपल्याकडे उपलब्ध असलेले चांगले शिक्षक व साधनसामग्री यांचा उपयोग करून इंग्रजीच्या अध्यापनाचा दर्जा खरोखरच सुधारणे शक्य होईल.

उच्च शिक्षणातील माध्यमाच्या समस्येचे स्वरूप व त्यासंबंधीच्या माझ्या सूचना येथे मांडल्या आहेत, त्याचा योग्य तो विचार व चर्चा होईल ही अपेक्षा.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

महाराष्ट्राच्या शैक्षणिक इतिहासात प्रथम, म्हणजे १९७४ साली शासनाने सर्व विद्यापीठांकरता समान कायदा अस्तित्वात आणला. त्यामुळे महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांची रचना, चौकट, निरनिराळ्या शाखा, त्यांचे अधिकार व कर्तव्ये, प्रशासकीय कारभार इत्यादींमध्ये समानता आणि सुसंगतता आणली गेली. महाराष्ट्रातील मुंबई, पुणे, नागपूर, मराठवाडा, शिवाजी व एस्. एन्. डी. टी. या विद्यापीठांच्या चौकटीची कल्पना १९७४ साली अस्तित्वात आलेल्या विद्यापीठ कायद्यावरून येते. या कायद्याच्या दुसऱ्या प्रकरणात विद्यापीठाच्या अधिकारांची व कर्तव्यांची यादी दिलेली आहे. कायदा कलम ४ (४०) नुसार विद्यापीठाने स्वत: किंवा इतर विद्यापीठांच्या सहकार्याने मराठीचा

# व्यावहारिक मराठी आणि विद्यापीठीय चौकट

शां. ब. मुजुमदार

अभ्यास आणि मराठीचा शिकविण्याचे आणि परीक्षांचे माध्यम म्हणून उपयोग करणे आवश्यक आहे असे स्पष्ट केले आहे. म्हणजेच मराठीला उत्तेजन देणे आणि तिचा निरनिराळ्या स्तरावर वापर करणे हे महाराष्ट्रातील प्रत्येक विद्यापीठाचे कायद्याने घालून दिलेले एक कर्तव्य आहे. असे असले, तरी बहुतेक विद्यापीठांचा कारभार इंग्रजीतूनच चालत असल्याचे आढळून येते. कला, वाणिज्य या विषयांचे अध्यापन मर्यादित प्रमाणात मराठीतून जरी होत असले, तरी शास्त्र, विधी, वैद्यक व अभियांत्रिकी या शाखांचे विषय अद्यापि इंग्रजी माध्यमातूनच शिकवले जातात. आणि परीक्षेमध्ये प्रश्नपत्रिकांची उत्तरे इंग्रजीतूनच लिहिली जातात.

मराठीचा वापर विद्यापीठाच्या निरनिराळ्या स्तरांवर म्हणावा तसा का होत नाही याची कारणे-सुद्धा विद्यापीठ कायद्याच्या चौकटीतच शोधणे आवश्यक आहे. विद्यापीठ कायद्यामध्ये अनेक शाखा नमूद केलेल्या आहेत. कार्यकारिणी, विद्वत्सभा, अभ्यासमंडळे आणि विद्याशाखा यांच्यामार्फत विद्यापीठाचे शैक्षणिक धोरण व त्यांची कारवाई होत असते. विद्यापीठ कायद्यामध्ये प्रत्येक विषयाला एक अभ्यासमंडळ दिलेले आहे. इंग्रजी, मराठी, हिंदी, संस्कृत इत्यादी विषयांकरिता स्वतंत्र अभ्यास-मंडळे आहेत. त्यांचे अधिकारसुद्धा स्वतंत्र आहेत. मराठी अभ्यासमंडळ, मराठीचे अध्ययन-अध्यापन, क्रमिक पुस्तके ठरविणे इत्यादी बाबींस जबाबदार असते. सर्व भाषांची अभ्यासमंडळे कलाविद्या–विशाखेखाली येतात. कला, शास्त्र, वाणिज्य वैद्यक, विधी, अभियांत्रिकी यांकरिता विद्यापीठ कायद्यामध्ये स्वतंत्र विद्याशाखांची तरतूद आहे व या प्रत्येक शाखांची निरनिराळ्या विषयांची स्वतंत्र अभ्यासमंडळे आहेत. प्रत्येक विद्याशाखेचे अधिकार स्वतंत्र आहेत. त्यांच्या बैठकी स्वतंत्रपणे होतात. आणि निरनिराळ्या बाबींसंबंधीचे ठराव विद्याशाखांमार्फत होतात. एका विद्याशाखेचा दुसऱ्या विद्याशाखेशी किंवा एका अभ्यासमंडळाचा दुसऱ्या अभ्यासमंडळाशी संबंध नसतो.

मराठी भाषेचा आग्रह कलाविद्याशाखा आणि मराठी–अभ्यासमंडळाकडून धरला जातो. वाणिज्य किंवा शास्त्रविद्याशाखांना मराठी विषय सक्तीचा करण्याचा ठराव जेव्हा कलाविद्याशाखा करते, तेव्हा कायद्याचा अधिक्षेप होतो आणि म्हणून हा ठराव शिफारसवजा होतो. तो स्वीकारावयाचा किंवा नाही हे त्या त्या विद्याशाखांच्या सदस्यांच्या मतावर अवलंबून असते. पुणे विद्यापीठात असेच एक उदाहरण अलिकडेच घडले. वाणिज्यशाखेने मराठी विषय अभ्यासक्रमातून काढून टाकला. आणि त्यामुळे मराठीवर अन्याय झाल्याचे विद्याशाखा म्हणू लागली. थोडक्यात सांगावयाचे तर विद्यापीठाची चौकटच अशी आहे की, मराठी भाषा शिकवायची की नाही, मराठीचा वापर किती प्रमाणात करावा इत्यादी बाबी त्या त्या विद्याशाखेच्या कक्षेत येत असतात. आणि म्हणून कलाविद्याशाखा किंवा मराठी अभ्यासमंडळ यांनी मराठीचा कितीही






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आग्रह धरला, तरी कायद्याप्रमाणे ते इतर विद्याशाखांवर मराठी सक्तीचे करू शकत नाहीत.

विद्यापीठाची चौकट लक्षात घेतली तर मराठी भाषेचा वापर सर्व स्तरांवर करण्यात कोणत्या अडचणी येतात हे लक्षात येईल. अशा परिस्थितीत मराठीचा वापर, मराठीचा समावेश सर्व विद्याशाखांच्या अभ्यासक्रमात करावयाचा असल्यास विद्यापीठीय चौकटीत राहून तो करावा लागेल. तो कसा करता येईल हे आपण पाहिले पाहिजे.

मराठीचा वापर विद्यापीठीय स्तरावर करण्यापूर्वी मराठीचा वापर म्हणजे नेमके काय याचा शोध व बोध घेणे आवश्यक आहे. सध्या जो मराठीबाबत आग्रह धरला जातो, तो मराठी वाङ्मयाचा अभ्यास इतर शाखांतील विद्यार्थ्यांना करण्याबद्दलचा असतो. माझ्या मते या दृष्टिकोणात बदल होणे आवश्यक आहे. मराठीचा अभ्यास म्हणजे मराठी वाङ्मयाचा अभ्यास असा अर्थ होऊ नये. वाङ्मय हे मराठी भाषेचे एक प्रमुख अंग आहे. तरी पण मराठीची जी इतर अंगे आहेत, तीही महत्त्वाची आहेत. विद्यापीठीय चौकटीत राहून मराठीच्या इतर अंगांच्या अभ्यासाचा विचार केल्यास सध्या होणारा विरोध नाहीसा होईल. उपयुक्ततेच्या दृष्टीने अशा अभ्यासक्रमांचे महत्त्व विद्यार्थ्यांना वाटून ते अधिक आवडीने या विषयांचे अध्ययन करतील.

वाणिज्य, शास्त्र, विधी, वैद्यक, अभियांत्रिकी या विषयांच्या विद्यार्थ्यांना मराठी वाङ्मयाचा अभ्यास करण्याची सक्ती करण्याऐवजी त्यांच्याकरिता त्यांच्या त्यांच्या क्षेत्रात उपयोगी पडणारे छोटे छोटे मराठीचे व्यावहारिक अभ्यासक्रम दिल्यास त्यांना ते उपयुक्त वाटतील आणि म्हणूनच त्याचा अभ्यास करणे त्यांना आवडेल. असे अनेक अभ्यासक्रम असू शकतात. हे अभ्यासक्रम तयार करण्याकरिता मराठी भाषा जाणणारे तज्ज्ञ व त्या त्या विषयातील तज्ज्ञांना एकत्र येणे आवश्यक आहे. असे झाले, तर खऱ्या अर्थाने मराठीचा वापर विद्यापीठीय स्तरावर होईल व तो मराठी भाषेच्या विकासाच्या दृष्टीनेही उपयोगी होईल. वनस्पतिशास्त्राचेच उदाहरण घ्यावयाचे झाल्यास वनस्पतिशास्त्र मराठी माध्यमातून शिकणे व शिकवणे हे वेगळे आणि इंग्रजी माध्यमातून शिकत असतानाही वनस्पतीशास्त्रातील एखाद्या विषयावर मराठीतून भाषण कसे करावे, एखाद्या वनस्पतीची उपयुक्तता, तिचे गुणधर्म यांचे मराठीतून टिपण कसे करावे याचा थोडासा अभ्यासक्रम शिकविणे वेगळे. वाणिज्य विषय इंग्रजीतून शिकल्यानंतरही मराठी भाषेतून व्यावसायिक पत्रव्यवहार कसा करावा याचा अभ्यासक्रम विद्यार्थ्यांना दिल्यास विद्यार्थ्यांना त्यांच्या अभ्यासाचा व्यवहारात उपयोग करून दाखविता येईल. कायद्याच्या विद्यार्थ्यांना मराठीतून आपले मुद्दे कसे मांडावे, कैफियत कशी लिहावी याचा अभ्यासक्रम असावा. म्हणजेच कायदा हा विषय मराठीतून शिकविण्याचा आग्रह धरण्यापेक्षा कायद्याच्या पदवीधरांना त्यांच्या व्यवसायात उपयोगी पडतील असे मराठीचे अभ्यासक्रम उपलब्ध करून देणे अधिक महत्त्वाचे वाटते. आणि ते उपलब्ध करून देण्यात आपण मराठी भाषेचा विकास साधणार आहोत हे मराठीप्रेमींनी लक्षात ठेवावयास हवे.

सर्व विद्याशाखांतील विषयांच्या शिक्षणाचे माध्यम मराठी असावे, की नाही हा एक वादाचा विषय आहे. मराठी हे शिक्षणाचे माध्यम व्हावे असे जरी मानले, तरी आज अनेक विषयांवर मराठीतून पुस्तके उपलब्ध नाहीत. सोपे पारिभाषिक शब्द उपलब्ध नाहीत. ते उपलब्ध करून देण्याची जबाबदारी कला विद्याशाखा व मराठी अभ्यासमंडळावर आहे ही वस्तुस्थिती विसरली जात आहे आणि त्यांच्याकडून केवळ मराठी वाङ्मयाच्या अभ्यासासाठी सक्ती करणारे ठराव संमत होत असतात. हे ठराव विद्यापीठाच्या चौकटीत बसू शकत नाहीत. विद्यापीठीय स्तरावर मराठी माध्यमाची सक्ती केली, त्यासाठी आवश्यक असे ग्रंथ निर्माण झाले तरीही जोपर्यंत शासन, उद्योगधंदे, मोठ्या बँका इत्यादी क्षेत्रांत इंग्रजीचे प्रस्थ आहे, तोपर्यंत विद्यार्थी इंग्रजी माध्यमाचाच हट्ट धरणार हेही आपण लक्षात ठेवले पाहिजे आणि म्हणूनच विद्यापीठांनी शासन, उद्योगधंदे, बँका इत्यादी क्षेत्रांत मराठीला प्रतिष्ठा कशी प्राप्त करून देता येईल, त्या क्षेत्रात मराठी जाणणाराला अग्रक्रम कसा देता येईल यासाठी प्रयत्न करणे आवश्यक आहे. विकले जाते ते शिकले जाते ही वस्तुस्थिती आहे. म्हणजेच मराठी माध्यमाचा शिक्षणाचे माध्यम म्हणून आग्रह आज न धरता


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मराठी भाषेतून व्यावहारिक व व्यावसायिक जीवनात उपयोगी पडतील असे अभ्यासक्रम देणे अधिक आवश्यक आहे.

मराठीचा विकास होण्याच्या दृष्टीने विद्यापीठीय चौकटीत राहून खालील गोष्टींकडे लक्ष देणे आवश्यक आहे.

१) मराठी भाषेच्या विकासासाठी आणि मातृभाषेतून शिक्षण दिल्यास समाजातील तळाच्या व्यक्तीपर्यंत नवीन विचार पोहोचतील, त्यायोगे समाजाची शक्ती वर्धन होईल, या हेतूने प्रादेशिक विद्यापीठे स्थापन झाली आहेत. हे ध्यानात घेऊन या भाषेचा विकास ही गोष्ट फक्त विद्यापीठातील मराठी विभागाची बाब नसून ती सर्व विषयांतील तज्ज्ञांची, विद्यापीठाच्या निरनिराळ्या विद्याशाखांच्या कक्षेतील आहे, हे ध्यानात घेऊन मराठीच्या विकासासाठी सर्वांनी प्रयत्नशील असले पाहिजे.

२) प्रत्येक विद्याशाखेत मराठी हे शिक्षणाचे व परीक्षेचे माध्यम करण्याची सध्याच्या परिस्थितीत सक्ती करू नये.

३) वाणिज्य, शास्त्र, वैद्यक, अभियंत्रिकी व विधिशाखातील विद्यार्थ्यांकरिता त्यांच्या व्यावहारिक व व्यावसायिक जीवनात उपयुक्त होतील व ज्यामुळे त्यांना सामाजिक व व्यावसायिक प्रतिष्ठा व अग्रक्रम मिळेल असे अभ्यासक्रम उपलब्ध करून देऊन ते सक्तीचे करणे आवश्यक आहे.

४) वरील तीनमधील उद्दिष्ट साधण्याकरिता मराठी अभ्यासमंडळ व इतर विषयांच्या अभ्यासमंडळांमध्ये संपर्क, सहकार्य व सुसंवाद निर्माण होणे आवश्यक आहे.

---

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# चर्चासार

पश्चिम विभागीय भाषाकेंद्राने ५ फेब्रुवारी ते ७ फेब्रुवारी १९८१ पर्यंत व्यावहारिक मराठी-वर एक चर्चासत्र आयोजित केले होते. या चर्चा-सत्रात निरनिराळ्या क्षेत्रांतील २५ निबंधवाच-कांनी आपले निबंध सादर केले. या तज्ज्ञांच्या निबंधांवर चर्चा करण्यासाठी केंद्राने तितकेच अधि-कारी चर्चिक निमंत्रित केले होते. निबंधवाचनावर चर्चिकांनीही अभ्यासपूर्ण टिपणं सादर केली आणि चर्चासत्रात भाग घेणाऱ्या मान्यवरांनी त्यावर खुली चर्चा केली. या सर्व चर्चेमध्ये काही लक्षणीय मुद्दे आढळल्यामुळे त्यांचे स्वतंत्र संकलन करावे या उद्देशाने हे टिपण लिहिण्यात येत आहे.

पहिला निबंध 'प्रशासकीय मराठी'वर प्रबंध सादर केलेल्या डॉ. सौ. गीता भागवत यांनी वाचला. त्यांचा निबंध होता 'प्रशासकीय मराठी'तील दुर्बोधतेविषयी. भाषासंचालनालयाचे संचालक श्री. य. शं. कानिटकर यांनी या निबंधावरील चर्चेत सांगितले की, "प्रशासकीय मराठीचा संपूर्ण आराखडाच मूळ इंग्रजी मजकुरावर बेतलेला आहे. मूळ इंग्रजी मजकुराच्या तृतीय श्रेणीतील कारकुनाने केलेल्या मराठी भाषांतरामध्ये कृत्रिमता, अस्पष्टता आणि पर्यायाने दुर्बोधता आली. शासकीय मराठी मुळातच तांत्रिक आहे. त्यात शासनयंत्रणेचा साचा इंग्रजी असल्याने ती अधिक तांत्रिक झाली आहे. या भाषेत अधिकारी–अधिकारी, अधिकारी–कनिष्ठ सेवकवर्ग, अधिकारी-जनता असे अनेक स्तर असतात. दुर्बोधतेला जोडाक्षरं जबाबदार असतात असंही समजायचं कारण नाही. काही भाषांची प्रकृती जोडाक्षरांना अनुकूल असते. त्यामुळे या सापेक्ष उच्चार सुलभतेच्य संदर्भात दुर्बोधतेचा विचार व्हावा. भाषा लोकांच्या 'कानवळणी' पडली, की दुर्बोधता उरत नाही." चर्चेचे अध्यक्ष डॉ. वसंतराव पट-वर्धनांनी दुर्बोधता अक्षरांच्या संख्येवरून मोजायची या विधानाला आक्षेप घेतला. 'किती तरी अधिक अक्षरांचे शब्द सहज रुळलेले आढळतात. मुख्यतः ज्याला त्या शब्दातून संदेश द्यायचा त्याला तो स्वच्छ समजण्याइतका शब्द सोपा असावा' असे ते म्हणाले.

'कायदा आणि मराठी' या विषयावर वाचल्या गेलेल्या दोन निबंधांवरील चर्चेत श्री. एम्. आर्. परांजपे म्हणाले, "न्यायालयातील इंग्रजीचा दर्जा खालावला म्हणून हाकाटी पिटण्यात अर्थ नाही. सर्वच ठिकाणी इंग्रजीचा दर्जा खालावला आहे. न्यायालयात मराठीचा वापर होत नाही हेही खरे नाही. इंग्रजीच्या जागी एकदम मराठी सुरू करणेही योग्य नाही. मराठीचा वापर वाढायला हवा हे मात्र खरे." प्रा. रायकर म्हणाले, "कायदा कोणत्या भाषेत आहे ह्या मुद्द्यापेक्षा लोकांना कायदा

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

समजतो, की नाही हा मुद्दा महत्त्वाचा आहे. सर्व समाजजीवनाला ग्रासून राहिलेली जित-जेते वृत्ती गेली पाहिजे."

'वाणिज्य आणि मराठी' या डॉ. प्र. चिं. शेजवलकरांच्या निबंधावर उलटसुलट चर्चा झाली. चर्चिक श्री. र. कृ. जोशी म्हणाले, "मजकूर मराठीत नसूनही जर इंग्रजी मजकूर देवनागरीत लिहिला तर सोपा, मराठी वाटतो याचा विचार व्हावा. व्यावहारिक मराठीचा अभ्यासक्रम ठरवताना व्यवहारसुलभता, हुकमीपणा, संदेशवहनातील कार्यक्षमता यांवर भर द्यावा.' हा अभ्यासक्रम वाणिज्यच्या की मराठीच्या प्राध्यापकांनी शिकवावा असा प्रश्न डॉ. मुजुमदारांनी उपस्थित केला. डॉ. शेजवलकरांनी उत्तर दिलं, "तो शिकवावा वाणिज्यच्या प्राध्यापकांनी, पण त्यांना मराठीच्या लोकांनी मदत करावी.' डॉ. अशोक केळकरांनी 'या दोघांनाही योग्य मार्गदर्शन करायला भाषाशास्त्रज्ञ रिंगमास्टर म्हणून असावेत' अशी मिस्किलपणे पुस्ती जोडली. प्रा. ऊर्ध्वरेषे म्हणाले, "व्यावहारिक मराठीचा आग्रह धरला, तर अखिल भारतीय संदर्भ सुटणार नाही का?" चर्चेचा समारोप करताना डॉ. पटवर्धन म्हणाले, "नवे शोध लागले, की त्यांचे निर्देशक नवे शब्द तयार होतात. ते शब्द रूढ झाले, की रुळतात. वाणिज्य शाखेच्या मराठीच्या संदर्भात केवळ संवादसंस्थापन हा मुख्य मुद्दा नसून या शाखेत मराठी कसं येईल याचा विचार झाला पाहिजे. खरी गोष्ट ही आहे, की आपणच मराठीच्या वापरासंबंधी तितके आग्रही नाही आहोत, सोवळं सोडून ठेवलेलं आहे आणि ओवळं सापडत नाही या अवस्थेमुळे आपल्याला हे दिगंबरत्व आलं आहे."

'डॉक्टर आणि अशिक्षित रुग्ण यांतील संवाद' या डॉ. पत्कींनी वाचलेल्या निबंधावरही बरीच चर्चा झाली. खेडूत वापरत असलेल्या भाषेतून रोगाचं स्वरूप समजून घेणे आणि उपचारांची माहिती त्याला समजेल अशा रीतीने सांगणे अशा या दुहेरी भाषिक व्यवहाराच्या सोयीसाठी प्रा. पुष्पा भावे यांनी कोशाची कल्पना मांडली. प्रचारातलं रोगाचं नाव आणि शास्त्रीय नाव अशी ती सूची असावी. यावर डॉ. केळकर म्हणाले, "ही परिभाषा डॉक्टरांनी अनुभवानेच शिकावी असा आग्रह धरू नये. भाषाशास्त्रज्ञांच्या मदतीने तयार केलेल्या छोट्या पुस्तिकेची नव्या डॉक्टरला चांगली मदत होऊ शकेल." "रुग्णांचेही शिक्षण होणे आवश्यक आहे. रुग्णांचे शब्द शुद्ध मराठी, पण डॉक्टर अतिशहरी असल्यामुळे असा प्रसंग येतो." असा य. शं. कानिटकरांचा रोख होता. चर्चेचे अध्यक्ष डॉ. मोहन आगाशे मात्र म्हणाले, की 'पाश्चात्त्य पद्धतीचं शिक्षण आणि बोली बोलणाऱ्यांशी व्यवहार, यामुळे निर्माण होणारी दरी भरून काढण्यासाठी तांत्रिक शब्दांमध्ये मराठी शब्दांची भर घालणे आवश्यक आहे.'

'कारखान्याच्या आवारातील मराठी' या श्री. वि. नी. पेंडसे यांच्या निबंधावरील चर्चिक डॉ. द. न. गोखले म्हणाले, "कारखान्यातली भाषा मजुरांना अनाकलनीय असते. पण कारखानदार त्याची दखल घेत नाहीत. चर्चा, परिसंवाद वगैरे केवळ वरिष्ठ अधिकाऱ्यांसाठीच असतात." प्रा. चंद्रकांत अडावदकर यांनी कारखान्यात मराठी 'भाषांतरकारा'च्या जागा निर्माण कराव्यात अशी सूचना केली.

प्रा. पुष्पा भावे यांच्या 'नाट्यरूपांतर आणि नभोनाट्यरूपांतर करताना उपस्थित होणारे भाषिक प्रश्न' या निबंधावर डॉ. धोंगडे यांनी चर्चा केली. ते म्हणाले, "निबंधाची मांडणी लेखकाच्या दृष्टिकोणातून केली आहे. रूपांतर अथवा नाट्यीकरणातील अडचणी मुख्यतः कलाकृतीची अविघटनशीलता, रूपांतरकाराची ताकद, स्वायत्तता, भाषिक प्रश्न या क्रमाने असतात. अर्थात भाषिक प्रश्न गौण, चौथ्या स्तरावरचा आहे." कादंबरी आणि नाटक यांची तुलना करून नाट्यरूपांतरकारास कोणती दक्षता बाळगावी लागते याचे त्यांनी विवेचन केले.

'वाचिक अभिनया'वर प्रा. कमलाकर सोनटक्के यांनी वाचलेल्या निबंधाचे चर्चिक होते श्री. माधव वझे. ते म्हणाले, 'सोनटक्कयांनी वाचिक अभिनयाची मूलतत्त्वे असा मोठा विषय घेतला. पण प्रयोगजीवी कलेच्या संदर्भात हा विचार केला नाही. नाटकात सर्व पात्रं दिग्दर्शकाचीच पट्टी वापरतात. त्यांना स्वतःची पट्टी सापडत नाही. ताल-लय इत्यादींबाबतही काही अभ्यासाची सूचना करायला

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हवी. नाटचछटेचा अभ्यास केवळ शालेय पातळीवर न होता अधिक सखोलपणे व्हावा.' प्रा. मिलिंद मालशे यांनी वाचिक अभिनय हे अभिनयाचं प्राणतत्त्व मानण्याला आक्षेप घेतला, तर प्रा. पुष्पा भावे म्हणाल्या, "नाटकाच्या भाषेचा वाचिक अभिनयाच्या संदर्भात विचार व्हावा. देवल हा एक सन्मान्य अपवाद सोडला, तर व्यावहारिक भाषेचं मराठी नाटकात प्रतिबिंब नाहीच. नाटक नितांत ढोबळ झालं आहे. शोधक झालेलं नाही." उत्तरादाखल प्रा. सोनटक्के म्हणाले, "आज दिग्दर्शक आणि तालीममास्तर यांत फरक केला जात नाही म्हणून नटांना स्वतःच्या आवाजाची पट्टी न वापरता अनुकरण करावे लागते. मराठी नाटक शब्दांच्या पलीकडे पोचलेले नाही म्हणून वाचिक अभिनयावरच लक्ष केंद्रित करावे लागते. अंधारात वाचिक अभिनयच महत्त्वाचा ठरतो."

'प्रसारमाध्यमे आणि बोलभाषा' या. श्री. व्यंकटेश माडगूळकर यांच्या निबंधावर चर्चिक श्री. ल. गो. भागवत म्हणाले, "माडगूळकरांना सिनेमाचा अनुभव असल्यामुळे त्यांनी दूरदर्शनविषयीही बोलायला हवे होते. रेडिओच्या भाषेत दोष आहेतच. त्याच चुका टी. व्ही.वरील भाषेत होतात. बोलीभाषांचा वापर अधिक व्हावा म्हणजे या चुका टाळता येतील."

प्रा. प्र. ना. परांजपे यांच्या 'अनुवादकांचे प्रशिक्षण' या निबंधावरील चर्चिक डॉ. विलास सारंग म्हणाले, "इंग्रजी जाहिरातींचं मराठी भाषांतर फार क्लिष्ट असतं. मुळातला विनोद वा अभिप्रेत अर्थ त्या भाषांतरात येत नाही. अनुवादक हे व्यावसायिक भाषांतरकार होऊ शकतात का? मराठीत चांगले कोश नाहीत ही भाषांतरकाराची सर्वांत मोठी अडचण आहे." "इंग्रजीतून आलेल्या शब्दांबाबत जर आपण उदार दृष्टी ठेवतो, तर इंग्रजी Syntan च्या मराठीवरील प्रभावाबाबतही हा दृष्टिकोण का ठेवू नये?" असा प्रश्न प्रा. रायकरांनी उपस्थित केला. 'भाषांतर करताना सांस्कृतिक संदर्भांचा विचार व्हावा' अशी सूचना प्रा. स. ह. देशपांडे यांनी केली.

'साहित्याचे अध्यापन आणि भाषेचे अध्यापन' या डॉ. ना. गो. कालेलकरांनी वाचलेल्या निबंधावर चर्चिक प्रा. म. सु. पाटील यांनी विस्तृत चर्चा केली. 'मृतभाषा' शब्दावर त्यांचा विशेष रोख होता. भाषा मृत होतात की परिवर्तित होतात? भाषेचे मृतत्व हे भाषेचे असते की साहित्याचे? भाषेची आजची दुर्बोधता म्हणजे मृतत्व हे समीकरण अतिव्याप्त ठरते असे आक्षेप त्यांनी या संदर्भात घेतले. भाषेचे मूळ स्वरूप विनिमय की आविष्कार? भाषेत जिवंतपणा कशानी येतो— ध्वनी, उच्चार, शब्द, वाक्य वापरणाऱ्याचा हेतू की हावभाव इ.? भाषेचे अध्यापन ध्वनिविचार, शब्दविचार याच क्रमाने होते काय? सांस्कृतिक वारशाने वाकलेली भाषा सांस्कृतिक वारसा उपेक्षित ठेवून शिकवता येईल का? भाषेचा अभ्यास साहित्याचा संदर्भ सोडून करता येईल का? भाषेच्या पाठ्यपुस्तकात आपण साहित्यकृती किंवा व्याजसाहित्य समाविष्ट करतो, बोलीभाषा आणि प्रमाणभाषा यांच्यामधला पूल पाठ्यपुस्तकाद्वारे बांधतो, तर लोकसाहित्याचा वापर करून हा पूल अधिक मजबूत करता येईल. भाषेच्या अध्यापनात साहित्यसापेक्ष भाषेचा विचार व्हावा. आविष्कारात्मकतेकडून निवेदनात्मकतेकडे भाषेचा होणारा प्रवास विचारात घेतला जावा इत्यादी सूचना, प्रश्न त्यांनी चर्चेत उपस्थित केले. उत्तरादाखल डॉ. केळकरांनी स्पष्ट केले की, मृत भाषा आणि जिवंत भाषा या संकल्पना रूपकात्मक आहेत. जी कोणाचीही मातृभाषा नाही ती मृतभाषा. उलट, जी कोणाची तरी का असेना मातृभाषा आहे ती जिवंत भाषा. मृत आणि जिवंत या कल्पनांमागे मूल्यभाव नाही. अर्थात परिभाषेत अशी लाक्षणिक किंवा रूपकात्मक भाषा वापरू नये. दुसऱ्या मुद्द्याच्या स्पष्टीकरणार्थ ते म्हणाले, स्वभाषा आणि परभाषा यांच्या संदर्भात भाषेचा प्रवास भिन्न असतो. स्वभाषेबाबत तो विनिमयाकडून आविष्काराकडे, तर परभाषेत आविष्काराकडून विनिमयाकडे होत असतो. ते असेही म्हणाले, की साहित्याचे अध्यापन हा स्वतंत्र विषय आहे. व्यावहारिक मराठीच्या चर्चासत्रात तो ठेवण्याचे कारण आज ना उद्या मराठीच्या प्राध्यापकांना व्यावहारिक मराठी हा विषय शिकवावा लागणार आहे. तेव्हा त्या दृष्टीने त्यांनी आपली तयारी वाढवावी.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

'परप्रांतीयांसाठी मराठी भाषा' या डॉ. विजया चिटणीस आणि डॉ. कल्याण काळे यांच्या दोन निबंधांवर श्रीमती आशा मुंडले यांनी चर्चा केली. त्या म्हणाल्या, "भाषेचे अध्यापन आणि साहित्याचे अध्यापन याविषयी नवा दृष्टिकोण ठेवल्याखेरीज भाषेच्या शिक्षकांकडे गौरवाने पाहिले जाणार नाही. W. R. L. C. चा अभ्यासक्रम केवळ परप्रांतीय शिक्षकांसाठी आहे. त्याचप्रमाणे व्यासंगी, गरजू नोकर आणि हौशी शिकणारे अशा भिन्न स्तरांवरील शिकणाऱ्यांसाठी अभ्यासक्रम असावा." श्री. य. श. कानिटकरांनी सूचना केली, "अधिकाऱ्यांना हव्या असणाऱ्या उच्च दर्जाच्या शिक्षणासाठी मराठीचे पुस्तक तयार व्हावे. शासनात संभाषणापेक्षा लेखनात्मक मराठी शिकवण्यावर अधिक भर असावा." डॉ. केळकर म्हणाले, "बँक, शासन, शिक्षक यांच्यासाठी वेगवेगळे अभ्यासक्रम आखावे लागतात हे स्पष्ट आहे, पण त्यासाठी पाया एकच असतो. प्राध्यापकांकडून काय अपेक्षा आहेत हे त्यांना स्पष्ट व्हावे. मार्केट रीसर्च करणे महत्त्वाचे. परकीयांसाठी उच्चारणकोश हवेत."

'तळातील कार्यकर्ता आणि मराठी' या डॉ. अनिल अवचट यांच्या निबंधावर चर्चा केली प्रा. सीताराम रायकर यांनी. ते म्हणाले, "मराठी माणसाच्या व्यवहाराच्या अनेक क्षेत्रांमध्ये एकोपा वाढवायला व्यावहारिक भाषेचा बराच हातभार लागेल. मराठीच्या varieties चे निरीक्षण करून त्यातून व्यावहारिक मराठी सिद्ध व्हावी. ग्रामीण भागातील मराठीच्या अनेक परी rhetorics प्रमाण मराठीत आणता येतील का ? या व्यवहारातून 'तुझी माझी भाषा एक' ही भावना निर्माण व्हावी. केवळ ग्रामीण शब्दकोशाने भागणार नाही. तर Discourse लेव्हलवर अनेक नमुने पुढे आले पाहिजेत." या संदर्भात त्यांनी प्रा. माटच्यांच्या 'भाषाभिवृद्धीची सामाजिक दृष्टी' या निबंधाचा आवर्जून उल्लेख 'केला. प्रमाणभाषेने वसाहतवाद निर्माण करू नये' असा इशाराही त्यांनी दिला. प्रमाणभाषेच्या संदर्भात मग अनेक विचार पुढे आले. 'प्रमाण भाषेची गरज नाकारता येणार नाही. ग्रामीण जनतेत प्रमाण भाषा कीर्तनकार, राजकीय नेते इ. नी प्रचलित केल्यामुळे त्यांना ती समजते. फक्त बोली आणि प्रमाणभाषेतले अंतर कमी होऊन बोलीतले सामर्थ्य, चित्रमयता तिच्यात यावी' असे श्री. कानिटकर म्हणाले. प्रमाणभाषेची गरज कोणीच नाकारीत नाही पण तिने भेद वाढवला जाऊ नये या विचारावर प्रमाणभाषा म्हणजे पांढरपेशांची भाषा, प्रमाणभाषा आणि ब्राह्मणांची भाषा यांतले घोटाळे काढून टाकले पाहिजेत, असे विचार प्रा. बोरसे व ना. ग. गोरे यांनी मांडले. डॉ. अवचट म्हणाले, ग्रामीण भाषेतल्या शक्ती नागर भाषेत येण्यासाठी ग्रामीण साहित्य प्रकाशित करणं हा एक चांगला उपाय आहे. डॉ. मुजुमदार म्हणाले, "केवळ साहित्याचा विचार करणारी मराठी साहित्य परिषद आहे. तशी भाषेचाही विचार करणारी मराठी भाषा परिषद असावी."

'प्रौढ साक्षरांसाठी करायच्या लेखनाची भाषा' या श्री. इरगोंडा पाटील यांच्या निबंधावर चर्चा केली श्री. मनोहर पंधे यांनी. "प्रौढांसाठी लिहिणे म्हणजे अडाणी प्रौढांना शहाणे करण्यासाठी लिहिणे, या भूमिकेतून आजवरचे लेखन झाले. प्रौढांसाठी स्वतंत्र ललित साहित्य लिहावे. प्रादेशिक बोलींच्या विविधतेमुळे अशा सुशिक्षित प्रौढांसाठी प्रादेशिक बोलींमधून लिहिणे शक्य होत नाही. क्वचित ग्रामीण लोकांचाच ग्रामीण भाषेला विरोध असतो. प्रौढांसाठी सामान्यत: जोडाक्षरविरहित लेखन असावे." त्यांच्या शेवटच्या मुद्द्यावर आक्षेप घेताना प्रा. पुष्पा भावे म्हणाल्या, "प्रश्न जोडाक्षरांचा नसून संकल्पनांचा आहे. ज्या संकल्पना जीवनातच उद्भवत नाहीत, त्या समजावून देण्याचा आहे. प्रौढ साक्षरांसाठी बालवाङ्मयपद्धतीचे लेखन केले जाते याचा विचार व्हावा."

'व्यावहारिक मराठी आणि विद्यापीठीय चौकट' या डॉ. शां. ब. मुजुमदारांच्या निबंधाचे चर्चिक डॉ. शेजवलकर अनुपस्थित होते. तरीही या निबंधावर जोरदार चर्चा झाली. वाणिज्य शाखेचे मराठी या विषयावर डॉ. मुजुमदार आणि प्रा. रमेश वरखेडे यांच्यात चकमक झडली. मुजुमदारांचे मत होते, "वाणिज्य शाखेकडे केवळ साहित्य शिकवू नये. ते त्यांना निरुपयोगी आणि कंटाळवाणे वाटेल. त्यांना व्यावहारिक मराठीचा अभ्यासक्रम नेमावा." श्री. वरखेड्यांचा 'मराठी फक्त वाणिज्यच्या प्राध्या

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पकांनी शिकवावे' याला आक्षेप होता. यापुढे जाऊन प्रा. शांताराम कुलकर्णी म्हणाले "वाणिज्य शाखेलासुद्धा साहित्यच शिकवावे. साहित्याचा अभ्यास केवळ वाङ्मयीन निकषांवर न करता जीवनस्पर्शित्वाच्या निकषांवर केला जावा." तापणाऱ्या वातावरणात डॉ. केळकरांनी सांगितले, "प्रथम अभिनिवेशाचे जोडे बाहेर काढून या. मराठीची वाणिज्य शाखेकडे आवश्यकता पटवणे हा महत्त्वाचा प्रश्न आहे. साहित्य अनेकजण नाकारतात. साहित्याची रुची वाढेल असे प्रयत्न साहित्याच्या अभिमान्यांनी करायला हवेत." मराठी शिकवण्याचे त्यांनी तीन अर्थ स्पष्ट केले. पहिला, मराठीत संवाद करण्यास विद्यार्थ्यांना पात्र बनवणे म्हणजे व्यावहारिक मराठी शिकविणे. दुसरा, ललित वाङ्मयाची रुची निर्माण करण्यासाठी विद्यार्थ्यांना पचतील, रुचतील अशी पुस्तके नेमणे आणि तिसरा अर्थ — मेडिकल, इंजिनिअरिंग हे विषय घेणारे बुद्धिमान विद्यार्थी रसिक असतात. त्यांची रसिकता जोपासणे." या संदर्भात श्री. कानिटकरांनी सांगितले, "मराठीचा विचार फक्त साहित्याच्याच अंगाने होतो आहे. मराठी विज्ञान परिषद, मराठी समाजविज्ञान परिषद, मराठी अर्थशास्त्र परिषद, यांच्या कार्याचादेखील इथे विचार व्हावा."

समारोपात श्री. नानासाहेब गोरे म्हणाले, "सुशिक्षित लोकही इंग्रजीतील गुन्हेगार-वाङ्मय वाचतात. मराठीची आस्थाच कोणाला उरलेली नाही. अशा परिस्थितीत मराठीने आक्रमक बनले पाहिजे."

श्री. गोविंद तळवलकरांच्या 'वृत्तपत्रीय मराठी'-वरसुद्धा बरीच उलटसुलट चर्चा झाली, डॉ. ल. ना. गोखले म्हणाले, "प्रत्येक वर्तमानपत्राजवळ स्वतःचे 'स्टाइल बुक' असावे. मथळ्यांचे मराठी, बातम्यांचे मराठी, अग्रलेखांचे मराठी असे तीन भाग करण्यात यावेत. वाचकांशी समनुयोग (Communication) साधण्यासाठी चित्र, रिकामी जागा, टाइप या सर्वांचाच विचार व्हावा." डॉ. केळकरांनी वृत्तपत्रांनी मुलांची भाषा बिघडवली असा आक्षेप घेतला. डॉ. अवचटांनी वृत्तपत्रातली तथाकथित काव्यमय भाषा मारक ठरते असे सांगितले. प्रा. स. शि. भावे म्हणाले, "वार्ताहरांना व्याख्यानविषयांचे ज्ञान नसते, त्यामुळे आकलन न झालेले भोंगळ विचार भोंगळ भाषेतून व्यक्त केले जातात." रायकरांनी सुचवले, "इंग्रजी हॅटट्रिकसारख्या शब्दाचे तिहेरी मुकुट असले भाषांतर न करता या कल्पना Paraphrase कराव्यात." श्री. पु. ल. देशपांडे म्हणाले, "चाळीस पैशाच्या वृत्तपत्रात ३८ पैशाच्या जाहिराती असतात. त्यातूनही या जाहिरातीतले मराठी भयंकर असते. त्यावर संपादकांचे नियंत्रण नसते." पुढे त्यांनी अशीही एक सूचना केली की, "वृत्तपत्राची भाषा हे लिखित स्वरूपातले आणि यंत्रणा, छापखाना, कॉलम यांच्या प्रभावाखाली असलेले माध्यम आहे. इंग्रजीत जसे काही मोठे शब्द लहान केलेले आहेत तसा मराठीतही प्रयत्न व्हावा." प्रभाकर ऊर्ध्वरेषे यांनीही एक सूचना केली. ते म्हणाले, "वृत्तपत्रांच्या भाषेचे शिक्षण दिले पाहिजे. त्यासाठी स्वतंत्र पुस्तिका तयार कराव्यात. विशेषनामांच्या बरोबर उच्चारणासाठी Phonetic script चा उपयोग करावा." आक्षेपांना उत्तर देताना श्री. तळवलकर म्हणाले, "शाळाकॉलेजातून भाषा शिकून येणारेच वृत्तपत्रांमधून लिहितात, त्यामुळे दोष फक्त वृत्तपत्रांचाच नाही." त्यांनी वृत्तपत्रांनी भाषा बिघडवली हा आक्षेप अमान्य केला. उलट क्रीडा, राजकारण, विज्ञान यांसारख्या क्षेत्रांत भाषा निर्माण करून त्यांनी काही भरच घातली आहे असे ते म्हणाले.

'व्यावहारिक मराठीची गरज आणि मागणी' या श्री. ह. मो. मराठ्यांच्या निबंधाचे चर्चिक होते डॉ. ना. गो. कालेलकर. ते म्हणाले, "भाषेचे स्वरूप प्रयत्नांनी निश्चित करता येत नाही. काही थोड्या बाबतींत वळण देता येईल. नैसर्गिक आणि प्राथमिक गरजा भागवणाऱ्या दैनिक विनिमयाच्या भाषेमध्ये कोणीही वळण लावण्याचा प्रयत्न करणार नाही. शासकीय यंत्रणेतील भाषेला थोडे वळण देता येईल. पण ती भाषा दैनिक व्यवहारात वापरली जाणार नाही." इंग्रजीच्या आक्रमणाबद्दल ते म्हणाले, "परभाषेचे मराठीवर आक्रमण होते आहे ही तक्रारही चुकीची आहे. इंग्रजी ज्ञानभाषा असल्यामुळे तिचा प्रभाव राहणार, तसेच हिंदी संपर्कभाषा असल्यामुळे काही मर्यादेपर्यंत तिची

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

गरजही राहणार. चालू स्थितीत फारसा बदल करण्याचे कारण नाही." भाषाशुद्धीविषयी प्रा. यास्मिन शेख म्हणाल्या, "भाषाशुद्धीचा जास्त आग्रह धरू नये हे जरी खरे असले, तरी थोडा आग्रह धरलाच पाहिजे. खोटया प्रतिष्ठेसाठी होणाऱ्या इंग्रजीच्या वापराला बंधन घातलेच पाहिजे इंग्रजीचे आक्रमण शब्दपातळीवर चालेल, ते वाक्य-पातळीवर होऊ नये." अर्धशिक्षित समाजाची भाषा अर्धशुद्धच असणार–ती स्वीकारावी या मराठ्यांच्या विधानाला प्रा. मालशांनी आक्षेप घेतला. श्रीमती आशा मुंडले म्हणाल्या, "ज्ञानाची भूक वाढलेला समाज अर्धशिक्षित आहे आणि पुस्तकं लिहिणारे लेखक मात्र पदवीधर आहेत. या दोघांमध्ये दरी आहे. ही दरी मिटवण्यासाठी अर्धशिक्षितांनाच लिहायला प्रवृत्त केले पाहिजे. यामुळे जुन्यांची मक्तेदारी संपली, तरी मराठीचे नुकसान होणार नाही. वर्तमानपत्रांनी याबाबतीत पुढाकार घ्यावा." प्रा. रायकर म्हणाले, "सध्या साहित्याचे अध्यापन इंग्रजीच्या मॉडेलवर होते, त्यामुळे ते परिणामकारक होत नाही. केवळ साहित्यिक संदर्भामध्ये भाषा न शिकवता संस्कृतीच्या संदर्भातही भाषा शिकवावी. नुसत्याच व्यावहारिक मराठीने नुकसान होईल. प्रत्येक शाखेची गरज पाहून त्या त्या style ने मराठी शिकवावे."

'व्यावहारिक इंग्रजी' वरील डॉ. तिलोत्तमा दासवाणी यांच्या निबंधावर चर्चा केली डॉ. चं. जे. दासवाणी यांनी. ते म्हणाले, "व्यावहारिक मराठी हा विषय द्वितीय भाषा म्हणून शिकवण्याच्या कक्षेतला आहे. मातृभाषेच्या अध्यापनाच्या संदर्भात हा प्रश्न येत नाही. इथली अपेक्षित चर्चा भाषानियोजनाच्या कक्षेतली आहे. व्यावहारिक भाषेची मागणी ही भाषेच्या मर्यादित उपयोगाची मागणी आहे. उलट, इथे व्यापक उपयोगाची मागणी अभिप्रेत आहे."

डॉ. भालचंद्र फडके अनुपस्थित असल्यामुळे 'निरंतर शिक्षण आणि व्यावहारिक मराठी' या निबंधावरचे र्चचिक प्रा. स. ह. देशपांडे यांनी आपले टिपणच फक्त वाचले. "निरक्षर, अशिक्षित, मर्यादित शब्दसंग्रह असलेल्या लोकांशी संवाद कसा साधावा या संदर्भात त्यांनी आपले विचार मांडले. समाजाच्या वरच्या स्तरातून खालच्या स्तरापर्यंत जसजसे जाऊ तसतसा शब्दसंग्रह कमी होत जातो. विचारशक्ती मर्यादित होत जाते. वारली समाजातील माणसे फार कमी बोलतात. अशा समाजावर प्रमाणभाषा बोलणाऱ्यांचे आक्रमण अपरिहार्य राहणार. अशा समाजाचे प्रबोधन करण्यासाठी त्यांची भाषा, सोपी भाषा वापरली पाहिजे." डॉ. अवचटांचा सूर थोडा वेगळा होता. "ज्यावेळी शब्दसंग्रह कमी पडतो तेव्हा कवी प्रतिमेचा आश्रय घेतात. अशिक्षित लोकही प्रतिमांचाच वापर करतात. सोपेपणाचा आग्रह कितपत धरणे योग्य आहे ? नेहमीच पातळ करून सांगण्यातही धोका आहे. थोडेसे तरी आव्हान पाहिजे." प्रा. रायकर म्हणाले, "आदिवासींचे शब्द कमी असले, तरी आपला सर्व भाषिक व्यवहार ते उत्तम करू शकतात. केवळ abstract thinking हे श्रेष्ठत्वाचे गमक मानता येणार नाही. ते नसतानाही आदिवासी गुंतागुंतीचा व्यवहार करू शकतात."

या बैठकीच्या समारोपात श्री. मुणगेकर म्हणाले, 'सकाळचे'चे संपादक श्री. परुळेकर यांनी 'स्टाइल बुक' निर्माण करण्याचा प्रयत्न केला होता. वृत्तपत्राइतके भाषाविषयक प्रयोग साहित्यिकही करत नाही. 'सुबोध, शुद्ध' मराठीत लेखन करणारे पत्रकार निर्माण झाले पाहिजेत, भाषांतराचे पद्धतशीर शिक्षण देण्याची सोय व्हावी, पारिभाषिक शब्दकोश संकल्पनांच्या विवरणासह प्रसिद्ध व्हावेत, शब्द घडवण्याचे सामर्थ्य इंग्रजीप्रमाणे मराठीतही यावे, तसे स्वातंत्र्य असावे अशा काही सूचनाही त्यांनी केल्या.

व्यावहारिक मराठीचा पाया इ. १ ते ७ – डॉ. रा. सो. सराफ, इ. ८ ते १२ – प्रा. वसंत दावतर आणि 'महाविद्यालयीन अध्यापन आणि मराठी माध्यम'– प्रा. प्रभाकर ऊर्ध्वरेषे हे तीनही निबंध एकाच वर्तुळात येणारे होते. पहिल्या निबंधाचे र्चचिक डॉ. द. न. गोखले म्हणाले, 'प्रमाण भाषा आणि बहुजनसमाजाची भाषा यामधील अंतर कमी करून बहुजनसमाजाला प्रमाणभाषेकडे वळवणे हा व्यावहारिक मराठीचा उद्देश असेल. पाठ्यपुस्तकात मुलांच्या अनुभवविश्वातलेच धडे असावेत. मुलांची भाषा सुधारण्याची जबाबदारी भाषेच्या पुस्तकांप्रमाणे इतर विषयांच्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पुस्तकांनीही उचलावी. ५ वी ते ७ वी च्या पुस्तकांत साहित्य आणल्यामुळे पुस्तकं साहित्यिक बनली. पाठ्यपुस्तकात साहित्य आणि इतर क्षेत्रे यांची सांगड घालावी. शिकवले जाणारे सगळेच विषय परीक्षेच्या तंत्रात घालावेत असे नाही.' प्रा. प्र. ना. परांजपे यांनी व्यावहारिक मराठीच्या Functional Marathi आणि Practical Marathi या दोन अर्थांकडे लक्ष वेधून सांगितले, 'की केवळ जीवनव्यवहारात मराठी कशी वापरायची यापेक्षा वेगवेगळ्या व्यवहारात मराठी कशी वापरता येईल हे पाहणे आवश्यक आहे.' हे दोन्ही अर्थ संयोजकांच्या मनात होते असा खुलासा करून डॉ. केळकर म्हणाले, "शालेय व्यावहारिक मराठी लेखनाच्या कर्मकांडात फारसे अडकवू नये. मुलाला चांगले बोलता येणे निबंध लिहिण्यापेक्षा अधिक महत्त्वाचे. सातवीनंतर लिहायला सांगावे. वस्तू समक्ष असताना भाषेचा उपयोग आणि परोक्ष असताना भाषेचा उपयोग यात अंतर आहे. मध्यमवर्गीय मुलांमध्ये भाषेचा परोक्ष उपयोग करण्याची क्षमता असते. कामगारवर्गात ती नसते. ही फट बंद करण्याइतके भाषिक शिक्षण द्यावे." 'वस्तुपरोक्षतेसाठी प्रमाण भाषेचे शिक्षण आवश्यक' अशी पुस्ती प्रा. स. शि. भाव्यांनी जोडली. डॉ. इंदापूरकरांनी अभ्यासक्रम आदर्श असले, तरी अंमलबजावणी सदोष होते हे निदर्शनास आणले. प्रा. दावतरांच्या निबंधावरील चर्चेत ८ वी ते १२ वीमध्ये लेखनाकडे लक्ष द्यावे – यासाठी शिक्षणपद्धतीत बदल हवा, विद्यार्थ्यांची संख्या मर्यादित असावी. जर संख्येवर नियंत्रण शक्य नसेल, तर Parateachers ची यंत्रणा उभी करावी असे मुद्दे पुढे आले. प्रा. ऊर्ध्वरेषे यांच्या निबंधाचे चर्चिक श्री. रा. प. नेने यांनी मराठी माध्यमाबाबत राजकारण आड येते म्हणून तेच

## चर्चेत विचारासाठी मांडलेल्या काही विधायक सूचना

१) वाणिज्य शाखेचा मराठीचा अभ्यासक्रम वाणिज्याचे प्राध्यापक आणि मराठीचे प्राध्यापक यांनी मिळून ठरवावा. ह्यासाठी भाषावैज्ञानिकांचे सहकार्य व मार्गदर्शन अवश्य घ्यावे.

२) रोगाचे रूढ बोलीतील किंवा खेडुतांच्या बोलीतील नाव आणि त्याचे शास्त्रीय नाव यांची यादी देणारी छोटी पुस्तिका शिकाऊ डॉक्टरांसाठी उपलब्ध करावी.

३) कारखान्यात मराठी भाषांतरकाराची जागा निर्माण करावी.

४) वाचिक अभिनयासाठी नाट्यछटांचा अधिक सखोल अभ्यास व्हावा.

५) भाषांतरकर्त्यांसाठी उपयुक्त कोश निर्माण व्हावेत.

६) पाठ्यपुस्तकाद्वारे बोलीभाषा आणि प्रमाणभाषा यात सांधला जाणारा पूल लोकसाहित्याचा वापर करून अधिक मजबूत करता येईल.

७) व्यासंगी, गरजू नोकर आणि हौशी शिकणारे अशा भिन्नस्तरीय परभाषिकांसाठी मराठीचे अभ्यासक्रम तयार करण्यात यावेत. अधिकाऱ्यांच्या गरजेनुसार वेगवेगळे अभ्यासक्रम बनवावेत. परभाषिकांसाठी उच्चारणकोश बनवण्यात यावा.

८) मराठी साहित्य परिषदेसारखी मराठी भाषा परिषद असावी.

९) प्रत्येक वृत्तपत्राजवळ स्वतःचे 'स्टाइल-बुक' असावे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्वीकारावे ही भूमिका अमान्य केली. भिकार पाठ्यपुस्तकांमुळेही मराठी माध्यम घेण्याला नकार मिळतो असे डॉ. संगोराम म्हणाले. एकच विषय अनेक माध्यमांतून शिकवला, तर संघर्ष कमी होईल असे प्र. ना. परांजपे म्हणाले. डॉ. पुंडे यांनी विद्यापीठ ग्रंथनिर्मितीमंडळाने तज्ज्ञ प्राध्यापकांना डावलून पुस्तके लिहिली, त्यामुळे पुस्तके सदोष झाली याकडे लक्ष वेधले. डॉ. अ. रा. कामत म्हणाले, "गणित हा विषय भाषेशिवाय शिकवता येईल. पण इतर विषय दोन दोन भाषांमध्ये शिकवण्याने भाषिक प्रदूषण वाढेल." कलाशाखेत अनेक भाषा वापरल्या जातात, त्याचा दृश्य फायदा दिसतो आहे. असे र. कृ. जोशी म्हणाले. उत्तरात प्रा. ऊर्ध्वरेषे म्हणाले, "मराठी माध्यम झाल्याखेरीज पुस्तके खपणार नाहीत हे महत्त्वाचे. सक्तीचे इंग्रजी करू नये."

'व्यावहारिक हिंदी' वरील डॉ. कान्तिप्रकाश मिश्र यांच्या निबंधावर चर्चा केली डॉ. संगोराम यांनी. हिंदीकडे राष्ट्रभाषा म्हणून न पाहता राजभाषा म्हणून पहावे असे सुचवून ते म्हणाले, "शासकीय व्यवहारातले भाषांतरित हिंदी भयंकर आहे. त्यातले पारिभाषिक शब्द कठिण आहेत. पारिभाषिक शब्द बनवण्यासाठी संस्कृतचा आश्रय घ्यावा." अखेर बोधगम्यतेच्या निकषावर बंबइया हिंदीचाही विचार व्हावा असे ते म्हणाले.

या बैठकीचा समारोप डॉ. अ. रा. कामत यांनी विस्तृतपणे केला. (त्यांनी नंतर एक स्वतंत्र लेखच पाठवला. तो समाविष्ट केला आहे)

(चर्चासार देताना अवतरणचिन्हे सोयीदाखल घातली आहेत. चर्चिकाचे नेमके शब्द दिले आहेत असे समजण्याचे कारण नाही.)

— सुमन बेलवलकर व कल्याण काळे

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# लेखक-परिचय

★ **डॉ. अनिल अवचट** – महात्मा फुले समता प्रतिष्ठान, पुणे ह्या संघटनेचे कार्यकर्ते, सामाजिक प्रश्नांवर सातत्याने लेखन; 'कृष्णा', पत्रकार नगर, पुणे–४११ ०१६.

★ **प्रा. प्र. वा. ऊर्ध्वरेषे** – इंग्लिशचे निवृत्त प्राध्यापक, इंग्लिश भाषा अध्यापनक्षेत्रातील तज्ज्ञ, कामगार चळवळीतील निवृत्त कार्यकर्ते; ५२, माजी सैनिक वसाहत, पुणे–४११ ००४.

★ **डॉ. अ. रा. कामत** – सांख्यिकीचे निवृत्त प्राध्यापक, आर्थिक व शैक्षणिक प्रश्नांबद्दल लेखन करणारे मार्क्सवादी विचारवंत; ७३-२-३ लॉ कॉलेज रोड, पुणे–४११ ००४.

★ **डॉ. ना. गो. कालेलकर** – भाषाविज्ञानाचे निवृत्त प्राध्यापक, फ्रेंच साहित्याचे व्यासंगी; २०३ नील-आकाश अपार्टमेंट्स, कमला नेहरू पार्कसमोर, केतकर रोड, पुणे–४११ ००४.

★ **डॉ. कल्याण काळे** – पश्चिम-विभागीय भाषा-केन्द्र, डेक्कन कॉलेज, पुणे येथे मराठीचे प्राध्यापक; १२०६ ब-१३, म्युनिसिपल कॉलनी, शिवाजीनगर, पुणे–४११ ००४.

★ **डॉ. अशोक रा. केळकर** – प्राध्यापक, भाषाविज्ञान-प्रगत-अध्ययन-केन्द्र, डेक्कन कॉलेज, पुणे; साहित्य मीमांसक; ए–२ 'परिमल' १२३९–ए आपटे रस्ता, पुणे–४११ ००४.

★ **अॅड. नरेंद्र चपळगावकर** – मुंबई उच्च न्यायालयात अधिवक्ता (अॅडव्होकेट), सामाजिक प्रश्नांत रस; २६, नवसाई सदन, पोस्टाजवळ, मुलुंड पूर्व, मुंबई–४०० ०८१.

★ **डॉ. विजया चिटणीस-माडगूळकर** – प्राचार्या, पश्चिम-विभागीय भाषा-केन्द्र, डेक्कन कॉलेज, पुणे; ३०४ प्लेझंट अपार्टमेंट्स, १५ प्रभात रस्ता, पुणे–४११ ००४.

★ **श्री. र. कृ. जोशी** – मुंबईच्या जाहिरात व्यवसायातील सुलेखनविद्यातज्ज्ञ, मराठीतील एक प्रयोगशील कवी; उल्का अॅड्व्हर्टायझिंग, 'निर्मल', नरिमन पॉइंट, मुंबई–४०० ०२१.

★ **तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी** – विद्वान, विचारवंत, लेखक व मराठी विश्वकोशाचे प्रमुख संपादक, वाई ४१२ ८०३.

★ **श्री. गोविंद तळवलकर** – संपादक, 'महाराष्ट्र टाइम्स', मुंबई; 'राम निवास', दिनशा वाच्छा रोड, मुंबई ४०००२०.

★ **प्रा. वसंत दावतर** – मराठीचे निवृत्त प्राध्यापक, 'आलोचना' या साहित्यिक नियतकालिकाचे संपादक, मराठीच्या अध्यापनातील सुधारणांसंबंधी सक्रिय चिंतन; ३३ शेफाली, माहीम मकरंद सहनिवास, १०७४ स्वा. सावरकर मार्ग, माहीम, मुंबई ४०००१६.

★ **डॉ. तिलोत्तमा दासवाणी** – भाषाविज्ञान आणि इंग्लिश भाषा अध्यापनतज्ज्ञ; द्वारा डॉ. चं. जे. दासवाणी, प्राध्यापक निवास, पुणे विद्यापीठ परिसर, पुणे ४११००७.

★ **डॉ. स. ह. देशपांडे** – प्राध्यापक, अर्थशास्त्र विभाग, मुंबई विद्यापीठ; 'संपादक, समाज प्रबोधन पत्रिका'; 'कृष्णकुंज', १९ बी/ए, महंत मार्ग विस्तार, विलेपार्ले पूर्व, मुंबई ४०००५७.

★ **श्री. रा. प. नेने** – विविध आर्थिक-सामाजिक निरीक्षणांत भाग घेतलेले एक सामाजिक-राजकीय कार्यकर्ते; मराठे सदन, ५४४ (नवा) सदाशिव पेठ, लक्ष्मी रस्ता, पुणे ४११०३०.

★ **डॉ. सुभाष पत्की** – पुण्यातील एक नामवंत शल्यचिकित्सक; 'सुश्रुत', १३१ रास्ता पेठ, पुणे ४११०११.

★ **प्रा. प्र. ना. परांजपे** – वृत्तविद्याविभाग, पुणे विद्यापीठ येथे प्राध्यापक, ग्रंथाली वाचक चळवळीचे एक कार्यकर्ते; १–८ आगरकर नगर, पुणे ४११००१.

★ **श्री. इरगोंडा पाटील** – सातत्याने प्रौढ साक्षरांसाठी लिहिणारे एक नामवंत लेखक; १९१ शुक्रवार पेठ, पुणे ४११००२.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

★ **श्री. वि. नी. पेंडसे** – भारत सरकारच्या केंद्रीय कामगार शिक्षण मंडळाच्या पुणे केंद्रात अधिकारी; सुकृत सहकारी संस्था, अरण्येश्वर, पुणे ४११००९.

★ **डॉ. भालचंद्र फडके** – मराठी विभाग, पुणे विद्यापीठ येथे प्राध्यापक, विद्यापीठाच्या प्रौढ आणि निरंतरशिक्षण विभागातही काम; प्राध्यापक निवास, पुणे विद्यापीठ परिसर, पुणे ४११००७.

★ **प्रा. सुमन बेलवलकर** – पश्चिम–विभागीय भाषा–केंद्र, डेक्कन कॉलेज, पुणे येथे मराठीच्या प्राध्यापिका; सुंदरनगरी अपार्टमेंट्स्, सोमवार पेठ, पुणे ४११ ००२.

★ **डॉ. सौ. गीता सुभाष भागवत** – महाराष्ट्र सरकारच्या भाषासंचालन कार्यालयाच्या नागपूर शाखेत अधिकारी, प्रशासकीय मराठी या विषयावर पदवी प्रबंध लेखन; सहजीवन सोसायटी, २, शिवाजीनगर, उत्तर अंबाझरी रस्ता, नागपूर ४४० ०१०.

★ **प्रा. पुष्पा भावे** – राम नारायण रुइया महाविद्यालय, मुंबई येथे मराठीच्या प्राध्यापिका, नाट्य-चळवळीच्या तसेच समाजवादी चळवळीच्या सक्रिय अभ्यासिका; ६–२१३, सर भालचंद्र रस्ता, मुंबई ४०० ०१९.

★ **श्री. ह. मो. मराठे** – सहसंपादक, 'किर्लोस्कर', पुणे; मराठीतील एक नामवंत कथा-कादंबरीकार; आरती सोसायटी, पौड फाटा, कर्वे रस्ता, पुणे ४११ ००४.

★ **श्री. व्यंकटेश माडगूळकर** – आकाशवाणीच्या पुणे केंद्रातील एक अधिकारी, मराठीतील ज्येष्ठ आणि नामवंत कथा–कादंबरीकार, तसेच नाटककार आणि ललितगद्यलेखक; ३०४ प्लेझंट अपार्टमेंट्स्, १५ प्रभात रस्ता, पुणे ४११ ००४.

★ **श्री. क्रान्तिप्रकाश मिश्र** – भारत सरकारच्या प्रशासकांना हिंदी शिकवण्याच्या योजनेत पुणे येथे अधिकारी; संचालक, हिंदी अध्यापन योजना, सी. डी. ए.; साधू वासवाणी रस्ता, पुणे ४११००१.

★ **डॉ. शां. व. मुजुमदार** – फर्गसन महाविद्यालय, पुणे येथे वनस्पतिविज्ञान-विभागाचे प्रमुख; सिंबायोसिस, पुणे या शिक्षणसंस्थेचे संवर्धक; प्राध्यापक निवास, फर्गसन महाविद्यालय, पुणे ४११००४.

★ **प्रा. मे. पुं. रेगे** – विद्याभारती पुणे २९ ह्या संस्थेच्या गो. ध. पारीख शैक्षणिक अभ्यासकेंद्र, मुंबई ९८ या शाखेचे प्रमुख; तत्त्वज्ञानाचे व्यासंगी, 'नवभारत'चे कार्यकारी संपादक; आय. सी. एस्. एस्. आर्. होस्टेल, विद्यानगरी, कालिना, मुंबई ४०००९८.

★ **डॉ. प्र. चिं. शेजवलकर** – प्राचार्य, डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे व्यवसाय व्यवस्थापन विद्यालय, पुणे; अर्थशास्त्रज्ञ; संचालक, इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेंट डेव्हलपमेंट अँड रिसर्च, पुणे ४११००४.

★ **डॉ. रा. सो. सराफ** – संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती आणि अभ्यासक्रम-संशोधन मंडळ, पुणे; इंग्लिश भाषा-अध्यापन या क्षेत्रातील तज्ज्ञ; 'बालभारती', १७३ सेनापती बापट रोड, पुणे ४११००४.

★ **डॉ. सत्यरंजन साठे** – प्राचार्य, इंडियन लॉ सोसायटीचे विधि-महाविद्यालय, पुणे ४११००४.

★ **डॉ. राज्यश्री सुब्बय्या** – भारत सरकारच्या भारतीय-भाषा-संस्थान, म्हैसूर ह्या संस्थेत संशोधक; भारतीय-भाषा-संस्थान, मानस-गंगोत्री, म्हैसूर ५७०००६.

★ **प्रा. कमलाकर सोनटक्के** – नाट्यकलेच्या क्षेत्रात नट, दिग्दर्शक, तज्ज्ञ अध्यापक म्हणून प्रसिद्ध; संचालक, इंडियन नॅशनल थीएटर, १९/२१ हमाम स्ट्रीट, मुंबई ४०००२३.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'नवभारत' वर्ष ३४ वे अंक १ ते १२ (ऑक्टोबर १९८०–सप्टेंबर १९८१)

# लेखक–सूची ( अकारविल्हे )

अ. ना. ठाकूर

---

अंतरकर, शि. स. : 'आत्मसंकल्पना : आत्मवाद,' ऑक्टो. व नोव्हें.
: 'आत्मसंकल्पना : देहात्मवाद,' डिसें.

अवचट अनिल : ग्रामीण उपेक्षित वर्गात काम करणारा कार्यकर्ता व मराठी, ऑगस्ट–सप्टें.

आत्राम, व्यंकटेश : भारतीय शिल्प आणि गोंडी संस्कृतीचे संदर्भ, जून

इनामदार, एस्. डी. : 'आम्ही यातनांचे स्वामी' (वामन देशपांडे ), लघुकादंबरी (परीक्षण), डिसें.

उदगावकर, भालचंद्र माधव : मूलभूत गरजा, विज्ञान आणि समाजव्यवस्था, जाने.

ऊर्ध्वरेषे, प्र. वा. : महाविद्यालयीन अध्यापन आणि मराठी भाषा, ऑगस्ट–सप्टें.

कळमकर, यशवंत : 'कोसलाबद्दल' ( संपा. बाबा भांड ), परीक्षण, नोव्हें.

कामत, अ. रा. : मराठी भाषेच्या विकासाविषयी, ऑगस्ट–सप्टें.

कालेलकर, ना. गो. : 'अध्यापन : भाषेचे आणि साहित्याचे,' ऑगस्ट–सप्टें.

काशीकर, चिं. ग. : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी आणि संस्कृत विद्या, फेब्रु.–मार्च

काळे, कल्याण : अमराठी भारतीयांसाठी मराठी भाषा, ऑगस्ट–सप्टें.
: चर्चासार, ऑगस्ट –सप्टें.
: व्यावहारिक मराठी, जून

कुबल, रमेश : 'रक्ताळलेली लक्तरे' (योगेन्द्र मेश्राम), कथासंग्रह (परीक्षण), नोव्हें.

कुलकर्णी, अनिरुद्ध : तिसरे क्रांतिमूल्य, मे

कुलकर्णी, वा. म. : ऑगस्ट ८० अंकातील स्वतःच्या लेखाविषयी विस्तारपूर्वक टिप्पण (पत्र), ऑक्टो.

न. भा. २३

कुलकर्णी, वि. ना. : 'मराठी नाट्यसमीक्षेचा विकास' (चंद्रकांत धांडे)– परीक्षण, ऑक्टो.

कुलकर्णी, वि. म. : 'पाथेय' (श्रीपाद जोशी), कवितासंग्रह (परीक्षण), जाने.

कुलकर्णी, श्यामकांत : आणि बाकीचे सगळे' (शाम मनोहर), कथासंग्रह (परीक्षण), जून
: 'चाहूल' (अंबिका सरकार), कथासंग्रह (परीक्षण), जून
: 'वाघीण' ( व. बा. बोधे ), कादंबरी (परीक्षण), एप्रिल
: 'शूद्र' (सुधाकर गायकवाड), कादंबरिका (परीक्षण), जाने.

कुलकर्णी, सतीश वि.
: 'इस्कोट' ( भीमसेन देठे ), कादंबरी (परीक्षण), एप्रिल
: मार्च ८० अंकातील संपादकीयावरील प्रतिक्रिया (पत्र), ऑक्टो.
: 'स्वागत - संक्षिप्त ग्रंथपरिचय (पंचधारा, जयमहाराष्ट्र मंडळाचा विवाहविषयक प्रबोधन विशेषांक, शिवाजी महाराजांच्या नवलकथा, प्राचीन जैन प्रणयकथा, चंद्रपालखीची वाट ), ऑक्टो.
: स्वागत (सहजीवन, तेजस्वी नेतृत्व व कर्तृत्व–इंदिरा गांधी, प्रोफेसर सत्तिगिरी, झळ, कवडसे, महामायाचक्र, तीस वर्षांचे मूल, ऋतुस्पर्श, अस्तोदय), एप्रिल

केळकर, अशोक रा. (अभ्यागत संपादक) : मनोगत, ऑगस्ट–सप्टें.

कोलते, वि. भि. : श्रीचक्रधरोक्त आचार्य कोण ? डिसें.

खंडकर, अरुंधती : कौटुंबिक जीवनातील शास्त्रीजी, फेब्रु.–मार्च

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

खैरकर, दि. मा. : बुद्धधर्म व ऐतिहासिक भौतिकवाद, एप्रिल
गोखले, शोभना : 'सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास आणि कोरीव लेख' (वा. वि. मिराशी)–परीक्षण, ऑक्टो.
घाग, एकनाथ : 'कथा एका शायराची' (इंदुमती शेवडे), कादंबरी (परीक्षण), नोव्हें.
घोरपडे, दिनकर रामचंद्र : 'गांधीजींचे स्मरण : एक अन्वय', जाने.
चपळगावकर, नरेंद्र : कायदा आणि मराठी, ऑगस्ट–सप्टें.
चव्हाण, यशवंतराव : 'तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी : शास्त्र आणि शस्त्र', फेब्रु.–मार्च.
चव्हाण, रा. ना. : 'नॉन ब्रँह्मिन मुव्हमेंट इन सदर्न इंडिया १८७३–१९४९' (काशीनाथ के. कवळेकर) – परीक्षण, नोव्हें.
: महाराष्ट्रातील प्रबोधनाची चळवळ व शास्त्रीजी, फेब्रु.–मार्च
चिटणीस–माडगूळकर, विजया : व्यावहारिक मराठीचे परभाषिकांना अध्यापन, ऑगस्ट–सप्टें.
चिपळोणकर, व. त्रि. : विज्ञान व त्यामधील तर्कनिष्ठता, मे
चौधरी, ज. सु. : 'द कॅटल इकॉनॉमी ऑफ इंडिया' (वि. म. दांडेकर) – परीक्षण, ऑक्टो.
: भारतातील मक्तेदारीचे नियंत्रण, मे
: 'व्यवस्थापन : एक शास्त्र', डिसें.
चौधरी, सौदामिनी : 'तञ्जपुरीमहात्म्य' (संपा. टी. आर्. भीमराव)– परीक्षण, जुलै
चौसाळकर, अशोक : शरद् पाटलांच्या उत्तरावरील प्रतिक्रिया (पत्र), नोव्हें.
चौहान, दे. व्यं. : 'राजवाडेकृत ज्ञानेश्वरीचे व्याकरण' (संपा. शं. गो. तुळपुळे)– परीक्षण, डिसें.
जाधव, रा. ग. : शास्त्रीजींचा सामाजिक विचार, फेब्रु. – मार्च
जोशी, अविनाश : मे ८१ अंकातील 'तिसरे क्रांतिमूल्य' या लेखाच्या अनुषंगाने माहिती (पत्र), जुलै
जोशी, अशोक कृष्णाजी : 'सौंदर्यानुभव' (प्रभाकर पाध्ये) – परीक्षण, मे
जोशी, इंदु : माझे सासरे, फेब्रु. – मार्च
जोशी, मधुकर : आबा व मी, फेब्रु. – मार्च
जोशी, र. कृ. : जाहिरातव्यवहार आणि मराठी, ऑगस्ट–सप्टें.
जोशी, लक्ष्मणशास्त्री : दलित साहित्य ही युगांतरसूचक घटना, मे
: प्रस्तावना (वसंत पटवर्धनकृत 'आर्य' या कादंबरीची), नोव्हें.
: 'सुमति–दर्शनम्' (सुमती नारळीकर), संस्कृत लेखसंग्रह (परीक्षण), जुलै
जोशी, लक्ष्मी : माझे आजोबा, फेब्रु.–मार्च
जोशी, वि. रा. : 'कोवळे दिवस' (व्यंकटेश माडगूळकर), आत्मनिवेदन (परीक्षण), डिसें.
ठाकूर, अ. ना. : 'नोबेल पारितोषिके : १९८०', जाने.
ठोंबरे तानाजी : 'कोरस' (विश्वास वसेकर) कवितासंग्रह (परीक्षण), जाने.
: 'वृंदगान' (फ. मु. शिंदे), काव्यसंग्रह (परीक्षण), नोव्हें.
डोळके, सुरेश म. : 'आचार्य' दप्तरी यांचे तत्त्वज्ञान, पूर्वार्ध, जुलै
तळवलकर, गोविंद : वृत्तपत्रे व मराठी, ऑगस्ट–सप्टें.
तुळपुळे, वि. स. : मराठी भाषेच्या सहस्रवर्षपूर्तीच्या निमित्ताने, जून.
थिटे, गणेश : संस्कृत साहित्यात विट्ठल, डिसें.
थोन्टे, विश्वनाथ : ओडिसीअस एलायतिस, डिसें.
दामले, प्र. रा. : जाने. ८१ अंकातील दोन लेखांवरील प्रतिक्रिया (पत्र), एप्रिल
दावतर, वसंत : व्यावहारिक मराठी : इयत्ता ८ वी ते १२ वी, ऑगस्ट–सप्टें.
दासवाणी, तिलोत्तमा : 'व्यावहारिक इंग्रजी : परिचय व बोध', ऑगस्ट–सप्टें.
देवस्थळी, गो. वि. : 'वैदिक संस्कृतीचे पैलू' (चिं. ग. काशीकर) – परीक्षण, एप्रिल
देशपांडे, ज. शा. : 'मराठी भाषेचे मूळ' (विश्वनाथ खैरे) – परीक्षण, जाने.
देशपांडे, स. ह. : ऑक्टो. ८० अंकातील आ. ह. साळुंखे यांच्या लेखावरील प्रतिक्रिया (पत्र), एप्रिल



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

: मर्यादित शब्दसंग्रह व त्याचे परिणाम, ऑगस्ट–सप्टें.
देशपांडे, सी. जी. : ' शुभमंगल सावधान ' ( र. वै. शिरवैकर ) – परीक्षण, नोव्हें.
निपाणीकर, रा. पां. : महानुभाव पंथाचे अवैदिकत्व–एक पुनर्विचार, जाने.
: ' महानुभाव पंथाचे अवैदिकत्व : एक पुनर्विचार– पुरवणी ', एप्रिल
: मे ८१ अंकातील ' सदानंद ' यांच्या पत्रावरील खुलासा ( पत्र ), जून
: श्रीचक्रधरोक्त ' आचार्य ' कोण ? ऑक्टो.
नेने, रा. प. : समाजनिरीक्षकाच्या वाटेतील भाषाव्यवहाराचे खाचखळगे, ऑगस्ट–सप्टें.
पण्डित, राम : उर्दू नाटकांचा विकास, जाने.
पत्की, सुभाष : डॉक्टर आणि अशिक्षित रुग्ण यांचा संवाद, ऑगस्ट–सप्टें.
परांजपे, प्र. ना. : अनुवादकांचे प्रशिक्षण, ऑगस्ट–सप्टें.
पाटील, इरगोंडा : प्रौढसाक्षरांसाठी करायच्या लेखनाची भाषा, ऑगस्ट–सप्टें.
पाटील, शरद् : फुले तत्त्वज्ञानी होते काय ?, एप्रिल
: ' मानव आणि मार्क्स ' व पाध्ये, जुलै
: सप्टें. ८० अंकातील अशोक चौसाळकरांच्या लेखातील टीकेला उत्तर (पत्र), नोव्हें.
पाठक, यशवंत : ' मुकज्जी ' ( शिवराम कारंत; अनु. मीना वांगीकर), कादंबरी (परीक्षण), एप्रिल
पेंडसे, वि. नी. : कारखान्याच्या आवारातील भाषा, ऑगस्ट–सप्टें.
फडके, भालचंद्र : निरंतर शिक्षण आणि व्यावहारिक मराठी, ऑगस्ट–सप्टें.
बेलवलकर, सुमन : चर्चासार, ऑगस्ट–सप्टें.
: ' व्यावहारिक मराठी : गरज, मागणी, पूर्ती ' या चर्चासत्राविषयी थोडेसे, ऑगस्ट–सप्टें.
बोंडाळे, ग. वि. : सप्टें. ८० अंकातील आ. ह. साळुंखे यांच्या लेखावरील प्रतिक्रिया (पत्र), डिसें.
ब्रह्मे, माधुरी : ' हे झाड जगावेगळे ' ( वसंत नरहर फेणे ), कादंबरी (परीक्षण), जुलै
भागवत, गीता सुभाष : प्रशासकीय मराठी, ऑगस्ट–सप्टें.
भागवत, विद्युत : ' भारतीय शिक्षणाची वाटचाल ' (अ. रा. कामत)– परीक्षण, मे
: ' शिक्षणाचा सामाजिक संदर्भ ' ( अ. रा. कामत)– परीक्षण, मे
भावे, पुष्पा : ' नभोनाटयरूपांतर आणि नाटयरूपांतर : भाषिक प्रश्न ', ऑगस्ट– सप्टें.
मंचरकर, रत्नाकर बापूराव : ' समन्वय ' (केशव मेश्राम)– परीक्षण, डिसें.
मराठे, ना. बा. : प्राज्ञपाठशाळा आणि शास्त्रीजी, फेब्रु.–मार्च
मराठे, प्र. शं. : वार्धक्य हा रोग नव्हे, एप्रिल
मराठे, ह. मो. : 'व्यावहारिक मराठी : गरज आणि मागणी,' ऑगस्ट–सप्टें.
महाजनी, शैला बा. : आधुनिक आरण्यके व एका मूर्तिभंजकाचे तत्त्वविचार ' ( न्यायरत्न विनोद )– परीक्षण, जाने.
माडगूळकर, व्यंकटेश : प्रसारमाध्यमे आणि बोलभाषा, ऑगस्ट–सप्टें.
मिराशी, वा. वि. : पूर्वकालीन राष्ट्रकूटांच्या मानपुर राजधानीचा शोध, ऑक्टो.
मिश्र, क्रान्तिप्रकाश : व्यावहारिक हिन्दी, ऑगस्ट–सप्टें.
मुजुमदार, शां. ब. : व्यावहारिक मराठी आणि विद्यापीठीय चौकट, ऑगस्ट–सप्टें.
मुळे, देवीदास : ' ग्रामसेवकांच्या समस्या : एक अभ्यास,' मे
मेहेंदळे, म. अ. : मन्त्रब्राह्मणोपनिषद, फेब्रु.–मार्च
: मित्र (वेद) आणि मिथ्र (अवेस्ता), जुलै
: होम यश्त (यस्न १० व ११ चे मराठी भाषांतर), ऑक्टो.
रेगे, मे. पुं. : ' गद्य : समाजपरिवर्तनाचे एक वाहन आणि साधन ', ऑगस्ट–सप्टें.
: ' परंपरा आणि आधुनिकता : प्राज्ञपाठशाळेचा दृष्टिकोन ', फेब्रु.–मार्च
: अनु. विकसनशील देश आणि मूलभूत संशोधन (मूळ लेखक राजा रामण्णा), ऑक्टो.
लिमये, माधव : पाकिस्ताननिर्मितीची मीमांसा, जुलै



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वकील, ए. के. : महाराष्ट्र विधिमंडळातील प्रादेशिकवाद, नोव्हें.

वडेर, प्रल्हाद : 'पाण्यावरची अक्षरे' (गंगाधर गाडगीळ), समीक्षा (परीक्षण) जून

वऱ्हाडपांडे, नी. र. : एप्रिल ८१ अंकातील आ. ह. साळुंखे यांच्या लेखासंबंधी विचारणा (पत्र), मे

: वंशदाय, सुजनन आणि मानवी समता, जून

शिंदे, गौतम : बौद्धवाद आणि मार्क्सवाद, एप्रिल

शेजवलकर, प्र. चि. : व्यापार उद्योग आणि मराठी, ऑगस्ट–सप्टें.

'सदानंद' : ऑक्टो. व डिसें. ८० अंकांतील 'श्री चक्रधरोक्त आचार्य कोण ?' या लेखांवरील प्रतिक्रिया (पत्र), मे

सराफ, रा. सो. : व्यावहारिक मराठीचा शालेय पाया इयत्ता १ ते ७, ऑगस्ट–सप्टें.

साठे, सत्यरंजन : कायद्यासंबंधी लोकांचे व विद्यार्थ्यांचे शिक्षण, ऑगस्ट–सप्टें.

सावरकर, सुभाष : 'संतश्रेष्ठ तुकाराम : वैकुण्ठगमन की खून ?' (सुदाम सावरकर) – परीक्षण, जून

साळुंखे, आ. ह. : 'लोकायतदर्शन : ऋणसंकल्पना व अहिंसा,' ऑक्टो.

: लोकायतदर्शन : वार्ता, चातुर्वर्ण्य व यज्ञ' डिसें.

: 'लोकायतदर्शन : सिंधु–संस्कृती ते विसावे शतक' (पूर्वार्ध व उत्तरार्ध), जाने., एप्रिल व जून

: 'लोकायतदर्शन : स्त्री व कामजीवन' नोव्हें.

सुतार, अ. मा. : 'ज्ञानोदय' आणि महाराष्ट्राचा सामाजिक इतिहास, डिसें.

सुब्बय्या, राज्यश्री : मातृभाषेसाठी दुवा – पाठ्यक्रम, ऑगस्ट – सप्टें.

सोनटक्के, कमलाकर : 'वाचिक अभिनय : एक अभ्यासक्रम,' ऑगस्ट–सप्टें.

---

# लेख–सूची (अकारविल्हे)

'अध्यापन : भाषेचे आणि साहित्याचे' : ना. गो. कालेलकर, ऑगस्ट–सप्टें.

अनुवादकांचे प्रशिक्षण : प्र. ना. परांजपे, ऑगस्ट–सप्टें.

अमराठी भारतीयांसाठी मराठी भाषा : कल्याण काळे, ऑगस्ट–सप्टें.

'अस्तोदय' (शंकर शामराव काळे) काव्य (स्वागत) : सतीश वि. कुलकर्णी, एप्रिल

'आचार्य' दप्तरी यांचे तत्त्वज्ञान : सुरेश म. डोळके (पूर्वार्ध), जुलै

'आणि बाकीचे सगळे' (शाम मनोहर), कथासंग्रह (परीक्षण) : श्यामकांत कुलकर्णी, जून

'आत्मसंकल्पना : आत्मवाद' : शि. स. अंतरकर, ऑक्टो. व नोव्हें.

'आत्मसंकल्पना : देहात्मवाद' : शि. स. अंतरकर, डिसें.

'आधुनिक आरण्यके व एका मूर्तिभंजकाचे तत्त्वविचार' (न्यायरत्न विनोद) – परीक्षण : शैला बा. महाजनी, जाने.

आबा व मी : मधुकर जोशी, फेब्रु.–मार्च

'आम्ही यातनांचे स्वामी' (वामन देशपांडे), लघुकादंबरी (परीक्षण) : एस्. डी. इनामदार, डिसें.

'इस्कोट' (भीमसेन देठे), कादंबरी (परीक्षण) : सतीश वि. कुलकर्णी, एप्रिल

उर्दू नाटकांचा विकास : राम पण्डित, जाने.

'ऋतुस्पर्श' (अशोक बेंडखळे) – स्वागत : सतीश वि. कुलकर्णी, एप्रिल

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

